# महाराष्ट्र सांवत्सरिक

अथवा

## मराठी वार्षिक ज्ञानसंग्रह

इ. स. १९३५



संपादक

श्रीपाद महादेव माटे एम्. ए.



शके १८५७ ] आवृत्ति पहिली [ इ. स. १९३५

मजकूर न छापतां या नव्या मजकुरालाच जागा देणें प्रशस्त वाटलें म्हणून कॉम्यूनल ॲवार्डसंबंधींचा मजकूर रद्द केला.

श्रीपाद महादेव माटे

# प्रास्ताविक

१९३५ सालचें महाराष्ट्र सांवत्सरिक आज लोकमान्यांच्या पुण्यतिथीच्या दिवशीं प्रसिद्ध होत आहे.

सांवत्सरिकांत नेहमीचीं सर्व सदरें घातलीं आहेत. कामगार मंडळांची हकीकत, हैदराबाद संस्थानांतील हिंदूंची माहिती, मुख्य मुख्य परिषदांचे मुख्य मुख्य ठराव हीं प्रकरणें शिवाय घातलीं आहेत. दौऱ्याचें प्रकरण व्यापक केलें आहे. परदेशाच्या हकीकती वाचनांत फार येतात व त्यांत तिकडील मोठ्या लोकांचीं नांवें अनेकदां भेटतात म्हणून अशा लोकांपैकीं ज्यांचीं चरित्रें देतां आलीं त्यांचीं दिलीं आहेत. कौटुंबिक स्वास्थ्याची कल्पना यावी म्हणून सरकारी गणनाकोशावरून स्वतंत्र कोष्टकें दिलीं आहेत. ‘ उपस्थित प्रश्न ’ हें गतवर्षीचें प्रकरण ‘ पृथ्वीप्रदक्षिणा ’ या नांवानें यंदा दिलें असून त्यांत ज्या अनेक प्रश्नांमुळें त्या त्या देशांतील व जगांतील लोकांच्या मनांत खळबळ चालू आहे त्यांची विवेचनपर हकीकत अनेक मासिकें, पत्रें इ. वरून दिली आहे. इतर विशेष मजकुराचा तपशिल अनुक्रमणिकेंत आलेलाच आहे. याशिवाय महाराष्ट्राचा एक सुंदर रंगीत नकाशा जोडलेला असून त्यांत मुख्यत: कमी प्रसिद्ध अशीं स्थळें दाखविलीं आहेत, व सोबत सूचींत तीं स्थळें कशासाठीं ध्यानांत ठेवावयाचीं हें सांगितलें आहे. शेवटीं पुस्तकाचें दर्शनी पान चांगलें दिसेसें केलें आहे.

नकाशा तयार करण्याचें अवघड काम श्री. शंकरराव जोशी या इतिहाससंशोधकांनीं केलें. तसेंच तो नकाशा वठविण्याचें काम श्री. गुर्जर यांनीं फार चांगलें केलें. निजामशाहीची येवढी सविस्तर हकीकत तयार करून धाडण्याचें काम श्री. काशीनाथपंत वैद्य एम. ए., एलएल. बी. वकील हैदराबाद यांनीं पत्करलें व सिद्ध केलें. त्यांच्या मित्रांनींही त्यांना पुष्कळच मदत केली आहे. श्री. नानासाहेब राजमाचीकर, श्री. दत्तात्रय बापू रानडे, डॉ. मुकुंदराव वझे, श्री. दादासाहेब केतकर, श्रीनिवासराव पाटणकर व माधवराव भावे या मंडळींनीं कामाला बराच हातभार लाविला. मुख्य कामाचा भार मात्र श्री. मोरेश्वर सखाराम देशपांडे, व श्री. वासुदेव माधव भिडे यांजवरच पडला. जलदीनें व बौद्धिक मेहेनतीनें एकादें काम उरकावयाचें असलें म्हणजे ज्या ज्या गुणांची आवश्यकता असते ते सर्व गुण उभयतांनीं प्रकट केले म्हणून मला हें सांवत्सरिक प्रसिद्ध करतां येत आहे. या सर्वांचा मी ऋणी आहें. माझे फार दिवसांचे स्नेही श्री. शंकरराव ऊर्फ मामासाहेब दाते यांची हरकत नसती तर त्यांनीं केलेल्या साह्याचाही मी उल्लेख केला असता. ज्या लेखकांना मी कांहीं मजकूर तयार करावयास सांगितला पण ज्याचा अन्तर्भाव मला करतां आला नाहीं त्यांनीं क्षमा करावी.

हैदराबाद संस्थानासंबंधीं बराच मजकूर हातीं आल्यामुळें पूर्वीं एकेकदां आलेला मजकूर न छापतां या नव्या मजकुरालाच जागा देणें प्रशस्त वाटलें म्हणून कॉम्यूनल ॲवार्डसंबंधींचा मजकूर रद्द केला.

श्रीपाद महादेव माटे

# अनुक्रमणिका



---

## चुकीची दुरुस्ती.

पान १७–गुजराथ हा ठळक शब्द पडला आहे.
पान ३०–'महाराष्ट्राबाहेरील' हा ठळक शब्द चुकून पडला आहे.
पान४९–'अक्कलकोटचे' मागें १० हा आंकडा-हवा
पान ५०– 'सांगली' मागें ११ हा आंकडा हव

# नकाशांतील स्थलांची सूचि



शेजारीं दिलेल्या नकाशांत जीं गांवें दाखविलीं आहेत त्यांतील मुख्यतः अप्रसिद्ध गांवीं काय झालें हें त्या त्या गांवापुढें दिलें आहे. प्रसिद्ध गांवीं काय झालें हें सर्वांसच माहित आहे.

अर्नाळा—थो. बाजीराव घेतो. १७३७

अवचितगड—.... .... .... १७३३

अंजनेरी—राघोबादादाचें वसतिग्राम १७६४

अंबे—(जोगाईचें) सिंघण सेनापति खोलेश्वराचें ठिकाण.

उंबरखिंड—शिवाजी कहारतलब खानाचा पराभव करतो. १६६० फे. २

कऱ्हाड—बौद्धकालीन प्रमुख शहर.

कल्याण—बौद्धकालीन धर्म-क्षेत्र

कल्याणी—चालुक्यांची राजधानी

केळंजा—शिवाजी घेतो १६७४ एप्रिल २४

कोणेगांवः—बापू गोखले व प्रतिनिधी यांची लढाई. १८०६ परशुरामपंत-प्रतिनिधींचा हात तुटतो.

खळद—बेलसरः—शिवाजीचें फत्तेखानाशीं युद्ध

खेडे-बारें—शिवाजीचा वाडा. १६४०

खोलापूर—सिंघण सेनापति खोलेश्वराचा जन्म

गुलबुर्गा—बहामनी राज्याची पहिली राजधानी.

चाकण—दक्षिणी मुसलमानांनीं परदेशी मुसलमानांची कत्तल केली. १४४५

चौल—(चेऊल) इ. स. पूर्व व्यापारी शहर.

जमखंडी—बाळाजी विश्वनाथाची स्वारी. १७१९

जुन्नरः—क्षत्रपकालीन मोठें गांव.

तालिकोट—रामदेवराव व ब्राह्मणी पातशाहया यांची लढाई १५६५

तुळापूर—मुरार जगदेव—तुला १६३०

तेर—दोन हजार वर्षांपूर्वीचें व्यापार नगर.

त्रिंबक—( श्रीगड ) मोरोपंत पिंगळे घेतो. १६७०

नाशिक—क्षत्रप व शातवाहन यांचें प्रमुख गांव.

निजामपूर—शिवाजी लुटतो. १६६१ फे.

नांदेड—गुरु गोविंदसिंगाची समाधी.

दिंडोरी—मोरोपंत पिंगळे व मोगल यांची लढाई. १६७० आक्टो. १७

देवगड—रघूजी भोसले घेतो. १७३७

पद्मपूर—भवभूति कवीचा गांव.

पन्हाळा—शिलाहारांची राजधानी.

पवनी—रघूजी भोसले सर करितो. १७३६

पाचाड—राजमाता जिजाबाईचा मृत्यू १६७४ जून १७

पाटण—भास्कराचार्याचा मळ गाव.

पाली—औरंग०पुत्र अकबर छ. संभाजीकडे येतो. १६८१ मे.

पुणें—राष्ट्रकूट कालीन प्रांतस्थल. शके ११००

पुरंदर—मुरारबाजी युद्ध, छत्र. संभाजी व सवाई माधवराव यांचें जन्म-स्थान.

पेण—शिवाजी मोगलांचा खजिना लुटतो; पार्वतीबाई पेशवे यांचें माहेर.

पेमगिरी—शहाजी निजामशाहीचें पुनरुज्जीवन करितो. १६३२

पोलादपूर—शिवाजीच्या सैन्याचा तळ १६५९

फलटण—बदामी तालुक्यांचें प्रसिद्ध नगर.

फोंडा—शिवाजीची स्वारी १६७५

बऱ्हाणपूरः—निजामउल्मुल्क मृत्यू. १७४८ मे. २१

बसनूर—शिवाजीची आरमारी स्वारी.

बीड—मोगल—शहाजी युद्ध.

बीरवाडी—थो. बाजीराव हबशापासून घेतो १७३३

भगवंतगड—बावडेकर बांधतात १७०१

भुलेश्वर—दौलतमंगळ—पुणें प्रांताचें मुख्य ठिकाण १६२०

भातवडी—निजामशहाचें मोगल व अदिलशहा यांबरोबर युद्ध. शहाजीचा पहिला पराक्रम १६२४

भाम–नागपूरकर भोसले यांचा मूळ गांव.

भांदक–वाकाटक व सोमवंशी यांची राजधानी.

माहुली किल्ला–शहाजी–मोगल युद्ध १६३६

माहुली–(सातारा) छ. शाहू व प्र. परशुराम त्रिंबक यांची समाधी.

मंगळवेढें–कळचुर्य घराण्याची पहिली राजधानी.

रहिमतपूर–रणदुल्लाखान कबर १६४३

रामनगर–शिवाजीची स्वारी १६७२

रोहिडा–शिवाजी परत घेतो. १६७० जून २४

लातूर–राष्टकूटांचा मूळ गांव

वडू–छत्र. संभाजीराजे–समाधि. १६८९

वर्धनगड–शिवाजीचा उन्हाळ्यांतील मुक्काम १६६१ आक्टो. नोव्हें.

वासोटा–शिवाजीनें घेतला जुलै ६–१६६०

वेलूर–शिवाजीची स्वारी १६७८

वैराटगड–महार मंडळी मोंगलापासून घेऊन शाहूस देतात. १७१०

शिरवळ–राष्ट्रकूटकालीन तालुक्याचें ठिकाण

साते–नानासाहेब पेशवे जन्म १७२१ डिसें. १२

साल्हेरमुल्हेर–मोरोपंत पिंगळे घेतात १६७०

सोनोरी–मल्हारीगड:–पानसे बांधतात १७७५

संपगांव–शिवाजी लुटतो. १६७४ मार्च २२

सिंधदुर्ग–शिवलंका. १६६४ मध्यें छत्रपती शिवाजीनें बांधली.

सिंहगड–शिवाजीनें प्रथम घेतला १६४७

हिवरें–सखारामपंत बोकील यांचें मूळगांव.

---

KMChanodkar

# चरित्रें

१ अॅट्ली, मेजर, क्लीमेंट आरः—वय ५२. ऑक्सफोर्ड येथें शिक्षण. वकील. महायुद्धांत भाग घेतला. १९२२ पासून पार्लमेंटमध्यें मजूर पक्षाचा सभासद. मजूरपक्षाचे प्रधानकींत युद्ध-मंडळाचा चिटणीस, १९२४. हिंदुस्थानांत पाठविलेल्या कमिशनचा सभासद १९२९–३०. पोस्टमास्तर जनरल. मजूर पक्षाचा पुढारी असूनहि १९३१ त निवडून आला.

२ अमेरी, नेक नामदार, लिओपोल्ड एस्:–वय ६२. ऑक्सफोर्डच्या एका कॉलेजचा फेलो १८९७ टाईम्स संपादक-कचेरी-पत्रपांडित्य १८९९-१९०९. कायदेपांडित्य १९०२. पार्लमेंटरी अंडर सेक्रेटरी फॉर कॉलनीज. बर्मिगहॅमसाठीं पार्लमेंटचा सभासद १९११–१८; युद्धमंडळाचा सहचिटणीस १९१७; नौकानयन खात्याचा खजिनदार. नौकानयन खात्याचा मंत्री, वसाहतमंत्री १९२४–२९.

३ ॲनन्झिओ, गॅब्रिएल ' डी. ':–वय ७२. इटलीचा प्रमुख कवि, कादंबरीकार, नाटककार. कादंबऱ्या व नाटकें एकदम १९११ मध्यें पुढें आलीं व लोकप्रिय झालीं. त्याच्या तेजस्वी व्याख्यानांचा सर्व इटलीवर परिणाम होऊन लोक युद्धांत पडण्यास अधिक उत्सुक झाले, १९१५. व्हिएन्ना येथें विमानदल घेऊन गेला १९१८. व्हर्सेल्सच्या तहांतील दोस्तराष्ट्रांच्या धोरणाचा निषेध केला. प्रिन्स ऑफ मॉन्टे नेव्होसो १९२४.

४ अल्फान्सो, स्पेनचा माजी राजाः–वय ४९. जन्मतःच राजा. एका जर्मन राजकन्येशीं लग्न १९०६. मोठ्या उत्साहानें व जोमानें राज्य केलें. नेहमीं इंग्लंडचा प्रवास करी. युद्धांतले कैदी कोठे आहेत त्यांचा तलास लावण्यासाठीं एक अधिकारीमंडळ निर्माण केलें. ऑक्सफोर्डची सन्मान्य पदवी १९२६ त मिळाली व तेथें स्पॅनिश शिक्षणाची शाखा सुरू झाली. ब्रिटिश आरमाराचा फील्ड मार्शल म्हणून काम केलें. लोकसत्ताकाची स्थापना होतांच राज्यपद सोडलें व सर्व कुटुंबासह स्पेन सोडलें १९३१. त्याच्या मोठ्या मुलानें राजघराण्यांतली मुलगी न पाहतां एका सामान्य मुलीशीं लग्न केलें. दुसरा १९ वर्षांचा मुलगा ऑस्ट्रियांत मोटारचा अपघात होऊन मेला १९३४.

५ अलेन्बी, फील्ड मार्शलः––वय ७३. सॅन्ढर्स्ट कॉलेजांत शिक्षण. बेचुआनालॅंड. १८८४-८५; झुलू लॅंड १८८८, आणि दक्षिण अफ्रिका १८८८ ते १९०२, या तीन लढायांतून शिपाईगिरी केली. घोडदळाचा अधिकारी १९०५ ते १९१०. महायुद्धाचे सुरुवातीस घोडदळाचे सैन्याचा अधिपति; जनरल झाला १९१७; इजिप्तमधें लढाया, जेरूसलेम घेतलें १९१७. मोठा विजय, १९१८. फील्डमार्शल झाला, १९१९. आणि ५०००० पौंडांची सनद मिळून व्हायकाउंट झाला. इजिप्तचा हाय कमिशनर १९१९ ते १९२५.

६ आइन्स्टाइन, प्रो. अल्बर्टः––वय ५६. म्युनिच व झुरिच येथें शिक्षण. स्वित्सलंडचें राष्ट्रीयत्व स्वीकारलें. झुरिच विश्वविद्यालयांत प्रोफेसर एक्स्ट्रा ऑर्डिनरी. बर्लिन येथें जाऊन सापेक्षता प्रमाणाचा सिद्धांत अकॅडमी ऑफ सायन्सपुढें व्याख्यान. व्हायोलिन वाजविण्यांत कुशल. १९२१ त इंग्लंडला जाऊन आला. जर्मनींतून हद्दपार १९३३.

७ आगाखान, नामदारः–वय ५८. खोजांचा धार्मिक मुख्याधिकारी व हिंदुस्थानांतील मुसलमानांचा एक पुढारी. केंब्रिजची सन्मान्य पदवी १९११. मुंबई इलाख्याचा पहिल्या वर्गाचा चीफ म्हणून बादशहाकडून नेमणूक. इंग्लंडमधील घोड्यांच्या शर्यतींत त्याचे घोडे अनेकदां पहिले आले आहेत. १९२९ त एका फ्रेंच

बाईशीं लग्न. १९३०–३१ च्या गोलमेजपरिषदेंत प्रमुख भाग. प्रीव्ही कौन्सिलर १९३४.

८ **इमॅन्युअल**, व्हिक्टर तिसरा, इटालीचा राजा :—वय ६६. बापाचा खून झाला व हा गादीवर आला १९००. मॉंटेनेग्रोच्या प्रिन्सेस हेलेनशीं विवाह १८९६. मेसिना येथें झालेल्या धरणीकंपांतील जखमी लोकांची व्यवस्था स्वतः श्रम घेऊन केली १९०८. उद्योगी, मनमिळाऊ आणि पुस्तकें वाचण्याची हौस. १९१५ मध्यें महायुद्धांत दोस्तराष्ट्रांना मदत करण्यासाठीं आपल्या देशास मोठ्या उत्साहानें रणांत नेलें. मिलन येथें १९२८ मध्यें त्याचा जीव घेण्याचा प्रयत्न झाला. त्याच्या ज्येष्ठ मुलाचें लग्न बेल्जियमच्या राजकन्येशीं झालें, १९३४.

९ **इरिस**, मॉन्सेल, नेक नामदारः—वय ५४. प्रथम आरमारांत दाखल. टॉरपेडो–लेफ्टनंटचें काम करण्यांत पटाईत पार्लमेंटमध्यें प्रवेश १९१०. युद्ध सुरूं झाल्यावर पुन्हां आरमारांत शिरला. युनिअनिस्ट पक्षाचा पुढारी १९२३–३१. सिव्हिल लॉर्ड ऑफ दि अॅडमिरल्टी १९२१–२२. आरमार खात्याचा फडणवीस १९२२–२३. पार्लमेंटचा खजिन्यावरील कारभारी १९२३–२९. फर्स्ट लॉर्ड ऑफ दि अॅडमिरॅल्टी १९३१ पासून.

१० **इलियट**, नेक नामदारः—वय ४७, लढाईंत हॉस्पिटलवर डॉक्टर. १९१८ पासून पार्लमेंटचा कॉन्झर्व्हेटिव्ह सभासद. अंडर सेक्रेटरी फॉर स्टेट फॉर स्कॉटलंड १९२४–२९. १९३१ पासून खजिन्याचा फडणवीस. शेतकी खात्याचा मंत्री १९३२.

११ **एडिंग्टन**, प्रो.:—वय ५३, केंब्रिज येथें शिक्षण. सीनियर रँगलर १९०४. केंब्रिज येथें ग्रहज्योतिषाचा अध्यापक १९१३. वेधशाळेचा दिग्दर्शक १९१४. त्याचीं व्याख्यानें व पुस्तकें खळबळ उडविणारीं अशीं झालीं. "दि नेचर ऑफ दि फिजिकल वर्ल्ड" हें त्याचें अगदीं नवीन पुस्तक.

१२ **एडन**, नेक नामदार, कॅप्टनः—वय ३८. ईटन व ऑक्सफोर्ड येथें शिक्षण. सर ऑस्टिन चेंबरलेन यांचा पार्लमेंटरी प्रायव्हेट सेक्रेटरी. १९२३ पार्लमेंटचा सभासद निवडून आला. पार्लमेंटमध्यें व जिनीव्हा येथें भाषणें केल्यामुळें नांवास आला, १९३३. परराष्ट्रीय कारभाराचा सहचिटणीस. लॉर्ड प्रिव्ही सील.

१३ **कनलिफ**, लीस्टर नेक नामदारः—वय ५१. युद्धांत भाग घेऊन नंतर कॅबिनेटमध्यें सेक्रेटरी १९१७. दोन सिलेक्ट कमिटीजमध्यें काम. मि. बोनर लॉ याचे कॅबिनेटमध्यें जागा मिळविली १९२२; आणि बाल्डविनच्या वेळींहि ती कायम ठेवली. बोर्ड ऑफ ट्रेडचा अध्यक्ष १९२४. बायकोला मोठी मिळकत वारसा हक्कानें मिळाली म्हणून वरील नांव घेतलें १९२९. पहिलें नांव सर फिलिप लॉइड ग्रॅम. १९३१ पासून वसाहतमंत्री.

१४ **कार्सन**, लॉर्डः— वय ८१. प्रथम आयर्लंड व मग इंग्लंड या दोनहि ठिकाणीं साध्या वकिलापासून सॉलिसिटर जनरलच्या जागेपर्यंत बढती. रीडर टु दी इन्स ऑफ कोर्ट १९१२. होमरूल विरोधकांची चळवळ सुरू करून अल्स्टर स्वयंसेवकांचा संघ स्थापन केला १९१३. कोअॅलिशन मिनिस्ट्रींत अॅटॉर्नी जनरल व लगेच राजीनामा १९१५. फर्स्ट लॉर्ड ऑफ दि अॅडमिरल्टी १९१६. युद्धमंडळाचा सभासद १९१७. राजीनामा १९१८. पुनः वकिली. अल्स्टरच्या स्वतंत्र पार्लमेंटचा पहिलाच प्रधान होण्याचें नाकारलें १९२१.लॉर्ड १९२१.चरित्र प्रसिद्ध झालें १९३२. पुतळा उभारला १९३३.

१५ **किपलिंग**, रुडयार्डः—वय ७०. तरुणपणीं लाहोरच्या एका नियतकालिकांत 'बरॅक रूम बॅलड्स' लिहून प्रसिद्ध झाला. त्याचें नांव युरोपांत गेलें. खूप प्रवास केला आणि कांहीं वर्षें अमेरिकेंत राहिला. गोष्टी व कविता लिहून कीर्ति संपादन केली. १९०७ मध्यें वाङ्मयासाठीं नोबेल प्राईझ मिळालें. दुसऱ्या एका मित्राच्या सहकार्यानें "मुलांसाठीं इंग्लंडचा इतिहास" लिहिला १९११. कवितांचें पुस्तक निघालें १९१२.

त्याचा एकुलता एक मुलगा महायुद्धांत पडला. लॉर्ड रेक्टर ऑफ सेंट अँड्रयूज युनिव्हर्सिटी १९२३. रॉयल सोसायटी ऑफ लिटरेचरकडून सुवर्णपदक मिळालें १९२६.

१६ **केमाल पाशा**, मुस्तफा, तुर्की लोकसत्ताकाचा स्वामी:—वय ५५. जन्म सॅलोनिका येथें. लहानपणींच बाप मेला. शिक्षण इस्तंबूल लष्करी विद्यालय. सैन्यांत असतांना सुलतान अबदुल हमीद याला विरोध केला म्हणून तुरुंगांत. तुर्की इटालियन युद्धांत शिपाईगिरी १९११. कर्नल १९१३. तुर्कांनीं लढाईत (१४ च्या) पडूं नये यासाठीं यत्न. पण पुढें युद्ध सुरूं झाल्यावर अपूर्व पराक्रम. तुर्की सैन्याच्या उत्तर विभागाचा सेनापति, गॅलिपोली १९१५. काकेशसमधील सैन्यावर १९१६. इन्स्पेक्टर जनरल ऑफ ऑटोमन फोर्सेस, अॅनाटोलिया १९१९. तुर्कस्तानच्या राष्ट्रीय सभेचा अधिपति १९२०.गाझी १९२१.नवीन तुर्की लोकसत्ताकाचा स्वामी १९२३ पासून. इराणचा शहा भेटून गेला १९३४.

१७ **केलॉग**,नामदार फ्रॅंक, बी:—वय ७९.अमेरिकन वकील१८७७.प्रथम सरकारी वकिली व मग खाजगी. सीनेटमध्यें १९१७–१९२२.अमेरिकेच्या वकील मंडळाचा अध्यक्ष १९१२. ग्रेट ब्रिटनकडे अमेरिकेचा वकील म्हणून १९२३. गृहमंत्री १९२५–२९. आंतरराष्ट्रीय न्यायसभेंत न्यायाधीश १९३० पासून.

१८ **कॉवर्ड**, नोअेल:—नट आणि नाटककार. वय ३५. अकराव्या वर्षापासून रंगभूमीवर उभा आहे. स्वतःच्याच एका नाटकांतील भूमिका अत्यंत सुंदर रीतीनें वठवून लोकप्रिय झाला. सुरवातीपासूनच उत्तम नाटकें लिहिणें आणि त्यांतील भूमिका उत्तम अभिनयानें यशस्वी करून दाखविणें अशा सव्यसाची कौशल्यांत तो प्रथितयश आहे.

१९ **कॉसग्रेव्ह**, माजी अध्यक्ष:— वय ५५. डब्लिनच्या कॉर्पोरेशनचा प्रमुख सभासद. पार्लमेंटमध्यें १९१७–१९२२ आयरिश फरीस्टेटचें कॅबिनेट १९२२ त स्थापन झालें तेव्हां तात्पुरता अध्यक्ष. १९२७ मध्यें पुन्हां निवडून आला. अमेरिकेंत प्रवास १९२८ पुन्हां अध्यक्ष म्हणून निवडून आला, १९३०. पुढें १९३२ मध्यें डी व्हॅलेरानें त्याचा पराभव केला.

२० **कॅनॉट**, हिज रॉयल हायनेस, प्रिन्स ऑर्थर ऑफ :—वय ४५. ईटन व ऑक्सफर्ड येथें शिक्षण. महायुद्धांत नोकरी.१९२४ पासून पार्लमेंटमध्यें. युद्धखात्याचा खजिनदार १९२८–२९. टॉलेरँड यांचें सुंदरसें चरित्र प्रसिद्ध केलें १९३२. फील्ड मार्शल, अर्ल हेग याचें चरित्र सध्यां लिहीत आहे.

२१ **कॉलिन्स**, नेक नामदार:— वय ६०. युद्धकालीं आरमारांत नोकरी. पार्लमेंटचा सभासद. ज्यूनिअर लॉर्ड ऑफ दि ट्रेझरी १९१९–२०. उदारमतवाद्यांचा पुढारी १९२४–२६. सर आर्चिबाल्ड सिन्क्लेअर यांच्या राजीनाम्यानंतर कॅबिनेटमध्यें प्रवेश. सेक्रेटरी ऑफ स्टेट फॉर स्कॉटलंट १९३२ पासून.

२२ **गार्व्हिन**, जे. एल., एल एल. डी.:— वय ६७. "औट–लुक" व "पेल पेल गॅझेट" यांचा पूर्वींचा संपादक व सध्यां "दि ऑब्सर्व्हर" चा संपादक. "एन्सायक्लोपीडिआ ब्रिटानिका" या जगप्रसिद्ध ज्ञानकोशाचा संपादक १९२६–१९२९. बाल्कन युद्धावरील त्याचे लेख नाणावलेले आहेत आणि महायुद्धांतहि त्याचे लेख उंचावरून लिहिलेले असत. पत्रपंडितांच्या मंडळाचा अध्यक्ष १९१८. जोसेफ चेंबरलेन याचें चरित्र लिहिले १९३२. "शांततेचा आर्थिक पाया" याविषयीं एक ग्रंथ लिहिला साम्राज्यांतील प्रेस युनियन कौन्सिलचा अध्यक्ष १९२६–२७.

२३ **गार्डिनर**, ए. जी.:— वय ७०. '**डेली** न्यूज' चा संपादक १९०२–१९१९. 'प्रॉफेट्स प्रिस्ट्स अँड किंग्ज,' 'पिलर्स ऑफ सोसायटी' १९१३, वॉर लॉर्डस् १९१५ हीं पुस्तकें लिहिलीं स्वभावचित्रें लिहिण्यांत कुशल. पत्रपंडितांच्या मंडळाचा अध्यक्ष १९१५. 'डेली न्यूज'च्या संपा-

दकत्वाचा राजीनामा १९१९. अमेरिकेंत प्रवास, व जर्मनींतील प्रवासाचें वर्णन. 'सर्टन् पीपल ऑफ इंपॉर्टन्स' १९२६.

२४ **गिलमोर**, ले. कर्नल, नेक नामदार:—वय ५८. पार्लमेंटचा सभासद. बोअर युद्ध व महा युद्ध यांत शिपाईगिरी. बाल्डविनच्या कॅबिनेटमध्यें १९२४. एडिंबरो विश्वविद्यालयाचा लॉर्ड रेक्टर १९२६. सेक्रेटरी ऑफ स्टेट फॉर स्कॉटलंड, ज्यूनिअर लॉर्ड ऑफ दि ट्रेझरी आणि शेतकी खात्याचा प्रधान अशीं कामें केल्यावर १९३२ पासून गृहमंत्री.

२५ **गोरॉड**, जनरल:—वय ६७. शूर फरेंच सैनिक, महायुद्धाच्या सुरुवातीस शौर्य दाखविलें म्हणून त्यास 'अरगॉनचा सिंह' असें नांव पडलें. १९१५ मुख्य सेनापति. जखमी सैनिकांच्या शुश्रूषेंत असतांना तोफेच्या गोळयानें जखमी. १९१८ च्या लढाईंत अप्रतिम कौशल्यानें शत्रूचा पराजय. लंडनचा प्रवास १९२६.

२६ **गोअरिंग**, जनरल: –एका बव्हेरिअन मुत्सद्याचा मुलगा. जर्मनीचा सेनापति. रिचस्टॅगचा अध्यक्ष. विमानखात्याचा मंत्री आणि गृहमंत्री. महायुद्धांत वैमानिकांचा नेता. नाझी पक्षांत हिटलरचा उजवा हात. जर्मन सरकारच्या विरोधकांचे विरुद्ध कडक उपाय १९३३. पुस्तक लिहिलें "जर्मनी एक्सप्लेन्स".

२७ **गोएबेल्स**, जनरल:—जर्मनीचा मतप्रतिपादनासाठीं मंत्री. नाझी चळवळीच्या सुरुवातीपासून अत्यंत कुशल मत प्रतिपादन करणारा असा हिटलरचा हस्तक. प्रशियाचा मुख्य प्रधान. १९३४ त त्याच्या धोरणावर आणि नंतर डॉ. डॉल्फसचा खून झाल्यावर, त्याच्यावर फार कडक टीका झाली. ज्यू लोकांचा द्वेष्टा.

२८ **गार्की**, मॅक्झिम:—रशियन वय ६७. रशियन कादंबरीकार. राजकीय गुन्हेगार म्हणून १९०५ मध्यें अटक. १८७८ त एका चांभाराचा दुय्यम. होता. १८८०मध्यें एका लहानशा जहाजावर झाडणें–पुसणें करणारा; १८८३ मध्यें भराडी, १८८४ त हमाल, १८८५ त पुन्हां हमाल, १८८६–१८८७ मध्यें रस्त्यांतून फळें विकणारा, असे अनेक उद्योग केले. १८८८ मध्यें आत्महत्त्या करण्याचा प्रयत्न. १८९० मध्यें वकिलाचा कारकून. १८९१ मध्यें रशियाभर पायीं प्रवास. १८९२ मध्यें रेल्वेच्या कारखान्यांत मजूर त्याच वर्षीं पहिली गोष्ट प्रसिद्ध.

२९ **चर्चिल**, नेक नामदार, विंस्टन एस:—वय ६१. एकोणिसाव्या वर्षी सैनिक. हिंदुस्थानांतील सरहद्दीवरील युद्धांत स्वतः हजर होता. सूडानच्या स्वारींत होता १८९८. बोअर युद्धांत याला शत्रूंनीं पकडलें होतें पण मोठ्या हिकमतीनें पळून आला. १९०४ मध्यें कॉन्झर्व्हेटिव्ह पक्ष सोडून लिबरल झाला. अंडर सेक्रेटरी फॉर कॉलनीज १९०५. बोर्ड ऑफ ट्रेडचा अध्यक्ष १९०८. तुरुंगांची सुधारणा १९१०. आयर्लंडविषयीं प्रसिद्ध भाषणें १९१३–१४. आरमाराचें अंदाजपत्रक १९१४ त तयार केलें एवढें अंदाजपत्रक आजपर्यंत कधीं झालें नव्हतें. फर्स्ट लॉर्ड ऑफ दि अॅडमिरल्टी या जागेचा वरिष्ठांशीं न पटल्यामुळें राजीनामा. सैनिक म्हणन युद्धावर गेला १९१५. ले. कर्नल १९१६. पुन्हां राजकारणांत प्रवेश. मिनिस्टर ऑफ अॅम्युनिशन्स १९१७. युद्धमंडळांत सभासद १९१९–२१. वसाहतमंत्री १९२१. आयर्लंडविषयींच्या परिषदांत प्रमुख भाग १९२२. निवडणुकींत पडला १९२२, १९२३, १९२४. १९२४ त पार्लमेंटचा कॉन्झर्व्हेटिव्ह सभासद होऊन बाल्डविनच्या प्रधानमंडळांत चॅन्सेलर ऑफ दि एक्सचेकर. एडिंबरो युनिव्हर्सिटीचा रेक्टर म्हणून व्याख्यान १९३१. अमेरिकेंत व्याख्यानें १९३२. न्यूयॉर्क येथें अपघात. सरकारच्या हिंदुस्थानविषयक धोरणास पार्लमेंटमध्यें व इतरत्रहि विरोध.

३० **चेटवुड**, फील्ड मार्शल, सर फिलिफ :—१८८९ मध्यें सैन्यांत दाखल. ब्रह्मदेश व दक्षिण आफ्रिका येथें नोकरी. महायुद्धांत घोडदळाच्या पांचव्या पलटणीचा नेता. इजिप्तमध्यें शौर्य दाखविलें १९३० पासून हिंदुस्थानमध्यें कमांडर इन् चीफ.

३१ चेंबरलेन, नेव्हिलः—वय ६५. बर्मिंगहॅमच्या नगरपालिकेचा सभासद १९११ व अध्यक्ष १९१५; पुन्हां अध्यक्ष १९१६. पार्लमेंटचा सभासद १९१८ पासून. कॉन्सरव्हेटिव्ह पक्षाचा अध्यक्ष १९२० ते १९३१. पोस्ट मास्तर जनरल १९२२, पेमास्टर जनरल १९२३, आरोग्य मंत्री १९२२–२९. जकातीविषयीचें बिल पुढें आणलें १९३२. १९३४त तिसरें अंदाजपत्रक तयार केलें. ऑक्सफोर्ड विश्वविद्यालयाकडून सन्मान्य पदवी. १९३१ पासून राष्ट्रीय पक्षाचा प्रधान. १९३१ पासून चॅन्सेलर ऑफ दि एक्सचेकर.

३२ चेंबरलेन, नेक नामदार, सर ऑस्टिनः—वय ७२. पोस्टमास्तर जनरल १९०२–०३. चॅन्सेलर ऑफ दि एक्सचेकर १९०३–०५. त्यापूर्वी खजिन्याचा फडणीस व सिव्हिल लॉर्ड ऑफ दि ॲडमिरल्टी. १९१२ मध्यें पार्लमेंटांत उत्कृष्ट भाषणें. युद्धकाली लॉइड जार्ज यांशीं पूर्ण सहकार्य. १९१५ ते १९१७ भारतमंत्री. युद्धमंडळांत जागा १९१८. लार्ड प्रीव्हीकौंसील १९२०. युनियनिस्टांचा पुढारी १९२१. बाल्डविनच्या प्रधानमंडळांत प्रवेश १९२४. फर्स्ट लॉर्ड ऑफ दि ॲडमिरल्टी १९३१. परराष्ट्रीय मंत्री व कॉमन्स सभेचा डेप्युटी लीडर १९२४–२९.

३३ चॅपमन, ए. पी. एफ्.ः—वय ३५. केंब्रिज येथें शिक्षण. ऑक्सफर्ड विरुद्ध केंब्रिजच्या क्रिकेट टीममध्यें तीनदां खेळला. १९२६ मधील पांचव्या टेस्ट मॅचमध्यें इंग्लंडचा कॅप्टन. ऑस्ट्रेलियास गेलेल्या इंग्लिश टीमचा कॅप्टन १९२८–२९. उत्तम फील्डर. केंट परगण्याच्या टीमचा कॅप्टन.

३४ चॅपलिन, चार्लसः—वय ४६. लंडन येथें जन्म. इंग्लिश व्हरायटी–स्टेजवर प्रथम अभिनय करण्यास सुरुवात केली. सध्यां त्याला सिनेमांत काम करण्याबद्दल १५०००० पौन्ड दरवर्षी मिळतात. "गोल्ड रश" १९२६, "दि सर्कस" १९२८ आणि "सिटी लाइट्स" १९३१ हे त्याचे चित्रपट फार नांवाजले.

३५ जहीरशहा अफगाणिस्तानचा राजाः—वय २१ नादीरखानाचा मुलगा सरदार अहंमदशहाखान याच्या मुलीशीं लग्न १९३१. बापाचा खून झाल्यामुळें १९३३ त गादीवर आला.

३६ जॉर्ज दुसरा, ग्रीसचा माजी राजा :—वय ४२. बारावा कॉन्सन्टाइन याचा ज्येष्ठ मुलगा. बापानें राजेपणाचा राजिनामा दिला तेव्हां हा गादीवर आला १९२२. प्रशियन पायदळ आणि ग्रीक आरमार यांत नोकरी, बाल्कन युद्धांत शिपाईगिरी. रुमानियाच्या माजी राजाची मुलगी एलिझाबेथ हिच्याशीं विवाह १९२१ ग्रीस मधून हद्दपार १९२३.

३७ जीन्स, सर जेम्सः—वय ५८. गणिती व ग्रहज्योतिषी. केंब्रिज विश्वविद्यालयांत कीर्ति, रॉयल सोसायटीचें रॉयल मेड्ल १९१९. आकर्षक शैलीनें लिहिलेल्या अनक विद्वन्मान्य ग्रंथांचा लेखक. त्याच्या दि युनिव्हर्स अबाऊट अस्' याचा १९३० 'प्रचंड खप झाला. "दि स्टार्स इन देअर कोर्सेस" १९३१ ब्रिटिश असोसिएशनचा अध्यक्ष १९[illegible]४

३८ जेलिको, ॲडमिरल ऑफ दि फ्लीट :—अर्ल वय ७५.आरमारी सैनिक १८७२. लेफ्टनंट असतांना गोलंदाजींत ऐंशी पौंडांचें बक्षिस मिळविलें इजिप्तच्या व चिनी युद्धांत चाकरी; थर्ड सी लॉर्ड सेकंड सी लॉर्ड, १९१३ च्या आरमारी प्रयोगांत तांबड्या आरमारचा नेता. इंग्लिश आरमाराच्या अधिकाऱ्यांचा अग्रणी व्हाइस ॲडमिरलचा ॲडमिरल झाला १९१५. राजाकडून भेट १९१५. उत्तर समुद्रांतील लढाई नंतर व्हिक्टोरिआ रॉयल क्रॉस १९१६. फर्स्ट सी लॉर्ड १९१६–१९१७. सरदारी १९१८. पन्नास हजार पौन्ड बक्षीस मिळाले. न्यू झीलंडचा गव्हर्नर १९२० – २५. आरमारांतून सेवानिवृत्त १९२४. नॅशनल रायफल असोसिएशनचा अध्यक्ष. लॉर्ड हेगनंतर ब्रिटिश लीजनचा अध्यक्ष १९२८–३२.

३९ झामोरा, डॉन अल्कालाः—वय ५७. स्पेनच्या लोकसत्ताक राज्याचा स्वामी. १९३१ त कांहीं राजकीय आरोप आला. चौकशी झाली.

बंदीवासाची शिक्षा. त्यांतून सुटला आणि स्पेनच्या नवीन लोकसत्ताकाचा तात्पुरता अध्यक्ष झाला. तो अध्यक्ष असतांना देवळें व मठ यांची मालमत्ता खाजगी आहे ती सरकारी करावी अशा संबंधीं ठराव पुढें आला व पसार झाला, त्याचा निषेध म्हणून यानें अध्यक्षपणाचा राजिनामा दिला. आक्टो. १९३१ पुन्हां लोकसत्ताकाचा सहा वर्षांपर्यंतचा स्वामी म्हणून निवडून आला. डिसेंबर १९३१.

४० **झेटलंड**, मार्क्विस ऑफः—वय ५९. हॅरो व ट्रिनिटी कॉलेज केंब्रिज येथें शिक्षण. शिक्षण संपल्यावर इराण, आशिया, सायबेरिआ, चीन, हिंदुस्थान या देशांतील निर्मनुष्य व अवघड प्रदेशांत प्रवास केला. व्हाइसरॉयचा ए. डी. सी. १९००. पार्लमेंटचा कॉन्सर्व्हेटिव्ह मेंबर १९०७. बंगालचा गव्हर्नर १९१७–१९२२. लॉर्ड कर्झनचा प्रचंड चरित्रग्रंथ लिहिला १९२८. बापामागून मार्क्विस झाला १९२९. "डिझरेलीचीं पत्रें" हें पुस्तक संपादिलें. " लॉर्ड क्रोमर याचें चरित्र" १९३२.

४१ **झोगू**, अल्बेनियाचा पहिला राजाः—वय ४२. नांव अहंमद बेग झोगू. लोकसत्ताकाचा माजी अध्यक्ष. १९२८ मध्यें राजा म्हणून जाहीर झाला. १९२० त गृहमंत्री होता व १९२४ त अध्यक्ष झाला. अंगापिंडानें धिप्पाड व तालेवार.

४२ **ड्रमंड**, नामदार, सर एरिक :—वय ५९. परराष्ट्रीय खात्यांत कांहीं वर्षे काम. मुख्य प्रधानाचा खाजगी कारभारी. राष्ट्रसंघाचा पहिला जनरल सेक्रेटरी. त्या जागेचा राजीनामा दिला १९३२. इटलींत ब्रिटिशांचा वकील.

४३ **डी व्हॅलेरा**, इमॉनः—वय ५३. न्यूयॉर्क येथें जन्म. एका स्पॅनिश चित्रकाराचा मुलगा; आई आयरिश. बी. ए., बी. एस्सी. १९१६ मध्यें आयर्लंड मध्यें बंड केलें म्हणन फाशीची शिक्षा झाली. पण तुरुंगांतून सुटला आणि नंतर पुन्हां त्याला कैद करून ठेविलें तेव्हां १९१९ मध्यें लिंकन तुरुंगांतून पळून गेला. पार्लमेंट मध्यें १९१७–१९. आणि १९१९–१९२२. आयलंडचा प्रेसिडेंट १९१९–१९२२ आणि १९३२ पासून पुढें. आयर्लंडच्या राष्ट्रीय विश्वविद्यालयाचा चॅन्सेलर. १९१० मध्यें लग्न केलें व सात मुलें आहेत. लंडन येथें ब्रिटिश सरकारशीं वाटाघाट केली १९३२, पण कांहीं निष्पन्न झालें नाहीं. आयरिश फ्री स्टेटच्या एक्झिक्यूटिव्हचा प्रेसिडेंट १९३२.

४४ **थॉमस**, नेक नामदार, जेम्स, एच.:—वय ६१. नवव्या वर्षापासून पोटासाठीं कामकरी. पुढें ग्रेट वेस्टर्न रेल्वेवर फायरमन व ड्रायव्हर. रेल्वे युनियनचा अध्यक्ष १९१०. नॅशनल युनियन ऑफ रेल्वेमेनचा जनरल सेक्रेटरी १८ ते २४ आणि २५ ते ३१. अमेरिकेंत प्रवास १९१७. प्रिव्ही कौन्सिलर १९१७. रेल्वेच्या संपास विरोध १९१८. मजूरपक्षाचा पुढारी १९२१. दक्षिण अफ्रिकेंत प्रवास १९२४. रेल्वेच्या लोकांच्या पगाराचा ठराव १९२८. बेकारी नाहींशी करण्याचें काम घेतलें १९२९. वसाहतमंत्री १९३०. ओटावा परिषदेंत सभासद. जलद व सहज ऐकूं येईल असें बोलणारा. चरित्र प्रसिद्ध झालें १९३३.

४५ **नार्मंड**, नेक नामदार,:—वय ५१. एडिंबरो येथें शिक्षण. वकील १९१०. "ज्युरिडिकल रिव्ह्यू"चा पूर्वी संपादक होता. पार्लमेंटमध्यें निवडून आला १९३१. स्कॉटलंडचा सॉलिसिटर जनरल १९२९ आणि १९३१–३३. लॉर्ड ॲडव्होकेट १९३३.

४६ **पर्शिंग**, जनरलः—वय ७५. अमेरिकेचा माजी मुख्य सेनापति. १८८६ मध्यें कॅप्टन होता नंतर ८६३ अधिकाऱ्यांच्या वरील ब्रिगेडिअर जनरल झाला. तांबडे इंडियन, स्पेनच्या युद्धांत निग्रो, आणि फिलिपाइन्समधील मूर ह्या लोकांशीं लढला. १९१७ मध्यें अमेरिकेच्या सैन्याचा नेता म्हणून इंग्लंडांत ससैन्य आला. 'महायुद्धांतील माझे अनुभव' हें पुस्तक लिहिलें १९३१.

४७ **पारमोअर**, लॉर्डः—वकिलींत प्रवीण. ॲटार्नी जनरल १८८५. धार्मिक कायदेकानूंचा सूक्ष्म अभ्यास करून त्यांवर पुस्तकें लिहिलीं आहेत. प्रीव्ही कौन्सिलच्या न्यायसभेचा सभासद झाला व सरदारी मिळाली १९१४. मजूरपक्षाचे

प्रधान मंडळास मिळाला १९२४ व १९२९. हाऊस ऑफ लॉर्डसमधील मजूर पक्षाचा नेता. १९२९–३१.

४८ **पील,** अर्ल, कॉमन्स सभेच्या स्पीकरचा मुलगा:––वय६९. भारतमंत्री १९२२–२४. युद्धखात्याचा सहचिटणीस १९१८–२१. पार्लमेंटचा सभासद १९००–१९०६ आणि १९१०–१२. ग्रीस व तुर्कस्तान यांच्या युद्धांत रणांगणावरील बातमीदार. वाहतुकीवरील मंत्री १९२१. बाल्डविनच्या कॅबिनेटमधें प्रवेश १९२४. सरदारी १९२९.

४९ **पेपेन,** फरान्झ व्हॉन:––व्हिएन्ना येथें १९३४ पासून जर्मनीचा वकील. १९३२ मध्यें जर्मन चॅन्सेलर आणि त्यानंतर हिटलरच्या हाताखालीं व्हाइस चॅन्सेलर. युद्ध चालू असतांना वॉशिंग्टन येथें जर्मनीचा वकील म्हणून होता. कॅथॉलिक जर्मन मजूरसंघाचा अध्यक्ष १९३३. सार प्रकरणांत प्रमुख भाग. डॉ. डॉल्फसचा खून झाल्यावर हिटलरनें त्यास व्हिएन्ना येथें मंत्री केलें, १९३४. हिटलरशीं याचें गेल्या तीन वर्षांत अनेकदां भांडण झालें. राजाला अनुकूल अशीं याचीं मतें आहेत असा इतरांचा प्रवाद असे.

५० **पीटर,** युगो स्लाव्हियाचा राजा:—वय १२. बेलग्रेड येथें जन्म. नुकतेंच कोठें इंग्लंड मधील एका शाळेंत त्यानें आपलें नांव दाखल केलें होतें, तों त्याचा बाप राजा अलेक्झांडर याचा (ऑक्टोबर १९३४ मध्यें) मार्सेल्स येथें खून झाला. म्हणून राज्यपद स्वीकारावें लागलें.

५१ **पीटेन,** मार्शल:––फरेंचांचा कुशल सेनापति. बचावाच्या लढाईंत प्रवीण. लष्करी शाळेंत पायदळाला हिकमती शिकविण्यासाठीं म्हणून तीन वेळां निवडून आला. लढाईचे सुरुवातीस चार आठवडेपर्यंत त्याला सेनापति जॉफ्रे यानें ब्रिगेडियर जनरल केलें होतें. लवकरच एका लढाईनंतर तो सेनापति व तेहतिसाव्या विभागाचा अधिपति झाला. १९१७ च्या युद्धमंडळांत एक प्रमुख. १९१८ मध्यें सुवर्णपदक मिळालें व फरान्सचा मार्शल झाला. युद्धखात्याचा उपाध्यक्ष १९२२.

५२ **प्रीस्टलें,** जे. बी.:––वय ४१. कादंबरीकार व निबंधकार. पत्रपंडित असतांना एका समाजसत्तावादी पत्राचा लेखक. युद्धांत प्रत्यक्ष शिपाइगिरी. नंतर केंब्रिज युनिव्हर्सिटींत शिक्षण. शिक्षण चालू असतांनाच लग्न. "डेली न्यूज" चा टीकाकार आणि एका प्रकाशकाचा वाचक. "दी गुड कंपॅनियन्स" ही कादंबरी एका वर्षांत लिहिली व तिच्या दोन लाख प्रति खपल्या. या कादंबरीचें नाटक केलें तेंहि यशस्वी झालें १९३१.

५३ **फाऊद,** इजिप्तचा राजा–वय ६७. सुलतान हुसेन केमालनंतर १९१७ त गादीवर आला. इटली व स्वित्सर्लंड येथें शिक्षण. इटालियन सैन्यांत शिपाईगिरी, इजिप्तचा राजा म्हणून अभिषेक १९२२. इंग्लंडांत प्रवास १९२७ व १९२९.

५४ **फराइड,** प्रो. सिग्मंड–वय ७९. पारिस येथें शिक्षण. त्याचें 'हिस्टेरिआ' या विषयावर झालेल्या पहिल्या व्याख्यानाचें सर्वत्र हसें झालें. तेव्हांपासून त्याच्या पुस्तकांनीं मनुष्य स्वभावाविषयींच्या कांहीं कल्पना व प्रमाणें यांत क्रांति करून टाकली आहे. व्हिएन्ना येथें अध्यापक आहे व प्रकृति निरोगी नसूनहि उद्योग चालू. मानसशास्त्रज्ञ.

५५ **बटलर,** आर. ए.:–वय ३३. इंडियन फरँचाइज कमिटीचा मेंबर. १९२९पासून पार्लमेंटचा सभासद. सर सॅम्युअल होअर यांचा पार्लमेंटरी प्रायव्हेट सेक्रेटरी नंतर सर हर्बर्ट सॅम्यूअल याचा असिस्टंट प्रायव्हेट सेक्रेटरी. इंडिया ऑफिसचा पार्लमेंटरी अंडर सेक्रेटरी १९३२ पासून.

५६ **बॅरी,** सर जे. एम्. बॅरोनेट.:––वय ७५. कादंबरीकार आणि नाटककार. हाडाचा स्कॉच. प्रथम बरींच वर्षे पत्रपांडित्य करून मग साहित्यिक झाला. बॅरोनेट् झाला जून १९१३. इनकॉर्पोरेटेड सोसायटी ऑफ ऑथर्स या संस्थेचा अध्यक्ष, मार्च १९२८. पीटर पॅन या अत्यंत

लोकप्रिय कथानकाचे सर्व हक्क आपल्या गांवच्या लहान मुलांच्या उपचारगृहास दिले १९२९. एडिंबरोच्या विश्वविद्यालयाचा कुलगुरु १९३०. एलिझाबेथ बर्गनर् या जर्मन नटीसाठीं एक नाटक लिहिलें तें १९३५ च्या हंगामांत रंगभूमीवर येईल.

५७ बाल्डविन, स्टॅनले :—वय ६८. पार्लमेंटचा सभासद १९०८. बोर्ड ऑफ ट्रेडचा अध्यक्ष १९२१–२२. चॅन्सेलर ऑफ दि एक्स्चेकर १९२२-२३. प्रधानमंडळांत प्रवेश होण्यापूर्वी बोनर लॉ याचा प्रायव्हेट सेक्रेटरी. लॉनंतर इंग्लंडचा मुख्य प्रधान १९२३. पराभव व राजिनामा १९२४. पुन्हां १९२४ त निवडणूक होऊन कॉन्सर्व्हेटिव्ह पक्षातर्फे मुख्य प्रधान. उद्योगधंद्यांबद्दलचीं त्याचीं भाषणें प्रसिद्ध आहेत. 'इंग्लंडविषयीं' म्हणून त्याच्या भाषणांचें एक पुस्तक १९२६ त निघालें. रॉयल सोसायटीचा फेलो व ब्रिटिश म्यूझिअमचा ट्रस्टी या जागांवर निवडन आला १९२७. कॅनडामध्यें प्रवास १९२७. सेंट अॅन्ड्र्यूज युनिव्हर्सिटीचा चॅन्सेलर १९२९. मुख्य प्रधानांच्या जागेचा राजिनामा १९२९, १९३१ सालच्या राष्ट्रीय पक्षाच्या सरकारांत लॉर्ड प्रेसिडेंट ऑफ दि कौन्सिल. ओटावा परिषदेंत ब्रिटिशांचा नेता. मुख्य प्रधान मॅक्डोनल्ड यांच्या रजेच्या मुदतींत कांहीं दिवस मुख्य प्रधान १९३४. १९३५ च्या मेमध्यें पुन्हां मुख्य प्रधान.

५८ बीव्हरब्रुक, लॉर्डः—वय ५६. पार्लमेंटचा सभासद १९१०–१६. लढाईंत उत्तम रेकर्ड ठेवणारा अधिकारी म्हणून नांवाजला. सरदारी १९१६. मिनिस्ट्री ऑफ इन्फर्मेशनचा मुख्य १९१८. "यश" १९२१ व "राजकारणी आणि पत्रपांडित्य" १९२५ हीं दोन पुस्तकें लिहिलीं "डेली एक्सप्रेस" व "संडे एक्सप्रेस" या दोन पत्रांचा कुशल व्यवस्थापक म्हणून पत्रपंडितांत त्याच्याविषयीं आदर. त्याच्या महायुद्धांतील आठवणींनीं १९२८ मध्यें खळबळ उडवून दिली "एम्पायर फ्री ट्रेड" चा पुरस्कार करणारें त्याचें पुस्तक १९३० मध्यें अमर्याद खपलें. महायुध्दांतल्या आणीबाणीच्या प्रसंगांविषयींचें त्याचें पुस्तक १९३२ त निघालें.

५९ बूथ, जनरल, ईव्हांजेलाइनः—वय ७०. साल्व्हेशन आर्मीचा संस्थापक. जनरल बूथ याची चवथी मुलगी. लंडन येथें सैन्यांत नोकरी केल्यानंतर १९०४ मध्यें अमेरिकेंत नॅशनल कमांडर. १९३४ मध्यें जनरल दिगिन्सच्या मागून साल्व्हेशन आर्मीचा सेनानी म्हणून निवडून आली.

६० बेट्टी, अॅडमिरल अर्लः— वय ६४. मुख्य आरमाराचा कमांडर-इन-चीफ १९१६-१९. वयानें लहानांत लहान अॅडमिरल. सूडान व चीनमध्यें अधिकारी. पूर्वी युद्ध मंडळाचा आरमारी सल्लागार. महायुद्धांत उत्तम लढत केली आणि उत्तर समुद्रांतल्या लढाईत विशेष कौशल्य दाखविलें १९१६. अनेक प्रकारचे दरबारी मानसन्मान व पदकें १९१६–१७. शरण आलेलें जर्मन आरमार ताब्यांत घेतलें १९१८. अॅड्मिरल ऑफ दि फ्लीट १९१९. सरदारी व एक लाख पौंडांची बक्षिसी मिळाली. फर्स्ट सी लॉर्ड १९१९–२७. प्रीव्ही कौन्सिलर १९२७.

६१ बेटरटन, नेक नामदारः—वय ६३. रग्बी व ऑक्सफर्ड येथें शिक्षण. वकील १८९६, पार्लमेंटचा सभासद १९१८–३४. मजूरपक्षाच्या प्रधानमंडळाचा पार्लमेंटरी सेक्रेटरी १९२३–२४ व १९२४–२९.

६२. बेडन, पॉवेल ऑफ गिल्वेल. ले. जनरल लॉर्डः—वय ७८. जगांतला मुख्य स्काऊट. स्काऊटिंगच्या चळवळीचा प्रणेता, त्या चळवळीविषयीं प्रतिपादक पुस्तकांचा लेखक. मेफकिंगचें ठाणें बोअर लोकांविरुद्ध लढविलें १९०३. दक्षिण आफ्रिकेचें पोलिसखातें सुधारलें. घोडदळाचा इन्स्पेक्टर जनरल १९०३–७. सैन्य सोडलें व स्काऊटिंगची चळवळ सुरू केली १९१०. चळवळ जगभर पसरविण्यासाठीं पृथ्वीप्रदक्षिणा १९१२. बॅरोनेट १९२१. सरदार १९२९. आजारांतून वांचला १९३४.

६३ बोरिस, बल्गेरियाचा राजाः—वय ४१.

लहानपणांच कांहीं राजकीय कारणासाठीं रोमन कॅथॉलिक चर्च सोडून हा ऑर्थोडॉक्स चर्चमध्यें गेला म्हणून वादळ उठलें होतें. इंग्लंडचा प्रवास १९३३. इटलीच्या राजकन्येशी लग्न १९३३.आपानें राजेपणाचा राजीनामा दिल्यामुळें १९१८ मध्यें गादीवर आला.

६४ **बॅटेन,** जीनः— वय २५. न्यूझीलंड रायफल ब्रिगेडमध्यें सैनिक. महायुद्धानंतर सहा वर्षें वैमानिक शिक्षण. १९३० मध्यें तिला ए.–सर्टिफिकेट मिळालें. ॲमि मॉलिसनची मर्यादा मोडण्याचा प्रयत्न दोनदां हुकला. पण तिसऱ्या-वेळीं इंग्लंड ते ऑस्ट्रेलिया सोलोफ्लाईट ची मर्यादा तिनें घातली. सर किंग्ज फोर्डस्मिथ यानें पॅसिफिक महासागर ओलांडला हें पाहून हिची महत्वाकांक्षा जागृत झाली.

६५ **ब्रॅडमन,** डोनाल्ड. जीः—वय २७. ऑस्ट्रेलियन क्रिकेटर लहानसा मुलगा होता तेव्हांच एकेका डावांत तीनशें-पेक्षां अधिक धांवा दोन वेळां काढून दाखविल्या. सिडनेच्या टीममध्यें प्रथम धावांचें शतक पुरें केलें. पुढें तो न्यू साऊथ वेल्सकडून खेळला तेव्हां बाद न होतां ४५२ धांवा त्यानें काढल्या. १९३० च्या टेस्टमध्यें अपूर्व यश, लागोपाठच्या चार डावांत १३१; २५४; ३३४ व २३२ अशा धांवा. १९३३च्या एकूण टेस्टमध्ये सातशें धांवा काढणारा एकटा एकच आस्ट्रेलियन. १९३४ त त्याचें सर्वत्र अभिनंदन झालें. लीडस् येथील टेस्टमध्यें ३०४ धांवा.

६६ **ब्रॅबोर्न,** लॉर्डः—वय ४०.महायुद्धांत नोकरी. तेव्हां खलित्यामधें तीन वेळां उल्लेख.पार्लमेंटचा सभासद १९३१—३३. लॉर्ड १९३३. सर सॅम्युअल होअरचा पार्लमेंटरी प्रायव्हेट सेक्रे-टरी. सध्यां मुंबईचे गव्हर्नर.

६७ **मांच्युकोचा,** राजाः— वय ३०. पूर्वी-चा राजा क्वँग सू याचा भाऊ चन त्याचा हा मुलगा. लहानपणींच चीनच्या गादीवर बसला आणि १९११ च्या राज्यक्रांतीपर्यंत राजा होता. पुन्हां १९१७मध्यें कांहीं काळ राजा. नंतर एकांत-वासांत बायकोला घेऊन श्रीयुत आणि श्रीमति पु. यी. अशा नांवानें राहिला. १९३२ मध्यें मांच्युकोच्या नवीन राज्याचा राजा म्हणून निव-डून आला व १९३४ त गादीवर बसला.

६८ **मेसफील्ड,** जॉन; एल्. एल्. डी.:—वय ५७. राजकवि, नाटककार, कादंबरीकार; प्रथम आगबोटीवर अधिकारी होता. पुढें तें काम सोडलें. अमेरिकेंत त्याचा १९१६ त सन्मान झाला. पोएट लॉरिएट झाला १९३०. अमेरिकेंत व्याख्यानें १९३३.

६९ **मुसोलिनी,** बेनिटो,वय५२:- समाजसत्ता-वादी ह्मणून स्वित्सर्लंडमध्यें हद्दपार. युद्धांत लढल्यानंतर कांहीं मित्र जमवून बोल्शेविकांच्या विरुद्ध अशी फॅसिस्ट चळवळ काढली. फॅसिस्ट मताचा आद्य प्रवर्तक. तो आणि त्याचे मित्र १९२२ च्या निवडणुकींत चेंबरमध्यें निवडून आले आणि मुसोलिनी प्रधान झाला. १९२६ मध्यें त्याच्या-वर कोणी गोळ्या झाडल्या. तो जखमी झाला पण वांचला. त्याच वर्षी पुन्हां चवथ्या वेळीं त्याचा जीव घेण्याचा प्रयत्न झाला. कॅबिनेटमधील सात जागांचे राजीनामे दिले १९२९. रोम शहराच्या पुनर्घटनेचा उद्योग आरंभला १९३२. मि. रॅम्से मॅकडोनल्ड यांची भेट १९३३. युद्ध-मंत्री १९३३. इटली, ऑस्ट्रिया आणि हंगेरी यांच्या तहावर सही १९३४. १५ वर्षें इटलीचा मुख्य सत्ताधारी.

७० **मॅकडोनल्ड,** नेक नामदारः— वय ६९. पत्रपंडित व अर्थशास्त्रावर उत्तम लेख लिहिणारा म्हणून प्रसिद्ध. इंडियन सिव्हिल सर्व्हिस वरील रॉयल कमिशनचा सभासद १९१२–१४. पार्ल-मेंटचा सभासद १९०६ ते १९१८. पुन्हां १९२२ त निवडून आला व मजूरपक्षाचा पुढारी झाला. १९२३ च्या निवडणुकींत मजूरपक्ष बळावला व १९२४ त बाल्डविनचा पराभव होऊन हा मुख्य प्रधान झाला. समाजसत्तावादावरील त्याच्या पुस्तकाची दुसरी आवृत्ति १९२४. १९२४ तच त्याचा पराभव व प्रधानकीचा राजीनामा. ब्रिटिश म्यूझियम (१९२४) व नॅशनल गॅलरी (१९२८)

यांचा ट्रस्टी म्हणून निवडून आला. १९२९ च्या निवडणुकींत पुन्हां पार्लमेंटचा सभासद झाला. याच वेळीं त्याचा मुलगा माल्कम हाहि सभासद झाला. १९२९ त बाल्डविननें राजिनामा दिल्यावर मुख्य प्रधान. अमेरिकेंत प्रवास १९२९. लंडन येथील क्षारमारी परिषदेंत भाग १९३०. जर्मनीच्या आर्थिक परिस्थितीवर विचार करण्यासाठीं भरलेल्या प्रधानांच्या परिषदेचा अध्यक्ष १९३१. राष्ट्रीयपक्ष स्थापन केला १९३१. डोळयाचें ऑपरेशन १९३२. जागतिक आर्थिक परिषदेचा अध्यक्ष १९३३. अतिशय श्रम केल्यामुळें तीन महिने सक्तीची रजा व कानडांत प्रवास १९३४. प्रधानकी सोडली १९३५.

**७१ मॉलिसन**, जेम्स. ए.:--वय ३०. जन्म ग्लासगो येथें. स्कॉच. एडिंबरो विश्वविद्यालयांत शिक्षण. ऑस्ट्रेलियास जाण्यापूर्वी वैमानिक दलांत नोकरी. १९३१ मध्यें ऑस्ट्रेलिया ते इंग्लंड हें अंतर ८ दिवस १४ तास २५ मिनिटें एवढ्या वेळांत तोडून रेकर्ड केलें. इंग्लंड ते केपपर्यंत ४ दिवस व १७॥ तासांत विमान नेलें १९३२. मिस ॲमी जॉन्सनशीं विवाह १९३२. पत्नीसह अमेरिकेंत विमानमार्गें प्रवास १९३३.

**७२ मॉलिसन**, ॲमी:--वय ३१. इंग्लंड ते ऑस्ट्रेलिया प्रवास करणारी पहिली स्त्री वैमानिक. शेफील्ड विश्वविद्यालयांत ग्रॅज्युएट. विमानाचें शिक्षण. १९२८ मध्यें घेतलें, पायलट व एंजिनिअरचें शिक्षण पुरें केलें व एक जुनें विमान विकत घेऊन ऑस्ट्रेलियास निघाली. हिंदुस्थानांत येण्याचें हिंकलरचें रेकर्ड मोडलें. इंग्लंडांत परत १९३०. 'डेली मेल' कडून १०००० पौंड बक्षीस. जपानांत प्रयाण १९३१. वैमानिक मॉलिसन याशीं लग्न १९३२. इंग्लंड ते केपपर्यंतचें त्याचें रेकर्ड ४ दिवस ६ तास ५४ मिनिटांत तो प्रवास करून मोडलें. १९३२. त्याच्यासह अमेरिकेंत आकाशयानानें प्रवास,

**७३ यीट्स**, डब्ल्यू. बी:—वय ७०. कवि, नाटककार व गूढवादी. डब्लिनच्या आयरिश राष्ट्रीय नाटकगृहाचा दिग्दर्शक. आयरिश पार्लमेंटमध्यें सीनेटर. नोबेल प्राइझ १९२३. रॉयल अकॅडमीमध्यें त्याचें चित्र लावलें १९३१. दोन नवीन नाटकें रंगभूमीवर आलीं १९३४.

**७४ यंग**, ओवेन. डी:– वय ६१. अमेरिकन सेंट लॉरेन्स विश्वविद्यालयांत शिक्षण. १८९६ त वकील. व्यापारी दावे चालविण्यांत कुशल. जनरल इलेक्ट्रिक कंपनीचा अध्यक्ष १९२२. रेडियो कॉर्पोरेशनची स्थापना याच्याच प्रयत्नामुळें झाली. युद्धकर्जाच्या व्यवस्थेविषयीं एक प्लॅन त्यानें तयार केला १९३४.

**७५ यंग**, नेक नामदार, सर हिल्टन:--- वय ५६. ईटन व ट्रिनिटी केंब्रिज येथें शिक्षण. कायदेपंडित: १९०४ "इकॉनमिस्ट"च उपसंपादक १९०९–११. " मॉर्निंग पोस्ट"चा आर्थिक संपादक १९११–१४. पार्लमेंटचा कॉन्झर्व्हेटिव्ह सभासद. हिंदी चलनावरील रॉयल कमिशनचा अध्यक्ष. युद्धांत हा लेफ्टेनंट–कमांडर होता व एका लढाईत याचा हात तुटला.

**७६ रनसिमन्**, नेक नामदार:--वय ६५. बोर्ड ऑफ ट्रेडचा अध्यक्ष १९१४ ते १६ शेतकीखातें व शिक्षणखातें यांच्या मंडळांचा अध्यक्ष १९०८. सरकारी तिजोरीचा फडणवीस १९०७. १९१८ पासून पुढील चार निवडणुकींत पडला पण १९२४ त निवडून आला. पुढें १९२९ व १९३१ मध्येंहि निवडून आला. ओटावा परिषदेंत ब्रिटिश प्रतिनिधि १९३२. बोर्ड ऑफ ट्रेडचा अध्यक्ष १९३१ पासून.

**७७ रसेल**, अर्ल (बर्ट्रंड):--वय ६३. व्हिक्टोरिया राणीच्या वेळचा एक मुख्य प्रधान लॉर्ड जॉन रसेल याचा नातू. ट्रिनिटी कॉलेज केंब्रिज येथें शिक्षण. गणित घेऊन पहिला वर्ग. तत्त्वज्ञान व शिक्षणशास्त्र या विषयांवर अनेक पुस्तकें लिहिलीं आहेत. पुष्कळ प्रवास केला आहे. बर्ट्रंड रसेल या नांवानेंच लिखाण प्रसिद्ध करणें त्याला अधिक पसंत आहे.

**७८ रुझवेल्ट**, प्रेसिडेंट:--हारवर्ड विश्वविद्यालयांत शिक्षण. बॅरिस्टर १९०७. १९१० मध्यें न्यूयॉर्कमध्यें सीनेटर म्हणून निवडून आला.

महायुद्धांत आरमारखात्याचा सहचिटणीस. न्यूयॉर्कचा गव्हर्नर चार वर्षेपर्यंत. मि. हूव्हरचा पराभव होऊन अमेरिकेचा अध्यक्ष म्हणून निवडून आला. अमेरिकेच्या आर्थिक आणिबाणींत फार कौशल्यानें पत राखली.

७९ रेडिंग, मार्क्विस ऑफ:—वय ७५. ज्यू; व्यापाऱ्याचा मुलगा. वकिलींत नांव कमावलें १८९८ पासून. इंग्लंडचा सॉलिसिटर जनरल १९१०. ॲटर्नी जनरल १९१०. कॅबिनेटमध्यें प्रवेश १९१२. न्यायखात्यावरील प्रमुख १९१३. सरदारी १९१४. आर्थिक प्रश्नाबाबत अमेरिकेस प्रवास १९१७. अमेरिकेंत ब्रिटिश प्रतिनिधि १९१८–१९. हिंदुस्थानचा व्हाइसरॉय १९२१.

८० रॉक फेलर, जॉन. डी.:—वय ९६. जगांतील श्रीमंतांपैकीं एक. पुस्तकविक्या म्हणून प्रथम व्यापारास सुरुवात केली. मग तेलाची गिरणी काढली. प्रतिस्पर्ध्याचा मोड करून तेलाचा व्यापार सर्व ताब्यांत घेतला व स्टँडर्ड ऑइल ट्रस्ट उभारला. रॉक फेलर फौंडेशनला दोन कोट डॉलर दिले.

८१ रौलॅट, नेक नामदार. सर गिडने.:—न्यायाधीश झाला १९१२. हिंदुस्थानांतील एका चौकशी कमिटीचा अध्यक्ष म्हणून काम केल्याबद्दल नाइटहूड. सेवानिवृत्त १९३२. जुगारीच्या चौकशी मंडळाचा अध्यक्ष १९३३.

८२ लिओपोल्ड, बेल्जियन्स लोकांचा राजा:—वय ३३. शिक्षण खाजगी तऱ्हेनें व ईटन कॉलेजांत. चौदा वर्षांचा असतांना सहा महिने महायुद्धांत प्रत्यक्ष भाग. शिक्षण झाल्यानंतर सैन्यांत अधिकारी. स्वीडनच्या राजकन्येशीं लग्न १९२६. १९३४ त गादीवर बसला.

८३ लिंडबर्ग, कर्नल:—वय ३३. निव्वळ हौसेखातर म्हणून वैमानिक १९२१. रक्तानें स्वीडिश-अमेरिकन. अमेरिका ते फ्रान्स हें अंतर विमानानें तोडणारास ५००० पौंडांचें बक्षिस लागलें आहे असें पाहून प्रयत्न करण्याचें ठरविलें. एका मोनोप्लेनमध्यें एकटा बसून मेच्या २० तारखेस न्यूयॉर्क सोडलें व दुसऱ्या दिवशीं फ्रान्सला पोहोंचला. एकंदर साडेतेहतीस तास तो आकाशांत होता. फ्रान्सचा मुख्य प्रधान' इंग्लंडचा राजा, वगैरेंनीं स्वत: त्याचा सन्मान केला. अमेरिकेच्या विमानखात्यांत अधिकारी. अमेरिकेच्या मेक्सिको येथील वकिलाच्या मुलीशीं लग्न १९२९. त्याचा लहान मुलगा चोरांनीं पळविला १९३२. त्याला परत मिळविण्यासाठीं अतिशय खटपट झाली पण शेवटीं त्या बालकाचें प्रेत सांपडलें. ऑगस्ट १९३२ मध्यें दुसरा मुलगा झाला.

८४ लॉइड्‌ जॉर्ज, नेक नामदार:—वय ७२. पार्लमेंटमध्यें स्थान १८९० पासून. पट्टीचा वक्ता. शिक्षणाच्या कायद्याविरुद्ध वेल्स प्रांतानें केलेल्या चळवळीचा नेता त्यानें १९०९ मध्यें तयार केलेल्या अंदाजपत्रकानें खूपच खळबळ उडविली व त्यामुळें १९१० सालीं पुन्हा निवडणूक झाली. युद्धकालांत फिनॅन्स खात्याच्या व्यवस्थेमुळें त्याचें नांव झालें. लॉर्ड किचनेर मेल्यावर त्याचे जागीं युद्धमंत्री. १९१६ मध्यें मुख्य प्रधान. पुन्हां १९१८ त निवडणूक झाली तेव्हां नवें मंत्रिमंडळ नेमलें. शांततापरिषदेंत प्रमुख भाग. १९२२ त कार्यनिवृत्त झाल्यापासून आजपर्यंत पार्लमेंटमध्यें व बाहेरहि एक नेहमींचा वक्ता. उत्तर अमेरिकेचा प्रवास १९२३. पार्लमेंटच्या उदारमतवादी पक्षाचा पुढारी १९२६. पण पुन्हां १९३१ त त्याच जागेवर निवडून येण्याचें नाकारलें. बेकारीवर उपाय १९२९ त्याचा मुलगा आणि मुलगी पार्लमेंटचे सभासद झाले १९२९. शस्त्रक्रिया करून घेतली १९३१. सीलोनचा प्रवास करून प्रकृति सुधारली १९३१ युद्धांतील आठवणींचें प्रकाशन १९३३–१९३४ "न्यूडील" १९३५.

८५ लाईड, लॉर्ड नेक नामदार:—वय ५३. पार्लमेंटचा सभासद १९१०–१७. परराष्ट्रीय राजकारणावरील वादविवादांत प्रमुख भाग घेतल्यानें प्रसिद्ध. पुष्कळसा प्रवास. पुन्हां पार्लमेंट १९२४–२५. सरदारी १९१५. मुंबईचा गव्हर्नर

१९१९-१९२३. इजिप्तचा हाय कमिशनर १९२५ पासून १९२९ पर्यंत.

८६ लंडनडेरी, मार्क्विस ऑफ:—वय ५६. उत्तर आयर्लंडच्या लोकसभेचा स्वामी व शिक्षण-मंत्री १९२१-२६. पार्लमेंटचा सभासद १९०६-१९१५. रॉयल हॉर्स गार्डसचा दुसरा अधिकारी १९१५. विमानखात्याचा खजिनदार व चिटणीस. आयर्लंडमधील जागेचा राजीनामा १९२६. फर्स्ट कमिशनर ऑफ वर्कस् १९२८, १९२९, १९३१. विमानखात्याचा प्रधान.

८७ विल्यम, एक्स-जर्मन क्राऊन प्रिन्स:—वय ५३. जर्मनीच्या माजी बादशहाचा वडील मुलगा. पूर्व आशियांत प्रवास, १९१०-११. इंग्लंडच्या जॉर्ज राजाच्या राज्याभिषेकाचे वेळीं आपल्या बापाचा प्रतिनिधि म्हणून उपस्थित होता १९११. प्रवासवृत्त प्रसिद्ध केलें १९१२. फ्रान्सवर पाठविलेल्या एका सैन्याचा अधिपति १९१४. पराभव १९१८.

८८ विलिंग्डन, व्हायकाऊंट:—वय ६९. ईडन, ट्रिनिटी व केंब्रिज येथें शिक्षण. पार्लमेंटचा उदारमतवादी सभासद १९००-०६ आणि १९०६ ते १९१०. 'बॅरन' १९१०; ज्युनिअर लॉर्ड ऑफ दि ट्रेझरी १९०५-१२. मुंबईचा गव्हर्नर १९१३-१९१९. मद्रासचा गव्हर्नर १९१९-१९२४. व्हायकाऊंट १९२४. कॅनडाचा गव्हर्नर जनरल १९२४-३०. अर्ल १९३१. व्हाइसरॉय आणि हिंदुस्थानचे गव्हर्नर जनरल १९३१ पासून पुढें. प्रवासाची आवड. क्रिकेट चांगलें येतें. एक मुलगा लढाईंत पडला.

८९ वुडहाऊस, पी जी.:—वय ५४. इंग्रजी साहित्यांतील लोकप्रिय विनोदक. जवळपास चाळीस ग्रंथांचा कर्ता. 'जीव्हज्' हा त्याचा मानसपुत्र वाङ्मयांत चिरंजीव राहील. एकंदर वीस नाटकांत (प्रसंगानुरोधानें म्हणावयासाठीं) विनोदी कविता लिहिल्या आहेत.

९० वेल्स, एच्. जी:—वय ७०. प्रथम लहानपणीं कापडविक्याच्या दुकानीं उमेदवारी. ब्रॉमले, केंट आणि मिडहर्स्ट येथील खाजगी-शाळांत शिक्षण. नंतर मास्तरकी. पुढें रॉयल कॉलेज ऑफ सायन्स येथें प्रवेश व बी. एस्सी. (लंडन) पहिला वर्ग ऑनर्स. "पेल मेल गॅझेट्" मधील लेखमालेमुळें लेखक म्हणून माहित झाला व त्यामुळें पत्रपांडित्यांत शिरला. "टाईम मशीन" ही कादंबरी १८९५ त प्रसिद्ध झाली. इतरही चारदोन कादंबऱ्या लिहून काल्पनिक शास्त्रीय शोधांच्या कथा लिहिणारा म्हणून नांवाजला. किप्स, टोनो बंगे, मि. पॉली, वगैरे कादंबऱ्यांतून तत्कालीन इंग्लिश जीवनाचें चित्रण त्यानें केलें. सामाजिक अस्वस्थतेच्या कारणांवर प्रबंध १९१२. लढाई चालू असतांना त्याचीं युद्धविषयक अनेक पुस्तकें निघालीं. जगाच्या इतिहासाची रूपरेखा १९१९. लंडनच्या विश्वविद्यालयाच्या निवडणुकीसाठीं १९२२ व १९२३ या दोन्ही वेळीं उभा राहिला आणि पडला. १९३० त त्याचें चरित्र मि. वेस्ट यांनीं लिहिलें. "शेप ऑफ थिंग्ज टु कम" १९३३ आणि आत्मचरित्र १९३४. कादंबरीकार, कथालेखक, समाजशास्त्रज्ञ, आणि इतिहासतज्ञ.

९१ वेनिझेलॉस, एस. एल्युथीरिऑस.:—वय ७१. अथेन्स विश्वविद्यालयांत शिक्षण. प्रथम क्रीट येथें वकिली. क्रीटच्या कौन्सिलचा अध्यक्ष व कार्यकारी मंडळाचा सभासद १८८६ ते १९१०. क्रीटचा परराष्ट्रीय व न्याय-मंत्री १८९८. क्रीटचा मुख्य प्रधान १९०९ आणि ग्रीसचा मुख्य प्रधान १९११. बाल्कन राष्ट्रांचा संघ बनविण्यांत पुढाकार घेतला. राजाशीं न पटल्यानें प्रधानकीचा राजीनामा १९१५. नवीन आलेला राजा अलेक्झांडर यानें १९१७ त पुन्हां त्याला प्रधान केलें. शांततेच्या तहांत उत्तम कार्य केलें. पण राजा अलेक्झांडर वारला व जुना राजा पुन्हां गादीवर आला म्हणून ग्रीस सोडलें. नॅशनल असेंब्लीचा अध्यक्ष निवडून आला १९२४. पण आजारी पडल्यानें राजीनामा. पुन्हां मुख्य प्रधान १९२८. १९३२ मध्यें राजीनामा. जानेवारी १९३३ त पुन्हां मुख्य प्रधान झाला पण मार्च १९३३ मध्यें त्याचा पराभव झाला. त्याचा जीव घेण्याचा प्रयत्न झाला

१९३३. अनेक आंतरराष्ट्रीय परिषदांतून ग्रीसचा प्रतिनिधि. नुकत्याच केलेल्या बंडांतून कसाबसा निभावून पळून गेला.

९२ शॉ, जी. बी.:—वय. ७९. समाजसत्तावादी, नाटककार, कादंबरीकार, अर्थशास्त्रज्ञ, पत्रपंडित, टीकाकार. तो आणि बायको दोघेहि आयरिश आहेत. त्याचीं नाटकें सर्व जगभर प्रसिद्ध आहेत. १९२६ त नोबेल प्राईझ. रशियास भेट १९३१ आणि अमेरिकेंत प्रवास १९३३.

९३ सट्क्लिफ, एच. डब्ल्यू.:—वय ४१. यॉर्कशायरमधील क्रिकेटपटु १९१९ पासून. १९२४–२५ च्या ऑस्ट्रेलियाच्या खेपेंत प्रसिद्ध झाला. ऑस्ट्रेलिआविरुद्ध हॉब्जबरोबर यानें अकरा शतकें धांवा केल्या आहेत. यॉर्कशायरमध्यें १९३१ त त्याच्या धांवांची सरासरी ९६ इतकी होती. १९३२त इसेक्स शायरविरुद्ध खेळतांना पी. होम्स याच्यासह त्यानें एका बादेस ५५५ धांवा असा नवीन सीमांत घातला. १९३२ त त्याच्या एकंदर खेळाचा आढावा घेतला त्यांत १०७ शतकें होतीं. एम्. सी. सी. चा एक प्रमुख खेळणारा.

९४ सेसिल, व्हायकाऊंट:—वय ७१. मार्कोनी कमिटींत पुढाकार १९१३. परराष्ट्रीय मंत्र्याचा चिटणीस १९१५. बर्मिंगहॅम विश्वविद्यालयाचा चॅन्सेलर. राष्ट्रसंघाचा पुरस्कर्ता. बाल्डविनच्या प्रधान मंडळांत जागा १९२३. व्हायकाऊंट १९२३. शांततेचा पुरस्कार केल्याबद्दल ५००० पौंडांचें विल्सन प्राइझ मिळालें १९२४. राष्ट्रसंघाचा उपाध्यक्ष १९२७. शस्त्रसंन्यासाच्या प्रकरणांत प्रधानमंडळांतून राजीनामा.

९५ स्ट्रॅकोना, लॉर्ड:—वय ४४. युद्धांत काम केलें. पार्लमेंटच्या कॉमन्स सभेंत सभासद १९२२–२६. कॉन्झर्व्हेटिव्ह पक्षाचा उपाध्यक्ष पार्लमेंटरी अंडर सेक्रेटरी फॉर वॉर.

९६ स्ट्रॅकी, मिस जे. पी.—सर रिचर्ड स्ट्रॅकी यांची कन्या. ट्रिनिटी कॉलेज डब्लिन येथून तिला सन्मान्य पदवी मिळाली. न्यूहॅम विद्यालय केंब्रिज येथें अर्वाचीन भाषांची व्याख्याती १९०६. पुढें तेथेंच अनुक्रमें फेलो, ट्यूटर, आणि व्हाइस प्रिन्सिपल होऊन आतां १९२३ पासून त्याच विद्यालयांत प्रिन्सिपल.

९७ स्टॅनले, ऑलिव्हर—वय ४१. अर्ल ऑफ डर्बीचा मुलगा. ईटन येथें शिक्षण व युद्धांत प्रत्यक्ष भाग. वकील १९१९. पार्लमेंटचा सभासद. कॅबिनेटमध्यें प्रवेश १९३४. गृहमंत्र्यांचा सहचिटणीस. वाहतुकीच्या खात्याचा मंत्री १९३३–३४. मिनिस्टर ऑफ लेबर १९३४ पासून.

९८ स्टॅनहोप, नेकनामदार, अर्ल:—वय ५५. शिक्षण ईटन व मॅगडेलन विद्यालय केंब्रिज. बापाच्या मागून सरदार झाला १९०५. युद्धांत ग्रॅनेडिअर गार्डसमध्यें शिपाईगिरी. लष्करी क्रॉस मिळविला. युद्धकचेरीचा पार्लमेंटरी चिटणीस १९१८. सिव्हिल लॉर्ड ऑफ दि ॲडमिरॅल्टि १९२४–२९. आरमार खात्याचा फडणवीस १९३१. पार्लमेंटचा युद्धखात्याचा सहचिटणीस १९३१ पासून मतानें कॉन्झर्व्हेटिव्ह.

९९ स्नोडन, नेक नामदार, व्हायकाऊंट:—वय ७२. प्रथम सिव्हिल सर्व्हिसमध्यें. नंतर पार्लमेंटचा सभासद १९०६–१९१८ आणि १९२२ ते १९३१. १९३१ मध्यें राष्ट्रीय पक्षाच्या सरकारानें त्यास सरदारी दिली. कॅबिनेटमधील जागेचा राजीनामा १९३२. आत्मचरित्र १९३४. चॅन्सेलर ऑफ दि एक्स्चेकर १९२९. १९३१ प्रथम मजूरपक्ष नंतर राष्ट्रीय पक्ष.

१०० स्मट्स्, नेक नामदार, लेफ्टे. जनरल:—वय ६५. वसाहतमंत्री. आफ्रिकेंतील सैन्याचा अधिपति व नंतर लेफ्टेनंट जनरल १९१७. प्रीव्ही कौन्सिलर १९१७. जनरल बोथाच्या मागून प्रीमियर १९१९–२४. १९२१ त बहुमतानें निवडून आला. त्याच्या प्रधानमंडळानें १९२४ त राजीनामा दिला. ऑक्सफोर्ड येथें ऱ्होडस मेमोरिअल लेक्चरर १९२९–३०. लॉर्ड रेक्टर ऑफ सेंट ॲंड्यूज युनिव्हर्सिटी १९३४. न्यायमंत्री १९३३.

१०१ सायमन, नेकनामदार:—वय ६२. सॉलिसिटर जनरल १९१०. वकिलींत चटकन

यश. अॅटर्नी जनरल व कॅबिनेटचा सभासद १९१३. कोअॅलिशन मिन्स्ट्रींत गृहमंत्री १९१५. या जागेचा १९१६ त राजीनामा देऊन परत वकिली सुरू केली. १९१६ नंतर लगेच सैन्यांत दाखल झाला. सैन्यांत मेजर झाला १९१८. १९१८च्या निवडणुकींत पडला पण १९२२मध्यें निवडून आला. उदारमतवाद्यांचा पुढारी १९२२. पार्लमेंटमध्यें नांव गाजविलें. १९२३ सार्वत्रिक संपाविरुद्ध मोठमोठीं भाषणें केलीं १९२६. हिंदुस्थानांत पाठविलेल्या रॉयल कमिशनचा अध्यक्ष—सायमन कमिशन १९२८–२९. राष्ट्रीय सरकारास मदत केली. यूरोपीय राजकारणांत परराष्ट्रीय मंत्री म्हणून बरेंच काम १९३५.

१०२ **सँकी**, व्हायकाऊंटः—वय ६९. ऑक्सफर्ड येथें शिक्षण. १८९२ त वकिली सुरू करून अपील केसेसमध्यें उत्तम नांव मिळविलें. खाणींची पाहाणी करणाऱ्या मंडळाचा अध्यक्ष १९१९. मजूर पक्षाच्या अमदानींत लॉर्ड चॅन्सेलर १९२९. सरदारी मिळाली. हिंदुस्थानच्या गोलमेज परिषदेंत प्रमुख भाग १९३०.

१०३ **ससून**, नेक नामदार, बॅरोनेटः—वय ४७. मतानें कॉंझर्वेटिव्ह. फील्ड मार्शल हेग यांचा खाजगी कारभारी. लॉइड जॉर्ज मुख्य प्रधान होता तेव्हांचा त्याचा पार्लमेंटरी सेक्रेटरी. नॅशनल गॅलरी बोर्डाचा अध्यक्ष म्हणून निवडून आला १९३२.

१०४ **सॅम्युअल**, नेक नामदारः—वय ६५ गृह मंत्र्याचा सहचिटणीस १९०५-०९. प्रिव्ही कौन्सिलर १९०८. कौन्सिलांत जागा १९०९. स्थानिक स्वराज्यमंडळाचा अध्यक्ष १९१४. १९१५ मधील नव्या मंत्रिमंडळांत पोस्टमास्तर जनरल आणि गृहमंत्री झाला. १९१८ च्या निवडणुकींत पडला. पॅलेस्टाईनचा हायकमिशनर १९२०. कोळशाच्या धंद्याची चौकशी झाली, तींत अध्यक्ष १९२६. उदारमतवाद्यांचा पुढारी १९२७–२९. निवडणुकींत यशस्वी १९२९ व १९३१. राष्ट्रीय सरकारांत गृहमंत्री १९३१. राजीनामा १९३२.

१०५ **हर्ट्झॉग** जनरलः—दक्षिण आफ्रिकेचा मुख्य प्रधान. धंदा वकिलीचा. पूर्वी ऑरेंज फ्री स्टेटमध्यें मुख्य न्यायाधीश. दक्षिण आफ्रिकेंतील बोअर युद्धांत सैन्याचा अधिपति म्हणून लढला. जनरल बोथाच्या कॅबिनेटमध्यें प्रवेश. दोन साम्राज्य परिषदांत प्रतिनिधित्व केलें, कोअॅलिशन मिन्स्ट्री उभारली १९३३.

१०६ **हडसन**, आर. एस्.:—वय ४९. ईटन व ऑक्सफर्ड येथें शिक्षण. १९२४ त पार्लमेंटांत प्रवेश. राष्ट्रीय पक्षाच्या सरकारांत पार्लमेंटरी सेक्रेटरी फॉर लेबर.

१०७ **हिटलर**, प्रेसिडेंट अॅडॉल्फः—वय ४६. पंधरा वर्षांचा पोरका असतना व्हिएन्ना येथें गवंडीकाम. युद्ध सुरू झाल्यावर सैन्यांत दाखल; जखमी. १९२८ त त्याचे सहकारी बारा होते ते १९३० त एकशेंसात झाले. प्रशियन पार्लमेंटमध्यें त्याच्या पक्षाचे लोक १९२८ त नऊ होते ते १९३२ त एकशेंबासष्ट झाले. त्याचें नाझी लष्कर परिपूर्ण आहे महायुद्धानांव त्यानें जर्मन मजूरसंघांत नांव घातलें म्हणून १९२३ त कैद बव्हेरियामध्यें मतप्रसार. उत्कृष्ट वक्ता. १९३३ मध्यें चॅन्सेलर झाल्यावर प्रचंड सभांतून भाषणें. निःशस्त्रीकरण परिषदेंतून जर्मनी निघाला १९३३. मुसोलिनीशीं प्रत्यक्ष बोलणें करण्यासाठीं विमानांतून व्हेनिसला १९३४. मार्शल व्हॉन हिंडेनबुर्ग मेला तेव्हां हा प्रेसिडेंट झाला १९३४. जर्मनीचा आमरण सर्वाधिकारी झाला

१०८ **हूव्हर**, माजी अध्यक्षः—वय ६१. शेतकऱ्याचा मुलगा. स्टॅनफोर्ड विश्वविद्यालयांत शिक्षण व तेथील पहिलाच विद्वान. खाणींचें काम पाहात तो कॅलिफोर्निया, अॅरिझोना व पश्चिम ऑस्ट्रेलिया येथें हिंडला. चीनमधील खाणीचा दिग्दर्शक १८९९ आणि लंडनच्या एका पेढीचा भागीदार. नंतर जगांतील निरनिराळ्या प्रदेशांतील खाणींच्या धंद्यांत व्यवस्थापक. महायुद्ध सुरू होतांच अमेरिकन लोक इतर देशांतून परत आणविण्याचे कामीं इंग्लंडांतील अमेरिकन वकिलातीला मदत केली. अमेरिका युद्धांत

पडली तेव्हां प्रे. वुइल्सन यानें अमेरिकेच्या खाद्य पदार्थांच्या व्यापाराचे अधिकार त्याच्याकडे सोंपविले. दोस्ताच्या कौन्सिलचा सभासद. १९२१ च्या प्रधानमंडळांत सहमंत्री. अमेरिकेचा अध्यक्ष १९२८. एक वर्षभर युद्धाचे कर्जावरील व्याज तहकूब ठेवण्याच्या त्याच्या धोरणाचें सर्व जगानें अभिनंदन केलें. १९३२ च्या निवडणुकींत रुझवेल्टनें त्याचा पराभव केला.

**१०९ हेंडरसन,** आर्थर:—वय ७२. न्यू कॅसल येथील एक मजूर. मेथॉडिस्ट. न्यू कॅसलच्या नगरपालिकेचा सभासद व नंतर अध्यक्ष १९०३. रेल्वे कमिशन व इंडस्ट्रिअल कौन्सिलचा सभासद १९११. मजूर पक्षाचा पुढारी १९१४. महायुद्ध सुरू होतांच मजूर पक्षाचा अध्यक्ष. सैन्यभरतीचें काम केलें. प्रीव्ही कौन्सिलर १९१५. रशियांत प्रवास १९१७. राजीनामा १९१७. त्याचा मुलगा डेव्हिड युद्धांत पडला. १९१८ च्या निवडणुकींत पराभव. १९१९ मध्यें निवडून आला. पण पुन्हां १९२२ त पडला. १९२३ त पुन्हा एकदां निवडून आला व पुन्हां पडला. १९२४ त निवडून आला व गृहमंत्री झाला. याचे दोन मुलगे पार्लमेंटचे सभासद आहेत. राष्ट्रीय पक्षास विरोध करणारांचा नेता. १९३१ च्या निवडणुकींत पराभव. जिनीव्हा येथें भरलेल्या शस्त्रसंन्यास परिषदेचा अध्यक्ष. १९३२, १९३३, १९३४. शांततारक्षणाच्या कामाबद्दल २१०० पौंडांचें बक्षीस मिळालें १९३३. १९३३ त चरित्र प्रसिद्ध झालें. पुन्हां पार्लमेंटचा सभासद म्हणून निवडून आला १९३३.

**११० हेलशॅम,** व्हायकाऊन्ट:—वय ६२. ईटन येथें शिक्षण. त्यानंतर ८ वर्षें साखरेच्या व्यापारांत. बुद्धी कुशाग्र असल्या मुळें वकिलीस सुरुवात करून यश मिळविलें. पार्लमेंटचा कॉन्झर्वेटिव्ह सभासद १९२२. ॲटॉर्नी जनरल १९२२. बॉल्डविनच्या कॅबिनेटमध्यें १९२४. लॉर्ड चॅन्सेलर १९२८. सरदारी १९२९.

**१११ होअर,** नेक नामदार,:—वय ५५. हॅरो व ऑक्सफर्ड येथें शिक्षण. लिटल्टन याचा खाजगी चिटणीस. १९१० पासून पार्लमेंटचा कॉन्झर्वेटिव्ह सभासद. १९२३ मधील बॉल्डविनच्या प्रधानमंडळांत कॅबिनेटमध्यें प्रवेश. पुढील सालच्या नव्या प्रधानमंडळांत तीच जागा कायम. बायकोसह हिंदुस्थानचा आकाशमार्गानें प्रवास १९२७. लॉन टेनिस असोसिएशनचा अध्यक्ष व कुशल स्केटिंग करणारा. हिंदुस्थानच्या सिलेक्ट कमिटीपुढें साक्ष १९३३. राष्ट्रीय सरकारच्या अमदानींत भारतमंत्री. कांहीं काळ विमानखात्याचा प्रधान. १९३५ परराष्ट्र मंत्री

**११२ हॉब्ज,** जॉन बेरी:—वय ५३, क्रिकेट खेळणारा म्हणून प्रथम नांवास आला १९०३. टेस्ट मॅचेसमध्यें एकंदर १५ शतकें काढलीं आहेत व एकंदर खेळण्यांतील शंभरावें शतक १९२३ त पुरें केलें. जगांत होऊन गेलेल्या क्रिकेटपटूंतील एक असा त्याचा मान आहे. डॉ. ग्रेस यांची १२६ शतकांची मर्यादा १९२५ त मोडली. १९२६ त सँडहॅम याचेसह खेळून ४२८ धांवांची मर्यादा मोडली. सगळ्याच टेस्ट मॅचेसमध्यें उत्तम खेळ आजपर्यंतच्या चुरशीच्या अशा अवघड सामन्यांतून मिळून एकंदर १९७ शतकें पुरीं केलीं आहेत

# महाराष्ट्रांतील संस्था

## अहमदनगर

१ अनाथ विद्यार्थी गृह, अहमदनगर:—संस्थेच्या आश्रमांत ७० विद्यार्थी आहेत. आतांपर्यंत सुमारें ५०० विद्यार्थी संस्थेंतून स्वावलंबी बनून बाहेर पडले. धंदेशिक्षण—सुतार काम, लोखंडी कारखाना, शिवणकाम, छापखाना, इ. विद्यार्थ्यांना आवडीप्रमाणें परंतु सक्तीनें धंदेशिक्षण दिलें जातें. औद्योगिक शाखा संस्थेचेच माजी विद्यार्थी दि. स. रायते यांचे देखरेखीखालीं आहे. १९३० पासून संस्थेनें बँड पथक केलें असून, सार्वजनिक समारंभ, मंगलकार्यें वगैरे प्रसंगीं निमंत्रणें येतात. एक वर्षांत इंग्रजी तीन यत्तांचा वर्ग जून १९३४ पासून सुरू केला असून जून १९३५ पासून औद्योगिक शिक्षणाचा समावेश करून संपूर्ण हायस्कूल काढण्याचा चालकांचा विचार आहे. एक प्रायोगिक शेतकी शाळा काढावी, असाही एक विचार आहे. संस्थेंत हिंदू स्पृश्य अनाथ पोरक्या होतकरू मुलांना प्रवेश मिळतो. अध्यक्ष—रा. ब. गणेश कृष्ण चितळें बी. ए. एलएल्. बी. एम्. एल. सी. ऑ. सेक्रेटरी—चि. मो. सप्तर्षी, एम्. ए. एल्एल्. बी. प्रमुख चालक व सहमंत्रि त्र्यं. अ. देवचक्के.

२ वाङ्मयोपासक-मंडळ, अहमदनगर:-१९३४ नेवासें येथें नगर—नाशिक वाङ्मयोपासकांचें संमेलन व श्रीज्ञानेश्वर —दर्शन ग्रंथाचें प्रकाशन हें यंदाचें विशेष कार्य होय. सालाबादप्रमाणें यंदाहि मंडळातर्फे श्रीगणेशोत्सव साजरा झाला. त्यावेळीं काव्यगायनाच्या व वक्तृत्वाच्या चढाओढी ठेविल्या होत्या. श्रीज्ञानदेव विद्यापीठ स्थापण्याचें निश्चित झालें असल्यामुळें पूर्वतयारीस सुरुवात झाली आहे. या वर्षी व्याख्यानें, काव्यगायन, चर्चा वगैरे मिळून एकंदर ३६ दिवस कार्यक्रम झाले. जमाखर्च—एकूण जमा रु. ५४१२—६—०; खर्च रु. ४७२५—१२—० सालअखेर शिल्लक. रु. ६८६—१०—०. अध्यक्ष—रा. ब. न. वा. देशमुख, कार्याध्यक्ष रा. ब. हिवरगांवकर बी. ई., ए. एम्., आय्. ई.; चिटणीस—गो. रा. गायकैवारी बी. ए. एल्एल्. बी., प. प. पटवर्धन.

३ हरिजन सेवाश्रम अहमदनगर:—संस्थेंत हरिजन विद्यार्थ्यांची राहाणें, भोजन, कपडालत्ता व बौद्धिक शिक्षणाची मोफत सोय केली आहे. हल्लीं विद्यार्थी २०. अ. वि. गृहाच्या औद्योगिक शाखांतून येथील विद्यार्थ्यांची धंदेशिक्षण देण्याची सोय केली आहे. स्पृश्य विद्यार्थ्यांच्या संगतीमुळें व योग्य काळजीमुळें सेवाश्रमांतील मुलांच्या वाईट संवई झपाट्यानें नष्ट होत आहेत व त्यांचे अभ्यास उत्तम असून गीतेचे श्लोक हे विद्यार्थी स्पष्ट व शुद्ध म्हणतात. संस्थापक व प्रमुख चालक त्र्यं. अ. देवचक्के.

## कुलाबा

१ श्रीहनुमान व्यायाम मंदिर, पनवेल (१९३५):—स्थापना इ. स. १९३३. शास्त्रशुद्ध व्यायामाचा सार्वत्रिक प्रसार करणें व तरुणांना निर्भय, तेजस्वी व बलवान बनविणें हे संस्थेचे आद्य हेतू आहेत. या दृष्टीनें पनवेल येथें एक व्यायामशाळा चालू असून शिवाय कांहीं मंडळी पनवेलचे आसपास खेड्यांत वरचेवर जात असून तेथें व्यायाम—शिक्षण देण्याचें कार्य चालू आहे. खेड्यापाड्यांतील सुमारें दोनशें मुलें या सोयीचा फायदा घेत असून गांवांतील ७५—८० मुलें व्यायामशाळेंत येतात. संस्थेनें तीस वर्षांच्या कायम भाड्यानें गांवांत एक भव्य पटांगण घेतलें आहे. आखाड्याची सोय झाली असून हल्लीं इमारतीचें काम चालू आहे. इमारत फंडास १५० रु. च्या देणग्या मिळाल्या आहेत. अध्यक्ष—गो. वि. भिडे, वकील. चिटणीस ना. बा. प्रधान. शिक्षक—मोरेश्वर गोविंद जोशी.

## ठाणें

१ सन्मित्र मंडळ, ठाणें (१९३३):-परस्पर सह-

कारी तत्त्वावर सभासदांच्या आर्थिक अडचणीचा परिहार करणें, हें ध्येय ठेवून मंडळ आज अकरा वर्षें काम करीत आहे. संस्थेच्या पैशांना बूड येणार नाहीं अशी दक्षता घेऊन सभासदांना ६ टक्के व्याजानें कर्ज देण्याची मंडळानें सुरुवात केली आहे. सभासदांची संख्या ४४ आहे व जमेचा आंकडा रु. २१२९ आहे. अध्यक्ष—नारायण गोविंद अत्रे. उपाध्यक्ष— सीताराम महादेव अभ्यंकर, चिटणीस—रामचंद्र महादेव जोशी.

**२ सोमवंशीय क्षत्रिय समाजोन्नति संघ,** बोर्डी (स्थापना १९१९):— वरील समाजाचें वास्तव्य ठाणें जिल्हयांत समुद्र किनाऱ्याजवळील भागांत, मुंबईपासून बोर्डीपर्यंतच्या लहानमोठ्या अशा २९ गांवांत आहे. सन १९३१ सालीं समाजामार्फत करण्यांत आलेल्या खानेसुमारीप्रमाणें समाजाची एकूण लोकसंख्या ९६७१ आहे. पैकीं पुरुष ४८५७ व स्त्रिया ४८१४ आहेत. बहुजन समाजाचें उपजीविकेचें साधन शेतीबागायत असून मुंबई व दादर येथील मंडळी नोकरी पेशानें राहतात. गेल्या पंधरा वर्षांत संघानें अंगीकृत केलेल्या कार्यांत बरेंच यश संपादन केलें आहे. संघानें माकूणसार, चराटें येथें कांहीं वर्षें शाळा चालविल्या असून, आतांपर्यंत ९६ विद्यार्थ्यांना ६९७३ रु. ची मदत केली आहे. समाजाच्या उन्नतीकरितां "क्षात्र. सेवक" नांवाचें त्रैमासिक सन १९३४ सालापासून श्री. परशराम धर्माजी चुरी यांच्या संपादकत्वाखालीं सुरू करण्यांत आलें आहे. एकूण ८७१ सभासद आहेत. पैकीं ४७ स्त्री सभासद आहेत. संघाच्या २३ शाखा आहेत. संघाचें वार्षिक उत्पन्न वर्गणी, देणगी वगैरे मिळून रु. २००० चें आहे व खर्च रु. १५०० आहे, गेल्या पंधरा वर्षांत संघास रु. ४१६२७ मिळाले असून, त्यांपैकीं खर्च विद्यार्थ्यांकरितां रु. १०२७३ धरून एकूण खर्च १५६४० झाला असून शिल्लक रु. ३९८७ व ठेवींत रु. २२००० आहेत. कार्यकारी मंडळाचे अध्यक्ष—भाईजी जगू राऊत, चिटणीस—आ. वि. सावे, बी. ए. बी. टी.; म. ल. राऊत, एल्. सी. सी.; भा. ह. पाटील, बी. ए.

## गुजराथ

**१ महाराष्ट्र मंडळ,**बेझवाडा (१९३४)—सभा-



सदसंख्या २२. मंडळास जागेचें साहाय्य श्री. भिकाजी पांडुरंग वालावलकर यांनीं मंडळस्थापनेपासून केलें. उत्सव समारंभ—लोकमान्य पुण्यतिथि, गणेशोत्सव, कोजागिरी व मंडळाचा वाढदिवस. जमा रु. २१६–१–६,खर्च रु. ११२ ६ आणे ९ पै; शिल्लक रु. १०३–१०–९. अध्यक्ष—डॉ. क्षीरसागर; चिटणीस— माणिक दत्तार. त्र्य सांगवीक

## धारवाड

**१ कर्नाटक महाराष्ट्र मंडळ,**धारवाड (१९३३ ते ३४):—चालू सालीं सुरुवातीस ५५ सभासद होते ते आतां शंभरावर आहेत. यंदाचें उत्पन्न रु. ३७२ १४ आणे ३ पै. सभासदांकडून बाकी येणें रु. २००. ग्रंथालयांत अदमासें १०० रु. चीं नवीं पुस्तकें घेतलीं, शिवाय कांहींनीं देणगी म्हणून पुस्तकें दिलीं आहेत. कचेरी यंदा मध्यवस्तींत आणली आहे. संस्थेची मालकीची जागा नाहीं. उत्सव समारंभ—शारदादिन, दासनवमी, शिवजयंती. जमा रु. ७८३–९–५, खर्च रु. ४४२–८–०, शिल्लक रु. ३४१–१–५. कार्यकारी मंडळाचे अध्यक्ष—वि. ना. जोग एम्. एल्. सी.; चिटणीस—भा. रा. पटवर्धन, एल्. एल्. बी.; रा. रा. करंदीकर बी. ए.

## पुणें

**१ अनाथ बालिकाश्रम, पुणें:—**

३९ वा वार्षिक अहवाल १९३४ सालाबद्दल. अध्यापिका शाळा, महिलाश्रम हायस्कूल, प्राथमिक शाळा व वसतिगृहें असे संस्थेचे चार विभाग आहेत हायस्कूलचा शिक्षणक्रम इतर शाळांप्रमाणें सात वर्षांचा केला आहे. त्यामुळें कायमची सरकारी मान्यता मिळाली. तीनही शाळांना दरसालप्रमाणें ग्रँट मिळाली. वसतिगृहांत ५ ते १० वर्षें वयापर्यंतचे मुलगे घेण्यास सुरुवात केली आहे. मुलगे व मुली यांचे स्वतंत्र वसतिगृहांत १० मुली व ४ मुलगे आहेत. श्रीमंत बाबासाहेब घोरपडे, संस्थान अधिपति, इचलकरंजी यांनीं रोख रु. ५००० व रु. २००० चें आश्वासन अशी रु. ७००० ची मदत केल्यामुळें 'इचलकरंजी सभागृह' उभारलें गेलें व एक मोठीच अडचण दूर झाली. वसतिगृहांतील मुलींची संख्या १७५ आहे; पैकीं ५३

नादार व १७ अर्धनादार आहेत. म्हणजे ७० विद्यार्थिनी आश्रमावर अवलंबून आहेत. तीनही शाळांत मिळून एकंदर १८८ विद्यार्थिनी व ११ विद्यार्थी आहेत. सध्यां आश्रमाजवळ रु. ४७३०० बाहेरील मंडळींच्या कायम ठेवी म्हणून आहेत. संस्थेनें कॉमन वेल्थ विमा कंपनीची एजन्सी घेतली आहे. या मार्गे इतरांना संस्थेतर्फे विमा उतरून संस्थेस थोडीबहुत मदत करतां येईल. वसतिगृहाचा १९३४ सालचा जमाखर्च--जमा रु. २९७२१-१४-८, खर्च रु. २५७३२-१-९ शिल्लक रु. ३९८३-१२-११. आश्रम मंडळी १९३४अखेर हिशोबःजमा-रु.२७२६०४-६-५,खर्च रु. ४११३७-०-९,शिल्लक रु. २३१४६७ ५आणे ८ पै. व्यवस्थापक मंडळाचे अध्यक्ष व ट्रस्टी रा.बा सी. कामत, बी. ए. एम्. एल्. सी. आश्रम मंडळीचे चिटणीस-भा. धों. कर्वे, बी. एस्‌एसी. बी. टी. एम्. डी.

**२ किंग एडवर्ड मेमोरियल हॉस्पिटल व सरदार मुदलियार डिस्पेन्सरी पुणें** (१९३३):-या वर्षी पुण्यांत प्लेगचा उपद्रव अत्यंत झाला. त्यामुळें नेहमीपेक्षां औषधाकरितां व उपचारासाठीं येणाऱ्या रोग्यांचें प्रमाण शेंकडा पन्नासानें उतरलें. एकंदर १०४ रोग्यांवर शस्त्रक्रिया केली. इस्पितळांत ९८३ स्त्रिया बाळंतीण झाल्या; पैकीं ८४५ बाळबाळंतीण अशा परत गेल्या. ६७ मुलें जन्मतःच मेलेलीं होतीं व ७१ मुलें मेलीं. इन्फंट वेलफेअर सेंटरवर साधारणतः रोजीं दोनवेळां पन्नास मुलें येत असत. गतवर्षी निराश्रित मुलें सहा संभाळलीं होतीं तर यंदा नऊ संभाळलीं. या वर्षी आऊट-डोअर पेशन्टस् एकंदर ४५७६३ येऊन गेले, व खुद्द इस्पितळांत उपचारासाठीं राहिले असे रोगी १२६१ होते. मिडविफ्रीच्या शिक्षणाकरितां यंदा पंधरा स्त्रिया घेतल्या. लेडी साइक्स यांचेमार्फत रु. २५००० देणगी मिळाली, व विशेष म्हणजे या उदार धनिकानें आपलें नांवच जाहीर केलें नाहीं. मुंबईचे एम्. एम्. भट, जे. पी. यांनीं रु. २००० देणगी दिली. राजाबहादुर प्रतापगिरजी यांनीं रेस्ट हाऊस बांधण्याकरितां रु. १०००० चें आश्वासन दिलें आहे. जमाखर्च १९३३ अखेर-जमा रु. १७३०२६-१०-१०, खर्च-४३०३४-१२-६, शिल्लक १२९९९१-१४-४. १९३४ चें अंदाजपत्रक-जमा रु. १९३३६, खर्च २०७५८ रु. तूट १४२२ रु. अध्यक्ष-कलेक्टरसाहेब, पुणें. उपाध्यक्ष सरदार एस्. सी. मुदलीआर, रा. ब. हणमंतराम रामनाथ. कार्यकारी मंडळः-चेअरमन-सरदार मुदलीआर, चिटणीस-रा. ब. चिमणलाल किसनदास, रा. ब. व्ही. जी. मानकर. चीफ मेडिकल ऑफिसर-पी. आर. वकील.

**३ डेक्कन एज्युकेशन सोसायटी,पुणें** (१९३३-३४):--या वर्षी फर्ग्यूसन कॉ. मध्यें मुलींकरितां सरस्वती क्वार्टर्स बांधल्या; सांगली येथील विलिंग्डन कॉ. मध्यें इंटरसायन्स 'बी' ग्रूपचा वर्ग सुरू केला व वांई येथील द्रवीड हायस्कूल संस्थेस जोडून शाखा म्हणून संस्थेच्या पूर्ण व्यवस्थेखालीं आलें. फर्ग्यूसन कॉलेज पुणें विद्यार्थ्यांची संख्या अंडर ग्रॅज्युएटस् ११७५ व पोस्ट ग्रॅज्युएटस् ९०. कॉलेजमध्यें १२०० विद्यार्थीच घ्यावे असा निर्बंध असल्यामुळें अत्यंत त्रास होतो. सरकारी ग्रँट रु. २५६०० धरून एकूण उत्पन्न रु. २५५०५३-१३-१ व खर्च रु. २६७६०५-८-०. प्रिन्सिपल-जी. एस्. महाजनी, विलिंग्डन कॉ. सांगली-विद्यार्थी अंडर ग्रॅज्युएटस् ३२७ व पोस्ट ग्रॅज्युएटस् १८. मुंबई सरकारच्या शिक्षण खात्यांतील मदत मिळणाऱ्या कॉलेजांच्या यादींत या कॉलेजचें नांव यंदापासून पडलें असल्यामुळें ग्रँट म्हणन रु. ५६०० मिळाले. जमाखर्चाचा आंकडा एकंदर रु. ८१३८४-८ आणे पैकीं रु. ९५७९-११-३ एवढी रक्कम बायलॉजिकल लॅबोरेटरी उभारण्यांत खर्ची पडली प्रिन्सिपल-लिमये, न्यू इंग्लिश स्कूल पुणें-विद्यार्थी संख्या १७४०, ग्रँट रु. १८०४५ एकूण जमा रु. १०२२४८-१२-१; खर्च रु. ९५४०५-२-९. या वर्षी शाळेला संस्थेकडन रु. ३३३०-१०-४ लोन म्हणून घ्यावे लागले. त्याचा जमेच्या आंकड्यांत समावेश केला आहे. सुपरिंटेंडेट पी. व्ही. बापट. न्यू इंग्लिश स्कूल सातारा-विद्यार्थी ८०५. ग्रँट रु. ८४२०, ड्रॉइंग ग्रँट रु. २३२. एकूण जमा

रु. ४६७०९ खर्च रु. ४७२२५. सुपरिंटेंडेंट एस्. आर. पारसनीस. नवीन मराठी शाळा पुणें:— विद्यार्थी ५८३. फीचें उत्पन्न रु. ४९९५. सरकारकडून ग्रँट रु. ५२५५. म्युनिसिपालिटीकडून रु. ११११. एकूण खर्च रु. १९६५८. सुपरिंटेंडेंट के.जी. पंडित. द्रवीड हायस्कूल, वांई:—विद्यार्थी ३३६. ग्रँट रु. ३२६०. एकंदर जमा रु. १९२८५–२–६ व खर्च रु. १९०१४–४–६. हेडमास्तर जी. व्ही. ढवळीकर. मावजी माधवजी इंग्लिश स्कूल, उंबरगांव:—विद्यार्थी १०९. एकूण जमा रु. ६९६४, १३ आणे ६ पै. खर्च रु. ९११५–२–९ तूट रु. २१५०–५–३ ही तूट सोसायटीच्या फंडांतून जादा मदत घेऊन व उंबरगांवांतील मंडळींनीं एकंदर रु. १००० जमवून मदत केली त्यामुळें भरून निघाली. ग्रँट रु. ११५०. ड्रॉइंग ग्रँट रु. ७५. हेडमास्तर—आर. जी. गोखले. न्यू इंग्लिश स्कूल वसतिगृह पुणें:—सुरवातीस विद्यार्थी ३५. वर्षाअखेर २५. दिवसानुदिवस येथें येणाऱ्या विद्यार्थ्यांची संख्या घटतच असल्यामुळें संस्थेपुढें वसतिगृह बंद करावें कीं काय हा प्रश्न आहे. सुपरिंटेंडेंट आर. एन्. जोशी. संस्थेच्या सर्व शाखांतून या वर्षी विद्यार्थ्यांची संख्या कमी असल्याचें कारण म्हणजे मुख्यत: प्लेगची सांथ हें होय. रामदुर्गचे चीफसाहेब श्रीमंत भावे यांनीं रु. १०००० संस्थेस देणगी दिली. त्यांची संस्थेच्या उपाध्यक्ष मंडळावर नेमणूक केली आहे. संस्थेची स्थावर मिळकत रु. २२६६५२७ व जंगम रु. ६३८५७० किंमतीची आहे. देणें (लोनचे रूपानें) रु. ३१५३८०–८–९. संस्थेजवळ एन्डोमिन्टस् म्हणून एकूण रक्कम रु. ३६३५४०–२–११, त्यावर द्यावी लागणारी रक्कम रु. १३३६९–१५–० मुख्य सोसा.चे प्रेसिडेंट— कोल्हापूरचे छत्रपती राजाराममहाराज. चेअरमन—दि. ब. के. आर. गोडबोले, सेक्रेटरी— प्रो. एम्. के. जोशी. संस्थेस ५० वर्षें पूर्ण झालीं म्हणून १९३५ मे मध्यें पुणें येथें सर सी. व्ही. रामन् यांच्या अध्यक्षतेखालीं ज्युबिली महोत्सव झाला.

**४ डेक्कन सभा**,पुणें:-अहवालाचे वर्षी १९३४ ‘गोखले हॉल’ चा उद्‌घाटन समारंभ सर कावसजी जहांगीर यांचे हस्तें झाला. या वर्षी नॅशनल लिबरल फेडरेशनचें अधिवेशन पुणें येथें सभेच्या ‘गोखले हॉल’मध्यें भरलें होतें. त्या वेळीं सभेच्या कार्यकर्त्यांस बरेंच काम पडलें. विशेष कामें— जॉइंट पार्लमेंटरी कमेटीच्या रिपोर्टाचा विचार, स्वराज्य पार्टीच्या पुनर्घटनेस दुजोरा, मध्यवर्ती सरकारच्या अंदाजपत्रकाचा विचार, मुंबईतील मजूरसंपाबाबत ठराव, झांजीबार येथील हिंदी लोकांबद्दल सहानुभूति, दक्षिण आफ्रिकेंतील हिंदी लोकांची वसाहत, मुंबई कौन्सिलमधील ‘मनी लेंडर्स बिल’ पुणें येथील विजेच्या दरवाढीविरुद्ध ठराव, नारायण पेठेंतील दारूचा गुत्ता निदान हमरस्त्यावरून तरी हलवावा अशी सूचना,शिवाय नेहमींप्रमाणें सभेनें रानडे स्मृतिदिन व गोखले स्मृतिदिन साजरे केले. १९३४ अखेरपर्यंत हिशेब (फक्त गोखले हॉलसंबंधीं) जमा—रु. १०७९१२-१३--२; खर्च—रु. ९९४८६--१--४, शिल्लक रु. ८४२६–११–१०. (१९३५ करितां) अध्यक्ष नामदार श्रीनिवासशास्त्री. चिटणीस—व्ही, एस्. लिमये, एस्. जी. गोखले, डी. व्ही. अंबेकर. लंडनचे प्रतिनिधि—एच्. एस्. एल्. पोलक सॉलिसीटर.

**५ पुणें अनाथ विद्यार्थी गृह** (१९३३–३४) (नाशिक–पुणें):—पुणें व नाशिक या दोन शाखा मिळून १६१ विद्यार्थ्यांची व्यवस्था होते. ता. ५ ते १२ मे १९३४ पर्यंतचा आठवडा संस्थेचा रौप्यमहोत्सव साजरा केला. रौप्यमहोत्सवांतील विशेष कार्यक्रम--श्रीरामलक्ष्मण मूर्तींची प्राणप्रतिष्ठा, हस्तें श्री. दादासाहेब केतकर, माजी विद्यार्थी संघ, संस्था चालकांचें संमेलन, महोत्सव समारंभ. २१ जून ३४ रोजीं डॉ. खैर यांचे हस्तें नाशिक येथील महाराष्ट्र विद्यालयाच्या स्वतंत्र इमारतीचा कोनशिला समारंभ साजरा झाला. १६ मार्च ३४ पासून पुणें येथील क्षयरोग चिकित्सालय नाशिक येथें नेलें. प्रथम हें भाड्याचे जागेंत होतें तें आतां पंचवटींतील संस्थेच्या जागेंत आहे. तेथें एक्स् रे ॲपरेटस्, न्यूमोथोरॅक्स ट्रीटमेंटची सोय आहे. शिवाय स्वतंत्र दवाखाना आहेच. डॉ. शं. वि. देवधर हे सर्व काम पाहतात. क्षयरोग-

प्रतिबंधक प्रचार डॉ. देवधर हे लेख लिहून व निरनिराळ्या ठिकाणीं सदीप व्याख्यानें देऊन करीत असतात. डॉ. खैर, परदेशाहून परत आल्यापासून अनेक वृत्तपत्र मासिकांतून लेख लिहितात व निरनिराळ्या ठिकाणीं व्याख्यानें देतात; अशा रीतीनें शिक्षणप्रचाराचें काम चालूं आहे. डॉ. खैर यांचे नेतृत्वाखालीं संस्थेची शिक्षण प्रगति चालूं असून नवीन उपक्रम चालू केले आहेत. संस्थेंतील प्रत्येक विद्यार्थी दररोज दोन तास हस्तव्यवसायाचें शिक्षण घेत असतो. औद्योगिक शिक्षणवर्गांतून या वर्षी पुढील गोष्टी सुरूं केल्या—मुद्रण शाळा, रासायनिक प्रयोगशाळा, मेकॅनिकल वर्कशॉप, विणकाम शिक्षण. नाशिक शाखेंतहि बागकाम शिक्षण, पंखा कारखाना, हस्तव्यवसाय, शिवणकाम इ. गोष्टी असून विद्यमान घडामोडींची माहिती, व्यावहारिक अर्थशास्त्र, धर्म, भारतीय कलांचें ज्ञान, प्राथमिक—लष्करी शिक्षण यांची जोड आहे. व्यापक शिक्षणासाठीं म्हणून सुटींतील प्रचार व पहाणी, समाज—निरीक्षण, स्वदेशी प्रचार, स्वयंसेवा, चित्रपट, व्याख्यानें असे कार्यक्रम असतात. या वर्षी प्रवेशासाठीं एकंदर १६६ अर्ज आले होते पैकीं ५१ विद्यार्थ्यांस प्रवेश मिळाला. नाशिक येथें ८७ व पुणें येथें ७४ मिळून १६१ विद्यार्थी होते. यांत निरनिराळ्या ठिकाणचे व निरनिराळ्या जातींचे विद्यार्थी होते. संस्थेचा लोकसंग्रह छापखाना हा आतां नव्या दुमजली इमारतींत गेला आहे. छापखान्यांत संस्थेचें ३५००० रु. चें भांडवल गुंतविलें असून सत्तर कामगार येथें काम करितात. याबरोबरच प्रकाशन खातें सुरूं केलें आहे. छापखान्यांत दैनिकें, मासिकें, शालोपयोगी पुस्तकें इ. बरेंच काम असतें. येथें छापखान्यांना लागणारा सर्व प्रकारचा टाइप पाडला जातो. एन्ग्रेव्हिंग मशिन येथें आहे. रबर-ब्लॉक तयार करण्याचें काम सुरूं केलें आहे. व्यवस्थापक शं. रा. दाते. संस्थेची गेल्या २५ वर्षांतील वाढीची पाहणी होऊन पुढील रूपरेखा आखावी या हेतूनें १—१—३४ रोजीं चौकशीमंडळ नेमलें होतें. अध्यक्ष डॉ. खैर व सभासद शं. रा. दाते व कृ. न. चौधरी यांनीं पाहणी करून ५०० हस्तलिखित पानांचा वृत्तांत सादर केला आहे. संस्थेचीं पुणें व नाशिक येथील मोफत वाचनालयें चालूं आहेत. त्यांत येणारीं वृत्तपत्रें, मासिकें (देशी, परदेशी) यांची संख्या भरपूर आहे. यंदाची एकूण जमा रु. ४२०७९—५—१०, नवें कर्ज रु. १६१३४—७—० मागील शिलकेसह एकूण जमा रु. ६९८१७—०—५॥ खर्च रु. ६३९३३-० ११॥ पै. नाशिक देणें रु. ५०९—१३—२ वजा जातां पुढील शिल्लक ५८८३—१५—६. एकूण कर्ज रु. ४६१८५-१३ व्यवस्थापक—वि. गं. केतकर.

**६ पुणें नगर वाचन मंदिर** (स्थापना १८४८):— ३१ मार्च १९३५ रोजीं संपलेल्या वर्षांत संस्थेच्या सभासदांची संख्या सुमारें ९०० होती. या वर्षी एकंदर उत्पन्न ९९११ रु. ८ आ. ६ पै झालें व खर्च ६२८२ रु. ५ आणे ३ पै झाला. नवीन २५ तहाहयात सभासद झाले. संस्थेच्या हल्लींच्या इमारतीवर नवीन तिसरा मजला बांधण्याची योजना संस्थेच्या सर्वसाधारण सभेनें मंजूर केली असून त्या कामीं १५००० रुपयांपर्यंत खर्च होईल. १९३५ अखेरपर्यंत हें काम पुरें होईल असा अंदाज आहे. गेल्या सालापासून संस्थेचें ऑफिस उघडें असण्याची वेळ वाढविण्यांत आली आहे. त्याचप्रमाणें इन्डेक्स कार्ड—पद्धतीनें पुस्तकांची यादी करण्यांत आली आहे. १९३५ ते ३६ सालासाठीं घेण्यांत येणाऱ्या नियतकालिकांची संख्या १६० वर असून यांत सर्व मराठी नियतकालिकें, हिंदुस्थानांत प्रसिद्ध होणारीं बहुतेक इंग्लिश नियतकालिकें व परदेशांतील प्रमुख नियतकालिकें यांचा समावेश होतो. १९३५—३६ सालासाठीं दि. ब. का. रा. गोडबोले हे अध्यक्ष, श्री. वा. मो. पोतदार व प्रो. श्री. नी. चाफेकर हे उपाध्यक्ष व श्री. ल. के. देशपांडे व श्री. रा. य. रानडे हे चिटणीस आहेत.

**७ प्रेस ओनर्स असोसिएशन**, पुणें.—पुण्यांतील विद्युत् पुरवठा संघानें विजेचे दर वाढविण्याचे योजिलें व 'मिनिमम' भलताच ठरविला. त्या वेळीं या संस्थेच्या सभासदांनीं शहरच्या नागरिकां-

बरोबर सहकार्य केलें व विद्युत् कंपनीच्या नवीन योजनेबद्दलचा निषेध करण्याचे कामीं बरीच खटपट केली. प्रेस अॅक्ट नवीन झाल्यावेळीं या धंद्यांतील अडचणी मध्यवर्ती कायदेमंडळापुढें आणण्याची खटपट केली. पोस्टाचे दर वाढविण्यांत आल्यावर त्याचा या धंद्यावर विविध तऱ्हेनें अनिष्ट परिणाम झाला ही गोष्ट मध्यवर्ती कायदेमंडळामध्यें नामदार व आमदार सभासदांमार्फत आणण्याचा शक्य तो प्रयत्न केला. छपाईच्या धंद्यांतील कामगार वर्ग जास्त कार्यक्षम होण्याच्या दृष्टीनें बऱ्याच योजनेची चर्चा या संस्थेमार्फत झालेली आहे. प्रॉव्हिडंट फंड, कामगार हितसंवर्धक फंड वगैरे बाबतच्या योजना कित्येक छापखान्यांतून या संस्थेच्या परिश्रमानें सुरूं झाल्या आहेत, देशी छापखान्याच्या धंद्याचें प्रदर्शन भरविण्याची व कामगारास लायकीचें सर्टिफिकेट या असोसिएशनमार्फत देण्याबाबतच्या योजनेची चर्चा या संस्थेमार्फत झाली असून या योजनांना लवकरच मूर्त स्वरूप येईल असें वाटत आहे. संस्थेचे अध्यक्ष आर्यभूषण छापखान्याचे चालक श्री. अनंत विनायक पटवर्धन हे आहेत व आनंद छापखान्याचे श्री. गोपाळ बळवंत जोशी व पूना लिथो वर्क्सचे श्री. शंकर बळवंत सहस्रबुद्धे हे जोड कार्यवाह आहेत, संस्थेची कचेरी आर्यभूषण छापखान्याच्या कचेरीचे जागेंत पुणें नं. २ येथें आहे.

८ **प्रौढ शिक्षण संघ**, पुणें:—विलायती मॅजिक लॅंटर्न किंमतीस महाग व वापरण्यास कठिण असल्यामुळें कमी किंमतींत व वापरण्यास सुलभ असा मॅजिक लॅंटर्न शोधून काढिला असून आतां त्याचा खाजगी संस्था, संस्थानें व ग्रामसुधारणेकरितां सरकारी अधिकारी इ. उपयोग करूं लागले आहेत. चित्रांचे योगानें खेड्यापाड्यांतील निरक्षर लोकांसही ज्ञान मिळतें. या वर्षी सरकारच्या उद्योगधंद्याच्या खात्याच्या साहाय्यानें सूत, रेशीम व लोंकर यांचें वीणकाम व रंगकाम यांच्या माहितीच्या स्लाइड्स् तयार झाल्या आहेत. या पद्धतीनें शिक्षण कसें द्यावें हें शिकविण्यासाठीं गेल्या नवरात्रांत एक स्पेशल ट्रेनिंग क्लास भरवून दहा शिक्षक तयार केले आहेत.

९ **भांडारकर ओरिएन्टल् रिसर्च इन्स्टिटयूट**, पुणें, १९३३-३४:—संस्थेची सभासद संख्या ३१४ आहे. एकंदर २०० मंडळी संस्थेस भेट देऊन गेली. हस्तलिखित प्रकाशन व महाभारत प्रकाशन इत्यादिकरितां जी सरकारी ग्रँट मिळत असे ती एप्रिल १९३३ पासून पुढील १० वर्षांकरितां पुन्हां मिळण्याचें निश्चित झालें आहे. नेहमींप्रमाणें कै. डॉ. भांडारकर यांचा ८ वा स्मृतिदिन साजरा झाला. निजाम गेस्ट हाऊस बांधून पूर्ण झालें. याकरितां रु. ३०००० वर खर्च झाला आहे. पैकीं रु. २५००० निजाम सरकारनें देणगी दिली. अजून रु. २००० फर्निचर वगैरे करितां खर्च झालेल्या रकमेची विनंतिवजा मागणी निजामसरकारकडे करण्यांत आली आहे. छापखान्याकरितां व माल ठेवण्याकरितां स्वतंत्र इमारत बांधली असून त्याकरितां रु. २३००० खर्च झाले ते कर्जाऊ काढलेले आहेत. सेक्रेटरी डॉ. बेलवलकर यांनीं सहा वर्षें काम करून राजिनामा दिला. हल्लीं सेक्रेटरी डॉ. सुखटणकर. ग्रंथालयांत एकंदर ९०१३ पुस्तकें आहेत. महाभारताचा एक पूर्ण ११०० पानांचा खंड विक्रीस तयार आहे. निरनिराळ्या पर्वांचें काम डॉ. रघुवीर, डॉ. डे, डॉ. सुखटणकर या तज्ज्ञ मंडळींच्या नेतृत्वाखालीं चालूं आहे. प्रकाशन खात्याकडून या वर्षी ९८० पानें छापलीं गेलीं. संस्थेनें अंगिकारलेलें आर, जी. बी. वर्कस्च्या चार खंडांच्या प्रकाशनाचें काम या वर्षी पूर्ण झालें. मुंबई युनिव्हर्सिटी अजूनही ही संस्था हें पोस्ट ग्रॅज्युएट विद्यार्थ्यांना संशोधनाकरितां एकच एक ठिकाण नेमत नाहीं.त्यामुळें यावेत तितके विद्यार्थी येथें येत नाहींत. हस्तलिखितें छापून तयार करण्याचें काम व्यवस्थित चालूं आहे. जमाखर्च १९३३–३४, जमा–रु. ११६४२२–५–४, खर्च रु. ९०९३६–७-१०, शिल्लक रु. २५४८५-१३-६. प्रेसिडेंट–मुंबईचे गव्हर्नर, नियामक मंडळ–अध्यक्ष न. चिं. केळकर, व्यवस्थापक मंडळ–अध्यक्ष–

प्रि. व्ही. जी. आपटे, चिटणीस-डॉ. सुखटणकर, खजिनदार-प्रो. व्ही. जी. काळे.

**१० महाराष्ट्र एज्युकेशन सोसायटी** हायस्कूल पुणें:-या शाळेची आणखी एक शाखा डेक्कन जिमखाना कॉलनींत भव्य व प्रशस्त इमारतींत आहे. चालूं सालीं संस्थेनें मुलींकरितां स्वतंत्र हायस्कूल सुरूं केलें आहे. प्राथमिक शाळेंत मात्र सहशिक्षणच आहे. संस्थेची 'टेक्सटाइल टेक्नॉलजी' म्हणून एक शाखा आहे. तेथें विणकाम, रंगकाम वगैरेचें स्वावलंबनास उपयोगी असें शिक्षण मिळतें. लौकरच कॉमर्स कॉलेज काढण्याचा संस्थेचा विचार आहे. हायस्कुलांत सक्तीचें शारीरशिक्षण असून तज्ज्ञ डॉक्टरांकडून शारीरिक तपासणी प्रतिवर्षी होते. अल्पोपहारासाठीं 'शाळेंत रिफ्रेशमेंट बार' ठेवण्यांत आला आहे. संमेलनप्रसंगीं होणाऱ्या नाटयप्रयोगाच्या सोईसाठीं एक थिएटर शाळेनें बांधलें आहे. विद्यार्थ्यांच्या जबाबदारीवर 'स्टूडंट स्टोअर' चालू आहे. एपिडिआस्कोप, मॅजिक लँटर्न, सिनेमा प्रोजेक्टर, रेडिओ, इत्यादि आधुनिक साधनें आहेतच. प्रेसिडेंड-श्री. बाबासाहेब घोरपडे (इचलकरंजी-चीफ). चेअरमन-दि. ब. के. आर. गोडबोले. बी. ए., एम्. सी. ई. सुपरिंटेंडेंट-जी. जी. मालशे एम्. ए. बी. एस्‌सी. सेक्रेटरी-डी. व्ही. बापट, एम्. ए.

**११ महाराष्ट्र कोश मंडळ लिमिटेड**, पुणें: (१९३४-३५) या वर्षी शब्दकोशाचा तिसरा विभाग छापून बाहेर पडला व तो ग्राहकांकडे रवाना झाला. सांप्रत चौथा विभाग पुरा होत आहे. आजतागायत ग्राहकांची संख्या भागीदार २४५८ व वर्गणीदार ४६०. डेक्कन व्हर्नाक्युलर ट्रा. सोसायटीनें पहिल्या दोन भागांप्रमाणें तिसऱ्या विभागासही रु. २५ पारितोषक दिलें. श्री. दाते व श्री. कर्वे यांचें प्रचारकार्य चालूं आहे. जमा रु. ४७०८७-१४-३ (यांत रु. २३२८-६-३ देणें आहे). वर्ष १ ते ६ यांतील खर्च रु. ५०२४५-१३. चालू वर्षाचा खर्च रु. १३५२५-१३-८. मॅनेजिंग डायरेक्टर - यशवंत रामकृष्ण दाते.

**१२ महाराष्ट्र चित्रकार मंडळ**, पुणें १९३४ आजमितीस १८३ सभासद पटावर आहेत. चित्रग्रंथालयांत देणगी व रोख खरेदी मिळून २५० रु. चीं पुस्तकें सुरुवातीसच आलीं आहेत. महाराष्ट्र आर्ट गॅलरींतील चित्रसंख्या वाढत असून वारंवार पुष्कळ लोक भेट देऊन जातात. चित्रकला, पेंटिंग इत्यादि चढाओढी, कलेवर तज्ज्ञांचीं व्याख्यानें, चित्रकार-संमेलन, राजा रविवर्मा स्मृतिदिन, फरी पेंटिंग क्लास इत्यादि मंडळाचें नेहमींचें काम चालूं आहेच. १९३४ अखेर जमाखर्च: जमा रु. १०५६-११-०; खर्च रु. १०२३-४-३ शिल्लक रु. ३३-६-९. अध्यक्ष सरदार जी. एन्. मुजुमदार; जनरल सेक्रेटरी -र. द. गोडबोले.

**१३ रायगड स्मारक कमिटी** १९३५:-कमिटीनें यंदा रायगडावरील उत्सव थाटांत करण्याचें ठरवून ७०० रु. खर्च केले. प्रवासी लोकांकरितां रायगड मार्गदर्शक पत्रक छापलें. तसेंच रायगडावरील ऐतिहासिक महत्त्वाच्या ठिकाणीं पाट्या लावण्याचे कामीं कुलाबा बोर्डाशीं सहकार्य केलें. शिवाजी महाराजांच्या स्मरणार्थ गडावर दोन उत्सव होतात. पैकीं चैत्र शु. १५ हा निधनाचा दिवस सुटीच्या दृष्टीनें महत्त्वाचा समजून तो स्थानिक कमिटीनें साजरा करावा व फाल्गुन व. ३ म्हणजे जन्म दिवशीं महाडकर मंडळींनीं गडावर जाऊन हा दिवस थोडक्यांत साजरा करावा. याशिवाय 'चित्रमय शिवाजी' हें पुस्तक राज्याभिषेक उत्सवप्रसंगीं प्रसिद्ध केलें, रायगड सिंहासन दुरुस्तीकरितां निधि गोळा करण्याचे कामास सहानुभूति आहे; दुरुस्तीबाबत सरकारचे पुराणवस्तु खात्याशीं पत्रव्यवहार, आहे, महाडपासून रायगडपर्यंत रस्त्याचे बाबतींत कुलाबा बोर्डाचें काम, गंगासागर तलाव दुरुस्ती कुलाबा बोर्डानें सुरू केलें आहे. सदर तलावांतील पाणी उत्सवाचे वेळीं शुद्ध ठेवणें, रायगडावरील पायरस्ता, गंगासागर तलाव इत्यादींची दुरुस्तीची बोर्डास विनंति या गोष्टी कमेटीनें करण्याचें ठरविलें आहे. १९३३-३४ जमाखर्च-जमा रु. ३१५०७-२-२, खर्च रु. ८७२-२-९. शिल्लक रु. २२१३४-१४-५. खजिनदार वा. कृ. भावे.

**१४ वक्तृत्वोत्तेजक मंडळी**, पुणें:—सभेतर्फे पुण्यांत बहुतकरून दरसाल वक्तृत्व समारंभ करण्यांत येतोच; पण त्याखेरीज पुण्याबाहेरच्या होतकरू तरुणांना उत्तेजन मिळावें म्हणून कांहीं ठिकाणच्या संस्थांना संस्थेतर्फे बक्षिसाकरितां देणग्या देण्यांत येतात. १८ वर्षांवरील सर्व स्त्रीपुरुषांस चढाओढींत भाग घेतां येतो. सभेतर्फे प्रशस्तिपत्रक, संतोषपत्र, गुणांचें पत्रक, पारितोषिकें याप्रमाणें गुणवार योग्य तें मिळतें. शिल्लक रु. १४९०३-८-२ या सालीं बक्षिसाकडे खर्च रु. २०७ झाला. कार्यकारी मंडळाचे अध्यक्ष—न. चिं. केळकर. चिटणीस वि. ल. गोडबोले, वा. कृ. भावे.

**१५ विधवा–विवाह–मंडळ**, पुणें :—

विधवा विवाह कार्य प्रचारासाठीं महिला मदत कमिटी निवडली आहे. विधवाविवाह–कायदा स्मृतिदिन जुलै ता. २५ ला साजरा झाला. १९३४ सालीं पांच पुनर्विवाह मंडळामार्फत झाले. तसेंच पुनर्विवाहेच्छु स्त्री–पुरुषांकडून मंडळाकडे एकंदर ६६० पत्रें आलीं. मंडळाच्या पटावर पुनर्विवाहेच्छु ७८ पुरुष व २० स्त्रिया यांचीं नांवें नोंदलीं आहेत या वर्षी एका निराश्रित पुनर्विवाहेच्छु मुलीचा आपल्या घरीं सांभाळ करून सेक्रेटरी श्री. पाटणकर यांनीं तिचा पुनर्विवाह करून दिला. एका पुनर्विवाहित कुटुंबावर दैवी आपत्ति कोसळल्यामुळें त्या कुटुंबाच्या खर्चासाठीं मंडळानें सहा महिने पर्यंत दरमहा १० रु. अशी त्यांना मदत केली. सपत्निकांच्या पुनर्विवाहाला मंडळ मदत करीत नाहीं. या सालीं वर्गण्या व देणग्या मिळून ५९४–४–० रु. इतकी रक्कम मिळाली. १९३४ सालचा हिशेब; जमा एकूण रु. १०२६४–१२–६ खर्च रु. ६५९–११–०, शिल्लक रु. ९६०५–१–६. १९३५ चें व्यवस्थापक मंडळ —अध्यक्ष श्री. रा. शं. दीक्षित, सेक्रेटरी —श्री. मा. रा. जोशी, श्री. ज. कृ. पाटणकर. ऑडिटर —ग. रा. गांधी, वकील. स्त्रीप्रतिनिधी — सौ. कमळाबाई बावळे. (ही सुरुवात यंदापासूनच आहे.)

**१६ वैदिक संशोधन मंडळ**, पुणें:—वैदिक वाङमयाचें अध्ययन, अध्यापन आणि संशोधन–प्रकाशन करण्याच्या उद्देशानें ता. १–८–१९२९ रोजीं स्थापन झाल्यानंतर प्रारंभीचें आणि महत्त्वाचें काम म्हणून मंडळानें, सध्यां दुर्मिळ असलेली सायणभाष्यासहित ऋग्वेदाची नवीन, निर्दोष आणि सुधारलेली अशी आवृत्ति संशोधनपूर्वक काढण्याचें ठरविलें. त्याप्रमाणें प्रथम मंडळाचा पहिला भाग (पृष्ठसंख्या १११५) आक्टोबर १९३३ मध्यें (विजयादशमी शके १८५५) प्रसिद्ध केला. त्यावर वृत्तपत्रांचे आणि प्राच्यविद्याविषयक नियतकालिकांचे उत्कृष्ट अभिप्राय प्रकट झाले. एकंदर पांच भागांमध्यें ही आवृत्ति पूर्ण व्हावयाची आहे. पहिल्या चार भागांमध्यें संहिता आणि भाष्य संपूर्ण होणार असून पांचव्या भागांत ऋषि, देवता, मंत्र, पदें इत्यादींच्या सूचींचा समावेश व्हावयाचा आहे. प्रथम–खण्डाची किंमत बारा रुपये ठेवण्यांत आली आहे. एकंदर प्रकाशनास पंचाहत्तर हजार रु. खर्च येईल व तें येथून पुढें पांच वर्षांत पूर्ण होईल असा अंदाज आहे. केवळ पुस्तकाच्या विक्रीवर एवढा खर्च भागणें अशक्य असल्यामुळें आर्य संस्कृतीचे अभिमानी असे संस्थानिक, जहागिरदार, धनिक इत्यादिकांची सहानुभूति संपादन करण्याचे यत्न चालू आहेत आणि त्यांत यशहि येत आहे. आवृत्तीच्या दुसऱ्या भागामध्यें २, ३, ४ व ५ अशा चार मंडळांचा समावेश व्हावयाचा आहे. या भागाचें हस्तलिखितांवरून पूर्ण संशोधन झालें असून मुद्रणप्रतहि तयार झाली आहे. या भागाचीं कमींत कमी एक हजार पृष्ठें व्हावयाचीं असून त्यांपैकीं चारशें पृष्ठें छापून झालीं आहेत. १९३५ अखेर सदर भाग प्रसिद्ध होऊं शकेल अशी अपेक्षा आहे. संस्थेची कचेरी आतांपर्यंत टिळक स्मारक मंदिरांत होती. आतां त्याच आवारांतील, पूर्वी टिळक महाविद्यालय असलेल्या जागेपैकीं कांहीं जागा मंडळानें टिळक स्मारक ट्रस्टपासून भाड्यानें घेतली आहे आणि मंडळाची कचेरी तेथें नेण्यांत आली आहे.

व्यवस्थापक मंडळ---प्रि. वै. का. राजवाडे, एम्. ए., (अध्यक्ष); श्री. चिं. वि. वैद्य, एम्. ए. एलएल्. बी. (उपाध्यक्ष); श्री. ह. वि. तुळपुळे, बी. ए., एलएल्. बी. (खजिनदार); श्री. न. चिं. केळकर बी. ए. एलएल्. बी.; सरदार माधवराव किबे,; एम्.ए., श्री. ज. स. करंदीकर, बी. ए., एलएल्. बी.; श्री. य. रा. दाते, बी. ए. एलएल्.बी. वैद्य पु. ग. नानलशास्त्री, आयुर्वेदाचार्य; विद्यानिधि सि. वि. चित्रावशास्त्री, आचार्य वि. प्र. लिमये, वाङ्मयविशारद; चिटणीस–श्री. ना. श्री. सोनटक्के, वाङ्मयविशारद; श्री. स. के. भावे, वाङ्मयविशारद.

संपादक मंडळ---प्रि. वै. का. राजवाडे, एम्. ए.; महामहोपाध्याय वासुदेवशास्त्री अभ्यंकर; श्री. ना. श्री. सोनटक्के, वाङ्मयविशारद; ति. सु. वरदराजशर्मा, वेदान्तविद्याप्रवीण; श्री. चिं. ग. काशीकर, वाङ्मयपारंगत, श्री. बा. वि. उम्राणीकर (शास्त्री).

सांपत्तिक स्थिति--( १९३५ मे अखेर) जमा ६८८० – ११ – ९, ( यापैकीं सुमारें तीनसाडेतीन हजार रु. कर्ज आहे). खर्च– रु. ६३५२–९–५; शिल्लक रु. ५२८–२–४.

**१७ शिक्रापूर ग्रामसंस्था**, शिक्रापूरः–(१९३५) पुण्यापासून २२ मैलांवर पुणें नगर रस्त्यावर शिक्रापूर हा गांव आहे. तेथील लोकसंख्या अदमासें १६०० आहे. बरेच दिवस हा गांव अत्यंत वाईट परिस्थितींत होता. गांवकऱ्यांनीं परस्पर सहकार्यानें श्री. सीताराम त्र्यंबक कुलकर्णी (शिक्षक महाराष्ट्र एज्यु. सोसा. चें हायस्कूल पुणें व या गांवचे रहिवासी) यांच्या नेतृत्वाखालीं गेल्या आठदहा वर्षांत देवळांचा जीर्णोद्धार, निवडुंगाचें उच्चाटन, रात्रीची मोफत शाळा, मोफत वाचनालय, मोफत आयुर्वेदिक औषधालय सार्वजनिक गटारें साफ करणें, रस्ते नीट ठेवणें इत्यादि कामें चालू आहेत. अशाच प्रकारचीं व याहूनही महत्त्वाचीं उदा. साक्षरता, पंचायतीकडून तंटे मोडणें इत्यादि कामें पार पडण्याकरितां ही संस्था स्थापिली आहे. संस्थेच्या प्रातिनिधिक सभेंत लोकप्रतिनिधी गांवकऱ्यांकडून निवडून येतात. संस्थेच्या सभासदांस वर्गणी वगैरे कांहीं नाहीं. कार्यासाठीं संस्थेचीं दोन मंडळें 'सल्लागार मंडळ' व 'कार्यकारी मंडळ' आहेत. सल्लागार मंडळ अध्यक्ष श्री. सीताराम त्र्यंबक कुलकर्णी कार्यकारी मंडळ अध्यक्ष–रामचंद्रराव धोंडिबा पाटील कारंजे. मुख्य चिटणीस–गोपिनाथ गोविंद कासार.

**१८ श्री समर्थ व्यायाम मंडळ**, पुणें (१९३५):- दारूवाला पुलाजवळील ३–४ एकर जागा म्युनिसिपॅलिटीची होती ती सात वर्षांचे करारानें द. सा. १ रु. भाड्यानें संस्थेस मिळाली व १ मे १९३४ पासून या नवीन जागेंत शारीरिक शिक्षणाचें कार्य सुरू झालें. ३५००रु. पर्यंत खर्च करून ही जागा खेळण्यास योग्य अशी केली व व्यायामाकरितां तात्पुरती इमारत बांधली आहे. व्यायाममंदिर सकाळसंध्याकाळ उघडें असतें. तसेंच व्यायाम शिक्षणाकरितां तज्ज्ञ शिक्षकही नेमले आहेत. बलोपासकांची संख्या १२५ ते १५० पर्यंत आहे. संस्थेंतून लष्करी कवायतीचा वर्ग, बँड विभाग, बालवीर पथक, पोहोण्याचा वर्ग, व्यायामप्रचार, शारीरिक शिक्षण वर्ग, उत्सव समारंभ इत्यादि कामें चालू आहेत. शिवाय वेळोवेळीं स्वयंसेवक पाठवून समाजसेवा चालू ठेवली आहे. १९३४ चा जमाखर्च–- जमा रु ३२६९ – ७ – ६ (यांत रु. १५०० कर्ज जमा आहे). खर्च रु. ३१६८–६–३, शिल्लक रु. १०१–१–३ अध्यक्षः– श्री. पां. के. शिराळकर. चिटणीसः–वैद्य ल. ब. शिराळकर.

**१९ सरस्वती मंदिर संस्था**, पुणें (१९३४ डिसेंबर):–संस्थेच्या 'पूना नाइट हायस्कल' मधून आजपावेतों १०० विद्यार्थी यशस्वी होऊन बाहेर पडले आहेत. शाखा नं. २ पूना इंग्लिश स्कूल– हल्लीं विद्यार्थी सुमारें ३०० . ही शाळा दिवसाची आहे. हल्लीं इतर शाळेंतील पद्धतीप्रमाणेंच शिक्षण मिळतें; परंतु पुढें डाल्टन पद्धतीनुसार शिक्षण देऊन मुलांचा कल बदलून औद्योगिक शाखांकडे प्रवृत्त करण्याचा विचार आहे. प्राथमिक शाळा ही

शाखा नं. ३ म्युनिसिपल स्कूल बोर्डानें 'अ' वर्गांत समाविष्ट केली आहे. विद्यार्थी २००, जागेच्या अभावीं जास्त मुलांना प्रवेश मिळत नाहीं. नवीन 'प्लेवे' पद्धतीनुसार येथें शिक्षण दिलें जातें, शाळेवर मुख्याध्यापिका आहेत. शाखा नं. ४ खेडेगांवांतील इंग्रजीचे वर्ग– असे पुणें जिल्ह्यांत आठ ठिकाणीं आहेत, पैकीं तीन सरकारनें रजिस्टर केले आहेत. येथें इंग्रजी तीन यत्तांचें शिक्षण मिळतें. शाखा नं. ५ रात्रींची औद्योगिक शाळा, ही नुकतीच सुरू केली असून येथें दोन महिन्यांचा एक कोर्स अशा तऱ्हेनें खेळणीं करणें, शाई, साबण, मलमें इत्यादि तयार करणें शिवाय कॅलिको प्रिन्टिंग वॉशिंग व डाइंग अशा प्रकारचे थोड्या भांडवलावर उभारतां येण्यासारखे धंद्याचें शिक्षण मिळतें. जोडीला जरूर तेवढें इंग्रजी शिक्षण व व्यापारधंद्याचें शिक्षण देण्याची सोय केली आहे. संस्थेची ६ वी परंतु जुनी शाखा म्हणजे प्रकाशनखातें. हल्लीं या शाखेचें काम आर्थिक स्थिति असमाधानकारक असल्यामुळें बंद आहे. बोर्ड ऑफ लाइफ मेम्बर्समध्यें य. रा. दाते, चिं. ग. कर्वे इत्यादि नऊ सभासद आहेत.

**२० सर्व्हंटस् ऑफ इंडिया सोसायटी, पुणें (१९३४–३५)**:–संस्थेस ३० वर्षें पूर्ण झालीं. एप्रिल १९३५ मध्यें संस्थेचे मुख्य नामदार शास्त्री यांचे हस्तें फर्ग्यूसनच्या टेकडीवर कै. नामदार गोखले, द्रवीड, पटवर्धन व देवधर या मंडळींनीं जेथें संस्थेच्या सदस्यत्वाच्या शपथा घेतल्या त्या ठिकाणीं एक शिला उभी केली आहे. हें सर्व काम डेक्कन एज्यु. सोसायटीनें स्वखर्चानें केलें. सोसायटीचे सभासद २९ आहेत. ही मंडळी पुणें, मद्रास, मयन्नूर (जिल्हा त्रिचनापल्ली), मंगलोर, कालिकत मुंबई, जळगांव, नागपूर, भांबोरा (जि. अमरावती), अलाहाबाद, लखनौ, लाहोर व कटक या ठिकाणीं आहेत. सभासद कोदंडराव हे अमेरिकेंतील येल विश्वविद्यालयाची शिष्यवृत्ती मिळाल्यामुळें तिकडे गेले आहेत. मजूर–प्रतिनिधी म्हणून ना. म. जोशी व रघुनाथराव बखले यांची अनुक्रमें मध्यवर्ती कायदेमंडळ व मुंबई कौन्सिलवर सरकारतर्फे नेमणूक झाली आहे. श्री. पटवर्धन यांचा संस्थानी राजकारणांत पुष्कळ वेळ खर्च होतो. पंडित कुंझरू हे नॅशनल लिबरल फेडरेशनचे अध्यक्ष होते ( पुणें अधिवेशन ). सोसायटीचीं कामें–परदेशस्थ हिंदी लोकांसंबंधीं विशेषतः झांझीबार येथील, स्थानिक स्वराज्य, मजूर. ना. म. जोशी, जिनिव्हा परिषदेस हजर होते व तेथील कार्यकारी मंडळाचे सभासद निवडले गेले. सहकारी संस्था, ग्रामोद्धार, स्वदेशी प्रचार, शैक्षणिक चळवळ ( देवधर–मलबार रिकन्स्ट्रक्शन ट्रस्ट, बालवीर इ.). सामाजिक-(सेवासदन, पुणें, मंगलोर येथील अस्पृश्यांचें मिशन, हरिजन सेवा संघ–दिल्ली, चिटणीस–ठक्कर ); क्रिमिनल ट्राइब्ज् सेटलमेंट, जळगांव–श्री. शारंगपाणी यांचे व्यवस्थेखालीं. अलाहाबाद सेवा समिती जनरल सेक्रेटरी–कुंझरू, टेंपरन्स असोसिएशन, संयुक्तप्रांत चिटणीस–डुबे. आरोग्य–बेबी आणि हेल्थ विक असोसिएशन, मुंबई इलाखा, उपाध्यक्ष–देवधर; मद्रास इत्यादि ठिकाणीं इतर मंडळी; भूकंप, पूर, दुष्काळ इत्यादि प्रसंगीं निराश्रितांना मदत फंड उभारणें इत्यादि. इंग्रजी साप्ताहिक 'सर्व्हंट ऑफ इंडिया' संपादक श्री. वझे, मराठी दैनिक ज्ञानप्रकाश. संपादक श्री. लिमये, हितवाद–नागपूर इंग्रजी द्विसाप्ताहिक–संपादक श्री. शहाणे हे आहेत. सोसायटीचीं पुणें, मुंबई, मद्रास, अलाहाबाद, नागपूर, कटक, कालिकत या ठिकाणीं ग्रंथसंग्रहालयें आहेत. परंतु पुणें येथील ग्रंथसंग्रहालय हें मुख्य होय. येथील ग्रंथसंख्या सुमारें २५००० आहे. संस्थेच्या गोखले इन्स्टिट्यूट ऑफ पॉलिटिक्स अँड इकानॉमिक्स या शाखेस या ग्रंथ संग्रहालयाचा फार फायदा होतो. या इन्स्टिटयूटमध्यें ४६ पोस्ट ग्रॅज्युएट विद्यार्थी आहेत. शाखेचे डायरेक्टर प्रि. धनंजयराव गाडगीळ आहेत. संस्थेला सभासदांची गरज आहे व त्याकरितां अर्ज ही येतात. परंतु आर्थिक प्रतिकूलतेमुळें नवीन सभासद घेतां येत नाहींत. अध्यक्ष–बाबासाहेब देवधर, उपाध्यक्ष–पं. हृदयनाथ कुंझरू, चिटणीस श्री. वझे.

## मुंबई

**१ कुडाळदेशस्थ, गौड-ब्राह्मण निराश्रित-साह्यकारी फंड** कचेरी, मुंबई:-सन १९३३ मध्यें एकंदर ३४ निराश्रितांस मदत दिली. मदत आंकडा रु.११५४-६-०. या वर्षी जमा रु. २२७०-४-०. फंडाची वर्षअखेर एकूण शिल्लक रु. २४०३२-५-० व्यवस्थापक मंडळाचे अध्यक्ष-रा. ब. वासुदेवराव अनंत बांबर्डेकर. चिटणीस-दादाजी सखाराम सामंत, तातो सखाराम सामंत. कार्यकारी मंडळाचे अध्यक्ष-बाळकृष्ण अनंत पाटील देसाई.

**२ नॅशनल लायब्ररी,** वांद्रें:-एकूण वर्गणीदार ३३३. एकंदर पुस्तक संख्या ३६३०. या वर्षी सुमारें ६४३२ पुस्तकें सभासदांकडून वाचलीं गेलीं. लायब्ररींत सुमारें २५ मासिकें व साप्ताहिकें येतात. वांद्रें म्युनिसिपालिटीकडून सालाबाद-प्रमाणें रु. २०० मदत मिळाली. एकूण जमा रु. ३३०५-२-० खर्च रु. ९१३-०-६, शिल्लक रु. २३९२-१-६. कार्यकारी मंडळाचे अध्यक्ष-ना. दा. सामंत, चिटणीस- द. श्री. तेंडुलकर, वा. गं. ठाकूर.

**३ पाठारे प्रभु ज्ञातींतील कांहीं संस्था,** मुंबई:-

**(अ) पाठारे प्रभु सोशल समाज:**-स्थापना सन १८८८. हल्लीं सभासद सहाशेंवर असून दर आठवड्यास व्याख्यानें देऊन त्यांवर वादविवाद केला जातो. वक्तृत्वास व लेखनकलेस उत्तेजन देण्याकरितां चढाओढीचे सामने भरवून दरवर्षी शंभर दीडशें रुपयांचीं बक्षिसें दिलीं जातात. चित्रकलेंत व इतर कलाकौशल्यांत प्राविण्य दाखविणाऱ्यांना खास बक्षिसें देण्यांत येतात. युनिव्हर्सिटीची परीक्षा पसार होणाऱ्या सर्व विद्यार्थ्यांस बक्षिसें दिलीं जातात. बक्षिससमारंभास ज्ञातींतील बहुतेक समाज हजर राहून सहाशें सातशें रुपये किंमतीचीं पुस्तकें साठसत्तर विद्यार्थ्यांस दिलीं जातात. समाजाचा स्वतःचा सर्वांगसुंदर पुस्तकसंग्रह असून दरवर्षी शंभर रुपयांच्या किंमतीचीं नवीन उपयुक्त पुस्तकें घेतलीं जातात. देशांतील विद्वानांचीं व्याख्यानें करवून सभासदांच्या ज्ञानांत भर घालण्यांत येत असते.

**(आ) पाठारे प्रभु चॅरिटीज:**-ही संस्था ज्ञातींतील गरिबांच्या राहणीचा प्रश्न सोडवीत आहे. या संस्थेच्या मालकीचीं पांचसहा देवालयें असून त्यांतून निरनिराळे धार्मिक उत्सव मोठ्या थाटानें साजरे केले जातात. संस्थेच्या मालकीच्या आठ नऊ इमारती असून त्यांतून मध्यम स्थितींतील लोकांची व गरीब कुटुंबाची राहण्याची व्यवस्था केली जाते. संस्थेचें वार्षिक उत्पन्न जवळ जवळ पंधरा हजार रुपये आहे.

**(इ) पाठारे प्रभु रिलीफ फंड:**-हा जवळ जवळ तीन लाख रु. चा असून तीस निराश्रित कुटुंबांना या फंडांतून वार्षिक सात आठ हजार रुपयांपर्यंत मदत देण्यांत येते. मुलांच्याकरितां शाळेपासून कॉलेजापर्यंतच्या शिक्षणाचा खर्च केला जातो. सालिना दोन अडीच हजारांपर्यंत ही मदत देण्यांत येते व तिचा लाभ जवळ जवळ वीस विद्यार्थी घेत असतात. या फंडांतून विलायतेंत उच्च शिक्षणाकरितां जाणाऱ्या विद्यार्थ्यांस देखील मदत करण्यांत आलेली आहे.

**(ई) प्रभु प्रभात:**-हें मासिक गेलीं तेरा वर्षे अव्याहतपणें प्रसिद्ध होत असून ज्ञातींत घडणाऱ्या हकीकतीची सर्व माहिती यांत भरपूर देण्यांत येत असते. शिवाय देशांतील महत्त्वाच्या घडामोडींची माहिती, विद्वान् व प्रमुख पुढाऱ्यांचे लेख वगैरे प्रसिद्ध होत असल्यानें या मासिकानें ज्ञातीची व साहित्याची उत्तम प्रकारें सेवा चालविलेली आहे.

**(उ) इतर संस्था:**-याशिवाय ज्ञातींतील स्त्रियांकरितां म्हणून पाठारे प्रभु महिला समाज स्थापन केलेला असून त्याचें कार्य पाठारे प्रभु सोशल समाजाप्रमाणेंच चाललेलें आहे. गरीबांना औषधोपचार फुकट करण्याकरितां पाठारे प्रभु नर्सिंग असोसिएशन ही संस्था असून "प्रभु-सेमिनरी." ही विद्यार्जनाचें काम उत्तम प्रकारें करीत आहे.

**४ ब्राह्मण सेवा संघ,** कुर्ला:-एकूण सभासद २०० संघानें आर्थिक गैरसोयीवर उपाय म्हणून परस्पर

सहाय्यकारी पतपेढी १९२२ सालीं स्थापन केली. आजमितीस पेढीचे ८६ सभासद असून सुमारें रु. ६५०० पर्यंत देवघेवीचा व्यवहार होत असतो. संघाच्या वाचनालयांत ५६० पुस्तकें आहेत. संघानें वेस्टर्न इं. ला. इन्शुअरन्स कंपनीची एजन्सी घेऊन ६–७ वर्षांत ४२५ रु. कमिशन मिळविलें. संघाच्या 'यशोदा प्रभाकर निवास' व 'दत्तात्रय दाजी साने' व्यायामशाळा या इमारती बांधून पुऱ्या झाल्या. निवास बांधकाम खर्च रु. ४१८९-४ आणे, व्यायाम शाळा बांधकाम खर्च रु. १०७९-५ आणे व उपकरणासाठीं ११५ रु.पर्यंत खर्च केला. निवासांत पांथस्थास उतरण्याची सोय केली आहे. भोजनाची सोय करणें आहे, ती. कै. यशोदाबाई खाडिलकर यांचे मृत्युपत्रान्वयें ३०० रु. येणें आहे त्यांतून होईल. याच बाईंनीं संघास इमारत बांधण्यास रु. ३००० देणगी दिली. त्या वेळीं रु. ४२५० खर्च करून हल्लीचें कार्यालय बांधलें. संघाच्या सुरुवातीपासून १४ वर्षांत सर्व देणग्या धरून रु. १७००० जमा झाले पैकीं जागा व इमारती मिळून रु. १२००० खर्च झाले. आज संघास रु. २५०० इतकें कर्ज आहे. अहवालाचे वर्षीं एकण वर्गणी जमा रु. ४५६ संस्थेचें नेहमीचें कार्य–रामनवमी, लो. टिळक पुण्यस्मरण, गणेशोत्सव, गीताजयंती इत्यादि चालू आहेत. संघाच्या पतपेढीचें वसूल झालेलें भांडवल रु. २४०० आहे. वर्ष अखेर पेढीला रु. २७४–१३–९ इतका निवळ नफा झाला. ३७ सभासदांस रु. ६२६१ इतकें रोख कर्ज दिलें. साल अखेर अद्याप येणें ४७९० रु. ६ आणे ६ पै आहे. पतपेढी का. मं. चे अध्यक्ष (१९३४–३५) श्री. रा. श्री. गोडबाले, व चिटणीस द. ब. जोशी. संघाचा जमाखर्च–जमा रु. ८५१५–६–०, खर्च रु. ८१८६–१२–०, शिल्लक रु. ३२८–१०–०. कार्यकारी मंडळाचे अध्यक्ष श्री. दत्तात्रय गणेश रानडे, बी. ए. चिटणीस–श्री. दत्तात्रय केशव पेंडसे.

**५ महाराष्ट्र चेंबर ऑफ कॉमर्स**, मुंबईः–ही संस्था महाराष्ट्रांतील व्यापारी व कारखानदार यांचे, त्याचप्रमाणें देशाचे आर्थिक हितसंरक्षणार्थ इ. स. १९२७ मध्यें दुसऱ्या महाराष्ट्र व्यापारी परिषदेचे वेळीं स्थापन करण्यांत आली. हिची कचेरी मुंबई येथें कोटांत फिनिक्स बिल्डिंग, बॅलर्ड इस्टेट, येथें आहे. मुंबई शहर व उपनगर, ठाणें, पुणें, सातारा, बेळगांव, सोलापूर, अहमदनगर, पूर्व व पश्चिम खानदेश, नाशिक, कुलाबा, रत्नागिरी हे मराठी जिल्हे व आजूबाजूचीं संस्थानें इतकें चेंबरचें कार्यक्षेत्र आहे. चेंबर महाराष्ट्राची संघटित, मध्यवर्ती व वजनदार व्यापारी संस्था आहे. चेंबरची सभासद संख्या २२५ चे वर असून तिला १६ व्यापारी संस्था जोडलेल्या आहेत. चेंबरचे अध्यक्ष शेठ वालचंद हिराचंद हे असून उपाध्यक्ष रा. म. ल. डहाणूकर, शेठ नारायणदास बंकट बुंदेलखंडी व रा. वि. रा. वेलणकर हे आहेत. रा. द. वि. केळकर एम्. ए. हे चिटणीस आहेत. चेंबरला मद्रास व सदर्न मराठा रेल्वेचे हुबळी येथील ब्रँच ॲडव्हायसरी कमिटी व मुंबई बोर्ड ऑफ कम्युनिकेशन्स यांजवर प्रतिनिधित्व आहे चेंबर व्यापारी, कारखानदार वगैरेंच्या गाऱ्हाण्यांची दाद लावण्याचा प्रयत्न करते. आजवर वेळोवेळीं टॅरिफ बोर्डामार्फत झालेल्या निरनिराळ्या उद्योगधंद्यांचे चौकशीचे वेळीं देशाचे हिताचे दृष्टीनें लेखी अभिप्राय तिनें सादर केला असून आपल्या प्रतिनिधीमार्फत तोंडी साक्षीपुरावाहि दिलेला आहे. याशिवाय देशापुढील तत्कालीन महत्त्वाचे आर्थिक प्रश्नांवर चेंबर मत व्यक्त करितें.

**६ राष्ट्रधर्म–सरस्वती मठ संस्था**, मुंबईः–देशाकरितां पदराला चाट लावून कांहीं विधायक कार्य करावें या हेतूनें राष्ट्रधर्म ही संस्था स्थापिली व तिच्या नेतृत्वाखालीं कांहीं पोट संस्था चालू करण्याचें ठरलें होतें. त्याप्रमाणें खेडेगांवांत शिक्षण प्रचार करण्यासाठीं म्हणून सरस्वती–मठ संस्था स्थापन झाली. मावळ तालुक्यांतील लोहगड भोंवतालच्या २० मैलांच्या टापूंत संस्थेनें दोन वर्षांत आठ शाळा सुरू केल्या होत्या त्यांपैकीं पांच शाळा आज चालू आहेत. एकंदर २०० विद्यार्थी या शाळांचा फायदा घेतात. संस्थेला पुणें जिल्हा स्कूल बोर्डाकडन रु. ४४७ ची ग्रँट मिळते. शाळां

तून नित्योपयोगी प्राथमिक शिक्षण मोफत दिलें जातें. ग्रामोद्धार कार्य संस्थेनें आंखलेल्या पद्धतीनुसार चालूच आहे; परंतु या कामाचें पाऊल जास्त झपाटयानें पुढें पडावें म्हणून सुशिक्षित व तज्ज्ञ स्त्रीपुरुषांचा 'व्हिलेज कल्चर कॅम्प' म्हणून योग्य स्थळ पाहून कांहीं दिवस करणें अशी एक योजना आहे. पहिला तळ लोहगड येथें पडणार आहे. स्कूलबोर्डाच्या ग्रँटविरहित १९३२ व ३३ सालीं एकंदर जमा रु. २९७६–७–३ झाली. सरस्वती–मठ संस्थेचा खर्च रु. २९१५–३–६. एकूण जमाखर्च –जमा रु. ६८८५–१–१ खर्च रु. ३३२४–५–९ शिल्लक ३५६०–११–४ व प्रॉव्हिडंट फंड रु. १३५–८–० अध्यक्ष–रा. ना. मोघे, व्यवस्थापक–शे. अ. गोपुजकर, एम्. ए. अॅ. व्यवस्थापक–स. पां. नाडकर्णी, डी. कॉम्. एम्. सी. ए. सी. आय्. आय्. (लंडन).

७ **लोकमान्य सेवासंघ**, पारलें (एप्रिल १९३४ ते मार्च १९३५):–संघानें बारावा वार्षिक वृत्तांत व स्थापनेपासून आजतागायत असा द्वादश वार्षिक वृत्तांत असे दोन अहवाल प्रसिद्ध केले आहेत. संघाचें कार्यकारी मंडळ असून उत्सव शाखा, करमणूक शाखा, ग्रंथ संग्रहालय शाखा, प्रचारक शाखा, म्युनिसिपल शाखा, व्यायाम शाखा, स्वदेशी वस्तुप्रचार शाखा, स्त्री शाखा व शिक्षण शाखा अशा नऊ शाखा आहेत. शिवाय एक मोफत वाचनालय चालू ठेवलें आहे. संघाची स्थिति निदर्शक आंकडे–सन १९३५–सभासद संख्या ४४८, देणगी रु. ३५७७०, वर्गणी रु. ४६३५, इतर उत्पन्न २८३२८, मालमत्ता रु. ५१०८२. संस्थेनें 'टिळक मंदिर' नांवाची एक विस्तृत इमारत उभारली असून त्यांत सभागृह, व्यायामशाळा व संग्रहालय असे तीन प्रशस्त विभाग बांधले आहेत. सभागृहांत एक हजार माणसें बसण्याची सोय झाली आहे. ग्रंथसंग्रहालयांतील ग्रंथसंख्या ३२१६ झाली आहे. वाचनालयांत ७० नियतकालिकें ठेविलीं जातात. एकण जमा–रु. २५४०९–६–०, खर्च रु. २२१२९–३–० शिल्लक रु. ३२८०–३–० अध्यक्ष–श्री. गोपाळ रामचंद्र फाटक, कार्यकारी मंडळाचे अध्यक्ष–श्री. वामन मंगेश दुभाषी. चिटणीस–श्री. शंकर काशिनाथ गोखले व श्री. रघुनाथ विष्णू कानिटकर.

८ **सारस्वत विद्यार्थी सहाय्यक मंडळी**, मुंबई: (१ जून १९३३ ते ३१ मे १९३४).

एकूण सभासद १८१७. पैकीं १९८ स्त्रीसभासद आहेत. गेल्या कित्येक वर्षांप्रमाणें चालू सालींही मंडळीचे चिटणीस श्री. य. ह. सुखटणकर हे मंडळीच्या प्रचारकार्यासाठीं बाहेरगांवीं स्वखर्चानें गेले होते. वर्गणी वसूल रु. ४१३६–६–०. वसूल न झालेली वर्गणी रु. ३४८२–२–० पैकीं वसूल होणें अशक्य म्हणजे बुडीत खातें रु. ६७६–१२–०. या वर्षी एकंदर देणगी रक्कम रु. ३८९–१२–० मिळाली. लायक असूनही द्रव्याभावामुळें ९६ विद्यार्थ्यांचे अर्ज नाकारावे लागले. वृत्तांत-वर्षअखेर मंडळीजवळ रु. १५६४७१–११–८ कायम शिल्लक आहे. १८६ विद्यार्थ्यांना शिष्यवृत्तीच्या रूपानें रु. १३५२९ देण्यांत आले. तसेंच अनाथ–विधवा–शिक्षण–फंडांतून १७ गतभर्तृकांना रु. १८२८ ची मदत झाली आहे. ७६ विद्यार्थ्यांकडून मदतफेड म्हणून रु. २४८९ संस्थेकडे जमा झाले आहेत. मंडळीनें ज्ञातीसाठीं ३२ वर्षांत ७२६ विद्यार्थी व विद्यार्थिनींच्या शिक्षणाप्रीत्यर्थ रु. १५४३४३–८–६ व अनाथ–विधवा-शिक्षण–फंडातून ५२ गतभर्तृकांच्या विद्यार्जनासाठीं सुमारें रु. १४३३७–१०–० मिळून एकूण विद्यादानाच्या कामीं सुमारें रु. १६८६८१-२–६ खर्च केले असून शिवाय स्मारक–फंड, कायम निधि वगैरे धरून सुमारें रु. १६७०३७–९–१० शिल्लक तिच्या हातीं आहे. विद्यार्जनासाठीं खर्चीं पडलेल्या रु. १६८६८१ पैकीं फक्त रु. २९१२४ मदतफेड म्हणून हातीं आले आहेत. व्यवस्थापक मंडळ: अध्यक्ष– शं. पु. वर्दे बी. ए. एल्‌एल्. बी.; चिटणीस–कु. नीरा लक्ष्मण मोंडकर बी. ए., बी. टी. व य. ह. सुखटणकर.

## सोलापूर

१ **गांधी नाथा रंगजी दिगंबर जैन बोर्डिंग** स्कूल, सोलापूर (१९३३):–गेल्या सालीं फंडांत

रु. ११६९१४ होते तेवढेच या सालींही कायम आहेत. रोज जेवणाऱ्या विद्यार्थ्यांची सरासरी संख्या ४९ होती. त्यांच्या भोजनाचा महिन्याचा खर्च सरासरीनें रु. ६ पडला. डिसेंबर अखेर पटावर ३७ विद्यार्थी होते. त्यापैकीं १७ अनपेड व २० पेड होते. पेड विद्यार्थ्यांपैकीं ७ जणांस दिगम्बर जैनोन्नती फंडांतून प्रत्येकीं दरमहा रु. ८ प्रमाणें शिष्यवृत्ति होती. हे सर्व विद्यार्थी निरनिराळ्या संस्थेंतून शिक्षण घेतात. यांना संस्थेंत धर्मशिक्षण दिलें जातें व सर्वजण व्यायामशाळेंत व्यायाम घेतात. १९३३ सालांतील उत्पन्न व खर्च–जमा रु. ७३९४–४–३. खर्च रु. ५०८७–२–३. वाढवा रु. २३०७–२–०. कार्यकारी मंडळाचे चेअरमन गांधी खुशालचंद पानाचंद.

**२ गांधी रामचंद्र नाथा दि. जैन बोर्डिंग छात्रालय**, सोलापूर (१९३३) :–हें छात्रालय गांधी नाथा रंगजी दि. जैन बोर्डिंग स्कूलच्या ट्रस्टींच्या ताब्यांत देण्यांत आलें आहे. छात्रालयाकरितां गांधी रामचंद नाथा स्मारक कमेटीनें अजमासें ७ हजार रुपयांचा फंड उभारून एक वसतिगृह बांधून दिलें आहे. गांधी रा. ना. ट्रस्टींनीं रु. २०००० चें व्याज मदत म्हणून देऊं केलें आहे. अनाथ मुलांना येथें आश्रय मिळतो. हीं मुलें वरील जैन बोर्डिंगांत भोजन करतात व जैन पाठशाळेंत शिक्षण घेतात. कांहीं टेकनिकल स्कूलमध्यें आहेत. शेठ जीवराज गौतमचंद दोशी हे छात्रालयास दरसाल रु. ३०० देतात. जमा रु. १६३०–८–० व तेवढाच खर्च झाला. गांधी नाथा रंगजी दिगंबर जैनोन्नति फंडाची १९३३ ची जमा ३२५४८–९–० आहे. या रकमेवरील व्याज रु. १५८०–४–०. ट्रस्टडीडप्रमाणें संस्कृत स्कॉलर्शिप, इंग्रजी स्कॉ., शास्त्रजीर्णोद्धार फंड व दुष्काळपीडितांस मदत यावर खर्च झाले. सेक्रेटरी रावजी सखाराम दोशी.

**३ शेठ सखाराम जैन औषधालय**, सोलापूर (१९३३–३४) :—या वर्षांत नवे रोगी १३२२२ असून, त्यांत पुरुष ५२२४, स्त्रिया ४६४५ व मुलें ३३५३ होतीं. जुने रोगी ३७६७८ असून एकूण नव्या जुन्या रोग्यांची संख्या ५०९०० आहे. गेल्या वर्षी ही संख्या ४८००९ होती. या वर्षी १ एप्रील १९३३ पासून या संख्येंतूनच नवीन नेत्रचिकित्सालयाची शाखा उघडली आहे. याचें सर्व श्रेय शेठ जिवराज गौतमचंद यांना आहे. डोळ्याच्या ऑपरेशन्सकरितां मुंबईचे डॉ. सरदेसाई येथें येऊन ऑनररी काम करितात. नवे जुने रोगी मिळून एकंदर संख्या ५२१६ आहे. वर्ष अखेर आठ महिन्यांत ११२ ऑपरेशन्स झालीं. औषधालयाचा जमाखर्च–जमा रु. ५४४८–१२–६, खर्च रु. ३६१४–३–० शिल्लक रु. १८३४–९–६ संस्थेचे वैद्य श्रीपाद नेमिनाथ उपाध्याय हे आहेत. व्यवस्थापक व ट्रस्टी–खुशालचंद पानाचंद.

## कोल्हापूर

**१ सिटी हायस्कूल**, कोल्हापूर :-स्थापना १८९३. उद्दिष्ट–गरीब व मागासलेल्या जातींत शिक्षणाचा प्रसार करणें. १९०३ पासून संस्थानची ग्रँट दरवर्षी मिळत आहे. १९१९ मध्यें एस्. एम्. ई. सोसायटी "सुलभ व चांगलें शिक्षण, निरनिराळ्या गांवीं शाळा व कॉलेजें चालवून देणें" ह्या उद्देशानें स्थापिली. चालू परिस्थितीला योग्य व तरतरीत विद्यार्थी बनतील असें शिक्षण दिलें जातें. संस्थेचे सहा आजन्मसेवक आहेत. सोसायटीचे अध्यक्ष– श्री. उदाजीराव चव्हाण, हिम्मत बहादूर, जहागिरदार, कोल्हापूर. सिटी हायस्कूल मुंबई विद्यापीठाच्या मॅट्रिकच्या परीक्षेस विद्यार्थी पाठवितें.

## मिरज

**१ श्रीशिवजयंत्युत्सव मंडळ**, मिरज :-फाल्गुन व. ३।१८५६. ता. २१ ते २६ मार्च १९३५ सहा दिवस उत्सव झाला. जागा मिरज सरकारी थिएटर. श्री. पं. सातवळेकर, श्री. रामभाऊ राजवाडे, श्री. गो. म. जोशी, दे. भ. बाबूराव गोखले यांचीं व्याख्यानें, डॉ. पटवर्धन यांचें कीर्तन, गीता वाच-भिडेशास्त्री यांचें प्रवचन व शाहीर श्री. बं. म. कुलकर्णी यांचे पोवाडे झाले. मंडळाजवळ शिल्लक रु. ७९५–१५–३ असून मंडळानें योजिलेल्या स्मारकास व्याजासुद्धां रु. ५६०–०–० जमलेले

आहेत. अध्यक्ष श्री. गो. म. रानडे, खजिनदार य. वा. खरे, चिटणीस दा. मो. भट व कृ. गो. पवार

**२ स्नेहसंवर्धक संघ**, मिरज (१९३२-३५):— सत्कार समारंभ, प्रोत्साहन व अभिनंदन कार्यक्रम, पुस्तक प्रकाशन हें व अशा प्रकारचें कार्य संघाच्या उद्देशास धरून चालू आहे. संघानें प्रसिद्ध केलेलीं पुस्तकें एकंदर पांच आहेत. संघाचे प्रमुख श्री. जोशी.

## सांगली

**१ आरोग्य संवर्धक मंडळ**, सांगली:—गेल्या वर्षात सांगली शहरांतील खण, एक्स्टेन्शन्, गांवभाग व पेठभाग येथील पाहणी केली. पाहणींत मिळालेली माहिती—वरील भागांतील कुटुंबें ४६८ (अदमासें २३४० माणसें) यांत निरोगी अशीं फक्त९ कुटुंबें (यांत पांच वर्षांखालचीं मुलें नाहींत), इतर कुटुंबांत इन्फ्लुएन्झा शेंकडा ३५, फुप्फुसांची अशक्तता व त्याचे रोग शें. ३७, यकृतवाढ शें. २०, टॉन्सिल शें. २७, दंतरोग शें. ४०, मेंदूची अशक्तता शें. २२, बाळंतरोग शें. १७, क्षयरोग शें. ७, मलावरोध शें. ६० हें विकारांचें प्रमाण थोरांत आढळलें. मुलांत दिसून आलेले विकार यकृतवाढ शें. ४७, न्यूमोनिया शें. २१, इन्फ्लु. शें. ५२, देवीगोंवर शें. ६७, रिकेटस् शें. ३१, बालग्रह शें. २९, कृमि शें. ८०, त्वचारोग (खरूज इ.) शें. ७२. संस्थापक व चालक वैद्य ग. पां परांजपे, चिटणीस—रा. द. डिग्रजकर.

**२ कुमार औषधालय**, सांगली:—जातिभेदाचा विचार न करतां रोगी मुलांना तपासून मोफत औषधोपचार केला जातो व निसर्ग उपायांची माहिती सांगण्यांत येते. आरोग्याचा प्रसार व्हावा म्हणून तज्ज्ञांचीं व्याख्यानें होतात व आरोग्यपत्रकें वाटलीं जातात. औषधालयांत नित्य ९० ते १२५ हजेरी असते; प्रत्यक्ष येणारे रोगी ४० ते ६० व बाकी औषधासाठीं येणारीं माणसें. निरनिराळ्या २३ गांवांतील रोगी मुलांनीं या औषधालयाचा फायदा घेतला आहे. वार्षिक आढावा (१९३३–३४) नवे रोगी ३१२१. जुने रोगी ५५१८२ एकूण हजेरी ५८३०३. रोगी बरे होण्याचें प्रमाण शेंकडा ९४ पडलें आहे. जमा रु. ६१९–६–० खर्च रु. ५७७–४–७ शिल्लक— रु. ६२–१–६. मुख्य चालक—वैद्य ग. पां. परांजपे.

## महाराष्ट्राबाहेरील संस्था

१ शहर वाचनालय, अमरावती:— एप्रिल १९३५ मध्यें संस्थेस ६८ वर्षें पूर्ण झालीं. नवीन वर्गणीदार २५ व वार्षिक उत्पन्नांत वाढ रु. २०० या वर्षीं रु. ६५० चीं पुस्तकें विकत घेण्याचें निश्चित झालें आहे. पैकीं फक्त इतिहास—पुस्तकाकडे रु. १५० खर्च करणार. गत वर्षीं रु. २५० चींच पुस्तकें घेतलीं होतीं. प्रो. द. वा. पोतदार यांचें 'मराठी सत्तेच्या विनाशाची कारण—मीमांसा' या विषयावर जानेवारींत तिकिटें लावून व्याख्यान माला केली; उत्पन्न रु. २१८, अध्यक्ष—डॉ. भट, चिटणीस—पु. के. ओझरकर वकील, दि. ह. सहस्रबुद्धे

**२ हनुमान व्यायाम प्रसारक मंडळ**, अमरावती:—व्यायामवस्तु भांडार, पुस्तकालय व वाचनालय, हनुमान बालचर पथक, बँड, आरोग्य विभाग व प्रकाशन विभाग असे मंडळाचे कार्यविभाग आहेत. मंडळानें आजपावेतों १०।११ पुस्तकें प्रकाशित केलीं आहेत. 'नगर संरक्षक दल' म्हणून एक मंडळाची शाखा आहे. त्यांत अधिकारी शिक्षण वर्ग, व सैनिक शिक्षण वर्ग असे दोन वर्ग आहेत. याचा विजयादशमीचा वार्षिक उत्सव फार मोठ्या प्रमाणांत साजरा होतो. मंडळाच्या आणखी सात ठिकाणीं शाखा चालू आहेत. व्यायाम प्रचाराचें काम अव्याहत चालू असून निरनिराळ्या लांबलांबचे ठिकाणींही प्रचारक जाऊन येतात. मंडळाची व्यायाम पद्धति इतर ठिकाणीं अनुसरली आहे. मंडळाचे कांहीं सभासद परदेशांत जाऊन व्यायाम शिक्षण घेऊन आले आहेत. जमाखर्च रु. १६६१४–०–३, अध्यक्ष—न. अ. द्रवीड, एम्. ए. नागपूर, जनरल सेक्रेटरी—ह. अ. असनारे वकील.

**३ महाराष्ट्र समाज**, अहमदाबाद, (१९२४):— सभासद संख्या १४०, दसऱ्याचें सामुदायिक सीमोल्लंघन, चंद्रिका संम्मेलन, संक्रांति संमेलन, दासनवमी उत्सव हे वार्षिक कार्यक्रम व्यवस्थित पार पडले. १९३४ च्या ईस्टरमध्यें बृहन्महाराष्ट्र

परिषद येथें भरणार होती. परंतु मेनिन्जायटीस-च्या सांथीमुळें अधिवेशन पुढें ढकलावें लागलें. अहमदाबाद येथें मराठी बोलणारांची संख्या सुमारें ६५०० आहे. या महाराष्ट्रीयांच्या शिरगणतीचें काम हातीं घेण्याचें ठरलें परंतु उरकलें नाहीं. समाजाच्या सरस्वती मंदिर (ग्रंथालय) व मराठी शाळा अशा दोन शाखा आहेत. मराठी शाळेंत चार इयत्तांपर्यंत शिक्षण मिळतें. एकंदर मुलें ३० होतीं, मासिक फी. १ रु. गरीब मुलांस नादारी मिळते. समाजाचा इमारत-फंड रु. २७६-१३-० जमला आहे. एकूण जमा रु. ४२५३-३-८, खर्च-रु. १९९२-६-४, शिल्लक रु. २२६०-१३-४. कार्यकारी मंडळाचे अध्यक्ष (१९३४-३५). रा. गो. पाटील, चिटणीस ना. अ. मावळणकर, गो. गो. करंजगांवकर.

**४ महाराष्ट्र ब्राह्मण सभा,** इंदूर (१९३४):- चालू वर्षी एकंदर ६८४ सभासद आहेत. कालवश झालेल्या सभासदांपैकीं सहा सभासद ब्रा. सभा-कुटुंब-सहाय्यक संस्थेचे सभासद होते. त्यांपैकीं चार जणांच्या कुटुंबियांस ११२५-२-० रु. मदत देण्यांत आली. राहिलेल्या दोघांच्या कुटुंबियास हिशेब झाल्यानंतर मदत मिळेलच (कुटुंब-सहाय्यक संस्था ही ब्रा. सभेची पोट संस्था आहे. तिचे ३१० सभासद आहेत. ही पोटसंस्था स्थापन झाल्यापासून आजपर्यंत मृत सभासदांच्या कुटुंबास रु. ३८९३-७-१० पै मदत केली आहे). संस्थेच्या सभागृह इमारतीचें काम बहुतेक पुरें झालें असून एकंदर खर्च रु. १६४२७-४-९ झाला. तसेंच ब्राह्मण सभेचे प्रारंभापासूनचे सभासद व एक प्रमुख चालक डॉ. शारंगपाणी यांनीं म. ब्रा. समाजाच्या उपयोगाकरितां सरकारी दवाखान्याच्या आवारांत, ५००० रु. खर्चून एक वॉर्ड बांधला आहे. यामुळें महाराष्ट्र ब्रा. समाजाची एक मोठीच अडचण दूर झाली आहे. या वर्षी एकंदर वर्गणीचें उत्पन्न रु. १४९२-१४-० झालें. देणगीदाखल ८०४ रु. आले. एकूण जमा रु. ४०८७-७-३. खर्च रु. १८६२-१-९, शिल्लक रु. २२२५-५-६. अध्यक्षः- वामन गणेश पंतवैद्य बी. ए. एल्. एल्. बी.; वकील, चिटणीसः- मा. गो. नातू, दि. वा. नेनेशास्त्री, रा. ना. काळेले, वकील; फडणीसः- दि. वा. नेने, वि. श्री. जोग.

## बृहन्महाराष्ट्रांतील महाराष्ट्रीय संस्थांची यादी

(१) अजमीर

१ महाराष्ट्र मंडळ, कडक्का चौक

(२) अमृतसर

२ महाराष्ट्रीय समाज, बट्टीहट्टा

(३) अयोध्या

३ महाराष्ट्र पंचद्राविड ब्राह्मण समाज, अहिल्याबाईचें राममंदिर

(४) अलाहाबाद

४ महाराष्ट्र मंडळ ३ क्रॉस्थवेट रोड

५ महाराष्ट्र बाल शिक्षण संस्था, दारागंज

(५) अलीगड

६ महाराष्ट्र समाज, रेलवे रोड

७ महाराष्ट्र क्लब, मामुभांजा लेन

(६) अहमदाबाद

८ महाराष्ट्र समाज, भद्र

९ दक्षिणी भजन मंडळ, रायपूर

१० भद्र भजन समाज, भद्र

११ जमालपूर भजन मंडळ, जमालपूर

१२ चांद्रसेनीय कायस्थ प्रभु समाज, भद्र

१ भद्र भगिनी समाज, भद्र

१ महाराष्ट्र हाउसिंग, सोसायटी, एलीस ब्रीच

१५ मराठा मंडळ, शाहीबाग

(७) आग्रा

१६ महाराष्ट्र समाज नीळकंठ

७ महाराष्ट्र मंडळ, राजाकी मंडी

(८) आबुरोड

१८ महाराष्ट्र मित्र मंडळ,

(९) इंदूर

१९ महाराष्ट्र ब्राह्मण सभा तोफखाना

२० महाराष्ट्र साहित्य सभा,

२१ महाराष्ट्र ब्राह्मण परस्पर सहकारी पेढी, जेलरोड

२२ चांद्रसेनीय कायस्थ प्रभु परस्पर सहकारी पतपेढी, स्नेहलतागंज

२३ मल्हारराव बाजीराव उत्सव मंडळ, तोफखाना

२४ देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मण शिक्षणसंस्था तोफखाना

२५ तरुण महाराष्ट्र मंडळ, ख्रिश्चन कॉलेज
२६ अहिल्या सेवासदन, राजवाडा चौक

(१०) कराची

२७ महाराष्ट्र मित्र मंडळ, रामस्वामी क्वार्टर्स, बार्नेस स्ट्रीट
२८ दक्षिणी म्युझिक क्लब,
२९ महाराष्ट्र जनरल एज्युकेशन सोसायटी
३० दक्षिणी ब्राह्मण सभा, रामस्वामी गाडीखाना, बार्नेस स्ट्रीट
३१ दक्षिणी समाज, बंदर रोड
३२ मराठा युनियन
३३ गौड सारस्वत समाज, बार्नेस स्ट्रीट
३४ चांद्रसेनीय कायस्थ प्रभु समाज
३५ मराठी जनरल एज्युकेशन सोसायटी, प्रिन्सेस स्ट्रीट
३६ शारदा मंदिर
३७ श्रीशिवाजी हायस्कूल रणछोड क्वार्टर्स
३८ मराठी वाचनालय " "
३९ भगिनी समाज कॉसमोपॉलिटन हाउसिंग सोसायटी
४० भंडारी समाज, तट्टाही कंपाउंड

(११) कलकत्ता

४१ महाराष्ट्र मंडळ ८५।१।१ बेताला रोड कालिघाट
४२ महाराष्ट्र निवास " "
४३ महाराष्ट्र भगिनी समाज " "
४४ महाराष्ट्र लॉज, ८ देवेंद्र मलिक स्ट्रीट चित्तरंजन अॅव्हेन्यु

(१२) कलोल (उ. गुजराथ)

४५ महाराष्ट्र मंडळ

(१३) कानपूर

४६ महाराष्ट्र मंडळ श्रद्धानंद पार्क
४७ महाराष्ट्र महिला समाज " "
४८ महाराष्ट्र विद्यार्थि संघ " "
४९ गणेशोत्सव मंडळ, सनातनधर्म कॉलेज

(१४) काशी Renares

५० दाक्षिणात्य परिषद
५१ महाराष्ट्र संघ रामघाट
५२ महाराष्ट्र वाचनालय, खालिसपूर
५३ महाराष्ट्र भगिनी समाज, बनारस हिंदु युनिव्हर्सिटी

(१५) कोचीन (मलबार)

५४ लोकमान्य टिळक वाचनालय.

(१६) खरगपूर (बंगाल)

५५ मराठा मित्र समाज ब्लॉक ४ ई २,

युनिट नं. २

(१७) खरगांव (होळकर राज्य)

५६ महाराष्ट्र ब्राह्मण साहाय्यक पेढी

(१८) गदग

५७ महाराष्ट्र वाङ्मयप्रेमी मंडळ

(१९) गया

५८ महाराष्ट्र मंडळ, राजाराम निवास देवघाट
५९ महाराष्ट्र मंडळ, स्टेशन रोड.

(२०) गुलबर्गा

६० मित्र समाज.

(२१) गोवा

६१ श्री शारदा वाचन मंदिर, रायबंदर

(२२) ग्वाल्हेर

६२ महाराष्ट्र समज, शितोळे ब्लॉक नं. इंद्रगंज लष्कर
६३ मातृभूमि कार्यालय, लष्कर

(२३) जमशेदपूर

६४ महाराष्ट्र हितकारी मंडळ, ५२ के रोड
६५ महाराष्ट्रीय समिति

(२४) जयपूर (राजपुताना)

६६ महाराष्ट्र समाज.

(२५) जोधपूर (राजपुताना)

६७ महाराष्ट्र मंडळ, गोविंदराम बिल्डिंग

(२६) झांशी

६८ महाराष्ट्र समिती
६९ महाराष्ट्र शिक्षण मंडळ

(२७) तिन्नेवेल्ली (साऊथ इंडिया)

७० महाराष्ट्र असोसिएशन

(२८) तंजावर (साऊथ इंडिया)

७१ महाराष्ट्र वाचन मंदिर सखानायक स्ट्रीट

(२८) दिल्ली

७२ महाराष्ट्र स्नेह संवर्धक समाज, ११५ बर्न बॅस्टियन रोड
७३ महाराष्ट्रीय रुग्ण सेवा संघ, १०९ बर्न बॅस्टियन रोड,
७४ हनुमान व्यायाम मंडळ ७९१ नई [illegible]

(३०) द्वारका

७५ महाराष्ट्र मंडळ

(३१) धारवाड

७६ कर्नाटक महाराष्ट्र मंडळ,

(३२) नडियाद

७७ महाराष्ट्र मित्र मंडळ

(३३) नवसारी

७८ श्रीगणेश मंडळ

(३४) पणजी (नोव्हा गोवा)
७९ श्रीशिवाजी युवक संघ
(३५) पाच्छापूर (जि. बेळगांव)
८० भारत हितेच्छु ऐक्यवर्धक मंडळ
(३६) पेडणें
८१ शीलोन्नति समाज
(३७) बडोदें
८२ सहविचारिणी
८३ जुम्मादादा व्यायाम मंदिर
८४ नारायणगुरु आद्य व्यायामशाळा
८५ ब्राह्मण सभा
(३८) बलसाड
८६ ब्रह्मपुरी युनियन क्लब, ब्रह्मपुरी
८७ महाराष्ट्रीय समाज
(३९) बेझवाडा (आंध्र)
८८ महाराष्ट्र मंडळ
(४०) बेळगांव
८९ वाङ्मय चर्चा मंडळ
(४१) बंगलोर
९० महाराष्ट्र मंडळ गांधी बाजार बसवनगुडी
(४२) बांदीकुई (राजपुताना)
९१ महाराष्ट्र मंडळ
(४३) ब्रह्मावर्त
९२ सरस्वती पुस्तकालय
(४४) भावनगर
९३ महाराष्ट्र मंडळ
(४५) भेलसा (सं. ग्वाल्हेर)
९४ महाराष्ट्र सन्मित्र मंडळ
(४६) मडगांव (गोवा)
९५ सरस्वती सेवक संघ व दामोदर वाचनालय
(४७) मद्रास
९६ महाराष्ट्र मंडळ, २१७ रंडाल्स रोड, वेपरी
९७ महाराष्ट्र बिल्डिंग ट्रस्ट
९८ महाराष्ट्र ॲसोशिएशन, शारदा हॉल, बिग स्ट्रीट, ट्रिप्लिकेन
९९ मराठी स्कूल अँड महाराष्ट्र असोसिएशन बिल्डिंग ट्रस्ट, ट्रिप्लिक्लेन
(४८) महू (सेन्ट्रल इंडिया)
१०० महाराष्ट्र समाज, स्टेशनजवळ
१०१ नूतन महाराष्ट्र मंडळ लुनिया पुरा
(४९) म्हैसाणा
१०२ महाराष्ट्र समाज
(५०) रतलाम
१०३ महाराष्ट्र समाज
(५१) राजकोट



१०४ महाराष्ट्र मंडळ, सिव्हिल स्टेशन, पंचनद ब्लॉक्स
(५२) रावळपिंडी
१०५ महाराष्ट्र मंडळ, नया मोहोल्ला
१०६ महाराष्ट्र भगिनी समाज
(५३) रंगून
१०७ महाराष्ट्र मित्र मंडळ, नं. ५६ स्ट्री. नं. १३० पो. ऑ. कादॉग्ले
(५४) लखनौ
१०८ महाराष्ट्रीय समाज, २३४ हुसेनगंज
(५५) लाहोर
१०९ महाराष्ट्र समाज मिल्किराम रोड गवालमंडी
(५६) सागर (सी. पी.)
११० महाराष्ट्र ब्राह्मण समाज
(५७) सावर्डे (गोवा)
१११ श्री शारदा विद्यालय, काकोडा
(५८) सिमला
११२ महाराष्ट्रीय समाज
(५९) सिद्धपूर (राजपुताना)
११३ महाराष्ट्र मंडळ
(६०) सुरत
११४ महाराष्ट्र समाज
(६१) हरिद्वार
११५ राधाकृष्ण मंदिर, रामघाट
११६ महाराष्ट्रीय यात्रीकष्टनिवारक–समाज
(६२) हैद्राबाद (दक्षिण)
११७ सनातन धर्म संस्था गौळीगुडा
११८ मराठी ग्रंथालय
११९ हिंद भगिनी समाज

परदेशांतील महाराष्ट्रीय संस्था
(६३) आबादान (इराण)
१ महाराष्ट्र मंडळ
(६४) क्वेटा (बलुचिस्थान)
२ महाराष्ट्र मित्र मंडळ
(६५) झांझीबार (पूर्व आफ्रिका)
३ महाराष्ट्र क्लब, पो. बॉ. नं. ७९
(६६) दारेसलाम (पूर्व आफ्रिका)
४ महाराष्ट्र मंडळ, पो. बॉ. नं. २०४
(६७) नैरोबी (पूर्व आफ्रिका)
५ महाराष्ट्रीय मेस, पो. बॉ. नं ४४१
(६८) बसरा (इराक)
६ मराठा लायब्ररी
(६९) मेसोपोटेमिया (एन्. डब्ल्यू.)

७ मराठा लायब्ररी, मेधील

(७०) मोंबासा (पूर्व आफ्रिका)

८ मराठा क्लब

(७१) लंडन (इंग्लंड)

९ महाराष्ट्र मंडळ, ८ गोवर स्ट्रीट

---

**शिक्षण प्रसारक मंडळीच्या संस्था पुणें**—अहवालाचे सालीं मॅनेजिंग कौन्सिलचे अध्यक्ष दि. ब. का. रा. गोडबोले व उपाध्यक्ष श्री. न. चिं. केळकर होते. उत्पन्न—व्याज वगैरे रु.७८२९ ६-५. स. प. कॉलेज २८०६० रु. नू. म. विद्यालय हायस्कूल १४५८० रु. मराठी शाळा ५५५ रु. हरीभाई देवकरण हायस्कूल ६६०० रु. ग्रंथशाळा ३०० शिवाय इतर मिळून एकूण उत्पन्न रु. ५९,१८८-११-११ खर्च व्याज वगैरे व मंडळीच्या संस्था मिळून रु. २७५६४-१५-१. कर्जफेड १४५८३ रु. ६-८ पै. शाखांना देणग्या ३६४७ रु. शिवाय इतर खर्च मिळून ५९,१८८-११-११ आतांपर्यंत मंडळीला मिळाल्या त्या देणग्या रु. १२३,९५० त्यापैकीं चालू सालीं २७०२० रु. मिळाले. मंडळी व इतर संस्थांना मिळालेल्या देणग्या रु. २०१८२-११

विद्यार्थ्यांची संख्या:— स. प. कॉलेज. ८२५ नू. म. विद्यालय १८०९. मराठी शाळा ५३०. हरीभाई देवकरण हायस्कूल १२१३. वर्षअखेर इमारती, फर्निचर, ग्रंथालयें व शास्त्रीय साहित्य मिळून मंडळीची मालमत्ता १३,९९,९९२ रुपयांची होती.

१९३५ सालीं स. प. कॉलेजांत एक हजारावर विद्यार्थी आहेत. कॉलेजच्या ग्रंथसंग्रहालयाच्या इमारतीचें काम झालें आहे. ह्याशिवाय विद्यार्थ्यांना वाचनालय व विश्रांतिस्थान म्हणून एक स्वतंत्र इमारत बांधण्यांत आली आहे. तसेंच अध्यापकांकरितां कांहीं बंगले बांधविले आहेत. नू. म. विद्यालयांतील एका विद्यार्थ्यास यंदा पहिली जगन्नाथ शंकरशेट शिष्यवृत्ति मिळाली आहे. मॅट्रिकचे निकाल दोन्ही हायस्कुलांचे समाधानकारक आहेत.

---

# संस्थानें



## १ औंध

( ६–७–३३ ते ५–७–३४ )

औंध संस्थान डेक्कन स्टेट्स एजन्सीपैकीं आहे. क्षेत्रफळ ५०१ चौरस मैल. लोकसंख्या १९३१ च्या खानेसुमारीप्रमाणें ७६५०७. कारभाराच्या व्यवस्थेसाठीं संस्थानचे औंध, आटपाडी, कुंडल, गुणदाळ हे चार तालुके व किन्हई ठाणें असे पांच विभाग पाडलेले आहेत. संस्थानांत एकूण ७२ गांवें आहेत. गेल्या पांच वर्षांची सरासरी काढतां संस्थानचें वार्षिक ठोकळ उत्पन्न ४८५४१६ रु. १४ आ. ९ पै आहे. संस्थान वरिष्ठ सरकारला अगर इतर संस्थानला खंडणी वगैरे देत नाहीं.

संस्थानाधिपति–मे. श्रीमंत भवानराव श्रीनिवासराव ऊर्फ बाळासाहेब पंतप्रतिनिधि, बी. ए. वय ६५. संतति–पांच मुलगे व पांच मुली. युवराज २१ वर्षांचे असून बी. ए. आहेत. सध्यां ते ऑक्सफर्ड येथें बी. ए. पदवीपरीक्षेचा अभ्यास करीत आहेत.

जमीनमहसूल खातें–मागणी (मागील ८३५५३ रु. बाकीसुद्धां) ३०९०७८ रु., वसूल–२४६९०२ रु. गेल्या वर्षीचे आंकडे–मागणी २७३४२६ रु., वसूल–१८९८७३ रु. लागवडीयोग्य जमीन–२८४०६७ एकर. लागवड झाली–२८२०१० एकर. यंदा संस्थाननें मुळींच तगाई वाटली नाहीं.

पोलिसखातें–५ अधिकारी, ४४ पोलिस व ९ स्वार मिळून एकूण ५८ पोलिस संस्थानांत आहेत. बहुतेक हत्यारबंद आहेत. ५२ साक्षर आहेत. प्रमाण–साडेआठ चौरस मैलांस अथवा १३१२ लोकसंख्येस एक पोलिस. खर्च–१६७२५ रु.; पोलिसशिवाय ६५ हत्यारबंद शिबंदी, राजवाडा, खजिना, तुरुंगरक्षक म्हणून आहेत. त्यांचा खर्च ७१४४ रु. तुरुंगखातें–कैदी ११८. वर्षअखेर २२. खर्च–२७६४ रु. कैद्यांच्या कामाचें उत्पन्न २९६ रु. (मागील वर्षी १४२९ रु.). संस्थानांत औंध, कुंडल व आटपाटी अशा तीन म्युनिसिपालिटया आहेत. तिन्हींचें मिळून उत्पन्न यंदा ६१२६ रु. होतें व खर्च ६०७९ रु. होता. गेल्या वर्षीचे हे आंकडे अनुक्रमें ४१५५ रु. व ४५८४ रु. असे होते.

पाऊसपाणी पिकें वगैरे:—पाऊस–कंसांतील आंकडे गेल्या पांच वर्षांच्या सरासरीचे आहेत. औंध ४२.४ इंच (४२ इंच); किन्हई ३३.४ इं. (२९ इं.) कुण्डल ४१ इं. (३५ इं.) आटपाडी २४ इं. (२१ इं.) गुणदाळ २५ इं. (१९ इं.). पाऊस गेल्या वर्षापेक्षां कमी झाला व तो दोन्ही पिकांना पुरेसा झाला. पिकें ६ ते १० आणे झालीं. गहूं, ऊस व भुइमूग यंदा जास्त पिकवला गेला. धान्यें गेल्या वर्षीपेक्षां स्वस्त होतीं. जंगल विशेष नाहीं म्हणून स्वतंत्र खातें नाहीं. क्षेत्रफळ–३०५८ एकर. उत्पन्न–गवत व जळाऊ लाकूडफाटा.

उद्योगधंदे व व्यापार—सर्व तालुके एकत्रित नसल्यानें संस्थानचा व्यापार वाढूं शकत नाहीं. किर्लोस्करवाडी, ओगलेवाडी व औंधचा साबणाचा कारखाना यांत लागणारा बराच माल कोक, कोळसा, रासायनिक द्रव्यें वगैरे आयात होतो. निर्यात माल: तयार–प्रभाकर कंदील, कांच सामान, किर्लोस्करवाडींतून लोखंडी सामान, औंधहून साबण वगैरे. बिचूद व कोडोली येथें किर्लोस्करांच्या सेंट्रीफ्यूगल यंत्रानें साखर तयार होते. किर्लोस्करांचा कारखाना यंदा जपानी पाण्याच्या पंपाच्या स्वस्ताईमुळें चांगला चालला नाहीं. तसेंच सरकारनें "उघडी–कढई" पद्धतीनें तयार होणाऱ्या साखर वगैरे पदार्थांवर कर बसविल्यानें सेंट्रिफ्यूगल पंपाची मागणीही कमी झाली. औंधच्या साबणाचा कारखाना चांगला चालला आहे. ओगलेवाडीचा काच कारखाना–येन व डॉलरचा भाव घसरल्यानें अमेरिकन व जपानी कंदिलाचे भाव भयंकर उतरले. त्यामुळें कारखान्याचें फार नुक

७ मराठा लायब्ररी, मेधील

(७०) मोंबासा (पूर्व आफ्रिका)

८ मराठा क्लब

(७१) लंडन (इंग्लंड)

९ महाराष्ट्र मंडळ, ८ गोवर स्ट्रीट

---

**शिक्षण प्रसारक मंडळीच्या संस्था पुणें**—अहवालाचे सालीं मॅनेजिंग कौन्सिलचे अध्यक्ष दि. ब. का. रा. गोडबोले व उपध्यक्ष श्री. न. चिं. केळकर होते. उत्पन्न—व्याज वगैरे रु.७८२९ ६—५. स. प. कॉलेज २८०६० रु. नू. म. विद्यालय हायस्कूल १४५८० रु. मराठी शाळा ५५५ रु. हरीभाई देवकरण हायस्कूल ६६०० रु. ग्रंथशाळा ३०० शिवाय इतर मिळून एकूण उत्पन्न रु. ५९,१८८—११—११ खर्च व्याज वगैरे व मंडळींच्या संस्था मिळून रु. २७५६४—१५—१. कर्जफेड १४५८३ रु. ६—८ पै. शाखांना देणग्या ३६४७ रु. शिवाय इतर खर्च मिळून ५९,१८८—११—११ आतांपर्यंत मंडळीला मिळाल्या त्या देणग्या रु. १२३,९५० त्यापैकीं चालू सालीं २७०२० रु. मिळाले. मंडळी व इतर संस्थांना मिळालेल्या देणग्या रु. २०१८२—११

विद्यार्थ्यांची संख्याः— स. प. कॉलेज. ८२५ नू. म. विद्यालय १८०९. मराठी शाळा ५३०. हरीभाई देवकरण हायस्कूल १२१३. वर्षअखेर इमारती, फर्निचर, ग्रंथालयें व शास्त्रीय साहित्य मिळून मंडळीची मालमत्ता १३,९९,९९२ रुपयांची होती.

१९३५ सालीं स. प. कॉलेजांत एक हजारावर विद्यार्थी आहेत. कॉलेजच्या ग्रंथसंग्रहालयाच्या इमारतीचें काम झालें आहे. ह्याशिवाय विद्यार्थ्यांना वाचनालय व विश्रांतिस्थान म्हणून एक स्वतंत्र इमारत बांधण्यांत आली आहे. तसेंच अध्यापकांकरितां कांहीं बंगले बांधविले आहेत. नू. म. विद्यालयांतील एका विद्यार्थ्यास यंदा पहिली जगन्नाथ शंकरशेट शिष्यवृत्ति मिळाली आहे. मॅट्रिकचे निकाल दोन्ही हायस्कुलांचे समाधानकारक आहेत.

---

# संस्थानें



## १ औंध

( ६–७–३३ ते ५–७–३४ )

औंध संस्थान डेक्कन स्टेट्स एजन्सीपैकीं आहे. क्षेत्रफळ ५०१ चौरस मैल. लोकसंख्या १९३१ च्या खानेसुमारीप्रमाणें ७६५०७. कारभाराच्या व्यवस्थेसाठीं संस्थानचे औंध, आटपाडी, कुंडल, गुणदाळ हे चार तालुके व किन्हई ठाणें असे पांच विभाग पाडलेले आहेत. संस्थानांत एकूण ७२ गांवें आहेत. गेल्या पांच वर्षांची सरासरी काढतां संस्थानचें वार्षिक ठोकळ उत्पन्न ४८५४१६ रु. १४ आ. ९ पै आहे. संस्थान वरिष्ठ सरकारला अगर इतर संस्थानला खंडणी वगैरे देत नाहीं.

संस्थानाधिपति–मे. श्रीमंत भवानराव श्रीनिवासराव ऊर्फ बाळासाहेब पंतप्रतिनिधि, बी. ए. वय ६५. संतति–पांच मुलगे व पांच मुली. युवराज २१ वर्षांचे असून बी. ए. आहेत. सध्यां ते ऑक्सफर्ड येथें बी. ए. पदवीपरीक्षेचा अभ्यास करीत आहेत.

जमीनमहसूल खातें–मागणी (मागील ८३५५३ रु. बाकीसुद्धां) ३०९०७८ रु., वसूल–२४६९०२ रु. गेल्या वर्षीचे आंकडे–मागणी २७३४२६ रु., वसूल–१८९८७३ रु. लागवडीयोग्य जमीन–२८४०६७ एकर. लागवड झाली–२८२०१० एकर. यंदा संस्थाननें मुळींच तगाई वाटली नाहीं.

पोलिसखातें–५ अधिकारी, ४४ पोलिस व ९ स्वार मिळून एकूण ५८ पोलिस संस्थानांत आहेत. बहुतेक हत्यारबंद आहेत. ५२ साक्षर आहेत. प्रमाण–साडेआठ चौरस मैलांस अथवा १३१२ लोकसंख्येस एक पोलिस. खर्च–१६७२५ रु.; पोलिसशिवाय ६५ हत्यारबंद शिबंदी, राजवाडा, खजिना, तुरुंगरक्षक म्हणून आहेत. त्यांचा खर्च ७१४४ रु. तुरुंगखातें–कैदी ११८. वर्षअखेर २२. खर्च–२७६४ रु. कैद्यांच्या कामाचें उत्पन्न २९६ रु. (मागील वर्षी १४२९ रु.). संस्थानांत औंध, कुंडल व आटपाटी अशा तीन म्युनिसिपालिटया आहेत. तिन्हींचें मिळून उत्पन्न यंदा ६१२६ रु. होतें व खर्च ६०७९ रु. होता. गेल्या वर्षीचे हे आंकडे अनुक्रमें ४१५५ रु. व ४५८४ रु. असे होते.

पाऊसपाणी पिकें वगैरे:––पाऊस–कंसांतील आंकडे गेल्या पांच वर्षांच्या सरासरीचे आहेत. औंध ४२.४ इंच (४२ इंच); किन्हई ३३.४ इं. (२९ इं.) कुण्डल ४१ इं. (३५ इं.) आटपाडी २४ इं. (२१ इं.) गुणदाळ २५ इं. (१९ इं.). पाऊस गेल्या वर्षापेक्षां कमी झाला व तो दोन्ही पिकांना पुरेसा झाला. पिकें ६ ते १० आणे झालीं. गहूं, ऊस व भुइमूग यंदा जास्त पिकवला गेला. धान्यें गेल्या वर्षीपेक्षां स्वस्त होतीं. जंगल विशेष नाहीं म्हणून स्वतंत्र खातें नाहीं. क्षेत्रफळ–३०५८ एकर. उत्पन्न–गवत व जळाऊ लाकूडफाटा.

उद्योगधंदे व व्यापार––सर्व तालुके एकत्रित नसल्यानें संस्थानचा व्यापार वाढूं शकत नाहीं. किर्लोस्करवाडी, ओगलेवाडी व औंधचा साबणाचा कारखाना यांत लागणारा बराच माल कोक, कोळसा, रासायनिक द्रव्यें वगैरे आयात होतो. निर्यात माल: तयार–प्रभाकर कंदील, कांच सामान, किर्लोस्करवाडींतून लोखंडी सामान, औंधहून साबण वगैरे. बिचूद व कोडोली येथें किर्लोस्करांच्या सेंट्रीफ्यूगल यंत्रानें साखर तयार होते. किर्लोस्करांचा कारखाना यंदा जपानी पाण्याच्या पंपाच्या स्वस्ताईमुळें चांगला चालला नाहीं. तसेंच सरकारनें "उघडी–कढई" पद्धतीनें तयार होणाऱ्या साखर वगैरे पदार्थांवर कर बसविल्यानें सेंट्रिफ्यूगल पंपाची मागणीही कमी झाली. औंधच्या साबणाचा कारखाना चांगला चालला आहे. ओगलेवाडीचा काच कारखाना–येन व डॉलरचा भाव घसरल्यानें अमेरिकन व जपानी कंदिलाचे भाव भयंकर उतरले. त्यामुळें कारखान्याचें फार नुक

सान झालें. हिंदुस्थानांत मोठ्या प्रमाणावर कंदील तयार करणारा हा एकच कारखाना असल्यानें विलायती चढाओढीपासून सरकारनें त्यास संरक्षण द्यावें. कारखान्याचे इतर विभाग चांगले चालले.

पब्लिक वर्क्स: खर्च – २४६८१ रु. मुख्य काम–सातवें किंग एडवर्ड इस्पितळ (औंध) ची इमारत पुरी झाली. व्यापारमंदी व स्वस्ताईमुळें लोकांची सांपत्तिक स्थिति साधारण आहे.

जमाखर्चः–जमा–४५४६२१ रु. १३ आ. ५ पै (गेल्या वर्षी जमा रु.४६८२५७–१५–७) खर्च–४३४३०६ रु. (गेल्या वर्षीचा ४७५६१० रु.). वर्षाचे सुरुवातीस संस्थानास ३१३६२५–१३ –० कर्ज होतें. त्यापैकीं ४७९५० रु. फेडलें. बाकी वर्ष-अखेर २६५६७४ रु. कर्ज आहे. संस्थानची शिलक औंध स्टेट सेंट्रल बँकेंत गंगाजळी वगैरे ४१३३५४ रु. सरकारी–रोखे ५००८ रु. एकूण ४१८३६२ रु.

जनन–मरण वगैरेः जननसंख्या –३३३०; मृत्यू २१०६. गेल्या वर्षी अनुक्रमें ३५४३ व १९६५. साथीनें मृत्यु–प्लेग १६०. यंदा औंध येथें किंग एडवर्ड (सातवे) इस्पितळ उघडण्यांत आलें. स्वच्छता– आरोग्य– सप्ताह दर वर्षीप्रमाणें भरविण्यांत आला. स्वच्छ घरांस श्रीमंतांनीं बक्षिसें दिलीं.

शिक्षणः–श्रीयमाई श्रीनिवास हायस्कूल, औंध विद्यार्थी २५३ (१५७ ब्राह्मण, ७९ मराठे), शें. ८३ संस्थानांतील विद्यार्थी आहेत. यंदाच्या सरकारी ड्राईंग परीक्षास येथील सर्व (३०)विद्यार्थी पास झाले. विद्यार्थ्यांच्या शारीरिक शिक्षणाची नमस्कार, कवाईत खेळ वगैरेंत विशेष प्रगति आहे. दुय्यम शिक्षण—शाळा इ. विद्यार्थी २७७. व्ह. फा. परीक्षेंत ३७ पैकीं २५ विद्यार्थी पास झाले. प्राथमिक शिक्षण-शाळा ७६. विद्यार्थी ४१३७. मुलींच्या शाळा ३. विद्यार्थिनी एकूण ७७०. संस्थानांतील कांहीं शाळांतून उद्योगधंद्याचें व कलाविषयक शिक्षण दिलें जातें. शिक्षणखातें खर्च ४६९१६ रु.

औंध स्टेट सेंट्रल बँक भागांचें भांडवल—१०७३०० रु., भागीदार १६३. शाखा चार तालुक्यांचे गांवीं. खेळतें भांडवल–रु. ८९६१५५ यंदाचा फायदा १०४७२ रु. सहकारी संस्था ५९. गेल्या वर्षी फक्त ३४ होत्या. एकूण सभासद १८६४. शेतकी सहकारी संस्था ३९. खेळतें भांडवल ११६४५२ रु. ठेवी–२०,३५७ रु. कर्ज दिलें. ८५७०६ रु. दोन वर्षांपूर्वी इंडियन लायडिंग (विमान) असोसिएशननें येथें स्थापलेल्या शाखेतर्फे यंदा विशेष कार्य झालें नाहीं.

जमाखर्चाचे विशेषः—जमा– जमीनमहसूल ५६५२८ रुपयांनीं वाढ. लोकलफंड–४८६६ रु. नीं वाढ. अबकारी–अफू ३५२० नीं कमी. व्याज ३२४७ रुपयांनीं वाढ.

खर्चः–खाजगीकडे–५१३३७ रु. (२२०७ रु.नीं कमी); शिक्षण–४६९१६ रु. (१९८५ रु. कमी); पब्लिक वर्क्स २४६८१ रु. (६९९१ रु. कमी) कारभार खातें-२९५५९रु. (६२७१ रु. वाढ); दवाखाने –११६१५ रु. (१३२७ रु. वाढ). वतनदार व हक्कदार ३१८६३ रु. (१७९५ रु. वाढ).

---

## २ इचलकरंजी

(१९३२–१९३३)

गेल्या खानेसुमारीप्रमाणें इचलकरंजी संस्थानची लोकसंख्या ६८५७३ असून एकंदर वसूल, गेल्या पांच वर्षांची सरासरी पाहतां कर्जे व डिपॉझिट वगळून ५,३५,७५० रुपये आहे.

कोल्हापूर दरबारला वार्षिक खंडणी २००० रु. संस्थान देतें. गेल्या पांच वर्षांत इचलकरंजी हें या भागांतील कापसाच्या व्यापाराचें केंद्र बनलें आहे. तेथें पांच जिनिंग फॅक्टरीज व एक कॉटन प्रेस आहे. सदर प्रेसमध्यें चालू सालीं २१०० कापसाचे गठ्ठे बांधण्यांत आले. ब्रोकर्सच्या दुकानाकरितां जागा आखण्यांत आल्या असून तेथें भुईमूग, तंबाखू, मिरच्या, गूळ वगैरेची देवघेव होते. आजऱ्याहून पुष्कळ तांदूळ परगांवीं रवाना होतो. आजरे तालुक्यांतील उत्तूर हें गांव व्यापाराचें लहानसें केंद्र आहे. इचलकरंजी तालुक्यांतील आरग हें गांव विड्याच्या पानाकरितां प्रसिद्ध आहे.

इचलकरंजी फार दिवसांपासून जाडचा भरडचा लुगड्याकरितां प्रसिद्ध आहे. पण कांहीं लोकांनीं यांत्रिक मागाचे कारखाने सुरू केले आहेत. त्यांत तयार होणारीं लुगडीं तलम व सुबक काठाचीं असून त्यांचा खप मध्यप्रांत व वऱ्हाडांतही होतो. यांत्रिक भागाशिवाय संस्थानांत ३०० हातमाग व धोटचाचे माग आहेत व सात गिरण्या आहेत.

शिवाय इचलकरंजी येथें दोन मेटल वर्कशॉप्स आहेत. त्यांत तिजोऱ्या, कॉटस् व बादल्या तयार होतात.

चालू सालीं २८८६९ रु. शिक्षणाकरितां खर्च झाले. गेल्या सालीं २८१२६ रु. खर्च झाले होते.

संस्थानांत सहकारी पतपेढ्या २४ आहेत. सभासद ३३७५ असून खेळतें भांडवल २९१९७६ रु. आहे. सभासदांचें लोकसंख्येशीं प्रमाण शेंकडा ५ आहे. म्हणजे दर वीस माणशीं १ पतपेढीचा सभासद आहे.

पोलीस खात्यांतील नोकर लोकांची संख्या ११४ असून खात्यावरील खर्च १७१७३ रुपये आहे.

पाऊस पाणी:—गेल्या पांच वर्षांची सरासरी इचलकरंजी २७–५० इंच. आजरें ८९–९० इंच.

ता. ३१–३–३५ अखेर इचलकरंजी म्युनिसिपालिटी जमाखर्च—जमा रु. १६४८८, खर्च रु. १३४१३ शिल्लक रु. २०५३२.

शाळांची संख्या ५२ असून एकंदर मुलें २९७५ आहेत. हायस्कूलचा खर्च रु. ११५४०–१५–७ व प्राथमिक शाळांचा रु. १७२२८–०–५

---

## ३ कोल्हापूर

**(१९३३–३४ वर्ष; राजशक २६०)**

संस्थानचें क्षेत्रफळ ३२१७.१ चौ. मैल असून यापैकीं १०९२.५ चौ. मै. क्षेत्रफळ सरंजामी जहागिरीचें आहे. १९३१ चे खानेसुमारीप्रमाणें सर्व संस्थानची लोकसंख्या ९५७१३७ असून तीपैकीं ८६६६४८ हिंदू, ४३८५७ जैन, ४१८६५ मुसलमान, ४७५९ ख्रिस्ती व ८ पारशी आहेत. राजधानी कोल्हापूर शहर असून त्याची लोकसंख्या ६६७२८ आहे.

एकूण उत्पन्न गेल्या पांच वर्षांच्या सरासरीनें १२७०७२६५ रुपये आहे. संस्थानाधिपति हिज हायनेस सर ले. क. श्री. राजाराम छत्रपति महाराज जी. सी. एस्. आय्., जी. सी. आय्. इ. वय ३७. वंशपरंपरा १९ तोफांच्या सलामीचा हक्क. राज्याचीं १२ वर्षें पुरीं. अहवालाचे सालांतील महत्त्वाचे समारंभ (१) ता. २० सप्टेंबर १९३३ रोजीं ना. सर फ्रेडरिक साइक्स् यांचे हस्तें पुणें येथें श्रीशिवाजी प्रेपरेटरी मिलिटरी स्कूल व श्री शिवाजी मेमोरिअल हॉल ह्यांचा उद्घाटन समारंभ झाला. (२) ता. ८–२–१९३४ रोजीं ले. कर्नल विल्बर फोर्स बेल सी. आय्. ई. यांचे हस्तें कोल्हापूर शुगर मिल्सचा उद्घाटन समारंभ झाला.

संस्थानांतील सरंजामी जहागिरी:— (१) विशाळगड–जहागिरदार मे. आबाजीराव कृष्णराव पंतप्रतिनिधि माध्यंदिन ब्राह्मण. वय ६६. जहागिरीचें क्षेत्रफळ २३६ चौ. मैल. लोकसंख्या ३३२१७; यंदाचें निवळ उत्पन्न ११६४९२ रु. व खर्च १७१६०८ रु. कोल्हापूर दरबारला खंडणी ५००० रु. शिक्षण १६ शाळांत ९०५ विद्यार्थी व खर्च ५९९४ रु. (२) बावडा–जहारिगदार–मे. परशुराम माधव ऊर्फ भाऊसाहेब पंतअमात्य देशस्थ ब्राह्मण. वय २७. जहागिरीचें क्षेत्रफळ २४३चौ. मैल. लोकसंख्या ५१५८४. यंदाचें उत्पन्न १२५२४६ रु. खर्च १४४७१९ रु. कोल्हापूर दरबारला खंडणी ३४२० रु. शिक्षण–२० शाळा; १२११ विद्यार्थी व खर्च–५०८२ रु. (३) कागल (थोरली पाती)–जहागिरदार मे. जयसिंगराव पिराजीराव ऊर्फ आबासाहेब घाटगे, सर्जेराव मराठा. वय १७ वर्षें. जहागिरीचें क्षेत्रफळ ११५.१ चौ. मैल. लोकसंख्या–४९८६७. यंदाचें उत्पन्न ३४५४६९ रु., खर्च ३२८२३८ रु. कोल्हापूर दरबारला खंडणी २००० रु. शिक्षण–४४ शाळा एक हायस्कूल २४३४ विद्यार्थी व खर्च २७५३३ रु. (४) कापशी–जहागिरदार मे. संताजीराव

जयसिंगराव ऊर्फ बाबासाहेब घोरपडे सेनापति; मराठा. वय ३२. जहागिरीचें क्षेत्रफळ–३३.१ चौ. मैल. लोकसंख्या १३७६७. यंदाचें उत्पन्न ३७९१८ रु.; खर्च ४७५८७ रु. कोल्हापूर रबारला खंडणी ४३०१ रु.; शिक्षण १३ शाळा, ५४९ विद्यार्थी व खर्च १५९९ रु. (५) तोरगळ–जहागिरदार मे. नरसोजीराव मुरारराव उर्फ बाबासाहेब शिंदे सेनाखासखेल, मराठा, वय २४, जहागिरीचें क्षेत्रफळ १३७.२ चौ. मैल; लोकसंख्या १४७२८, यंदाचें उत्पन्न –५६२६० रु. खर्च ६७८६३ रु. कोल्हापूर दरबारला खंडणी ४५६७ रु. (६) इचलकरंजी–जहागिरदार मे. नारायणराव गोविंद ऊर्फ बाबासाहेब घोरपडे, पंतसचीव. कोंकणस्थ ब्राह्मण, वय ६३, जहागिरीचें क्षेत्रफळ २४१ चौ. मैल. लोकसंख्या ६८५६७. यंदाचें उत्पन्न ४६५३०७ रु. खर्च ४४८७५३ रु. कोल्हापूर दरबारला खंडणी २००० रु. शिक्षण ४७ शाळा (एक हायस्कूल, ६ स्पेशल शाळा) एकूण विद्यार्थी २९७५ व खर्च २८७५६ रु. (७) कागल–(धाकटी पाती) जहागिरदार–मे. दत्ताजीराव नारायणराव ऊर्फ बाळासाहेब घाटगे सर्जेराव, मराठा वय ६४; जहागिरीचें क्षेत्रफळ १७.३ चौ. मैल. लोकसंख्या ६७८७, यंदाचें उत्पन्न ५७४९८ रु. खर्च ४६७३४ रु. कोल्हापूर दरबारला खंडणी १४३६ रु. जहागिरीच्या गैरव्यवस्थेमुळें जहागिरदारांचे अधिकार कांहीं वर्षें काढून घेण्यांत आले असून त्या अवधींत त्यांचे ज्येष्ठ चिरंजीव मे. यशवंतराव अप्पासाहेब यांस कांहीं अधिकार देण्यांत आले आहेत. (८) हिम्मत बहादुरांची इस्टेट–जहागिरदार मे. उदाजीराव राणोजीराव ऊर्फ आबासाहेब चव्हाण, हिम्मत बहादुर, मराठा, वय ५९. जहागिरीचें क्षेत्रफळ ४९.१ चौ. मै. लोकसंख्या २०४०१. यंदाचें उत्पन्न ४४०३० रु. खर्च ३७०२१ रु. कोल्हापूर दरबारला खंडणी ४००० रु. (९) सर लष्कर बहादुरांची इस्टेट–जहागिरदार बाळासाहेब सुलतानराव निंबाळकर, सरलष्कर बहादुर, मराठा. वय १८. जहागिरीचें क्षेत्रफळ २१.६ चौ. मैल. लोकसंख्या ७४७८; यंदाचें उत्पन्न ५९७३९ रु. खर्च ५७३३८ रु. कोल्हापूर दरबारला खंडणी २६६२ रु.

१९३३–३४ एकूण जमा १,२४,८५,५९६ रु. पैकीं निव्वळ जमा ४९६५३९७ रु. एकूण खर्च–१२७५५५९१ रु. निव्वळ खर्च–५१७१४७९ रु. संस्थानची जिंदगी, ठेवी वगैरे– वॉर बाँडस् ३३८९८०० रु., कोल्हापूर शुगर मिल्सचे भाग किंमत ४१४००० रु. व कर्ज आगाऊ १५०००० रु., व्यवहार ज्ञानकोश मंडळ–भाग किंमत १२००० रु. कोल्हापूर स्टेट श्री शाहूछत्रपती स्पी. व वीव्हिंग मिल्स् १४१४५३२ रु. कोल्हापूर स्टेट रेल्वेवर खर्च–२३६११२२ रु., वर्षअखेर संस्थानांत ८२० पेन्शनर असून त्यांस १३८४३३ रु. पेन्शन व वार्षिक तनखे वगैरे देण्यांत आले

यंदाचा वसूलः–जमीन महसूल–मागील बाकी व यंदाचा मिळून १६४२०५६ रु., जंगलखाते ९०३८९ रु., अबकारी ६१३५२४ रु., स्टँप्स्–३३७०९१ रु. न्यायखातें (दिवाणी व फौजदारी) ७४६७०रु., तुरुंग १२४६१ रु., रजिस्ट्रेशन ३१२४३ रु., व्याज २६५३४८ रु., कोल्हापूर स्टेट रेलवे ३८१६८६ रु., श्रीशाहू छत्रपती मिल्स ४०००० रु., हुजुरखासगी १८९८८६ रु., लोकलफंड ४१८०२३ रु., कर्जें ठेवी वगैरे वसूल ५३४८४३७ रु. सर्व मिळून १९३३–३४ एकूण जमा १२४८५५८६ रु. कोर्ट ऑफ वॉर्डस् कडे ५० अज्ञानांच्या इस्टेटी असून त्यांचे यंदा एकंदर ३९५८३३ रु. वसूल झाले, व खर्च १९२८१४ रु. झाला. देवस्थान धर्मादाय खात्याकडील एकूण १५९७१ एकर जमीन ५१३८३ रु. महसुलाची आहे. ह्याशिवाय १६ इनाम गांवांचा ३३६१८ रु. वसूल व २३७८९ रु. रोख याप्रमाणें देवस्थानांचें उत्पन्न आहे. कोल्हापूर संस्थानांत लागवडीयोग्य एकंदर जमीन ९८९४१६ एकर आहे. सर्व जहागिरीसुद्धां एकूण लागवडीयोग्य जमीन १६८११५३ एकर आहे. त्यापैकीं लागवडीयोग्य व पडीत जमीन २८३४२८ एकर आहे. यंदा तगाई वाटली नाहीं. नोंदणी खातें यंदा ५२४७७४६ रु. किंमतीचे ९९३० कागदपत्र नोंदले गेले. उत्पन्न–४२६६६ रु. खर्च ७६५० रु.

जंगल खातें—क्षेत्रफळ जहागिरी वगळून ३३२ चौ. मैल. उत्पन्न हिरड्याचें ३७०५२ रु., गुरें-चराई फी १५६६५ रु.; एकूण उत्पन्न—१२२७४७ रु. खर्च ४२७२२ रु.

न्यायखातें—नवीन दिवाणी दावे ४८३७ आले. यंदा गेल्या वर्षीच्या राहिलेल्या ६५३४ पैकीं ५६३५ दाव्यांचे निकाल लागले. अपील कोर्टांत जुनीं व नवीं मिळून १६३८ अपीलें होतीं, त्यांपैकीं ६४६ अपिलांचे निकाल झाले. कोल्हापूर संस्थानांत १२९ वकील असून शिवाय ११९ वकिली कामें करणारे श्रीमंत महाराजांच्या सनदा मिळविलेले असे आहेत. यंदा १०७७३ फौजदारी गुन्ह्याच्या आरोपींपैकीं २१६१ जणांस शिक्षा झाल्या.

संरक्षण:—लष्कर—घोडदळ १५२ स्वार; खर्च ८०४४३रु. तोफखाना—५७ तोफांपैकीं फक्त १० सलामी वगैरे करितां उपयोगांत असतात. खर्च १४४० रु., इतर इरेग्युलर्स ५९७ सैनिक; खर्च—४८३१४ रु., कोटकरी (कोल्हापूर येथील जुन्या किल्ल्यावरील) २२२. शिलेदार १७७. खर्च—५६२५ रु. सैनिकांना त्यांच्या जमिनीच्या वसुलाच्या दीडपट तनखा मिळतो. कोल्हापूर इन्फन्ट्री पायदळ ५२३ सैनिक, खर्च १३६८८० रु. इन्फन्ट्रीस युरोपियन मुख्याधिकारी आहेत. पोलिस खातें—पोलिस संख्या १०९३; खर्च—१९१७७२ रु. दर पोलिसमागें खर्च—वार्षिक १७५ रु. पोलिसाचें प्रमाण—८७५ लोकसंख्येस किंवा २.९४ चौ. मैल राज्यक्षेत्रास एक.

तुरुंगखातें—५७९ पैकींवर्षअखेर २७५ कैदी व आरोपी संस्थानच्या२२तुरुंगांत मिळून होते. खर्च ३०५६० रु. दर कैद्यामागें वार्षिक खर्च ६७ रु. तुरुंगांत कैद्यांनीं तयार केलेल्या मालाची यंदा १०४५४ रु. ची विक्री झाली.

शेतकी—संस्थानच्या कोल्हापूर शिरोळें येथील शेतजमिनीवर प्रायोगिक शेती यशस्वी रीतीनें करण्यांत येते.शेतकी शाळांतून सुधारलेल्या पद्धतीचें व शेतीस उपयुक्त असें शिक्षण दिलें जातें.

उद्योगधंदे—(१) कोल्हापूर शुगर मिल्स् लि. ही साखर तयार करणारी कंपनी १९३२ मध्यें रजिस्टर झाली. तिचें अधिकृत भांडवल १० लक्ष रुपये साधारण भागांचे असून २५००० रु. डिफर्ड भागांचें आहे. सुमारें ८ लाखांचे भांडवल जमा झालेलें आहे; त्यापैकीं ४१४००० रु. चें कोल्हापूर दरबारनें घेतलें आहे. ले. क. विल्बर फोर्स यांनीं ८-२-१९३४ रोजीं ह्या कारखान्याचा उद्घाटन समारंभ केला. रोज २२ तास कारखाना चालू ठेवला तर ४०० ते ५०० टन उसाचा रस येथें गाळला जाईल व दोन हंड्रेडवेटांचीं ( = ५६ शेराच्या) ४०० ते ५०० पोतीं येथें तयार होतील. कारखान्यास जोडून साखर तयार करण्याच्या कृतीस आवश्यक अशी रासायनिक प्रयोगशाला आहे व लहानसहान यंत्रें दुरुस्त करण्यासाठीं यंत्रशालाहि आहे. एक विहिरी खोदण्याचें यंत्र कंपनीच्या जमिनीवर विहिरी खोदण्यासाठीं ठेविलें आहे. कंपनी स्वतःचे २००० एकर जमीनीवर ऊस लावणार आहे. त्यापैकीं ७०० एकर जमीन उसाखालीं यंदा आहे. शेतकी व विज्ञान यांच्या पदवीधरांना व इतर यांत्रिक व शेतीच्या मिळून रोजीं सुमारें ३००० लोकांना (हंगामांत) येथें काम मिळतें. अहवालाचे सालीं ६६ दिवसांत १८००० टन उसापासून १५००० पोतीं साखर कारखान्यांत तयार झाली. यापैकीं निम्मी संस्थानांत खपली; बाकीची सांगली, कराड, बेळगांव, मिरज वगैरे भागांत खपली. भाव पोत्यास २७ रु. प्रमाणें होता. याशिवाय चिपाडें (जळण म्हणून) व काकवी वगैरे तयार होतात. यंदा विक्रीचें उत्पन्न ४१८८६३ रु., खर्च—३४७८४६ रु. (२) श्रीशाहु छत्रपति स्पी. व वीव्हिंग मिल्स्—१७७ मागांवर विविध प्रकारचें ५४७४०० पौंड कापड तयार झालें, व १६१७१ धोट्यांवर १४३५६०० पौंड अनेक प्रकारचें सूत तयार झालें.

इतर कारखाने—सरकी काढण्याचे व गठ्ठे बांधण्याचे कारखाने १३, १ विद्युत—उत्पादन कारखाना (कोल्हापूर शहरास वीज पुरविण्यासाठीं), ४ फिल्म कंपन्या, १ लाकडापासून बाष्पार्क काढणारा कारखाना राधानगरी येथें.

कोल्हापूर स्टेट रेल्वे–२९.२७ मैल लांबीची आहे. आतांपर्यंत खर्च २३६११२२ रु. यंदाचें उत्पन्न–५२५६६३ रु. खर्च २८५१८२ रु.; यंदा फायदा शे. १०.२ टक्के.

अबकारी खातें–देशी दारूच्या १५४ दुकानांचें व जत्रांतील दारूच्या दुकानांचें मिळून यंदा १३८४६३ रु. उत्पन्न झालें. गेल्या वर्षी १२४१२८ रु. झालें होतें; बाकीचें दारू गाळण्याबद्दल व इतर मिळून एकूण देशीदारूचें उत्पन्न ४९९९२४ रु. झालें. गेल्या वर्षी ५१६८१७ झालें होतें. शिवाय शिंदीच्या २७ दुकानांच्या लिलावाचे वगैरे २८२०० रु. उत्पन्न झालें. ७ विलायती दारूच्या दुकानदारांकडून ७०२६ रु. मिळाले. भांगगांजाचें उत्पन्नः–६४२६४ रु. अफूचें उत्पन्न ९१२५ रु. विक्री ४५८७ रु. फायदा. आरोग्य व वैद्यक खातें संस्थानांतील जननसंख्या ३५४२५, मृत्यु–२४४५७. दरहजारीं अनुक्रमें प्रमाण ३६ व २५ होतें. खात्याचा खर्च यंदा १०८४०३ रु. झाला. यंदा प्लेगनें २६१५, देवीनें २६१ व कॉलऱ्यानें ६६० मृत्यु झाले.

शिक्षण–जहागिरीसुद्धां संस्थानांत ३ कॉलेजें, १३ हायस्कुलें (पैकीं २ मुलींची), २८ अँग्लो–व्हर्नाक्युलर शाळा, १ मिडल् स्कूल, ७५७ प्राथमिक शाळा व १७ धंदे व धार्मिक शिक्षणाच्या शाळा आहेत; व त्या सर्वांत मिळून ४८९९४ विद्यार्थी यंदा शिकत होते. प्राथमिक व दुय्यम शिक्षणाच्या जहागिरीखेरीजच्या सर्व शाळा कोल्हापूर संस्थान चालवितें, संस्थानांतील ३ कॉलेजांत ९५२ विद्यार्थी होते. जहागिरीखेरीज संस्थानचा शिक्षणखर्च यंदा व गेल्या वर्षी अनुक्रमें ५९५६६० रु. व ५५६२४१ रु. झाला. १९३३ मध्यें कोल्हापूर येथें साइक्स् लॉ कॉलेज सुरूं झालें. त्यांत अहवालाचे सालीं १४८ विद्यार्थी होते. राजाराम कॉलेज (आर्टस् व सायन्स) मध्यें ८०४ विद्यार्थी होते. १३ हायस्कुलांत (जहागिरीसुद्धां) २४८८ विद्यार्थी (मुलगे व मुली) होते. खर्च–१५४५०६ रु. मुलांच्या ६९६ प्राथमिक शाळा पैकीं ३२ कोल्हापूर सरकार, ५४६ इलाखा पंचायत व ११८ जहागिरी चालवितात. त्यांचा एकंदर खर्च यंदा ३४५३४० रु. झाला. मुलींच्या ६१ शाळांत ३४१४ मुली असून त्या प्रीत्यर्थ १४१५० रु. खर्च झाला. इतर शिक्षणसंस्था वैदिक–शाळा, अरेबिक स्कूल, पाटील तलाटी क्लास, ट्रे. कॉलेज व प्रॅक्टिसिंग स्कूल, ओब्रायन टेक्निकल स्कूल (१३८ विद्यार्थी) वगैरे. कोल्हापूर दरबारनें शिष्यवृत्त्यांकरितां यंदा १००८३ रु. खर्च केले. बालवीर ३००० (सुमारें).

स्थानिक स्वराज्य संस्था– (इलाखा–पंचायती, म्युनिसिपालिटचा वगैरे) एकूण ९५७१३७ लोकसंख्येपैकीं ७४०१३५ लोकसंख्येस उपयुक्त आहेत. कोल्हापूर इलाखा पंचायत–१९३३–३४ चें उत्पन्न १५०७७३३ रु. खर्च–१३६०५४०. खर्चाच्या मुख्य बाबी–नवीन कामें–इमारती (शाळांखेरीज) १०५९७८ रु. रस्ते व पूल १६३१४८ रु. संस्थानांतील गेल्या व ह्या वर्षीचें पावसाचें अनुक्रमें प्रमाण–कोल्हापूर शहर–५३.४ व ५२, पन्हाळा ९१.३ व ८४.४; राधानगरी–१५३.८ व १८०.७, बावडा २४० व २९०; आजरें ११०.४ व ९४.६ वगैरे.

---

## ४ जत

### ( १९३३–३४ )

संस्थानचें क्षेत्रफळ ९८०.८ चौरस मैल असून एकंदर लोकसंख्या ९१,१०२ आहे. मागल्या पांच वर्षांच्या सरासरीनें संस्थानचें ठोकळ उत्पन्न ३,६६,३९४ रुपयांचें आहे. दरसाल ११,२४७ रु. ब्रिटिश सरकारला घोडदळाच्या कांहीं भागाबद्दल म्हणून द्यावे लागतात.

संस्थान बहुतेक डोंगराळ प्रदेशांतच आहे. सरासरीनें पाऊस २४ इंच पडतो. अहवालाचे सालीं २५ इंच झाला. संस्थानचें यंदाचें उत्पन्न मागील वर्षाची शिल्लक धरून ५५२४५० रु. झालें. निवळ उत्पन्न ४७१३०९ रु. होतें. त्यापैकीं उत्पन्नाच्या मुख्य बाबी पुढीलप्रमाणें होत्या. जमीनमहसूल रु.२३५३९४, देशमुखी रु. २४२१२, स्टँपस् रु. २०१७७, लोकलफंड रु. ३२५८२, इ.

मागील सालीं एकंदर उत्पन्न रु. ५४६८२७ होतें.

खर्चाची वाटणी निरनिराळ्या खात्यांत पुढील प्रमाणें झाली. जमीन महसूल रु. २८८२६, पोलीस रु. १७१६९, दवाखाने रु. ४९४९, शिक्षण रु. १०२६५, खाजगी खर्च रु. ६०२०० एकूण खर्च रु. ५०४३६५ झाला.

जत संस्थानची जमीन फारशी सुपीक नसल्यानें जत हें उद्योगधंद्याचें केंद्र होऊं शकत नाहीं. साधें कापड विणणें, घोंगड्या तयार करणें, बांगड्या व पितळेचीं भांडीं करणें ह्यासारखे किरकोळ धंदे संस्थानांत चालतात. संस्थाननें एक नवीन जिनिंग फॅक्टरी काढली आहे.

संस्थानचे जत येथें एक व उमडी येथें एक असे एकं र दोन मोफत दवाखाने आहेत. यांत औषध घेणाऱ्या रोग्यांची रोजीं सरसरी अनुक्रमें ६५.७ व ४९.८ अशी पडते. अहवालाचे सालीं संस्थानांत प्लेग, देवी व कॉलरा या साथीं थोड्याफार प्रमाणांत होत्या. त्यांच्या लागण व मृत्यूचे आंकडे अनुक्रमानें पुढील प्रमाणें होते. देवी ३१७ लागण, मृत्यु १०२; कॉलरा १७१ व ७८, प्लेग ४१६ व ३१४. जत संस्थानांत एक हायस्कूल व ३० प्राथामिक शिक्षण देणाऱ्या शाळा आहेत. प्राथमिक शाळांत १६०४ व हायस्कूलमध्यें १३५ विद्यार्थी होते.

संस्थानांतील पोलिसांची संख्या १२२. त्यांपैकीं ५२ हत्यारी पोलीस आहेत. जत येथें एक म्युनिसिपालिटी आहे. संस्थानांत मुख्य धंदा शेतीचा व तो सर्वस्वी पाऊस पडण्यावर अवलंबून असतो. अर्थातच लोकांची सांपत्तिक स्थिति बेताबाताचीच आहे. अहवालाचे सालीं पाऊस बरा झाला त्यामुळें पिकें बरीं आलीं व प्रजा सुखी होती.

---

## ५ जमखिंडी

(१९३३–३४)

जमखिंडी संस्थान बेळगांव व विजापूर तालुक्यांत वसलेलें आहे. संस्थानचे जमखिंडी व कुंदगोळ असे दोन तालुके पाडलेले आहेत. एकंदर क्षेत्रफळ ५२४ चौरस मैल. संस्थानांत जमखिंडी, कुंदगोळ व बनहट्टी हीं मोठीं गांवें व लहान मोठीं ८८ खेडीं आहेत. एकंदर लोकसंख्या ११४२८२.

संस्थानचें ठोकळ उत्पन्न ८२५७७० रुपये असून त्यांतून दरसाल २०८४० रु. १० आ. ब्रिटिश सरकारला घोडदळाच्या कांहीं भागाकरितां म्हणून द्यावे लागतात.

जमखिंडी संस्थानचें पावसाचें मान सरासरीनें २६ ते २७ इंचाचें आहे. अहवालाचे सालीं सरासरीनें ४० इंच पाऊस झाला. नेहमीपेक्षां बराच जास्त पाऊस झाल्याचा पिकावर परिणाम झाला. कपाशी, गहूं व ज्वारी हीं पिकें आठ ते सहा आणेच आलीं. यंदाचें एकंदर उत्पन्न ९१९६९९ रु. आलें. खातेवार उत्पन्नाचे आंकडे—जमीन महसूल ५७१९६२ रु., अबकारी ९०२५० रु., लोकलफंड ४४२३३ रु., स्टँपस् ६३५३२ रु, न्याय ४६९० रु., जंगल ६९७८ रु. इत्यादि.

एकूण खर्च—८९६४३०. खातेवार खर्च—वार्षिक खंडणी २०८४० रु., महसूल २०८४०५, शिक्षण ७५७९२, दरबारनें १९४७२, पोलिस ५६२१२ खाजगी १२२७४६, लोकोपयोगी कामें ९९२६४ इत्यादि. संरक्षण—संस्थानजवळ स्वतःचें सैन्य नाहीं. संस्थाननें एकंदर ३५८ पोलीस ठेविले आहेत. त्यांत ४७ स्वार २१४ हत्यारबंद पोलीस आहेत. सर्व पोलीस खात्याचा मुख्य अधिकारी पोलीस सुपरिंटेंडेंट असून त्याचे हाताखालीं २ इन्स्पेक्टर्स असतात. पोलिसांचे लोकसंख्येशीं ३२० : १ व क्षेत्रफळ १.४ चौरस मैलास एक असें प्रमाण पडतें. अहवालाचे सालीं दाखल झालेल्या गुन्ह्यांची संख्या ७३६ होती त्यांपैकीं २८९ आरोप शाबीत झाले व १३९ गुन्ह्यांचा अजून निकाल लागावयाचा आहे. मागील सालीं दाखल झालेले गुन्हे ९४४ होते.

जमखिंडी संस्थानांत उद्योगधंद्यांना फारसा वाव नाहीं. तरी पण चालू असलेल्या उद्योग धंद्यांत लुगडीं विणण्याचा धंदा बरा चालतो. संस्थानांत एकंदर ३५१ हातमाग आहेत. संस्थानच्या मालकीच्या जिनिंग फॅक्टरींत अहवालाचे सालीं ३५१

खंडी कापूस निवडला गेला. जिनिंग फॅक्टरीचें निव्वळ उत्पन्न २२,८७६ रु. झालें. खाजगी मालकीच्या एकंदर १४ जिनिंग फॅक्टरीज जमखिंडी व कुंदगोळ तालुक्यांत चालतात. करडीचें तेल जमखिंडी संस्थानांत उत्तम तयार होतें. तेलाचे एकंदर घाणे ७५ आहेत.

दवाखाने-जमखिंडी येथें एक इस्पितळ व बनहट्टी, कुंदगोळ व सावळगी या ठिकाणीं एक एक, असे तीन मोफत दवाखाने आहेत. अहवालाचे सालीं ४०३९४ रोग्यांना मोफत औषधोपचार करण्यांत आला.

शिक्षण—एकंदर लोकसंख्येपैकीं शें. ५ शाळेंत जाणारे विद्यार्थी आहेत. प्राथमिक व दुय्यम दोन्ही प्रकारचें शिक्षण मोफत दिलें जातें. एकंदर शिक्षण संस्था ६२. त्यांत हायस्कुलें २, ए. व्ही. स्कूल १ व प्राथमिक शाळा ५९. उच्च शिक्षणाची सोय पुणें येथें सर परशुराम भाऊ कॉलेजांत ५० मादाऱ्या ठेवून व इतर शिष्यवृत्त्या ठेवून केली आहे. अहवालाचे सालीं प्लेगनें संस्थानास बराच उपद्रव दिला. नुसती लस टोचण्याखातर २०१७ रु. खर्च झाले. एकंदर जननसंख्या ४२१३; मृत्यू ४००५.

अहवालाचे सालीं घडलेली महत्त्वाची गोष्ट म्हणजे संस्थानच्या असेंब्लीचा उद्घाटन समारंभ कर्नल एच. विल्बर फोर्स बेल यांचे हस्तें झाला. गुरांचें वार्षिक प्रदर्शन प्लेग असल्यामुळें एप्रिलमध्यें न भरतां जूनमध्यें भरविण्यांत आलें. उत्तम जोपासना केलेल्या २६ गुरांना बक्षिसें देण्यांत आलीं. एकंदरीनें अहवालाचे साल संस्थानच्या प्रजेस चांगलें गेलें. नुकताच राजेसाहेबांना 'राजा' हा वंशपरंपरा किताब मिळाला असून त्याबद्दल त्यांचें अभिनंदन करणें जरूर आहे.

---

## ६ फलटण
### (१९३३–३४)

फलटण हें दक्षिणेंतील अत्यंत जुन्या संस्थानांपैकीं एक आहे. त्याचें अस्तित्व तेराव्या शतकांत आढळतें. संस्थानचा मूळ पुरुष पहिला निंबराज हा १२७० त दक्षिणेंत शंभू महादेवाच्या डोंगराच्या पायथ्याशीं येऊन राहिला. हल्लींचे संस्थानाधिपतींचें निंबाळकर हें नांव संस्थानांतील फलटण पासून नऊ मैलांवर असलेल्या निंबळक या गांवावरून पडलें आहे. फलटण संस्थानचें एकंदर क्षेत्रफळ ३९७ चौरस मैल आहे व लोकसंख्या ५८७६१ आहे. म्हणजे दर मैलीं लोकसंख्या १४९ पडते. एकंदर लोकसंख्येंत २९,४९२ पुरुष व २९,२६९ स्त्रिया आहेत. लोकसंख्येची जातवार विभागणी ५६३७२ हिंदू, १४८० मुसलमान, ८९६ जैन, २ पारशी व ११ ख्रिश्चन अशी पडते.

फलटण ही राजधानी सोडून खेड्यांची संख्या ७२. त्यांत ३५ शें वस्तीचा गांव एक, २० शें वस्तीचा एक व हजारावर वस्ती असलेलीं गांवें १३ आहेत.

ज्वारी, बाजरी, गहूं व करडी हीं संस्थानांतील मुख्य पिकें होत. निरा कालव्यानें पाण्याची मुबलकता झाल्यानें व संस्थानांत पिंपळवाडी येथें एक साखरेचा कारखाना सुरू झाला असल्यानें उसाची लागवडही बरीच होते. अहवालाचे सालीं ८५४६ एकर जमीन कालव्याचे पाण्याखालीं भिजली. मागल्या वर्षीं हा आंकडा ६६८४ होता. चालू सालीं दिसून येणारी वाढ केवळ उसाच्या लागवडीमुळेंच होत आहे.

अहवालाचे सालीं एकंदर उत्पन्न ७५५३७० रु. झालें. खर्च ६३१४२९ रु. झाला.

संस्थानांत प्राथमिक शिक्षण मोफत दिलें जातें. एकंदर शाळांची संख्या ५८ असून विद्यार्थ्यांची संख्या ३१४४ आहे. इंग्रजी शिक्षणासाठीं फलटण येथें मुधोजी हायस्कूल आहे. मुलींना व मागासलेल्या विद्यार्थ्यांना तेथें मोफत शिक्षण मिळतें. शिक्षण खात्यावर ३३७८८ रुपये खर्च झाला. प्राथमिक शाळांतून सक्तीचें शारीरिक शिक्षण देण्यांत येत आहे. मागील सालीं बारद येथें काढलेल्या प्रौढ शिक्षण शाळेंत सरासरीनें २२ विद्यार्थी हजर असत. या सालीं असल्या पांच नवीन शाळा निघाल्या असून विद्यार्थ्यांची संख्या ७७ झाली आहे. सरासरी हजेरी ५५ असते.

फलटण गांवीं म्युनिसिपालिटी असून सबंध संस्थानाकरितां एक लोकलबोर्ड आहे. त्याचे २० सभासद असतात. अहवालाचे सालीं फलटण येथें सरासरी २४ इंचांपर्यंत पाऊस झाला. नेहमींचे मानापेक्षां यंदा पाऊस थोडा जास्त पडला. फलटणचें औद्योगिक महत्त्व निरा नदीच्या कालव्यामुळें वाढत आहे. साखरेचा कारखाना निघाल्यापासून उसाची लागवड वाढत आहे. कापसाची लागवड हळूहळू होत आहे. एकंदरींत पाटाचे पाण्यामुळें संस्थानचा बराच फायदा होईल असा रंग दिसतो. फलटण संस्थानांत २ साखरेचे कारखाने, १ जिनिंग फॅक्टरी व ५० तेल गाळण्याचे कारखाने आहेत. घोडदळाच्या कांहीं भागाबद्दल हिस्सा म्हणून फलटणला ब्रिटिश सरकारास ९,६०० रु. दरसाल द्यावे लागतात.

अहवालाचे सालीं ले. क. एच्. विल्बर फोर्स एजंट टु दि गव्हर्नर जनरल, श्री. के. ए. गांधी डायरेक्टर ऑफ पब्लिक हेल्थ बेळगांव, श्रीमंत-राजेसाहेब व राणीसाहेब सांगली, डॉ. डब्ल्यू बर्नस्, डायरेक्टर ऑफ ॲग्रिकल्चर, रा. सा. वाघोलीकर प्रिन्सिपॉल शुगर केन रिसर्च स्टेशन, यांनीं भेटी दिल्या.

---

## ७ बडोदें

### (१९३३–३४)

क्षेत्रफळ ८१६४ चौ. मैल. मुख्य सुभे—नवसारी दक्षिणेस; मेहसाना (अहमदाबादचे उत्तरेस); वरील दोन सुभ्यांमध्यें बडोदा; पश्चिमेस काठेवाडांत अमरेळी व ओखामंडळ. शहरें ५० व २९२० खेडीं. लोकसंख्या (१९३१ मध्यें) २४४३००७; जातवारी—२१५२०७१ हिंदू; १८२६३० मुसलमान; जैन ४८४०८; पारशी ७१२७; ख्रिस्ती ७२६२ व जंगली जाती ४४८९० (अगदीं ताज्या शिरगणतीप्रमाणें) लोकसंख्येपैकीं शे. ७१ शेतींत, शें. ११ उद्योगधंद्यांत व शे. ५.५ व्यापारांत गुंतलेले असतात. अहवालाचे वर्षीं बडोदें संस्थानचे ब्रि. सरकारशीं व हिंदुस्थानांतील इतर संस्थानांशीं सलोख्याचे संबंध होते.

राज्यसंरक्षण—आपल्या प्रजाजनाकरितां कायदे करणें हा श्रीमंत महाराजांचा पूर्वापार अधिकार आहे. त्यास अनुसरून संस्थानांतील कायदेमंडळानें पास केलेल्या ठरावांप्रमाणें श्रीमंत महाराजांच्या आज्ञेनें कायदे करण्यांत येतात. येथील कायदेमंडळांत ३० सभासद असतात. त्यांपैकीं ४ सुभ्यांच्या प्रांतपंचायतींचे, १० लोकनियुक्त सभासद असतात, बाकीचे संस्थानाधिकारी वगैरे सभासद असतात. यंदा कायदेमंडळाचीं तीन अधिवेशनें झालीं. त्यांत हिंदू कायद्यांतील सुधारणाविषयक ठरावांचा फेरविचार व्हावा व ते सर्व जनतेपुढें ठेवावे असें ठरलें. हिंदु वारसा—हक्काबद्दल बिल व हिंदु कायद्यांतील कांहीं सुधारणा पास झाल्या. तसेंच हिंदु दत्तक विधानांतील सुधारणाबद्दलचें बिल एकमतानें पास झालें. हिंदु कायद्यांतील सुधारणामुळें खालील महत्त्वाचे फरक बडोदें संस्थानांत घडून आले—हिंदु विधवांना पूर्वी एकत्र कुटुंबांत परावलंबी राहावें लागून जास्तींत जास्त नक्त नेमणूक मिळे, नवीन कायद्याप्रमाणें हिंदु विधवा ही एकत्र कुटुंबांत भागीदार होऊन विभक्त झाल्यास तिला जिंदगीचा हिस्सा मिळूं शकेल, तसेंच तिला मृतपतीची स्वसंपादित किंवा हक्काची (हिस्शाची) प्रत्येक मुलांइतकीच इस्टेट मिळूं शकेल. तसेंच अशा मिळालेल्या किंवा वारसाहक्कानें प्राप्त झालेल्या १२००० रु. किंमतीपर्यंतची इस्टेट तिच्या पूर्ण मालकीची राहील; त्यापेक्षां जास्त असलेल्या इस्टेटीवर तिची मालकी कांहीं प्रमाणांत असेल. अविवाहित स्त्रीस अन्नवस्त्र व विवाह वगैरेकरितां मुलाच्या विभागाच्या एकचतुर्थांश इतका संयुक्त कुटुंबांतील इस्टेटीचा भाग हक्कानें विभक्त होणें असल्यास मागतां येईल. तसेंच विधवा स्त्रीला आपल्या बापाच्या इस्टेटींतून अन्नवस्त्राकरितां कांहीं बाबतींत नेमणूक मागतां येईल. इतर सुधारणा, दासीपुत्रांचा नेमणुकीचा हक्क राहील. हिंदु विवाह असवर्ण झाले तरी कायद्याप्रमाणेंच मानले जातील.

न्यायमंत्रि कचेरी—बालविवाह–प्रतिबंधक कायद्याच्या अंमलबजावणीचें काम न्यायमंत्र्यांच्या

अधिकाराखालीं होतें. मुलीचें व मुलाचें वय अनुक्रमें १४ व १८ पाहिजे; तसेंच ८ वर्षांखालील मुला-मुलींचें (कोणी एक अगर दोन्ही) लग्न कायदेशीर नसतें. १९३३-३४ सालीं दाखल झालेल्या ३१०० खटल्यांपैकीं २८१३ चे निकाल लागून शें. ८१ आरोपितांना शिक्षा झाल्या; ह्यांपैकीं १० रु. पेक्षां जास्त दंड झालेल्यांचें प्रमाण शें. ३२.२ होतें.

न्यायखातें-हुजुर न्यायसभेखेरीज संस्थानांत वरिष्ठ वगैरे सर्व प्रकारचीं मिळून १९५ न्यायालयें आहेत. उत्पन्न ७१२७०६ रु. खर्च-७३००११ रु. घटस्फोटाच्या कायद्याप्रमाणें ६४ अर्ज यंदा आले. ज्यांत घटस्फोटाची चाल नाहीं अशा दक्षिणी ब्राह्मण जातींतील एका स्त्रीनें काडीमोड मंजूर करून घेतली, तिच्या नवऱ्यानें विरोध दाखविला नाहीं.

सैन्यखातें- जनरल नानासाहेब शिंदे सेनापति हे मुख्य आहेत. सैन्य एकूण ५०८६. पैकीं प्रत्यक्ष कामावर असलेलें ३७१६. एकूण सैन्यांतील १६० तोफखान्याकडे, १५८२ घोडदळ, ३२१९ पायदळ, ११७ बँड व ८ जनरल व त्याचे दुय्यम अधिकारी असे आहेत. वरील खड्या सैन्याशिवाय २००० घोडदळांत व १८०६ पायदळांत आहेत. खर्च-तोफखाना ६१७७९ रु., घोडदळ ६८९९५७ रु., पायदळ ७६६११५ रु., बँड ३६८०५ रु. सेनापति, त्यांचे दुय्यम अधिकारी व त्यांची कचेरी ५०५९२ रु., आरोग्यखातें ८१६३ रु., पशुवैद्यकखातें ८५८२ रु. एकूण १६३१९९४ रु. मागील वर्षी एकूण खर्च १६३६६७४ रु. खड्या सैन्यांतील कामावर असलेल्या सैनिकाबाबत अंदाजें दरमहा ३७ रु. खर्च होतो. सैन्याचा एकूण खर्च २०७२१०३ रु. यांत कांटिंजंटवगैरेबद्दलच्या रकमा धरल्या आहेत. सैन्याची जातवारी-तोफखाना ४४ हिंदू, २९ मुसलमान; घोडदळ ७७४ हिंदू, २३२ मुसलमान, १ ख्रिस्ती, पायदळ १८४७ हिंदू, ४३७ मुसलमान, बँड ३३ हिंदू, २४ मुसलमान, व ४ ख्रिस्ती. एकंदर २६९८ हिंदु, ७२२ मुसलमान, ५ ख्रिस्ती. पोलिस- पगाराचें प्रमाण सुरुवातीस दरमहा १८ रु. साक्षर असल्यास १ रु. जास्त; फौजदार ५० ते १५० रु. दरमहा, सरफौजदार १६० ते २५० रु. दरमहा. संख्या एकंदर ५१४० (१०३२ अधिकारी व ४१०८ शिपाई ) पैकीं हेरखातें व हातठसाखातें २६; घोडेस्वार २२७, रेल्वे पोलिस १६८; बंदर पोलिस १४. जातवारी-२६३७ हिंदू; १६२२ मुसलमान १२ इतर. एकूण ४२७१ (कामावर असलेले). पोलिसांचें प्रमाण १.९१ चौ. मैलास किंवा ५७२ लोकसंख्येस एक पोलिस. शें. ७५ पोलिस साक्षर आहेत. साक्षरतेचें प्रमाण दरसाल वाढतें आहे. शें. १२ ना शिक्षा झाल्या, ६७ जणांना बक्षिसें दिलीं. खर्च १३६७२२१ रु. दर पोलिसामागें वार्षिक खर्च ३२० रु. फिंगर प्रिंट ब्यूरोचा खर्च २३४७१ रु.

छापखाने-संस्थानांत ५८ असून १ दैनिक, ४ साप्ताहिकें, ३८ नियतकालिकें छापलीं व प्रसिद्ध झालीं. तसेंच १५० पुस्तकें व पत्रकें प्रसिद्ध झालीं. त्यांपैकीं १२५ गुजराथी व २५ इतर भाषांतील होतीं.

तुरुंगखातें-वर्षाचे सुरुवातीस १०८३ पुरुष व ३६ स्त्रिया, सबंध वर्षांत तुरुंगांत आलीं. ५४८५ पुरुष, १७४ स्त्रिया; वर्षअखेर ११०३ पुरुष व ३१ स्त्रीकैदी तुरुंगांत होते. खर्च १,४०,००० रु. कैद्यांनीं केलेल्या कामाचें उत्पन्न २९०१५ रु. दर कैद्यामागें खर्च वार्षिक १०९ रु.

रजिस्ट्रेशन खातें-एकूण २३१,७८,०९८ रु. किंमतीचे ३९७६० कागद यंदा नोंदले गेले. उत्पन्न १७४९८२ रु.; खर्च रु. ७१५८६. शेतकी, पेढ्या व सहकारी संस्था यांचे कागद नोंदणी-फी न घेतां नोंदले जातात.

कोर्ट ऑफ वॉर्डस्-वर्षअखेरीस ७६ इस्टेटी ताब्यांत होत्या. त्यांचें उत्पन्न १८२००० रु.; खर्च १४०३०० रु.

धर्मादाय खातें-संस्थानच्या व्यवस्थेखालीं यंदा ४८ संस्था होत्या. त्याबद्दल ८१००० रु. खर्च झाला. यंदा सर्वसामान्य धर्मादायफंडांतून ५८७३२ रु. १२ आ. देणगीदाखल देण्यांत आले. एकूण वर्षअखेर ५४०००० रु. शिल्लक होते. वर्षांत एकूण ९६००० रु. या खात्यातर्फे खर्च झाले. ह्याशिवाय खाजगी ३९४८ धर्मादाय संस्था संस्थानांत आहेत.

दौलत (फायनॅन्स्) (१) मागील बाकी व यंदाची खंडणी म्हणून रेवाकांठा, मही-कांठा, काठेवाड, पालनपूर व मियांगांव मिळून १२४३००० रु. येणें होतें. त्यांपैकीं यंदा ५१२००० वसूल झाले. (२) पेन्शनरांची संख्या २५१५, वार्षिक पेन्शन रक्कम ५८६७३७ रु. ग्रॅच्युइटी ३८ इसमांना मिळून ३२८४ रु. सैन्यांतील १२३५ पेन्शनरांना १५४१३२ रु. यंदा पेन्शन दिलें व १८ जणांना मिळून ५६९१ रु. ग्रॅच्युइटी दिली.

उत्पन्न–१९३३–३४ चें २४७१०००० रु. (२२८०००० रु. नीं कमी); पैकीं जमीन महसूल १०७५९००० रु. (१४६७००० रु. कमी) अबकारी २६३८००० रु. कस्टमस् १८९१००० रु., स्टँप्स् ११५३००० रु., व्याज १८४५०००, रेल्वे २०१८०००, शिक्षण ७०२००० रु., वगैरे जमा. खर्च–२०८०५००० रु. (३६९००० रु. जास्त). त्यांत जमीनमहसूल २२.२ लक्ष रु., खाजगी २२.९, लक्ष रु. श्रीमंत युवराज४२३०००, सैन्य–२०६६००० रु., पोलिस १४५८०००, शिक्षण ३६८४००० रु. (७२००० रु. जास्त); पब्लिक वर्क्स रु. ३०४७००० रु. वर्षअखेर ३९.२५ लक्ष रु. जादा राहिले. त्यापैकीं ५ लक्ष रु. रेल्वे व इतर महत्त्वाचीं कामें, ९ लक्ष रु. रोखे व ५ लक्ष रु. कर्ज व अॅडव्हान्स याप्रमाणें गुंतविले. वर्ष-अखेर संस्थानची जिनगी ११,१५,४३,११५ रु. होती. संस्थानांत एकंदर ३२८३ खेडीं असून ८८,९०,५९० बिघे जमीन आहे. त्यापैकीं ७०,६१,६८१ बिघे लागवड होण्याजोगी असून यंदा एकंदर ६६९२९१७ बिघे जमीन पिकविली गेली. पाऊस –यंदाचा व दशवार्षिक सरासरी अनुक्रमें बडोदें ४९ व ५१ इंच. मेहसाणा ३७.५ व २६, नवसारी ५४.३ व ५१.८, अमरेळी २९.८ व १९.३, ओखामंडळ २४.३ व १५.२ यंदा ८५८९८ रु. तगाई देण्यांत आली; व मागील ४०६००० रु. बाकी. पैकीं २३६००० रु. वसूल केले.

अबकारी खातें–ह्या खात्याचें उत्पन्न मुख्यत: देशी दारूची पैदास व विक्री, ताडी, विलायती दारू व मादक पदार्थ यांची विक्री यांपासून होतें. उत्पन्न २५२६५६१ रु. अफू तयार करण्याचा खर्च ७५८७५ रु. मक्तेदारांना अफूची विक्री केली त्याचें उत्पन्न ३४१४०४ रु. संस्थानला फायदा २६५५२९ रु.

कस्टमस् व बंदर –उत्पन्न– २१७३०११ रु. पैकीं ओखामंडळचें उत्पन्न २१२२४६७ रु. मीठ:– ओखा सॉल्ट वर्क्स लि.– पैदास १३५९४८४ बंगाली मण (गेल्या वर्षी ९७६०५२ मण तयार झालें होतें); बंगालला यंदा १३१२७५२ मण पाठविले. खराब व हलक्या प्रतीचें मीठ शेतीस खत म्हणून दरमणीं ८ आणे प्रमाणें देण्यांत येतें.

लोकल बोर्डें–लोकलफंड जमा–८६९१५३ रु. बोर्डाचें उत्पन्न–११५४३८६ रु. आणि खर्च १३८५३५४ रु. "अ" वर्ग म्युनिसिपालिटचा– बडोदा शहर–उत्पन्न रु. ९२४६३६ (१॥ लक्ष संस्थानची मदत) खर्च रु. ८०१८५६ दर डोई वार्षिक कराचा बोजा ५ रु. १४ आ. ३ पै "अ" वर्गाच्या इतर म्युनिसिपालिटचा १०. खर्च ४३००१७ रु. उत्पन्न ५०२९३० रु. "ब" वर्ग म्युनिसिपालिटचा ३१. उत्पन्न ३३४०७१ रु. खर्च ३४३७९४ रु.

उद्योगधंदेखातें–ऑईल इंजिनें व पंप वगैरे-साठीं ५ अर्जदारांना २४९५१ रु. तगाई कर्ज देण्यांत आलें (१) शेती व ग्रामोद्धार विषयक शाखा–उत्पन्न ३७२६६ रु. खर्च २१२५९९ रु. ह्यांत पिकासंबंधीं पुष्कळ प्रकारचें संशोधन, प्रयोग व शेतकऱ्यांस त्याबद्दल व शेतीच्या यंत्रा-बद्दल व इतर धंद्यांबद्दल माहिती देण्यांत येते. (२) व्यापार व उद्योगधंदे (कारखाने वगैरे) ओखा बंदरची सुधारणा व प्रगति. आयात ७६७५६ टन; निर्यात १०५६५५ टन, उत्पन्न–रु. २०९२०५८ खर्च ६३९१० रु. ९ आ. कापड गिरण्या १४. ह्यांत एकूण ७३८१९ देशी व विलायती कापूस खपला. ओखा येथें ५७०३१ टन सिमेंट यंदा तयार झालें. ओखाच्या मीठ व सिमेंट कारखान्याबद्दल "रॉयल्टी" म्हणून संस्थानला यंदा १३३०२ रु.

मिळाले. संस्थानांत बडोदें, पेटलाद (दातार मॅच फॅक्टरी) व बिलिमोरा येथें तीन काडयाचे पेटयांचे कारखाने आहेत. फॅक्टरी ॲक्टखालीं असणारे १२३ कारखाने आहेत. सर्व कारखान्यांत एकूण २५८५९ मजूर कामावर असतात. रजिस्टर्ड कंपन्या १०८; पैकीं ४ खाजगी. सर्वांचें मिळून अधिकृत भांडवल ४३९११९७७४ रु. जमा झालेलें भांडवल १०८५०३१८४. ह्यांपैकीं बडोद्या बाहेरील कंपन्यांचें जमा भांडवल ७९८२१६८० रु. होतें; त्यापैकीं विमा कंपन्यांचें ७३२९३८२८ रु. होतें. विद्युच्छक्ति–संस्थानांत सरकारी (बडोदा व ओखा) येथील कारखाने धरून १० विद्युत् उत्पादन कारखाने असून त्यांतून एकंदर २९६०४१४ यूनिट्स वीज वापरण्यांत आली. सहकारी संस्था–एकूण ११४६. पैकीं चालू १०५१; सभासदांची संख्या ४५७६० (गेल्या वर्षी ४३४८८). खेळतें भांडवल ७६८६२९७ रु. ठेवी ४१८४७५० रु. शेतकी सहकारी संस्था–९३६; सभासद संख्या २९७५६. खेळतें भांडवल ३५८७१७४ रु. वर्षअखेर कर्ज येणें २९९९२६८ रु.

बिगर शेतकी सहकारी संस्था–२०१; सभासद संस्था–१३९६०; खेळतें भांडवल २४५४९९१ रु. वर्षअखेर कर्ज येणें–१३६८९३२ रु. जंगल ७१७ चौ. मैल. उत्पन्न ३३४९३१, रु. खर्च १३६७५० रु. बहुतेक जंगलभागांतून सागवान, चंदन, खैर, बांबू, अंजन वगैरेची मोठ्या प्रमाणांत लागणी व संवर्धन केलें जातें.

पब्लिक वर्क्स डिपार्टमेंट–खर्च ३९२२७८ रु., इरिगेशनवर आतांपर्यंत खर्च–५६९१००० रु, ७९३२ बिघे पाण्याखालील जमिनीबद्दल २६४१४ रु. पाणीपट्टी वसूल झाली.

रेल्वे–संस्थानच्या मालकीची ७०६.७ मैल लांबीची रेल्वे आहे. रेल्वेवर आतांपर्यंत ५३९४८३४४ रु. खर्च झाले. त्यावर यंदा २०४४८४१ रु. म्हणजे शे. ३.८ टक्के निवळ फायदा झाला. शिक्षण खातें–एकूण शिक्षणसंस्था २४८०, विद्यार्थी संख्या २६५९२२; पुरुष व स्त्री लोकसंख्येशीं शिक्षण घेत असलेले मुलगे व मुली यांचें शेंकडा प्रमाण अनुक्रमें १३.३ व ८.३. इंग्रजी शिक्षणाच्या १०९ संस्थांत १७८९५ मुलगे व १०५९ मुली मिळून १८९५४ विद्यार्थी आहेत. इतर २३७१ संस्थांत १४९७९५ मुलगे व ९७१७३ मुली शिकत आहेत. बडोदें कॉलेजवर खर्च–२२४३६४ रु. उत्पन्न ८०५९९ रु. दर विद्यार्थ्यामागें खर्च १३९ रु. ९ आ. एकूण विद्यार्थी ९८७. धंदेशिक्षणाच्या शाळा–कलाभवन बडोदें, पेटलाद पाटण व अमरेळी येथील उद्योगशाळा, नवसारी येथील टाटा हुन्नरशाला वगैरे. कलाभवन विद्यार्थी ५४४. खर्च–१२७२७० रु.

स्त्रीशिक्षण–मुलींच्या शाळा–२८४; विद्यार्थिनी ३७६४४. अंत्यजशाळा–७८, विद्यार्थी ४७७५ (२७५४ मुलगे व २०२१ मुली). इतर शाळांतील मुलें धरून संस्थानांत एकूण २१३३३ अंत्यज मुलें शिक्षण घेत आहेत. बडोदें सेंट्रल लायब्ररी–पुस्तक संख्या ११२५०६. जिल्हानिहाय व फिरत्या लायब्ऱ्या आहेत. एकूण दोनतृतीयांश प्रजेस लायब्ऱ्यांचा फायदा मिळतो. ओरिएंटल इन्स्टिटयूट १३७७५ हस्तलिखितें आहेत. अभ्यास व संशोधन याची चांगली सोय आहे. खर्च–४२९५८ रु. ग्रंथकर्त्यांना उत्तेजन देण्यांत आलें. राजकीय संस्कृत महाविद्यालय–वार्षिक मदत २५००० रु. मंजूर आहे. २२ वर्गांत मिळून यंदा १४४ विद्यार्थी शिकत होते. संस्थानांतील बालवीर संख्या १०७३८. बालवीर चळवळीकरितां खर्च १४४४५ रु. पदार्थसंग्रहालय व पिक्चर गॅलरी–प्रेक्षक २४०९६९; खर्च ३४५६५ रु.

आरोग्यखातें– ९२ दवाखाने इस्पितळें वगैरे आहेत. खर्च ६६९७१० रु. उत्पन्न ८७८४३ रु. यंदा ९११९०२ रोग्यांना ह्या खात्यातर्फे औषधपाणी देण्यांत आलें.

जननसंख्या–८०५१३; मृत्युसंख्या ४८५२१, लोकसंख्येच्या दरहजारीं प्रमाण अनुक्रमें ३३ व २०; गेल्यावर्षीचें हें प्रमाण अनुक्रमें २७.७ व २०.१ होतें. बालमृत्यु–१ वर्षाखालील १०७३१; १००० जननास प्रमाण १३२.२ यंदा ७८९७३ जणांना प्राथमिक देवी टोचल्या.

---

## ८ भोर

### ( १९३४ अहवाल )

भोर संस्थानचें एकंदर क्षेत्र ९१० चौरस मैल असून सह्याद्रीच्या माथ्यावरून दोन्ही उतरणींवर त्याचा विस्तार झालेला आहे. पुणें, सातारा व कुलाबा या तीन जिल्ह्यांनीं संस्थान वेष्टिलें गेलें आहे. संस्थानचे एकंदर पांच तालुके पाडले असून ते तीन पुणें जिल्ह्यांत, एक सातारा जिल्ह्यांत व एक कुलाबा जिल्ह्यांत असे विभागले गेले आहेत. संस्थानांत लहानमोठीं ५०२ खेडीं गणिलीं जातात. संस्थानचा बहुतेक सर्व प्रांत डोंगराळ आहे. तीन चतुर्थांश जमीन तांबूस व उरलेली बहुतेक फिकट तपकिरी व क्वचित् काळसर अशी असल्यानें संस्थानांत कोंकणी व मावळी पिकेंच विशेषतः होतात. हिरडा, तांदूळ, नागली, वरी हीं पिकें मुख्य असून ज्वारी, बाजरी व गहूं या देशी पिकांची लागवडही कांहीं ठिकाणीं होते. पावसाचें मान पूर्वेकडून पश्चिमेकडे वाढत जातें. जास्तींत जास्त २५० इंच व कमींत कमी १५ इंच पाऊस पडणारीं ठिकाणें आहेत. अहवालाचे सालीं सरासरीनें ८२ इंच ९२ सेंट पाऊस पडला.

लोकसंख्या— संस्थानची एकंदर लोकसंख्या १,४१,५४६ असून त्यांत ७०,१२२ पुरुष व ७१,४२४ स्त्रिया आहेत. जातवार लोकसंख्या १,३९,४३१ हिंदू, १,५५८ मुसलमान, २७५ ज्यू, ३ पारशी, ३७ ख्रिश्चन, १ शीख व २४१ जैन अशी आहे. अहवालाचे सालीं एकूण जननसंख्या ५,९७४ व मृत्युसंख्या ३८९२ होती.

उत्पन्न—१९३४ सालाचें संस्थानचें उत्पन्न रु. ८,८८,४४८–१–११ झालें. त्यात महसूल रु. ३,८३,१४१–८–१० होता. त्याचे खालोखाल रु. १,७३,३९८–२–० इतके अबकारी खातें व अफूवरील कर वगैरेपासून उत्पन्न झालें.

एकूण खर्च–रु.८९२,९७२–४–४ इतका झाला त्यातील ठळक बाबी पुढील प्रमाणें होत्या.

खाजगी—७०,००० रुपये, कारखाने वगैरे ३०,००० रुपये.

| | |
|---|---|
| रेव्हिन्यू व दळणवळण— | ६९५९१– ३–४ |
| शिक्षण | २७६१७– २–३ |
| दवाखाना | ५२३९–१४–६ |
| बिहार फंड | १५००– ०–० |
| पब्लिक वर्क्स | ६३७००–१४–१ |

सैन्य व पोलीस—संस्थानजवळ स्वतःचें असें सैन्य नाहीं. राजवाडा, खजिना, तुरुंग वगैरेंचें संरक्षण करण्यासाठीं हत्यारी पोलिसांची तुकडी आहे तिलाच शिबंदी असें नांव आहे. याशिवाय संस्थानचे वेगळे २३५ पोलिस आहेत. पैकीं १६४ हत्यारबंद व १२३ बिनहत्यारी आहेत. शिवाय २५ खाशा पोलिसांची एक वेगळी तुकडी आहे. एकंदर पोलिसांचें लोकसंख्या व क्षेत्र यांशीं प्रमाण दर ३ मैलास व दर ५०० इसमास एक पोलिस असें पडतें. अहवालाचे सालीं या खात्यांत रु. ५०७८४–५–१ इतका खर्च झाला.

शिक्षण—संस्थानांत एकंदर ६१ शाळा आहेत. त्यांत एक हायस्कूल, २ दुय्यम शिक्षणाच्या शाळा व ५८ प्राथमिक शाळा आहेत. या सर्व शाळांतून शिकणाऱ्या विद्यार्थ्यांची संख्या ३०७६ आहे. संस्थानांत प्राथमिक शिक्षण मोफत असून हायस्कुलांत आठ आण्यांपासून एक रुपयापर्यंतच फी आहे. शिक्षणावर खर्च ३४ सालीं २७६१७ रु. २ आ. ३ पै झाला. संस्थानचे कोणतेही शाळेंत अस्पृश्यता मानली जात नाहीं.

स्थानिक स्वराज्य—भोर व शिरवळ या गांवीं म्युनिसिपालिटया आहेत. प्रत्येक तालुक्यास एक तालुका बोर्ड आहे. मामलतदार हा त्याचा एक्स ऑफिशिओ प्रेसिडेंट असतो. बोर्डाचे अधिकार साधारणपणें ब्रिटिश हद्दींतील तालुकाबोर्डाप्रमाणेंच आहेत. शिवाय पाली व इतर तालुक्याचे गांवीं सॅनिटरी बोर्डस् आहेत.

महत्त्वाच्या गोष्टी— भाटघरचे धरणाखालीं गेलेल्या मुलुखाबद्दल मोबदला म्हणून विंग व विंझर हीं दोन गांवें संस्थानास मिळालीं. नुकताच श्रीमंत राजेसाहेबांना 'राजा' हा वंशपरंपरा किताब मिळाला.

भोरजवळ निरानदीवरील लक्ष्मी–ब्रिजचें ए. जी. जी. विल्बर फोर्स–बेल यांचे हस्तें जून १९३३ मध्यें अनावरण झालें.

## ९ रामदुर्ग
### ( १९३३-३४ )

संस्थानचे राजे श्रीमंत रामराव व्यंकटराव भावे हे असून त्यांचें वय ३८ वर्षांचें आहे. संस्थानचे ब्रिटिश सरकारशीं सलोख्याचे संबंध आहेत. लोकसंख्या ३५,४५४.

संस्थानचा वसूलः—गेल्या पांच वर्षांची सरासरी पाहतां अडव्हान्स व डिपॉझिटची रक्कम सोडून एकूण वसूल २,९९,५२५ रु. आहे. या संस्थानला ब्रिटिश सरकारला खंडणी द्यावी लागत नाहीं. तथापि कित्तूर, सगत आणि गोन्नागार येथील जमिनी व कोन्नूर, तिजाई व हक्क वतन यांजबद्दल ४५२५ रु. द्यावे लागतात.

जमिनीची व्यवस्था—संस्थानची एकंदर जमीन १०८३०० एकर व २९ गुंठे आहे. त्यापैकीं १८,१३६ एकर व १२ गुंठे जमिन अरण्यांनीं व्यापली आहे. 'असेस्ड' जमीन ८५८९७ एकर आहे.

व्यापार व उद्योगधंदेः—या संस्थानांत जीनिंग फॅक्टरीज चार आहेत. त्यांतल्या ३ रामदुर्गला असून एक असोटीला आहे. रामदुर्गला असणारी तिसरी फॅक्टरी वर्षभर बंद होती. संस्थानांतील मुख्य धंदा साड्या विणणें, खण तयार करणें हा आहे. येथें एकंदर २००० हातमाग असून एकंदर माल ६ लाख रुपयांचा निघाला. त्यापैकीं रामदुर्ग शहरांतच निम्मे उत्पन्न झालें व उरलेलें अर्धें सुरेबान, मनीहस, शिवपेठ ह्या शहरांतून झालें. जगांतील आर्थिक मंदाईची झळ संस्थानांतील ह्या धंद्याला बाधली. त्याचा परिणाम म्हणजे पैशाची टंचाई हा होय. धंद्याला पैशाचा पुरवठा नजीकच्या ब्रिटिश हद्दींतील सावकारांकडून होतो. त्यामुळें विणकऱ्यांना रोजच्या मजुरीपेक्षां कांहींही मिळत नाहीं. विणकऱ्यांची स्थिति फार गरीबीची आहे. ती सुधारण्याचा उपाय म्हणजे सहकारी पतपेढ्या काढणें हा होय. ह्या बाबतींत गेल्या वर्षीचे प्रयत्न अयशस्वी ठरले तरी दरबारनें संस्थानच्या बँकेंतून मदत देण्याचे (स्थिति सुधारतांच) ठरविलें आहे. वरील मुख्य धंद्यापेक्षां नांव घेण्याजोगा दुसरा धंदा संस्थानांत नाहीं. भुईमुगाच्या उत्पन्नाच्या बाबतींत प्रोत्साहन देण्यासाठीं दरबारनें म्युनिसिपालिटीकडून कर कमी करण्याबाबत खटपट केली; याचा परिणाम म्हणजे ३११६५ पोतीं म्युनिसिपल हद्दींत आयात झाली.

रजिस्ट्रेशन—रजिस्टर झालेल्या कागदांचा आंकडा ७६८. उत्पन्न रु. २६८८ –१२–३.

पोलीस—पोलिसांची संख्या ७२ असून एकंदर खर्च १०९१४ रु. झाला. एकंदर २० गुन्हे पोलिसांनीं पकडले. चोरीस गेलेल्या मालाच्या किंमतीचा आंकडा ५१४–६–० असून ५०६ रु. किंमतीचा माल सांपडला. गेल्या वर्षी हा आंकडा १४३ होता. गेल्या वर्षीं ८११ रु. किंमतीचा माल चोरीस गेला.

तुरुंग—संख्या १. खर्च एकूण १४८६ रु. गेल्या वर्षीं हाच खर्च २५७५ होता.

पावसाचें प्रमाणः—सरासरी २१.४२. गेल्या वर्षींच्या एकंदर पावसाचें प्रमाण २७.४२, ह्या वर्षीं २६.२.

वर्षांतील हंगाम—ह्या वर्षीं पाऊस नेहमींच्या मानानें कमी पडला परंतु सरासरीनें बघतां तो जास्तीच झाला. पावसानें वेळेवर पडण्यास सुरुवात केल्यानें शेतकऱ्यांना खरीफ पिकाबद्दल आशा वाटत होती. परंतु तो जुलैमध्यें मुळींच न पडल्या-मुळें व पुढें पावसानें फारच अवकृपा केल्यामुळें खरीपाच्या पिकाचें नुकसान झालें. त्याचप्रमाणें कापूस व गहूंहि कमी झाला. शेतीची स्थिति विशेष समाधानकारक नाहीं. याचीं कारणें:—पुष्कळशा जमिनींतून निष्काळजीपणानें हवीं तीं रोपटीं वाढू देतात. (२) आधुनिक यंत्रसामुग्रीचा अभाव.

म्युनिसिपालिटी-संख्या २. एक रामदुर्ग शहरांत व दुसरी सुरेबान शहरांत आहे. म्युनिसिपालिटी-जवळ एकंदर पहिली शिल्लक १६२८६ रु. आहे. जमा-ह्या वर्षी७०४८९ रु. व गेल्या वर्षी७५०४३. एकंदर खर्च. मागच्या वर्षी७१५०१ रु. ह्या वर्षी ६७९७७ रु. वर्षाच्या शेवटीं शिल्लक १८७९८ रु. मुंबई सरकारच्या नियमाप्रमाणें ग्रामपंचायती संस्थानामध्यें सुरू करण्यांत आल्या आहेत. त्यांची संख्या पांच आहे.

पब्लिक वर्क्स—खात्याकरितां संस्थाननें एकंदर ४९९९३ रु. खर्च केला. त्यांत डागडुजीकरितां

१०९६२ रु. व नवीन कामाकरितां ३९१३१ रु. खर्च केले. टेलिफोन सर्व्हिस सुरू झाली.

शिक्षण—प्राथमिक शिक्षण सर्व संस्थानांत मोफत आहे. शाळांची संख्या २९ असून त्यांतल्या ३ रात्रींच्या शाळा आहेत. विद्यार्थ्यांची संख्या २०४९. गेल्या वर्षीचा आंकडा २१२९ होता. एक इंग्लिश शाळा आहे. एकंदर खर्च २२५५७ रु. आला. मुलींच्या शाळा दोन असून विद्यार्थिनींची संख्या २१० आहे. हीच संख्या गेल्या वर्षी २१६ होती. मुलींना सहशिक्षणही देण्यांत येत असून त्यांची संख्या ७० आहे. दुय्यम शिक्षण घेणाऱ्या मुलींची संख्या ७ असून गेल्या वर्षी हीच संख्या ११ होती. व्हि. जे. लायब्ररी ही स्टेट मध्यें आहे लायब्ररींत एकंदर २२७३ पुस्तकें आहेत.

आरोग्यालय—स्टेट रुग्णालय व म्युनिसिपल हॉस्पिटल ह्यांमधून रोग्यांना फुकट उपचार मिळतो. रामदुर्गला औषधोपचार केलेल्यांची संख्या ९५९६ होती व सुरेबानला ५००५ रोग्यांना उपचार केला. लहान व मोठ्या शस्त्रक्रिया अनुक्रमें ३१ व २७६ केल्या. एकंदर १८९७ लोकांना टोचलें. देवीची सांथ होती. जननमरणाची सरासरी अनुक्रमें ४२ व ३७ (प्रत्येकीं १०००त)होती. एकंदर खर्च ५४७१ रु. झाला. आयुर्वेदिक दवाखाना सुरू झाला आहे. त्याचा जनतेला फार उपयोग झाला. एकंदर ३४१२ लोकांना उपचार करण्यांत आले. खर्च ४१४ रु. आला. रामदुर्गला फक्त एकच खाजगी छापखाना आहे. त्याच छापखान्यानें ग्रामसेवक हें पाक्षिक सुरू केलें आहे. स्टेटनें शिक्षणखातें, पब्लिक वर्क्सखातें, दवाखाने व सार्वजनिक आरोग्य यांवर अनुक्रमें १५६४८ रु., ४९९८५ रु., ५४७१ रु., ४७९ रु. खर्च केला. राजेसाहेबांचा खाजगी खर्च म्हणून ३८७९० रु. वेगळे काढण्यांत आले होते.

एकंदरींत विशेष असें जरी घडलें नाहीं तरी जगांतील आर्थिक मंदीची झळ संस्थानाला लागलीच; तरी त्याचा परिणाम फारसा बाधकारक नव्हता. वर्षाचा हंगाम सुरुवातीला आशाजनक होता परंतु पाऊस शेवटीं अपेक्षेप्रमाणें पडला नाहीं ह्याचा परिणाम कापसाच्या पिकावर फारच झाला. बिगारी व कामगार ह्या दोघांनाही काम होतें. शिक्षण, न्याय, आरोग्य व औषधोपचार या सर्व बाबींचा व्यवहार उत्कृष्टपणें पार पडला.

---

## सं. अक्कलकोट

(१९३३–३४)

संस्थानचें क्षेत्रफळ ४९८ चौरस मैल असून लोकसंख्या ९२,६०५ आहे. संस्थानचें ठोकळ उत्पन्न ७,३२,१५७ रु. चें असून त्यांतून १४५९२ ब्रिटिश सरकारला खंडणी म्हणून द्यावे लागतात. अहवालाचे सालीं ३,२९,९८९ रु महसुलाचें उत्पन्न झालें. पाऊस वेळेवर व पुरेसा झाल्यानें खरीपाचीं व रब्बीचीं पिकें चांगलीं आली. इतकें असून धान्यांचे भावही जरा बरे होते. चालू सालीं संस्थानचें उत्पन्न ७,७२,१५९ रुपये व खर्च ६,७२,५९८ रुपये झाला. गेल्या सालीं हे आंकडे ८,२४,६६६ व ६,९५,१८३ असे होते. अहवालाच्या सालीं झालेल्या खर्चांतील मुख्य आकडे पुढीलप्रमाणें आहेत. श्रीमंत राजेसाहेबांचा विवाह २,५०,०००रु.नवीन वॉटरवर्क्स २,४९,०९३ रु. दवाखाने२१,८९९रु.,शिक्षण रु.४२,४२२ इत्यादि. संस्थानांत एकंदर ५१ शाळा आहेत. अहवालाचे सालीं एक दुय्यम शिक्षणाची शाळा काढण्यांत आली. मुलींची शाळा बांधण्याकरितां पब्लिक वर्क्स खात्यांतून या सालीं चाळीस हजार रुपये खर्च झाले आहेत. पटावरील विद्यार्थ्यांची एकंदर संख्या यंदा ३६६९ होती. संस्थानांत अक्कलकोट व खेड्यांतून प्लेगचा उपद्रव झाल्यानें पूर्वीपेक्षां ही संख्या थोडी घटली होती. जननसंख्या ३२६३ व मृत्यू २९३० त्यापैकीं प्लेगचे मृत्यू ८०८ होते. संस्थानी दवाखान्यांत २१८९९ रोग्यांस औषधोपचार करण्यांत आला. रीजंट राणीसाहेब यांनी उच्च शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थ्यांसाठीं दरमहा २० रुपयांच्या दोन शिष्यवृत्त्या ठेविल्या आहेत. १,०२,२४५ रु. शेतकरी व व्यापारी लोकांस मदतीदाखल लोन म्हणून देण्यांत आले. एकंदरीनें संस्थानची परिस्थिति समाधानकारक होती.

# १० सांगली
## ( १९३३–३४ )

सामान्य माहितीः–मिरजप्रांत, कुडची, मंगळवेढें, शहापूर, शिरहट्टी हे तालुके व तेरदळ हा महाल मिळून सांगली संस्थान बनलें आहे. संस्थानाचें क्षेत्रफळ ११३६ चौ. मैल असून १९३१ च्या शिरगणतीप्रमाणें लोकसंख्या २,५८,४४२ आहे. संस्थानचें उत्पन्न गेल्या पांच वर्षांच्या सरासरीप्रमाणें १५९५५८४ रु. आहे. संस्थान हिंदुस्थानसरकारला अगर इतर कोणत्याहि संस्थानाला खंडणी देत नाहीं. ४५० घोडदळाच्या तैनातीफौजेबद्दल संस्थाननें १८२० पासून १,३५००० रु. उत्पन्नाचा मुलूख सरकारला तोडून दिला आहे.

संस्थानाधिपति –लेफ्टनंट मेहेरबान हिज हायनेस श्रीमंत सर चिंतामणराव धुंडिराज ऊर्फ अप्पासाहेब पटवर्धन के. सी. आय्. ई. राजासाहेब ऑफ् सांगली वय ४४. गादीवर बसून २४ वर्षें पूर्ण झालीं. राजेसाहेब नरेंद्रमंडळाच्या स्टँडिंग कमिटीचे सभासद आहेत.

रयत सभा–तिसरें अधिवेशन ४ ते ८ सप्टेंबर १९३३ मध्यें भरलें. प्राप्तीवरील कराचा ॲक्ट राजेसाहेबांच्या मंजुरीकरितां पाठविण्याचें ठरलें. त्याशिवाय " मार्केट ॲक्ट ", बाल–विवाह प्रतिबंधक ठराव व हिंदु विधवांच्या इस्टेटीवरील वारसा हक्कांत वाढ ह्या ठरावांचीं पहिलीं वाचनें पास होऊन तीं सिलेक्ट–कमिटीकडे पाठविण्यांत आलीं. यंदा जमीन महसुलाची मागणी ६,९६,२०२ रु. होती, गेल्या वर्षीं ७,२०,४१४ होती. वर्षअखेर थकलेली बाकी यंदा व गेल्या वर्षीं अनुक्रमें :–– ६,०२,१८१ रु. व ५,२३,३४५ रु. होती. संस्थानांतील २४४ खेड्यांपैकीं ४६ इनामी वगैरे हक्कदारांचीं आहेत.

संस्थानांतील एकूण ६,०९,६९० एकर लागवडीयोग्य जमिनीपैकीं यंदा ६०५४२५ एकर जमीन पिकाखालीं होती. यंदा व गेल्या वर्षीं तगाई दिली नाहीं, जुन्या तगाईचीच वसुली चालू आहे.

संस्थानांत लष्कर नाहीं. अधिकारी व शिपाई वगैरे मिळून पोलिस संख्या यंदा ४८५ होती त्यांपैकीं २६ घोडेस्वार होते, १७५ पोलिस हत्यारबंद असून जमादारांजवळ तरवारी आहेत. ४६४ पोलिस साक्षर असून बाकीचे शिकत आहेत. यंदा व गेल्या वर्षीं अनुक्रमें १,०८,९६७ रु. व ९८,९७९ रु. पोलिस खात्यावर खर्च झाला. पोलिसांचें प्रमाण दर २.५ चौ. मैलास व ५६३ लोकसंख्येस एक असें पडतें. त्याशिवाय २३५ खेडेगांवांतील पोलिस आहेत.

तुरुंग एक–सांगली येथें वर्ष अखेर तुरुंगांत १३२ कैदी होते. तुरुंग खातें खर्च एकूण १०६१२ रु., कैद्यांचे श्रमाचें उत्पन्न ७९२ रु. झालें.

रजिस्ट्रेशन खातेंः––उत्पन्न २९६६० रु., खर्च १४३१ रु., वार्ड इस्टेटी ५५, उत्पन्न ३२५६४ रु. संस्थानांत ६ म्युनिसिपालिट्या असून त्या सर्वांचें यंदा उत्पन्न व खर्च अनुक्रमें २४११९७ रु. व २१९८७७ रु. होता. सांगली व मंगळवेढें म्युनिसिपालिट्यांत निम्मे व शहापूर म्युनिसिपालिटींत शें. ७५ सभासद लोकनियुक्त असतात.

लोकलबोर्डें ६ः––उत्पन्न ७६९३४ रु. संस्थानांत ६०१९० एकर जंगल आहे. जंगलखात्याचें उत्पन्न व खर्च यंदा अनुक्रमें ४०७६८ रु. व ७२१६ रु. झाला.

संस्थानांत सांगली ही शेतपिकांची व शहापूर व रबकवी ह्या कापडपेठा प्रसिद्ध आहेत. ह्याशिवाय तांबेपितळेचीं व सोन्याचांदीचीं भांडीं व नक्षीकाम बरेंच होतें.

पब्लिक वर्क्स खातें:–खर्च ९५६०९ रु.

सांगली वॉटर वर्क्सः–खर्च २८०४७ रु. उत्पन्न, पाणीपटी वगैरे–३७४७७ रु. ११ आ.

संस्थानांतील अबकारीचें सर्व काम ब्रिटिश सरकारकडे दिलेलें आहे.

यंदा जननप्रमाण दरहजारीं ४२ व मृत्युप्रमाण दरहजारीं ३१ होतें. साथीचे रोगानें–प्लेग ८८७, देवी २७ व कॉलरा ९६ असे बळी घेतले. जननसंख्या १०८४३ मृत्युसंख्या ८०१३

आरोग्य खातें खर्च–२५७२० रु.

शिक्षण–एकूण ३७ शाळा. सर्व प्रकारच्या शाळांत मिळून १४८७२ विद्यार्थी शिकत आहेत. पैकीं

३१३७ ब्राह्मण, ३६४३ मराठे,, २८२९ लिंगायत, ८५२ निकृष्ट जाती, ८६६ मुसलमान व बाकीचे इतर. १२४२२ मुलगे व २४५० मुली. खर्च–यंदा व गेल्या वर्षी अनुक्रमें १३९७३३ रु. १३९८६५ रु. झाला. पैकीं शें. ६३ संस्थानचा. फी व लोकल फंड प्रत्येकीं शे. १४.२ श्रीगणपती-संस्थान शें. ५.२ व म्युनिसिपालिटचा शें. ३.४. संस्थानांत प्राथमिक शिक्षण फुकट असून ६४ गांवीं सक्तीचें चालू आहे. ८ संस्कृत शाळांत १२४ विद्यार्थी शिकत आहेत. संस्थानच्या हद्दीवर असलेल्या विलिंग्डन कॉलेजला संस्थाननें बरीच मदत केली असून संस्थानांतील विद्यार्थ्यांना त्याचा फार उपयोग होतो. एकंदर ४ शहरें व २४० गांवें असलेल्या संस्थानांत १२९ ठिकाणीं शाळा आहेत.

इतर बाबी:–सांगली स्टेट रेल्वेचें यंदा व गेल्या वर्षाचें उत्पन्न अनुक्रमें ३७३५२ रु. व ३५३३८ रु. सहकारी संस्था ९० सभासद ७४४४. खेळतें भांडवल ९०८५८२ रु. गंगाजळी–६५४८१ रु.

सांगली सेंट्रल को. बँक–भागांचें भांडवल वसूल ५७९८० रु. ठेवी ३४९०३१ रु.

सांगली बँक–भांडवल–२ लाख रु. गंगाजळी ५४००० रु; गेल्या वर्षी ४६६०३ रु. फायदा. यंदा ७०५४७ रु. तोटा ( कारण एका पेढीचें दिवाळें निघालें).

संस्थानचा जमाखर्च—यंदा उत्पन्न १४३३११० रु. (गेल्या वर्षी १५४८१७५ रु.) शिल्लक रोख ४८७५१६ रु. १२ आ. ठेवी–२८६५५४ रु. गुंतविलेल्या रकमा–२१९३२८४ रु.(१७३६६०० चे सरकारी रोखे). कर्ज दिलेलें ५२९७५९ रु. सांगली स्टेट सेव्हिंग बँकेंत ८०१ खातेदारांचे २०६७३० रु. आहेत.

खर्च–खाजगी खर्च–३१४३८० रु. गोलमेज परिषद यंदा ८४८८ रु. गेल्या वर्षी १३८२१ रु. पागा २७३९० रु. राज्यकारभार ७०४२१ रु. जमीनमहसूल १३४२६६ रु. न्यायखातें–४२७८४ रु. पेन्शन वगैरे–४५४१४ रु. तैनातदार १६१६८ रु.

# रोजनिशी



## जुलै १९३४

१०-७-३४ अँड्रयु नांवाच्या निग्रोला एका गोऱ्या स्त्रीवर हल्ला केल्याबद्दल बेजबाबदार जमावानें हालहाल करून ठार मारलें. ठि. बारट्रोप.

१३-७-३४ जपानमध्यें भयंकर जलप्रलय झाला.

१४-७-३४ सॅमोसा बेटाजवळून जात असणाऱ्या ब्रिटिश बोटीवर तुर्कांनीं गोळ्या झाडल्या.

१६-७-३४ डॉ. महंमद आलम यांनीं कॉन्ग्रेस वर्किंग कमिटीच्या सभासदत्वाचा राजिनामा दिला.

१७-७-३४ हंगेरीनें नाझी संस्था बेकायदा ठरविल्या.

२२-७-३४ जॉन डिलिंजर प्रख्यात दरवडेखोर व मुलें पळविण्यांत पटाईत यास युनायटेड स्टेटस्-च्या पोलिसांनीं गोळ्या घालून ठार मारलें. त्यास पकडण्यास १०,००० डॉलर्सचें बक्षिस होतें.

२३-७-३४ सुविख्यात आस्ट्रेलिअन क्रिकेटपटु ब्रॅडमन् यानें इंग्लंडमध्यें चुरशीच्या सामन्यांत ३०४ धांवा काढल्या.

२५-७-३४ ऑस्ट्रियामधील नाझींनीं तेथल्या फॅसिस्ट सरकारविरुद्ध चळवळ करण्यास सुरवात केली. व्हिएन्ना येथें नाझींच्या एका टोळीनें मंत्रिमंडळाची जागा जबरदस्तीनें आपल्या ताब्यांत घेतली व चॅन्सेलर डॉल्फस यांस गोळी घालून ठार मारण्यांत आलें.

२७-७-३४ हिंदुस्थान सरकारनें हिंदुस्थानांतील कम्युनिस्ट पक्ष बेकायदा ठरविला.

२८-७-३४ कॉन्ग्रेसचें जातिविषयक धोरण अमान्य झाल्यामुळें पं. मालवीय व श्री. माधवराव अणे यांनीं कॉन्ग्रेसमधील आपापल्या जागांचे राजिनामे दिले.

कॉन्ग्रेसनें आपलें निवडणुकीसंबंधींचें धोरण जाहीर केलें.

३१-७-३४ डॉ. डॉल्फस यांचा खून करणारांना फांशी देण्यांत आलें.

हिंदुस्थान सरकारचे नवे होम मेंबर सर हेन्री क्रेक हे कामावर रुजू झाले.

## ऑगस्ट १९३४

१-८-३४ कै. लोकमान्य टिळक यांची पुण्यतिथी हिंदुस्थानांत साजरी झाली.

बर्लिन येथें जर्मन कॅबिनेटनें खालील ठराव पास केला : रिश प्रेसिडेंटची व रिश चॅन्सेलरची जागा एक करण्यांत यावी.

२-८-३४ जर्मन रिपब्लिकचे प्रेसिडेंट फील्ड मार्शल फॉन हिंडेन बुर्ग हे वयाच्या ८७ व्या वर्षी मृत्यु पावले.

बनारस येथें म. गांधींनीं हरिजन दौऱ्याची परिसमाप्ति केली. एकंदर ८ लक्ष रुपये गोळा झाल्याचें जाहीर करण्यांत आलें.

३-८-३४ हेर हिटलेर हे जर्मनीचें प्रेसिडेंट झाले.

ऑस्ट्रियामधील नाझी बंडाळीचा बीमोड केल्यानंतर डॉ. शूनिंग हे लष्कराचे प्रमुख झाले.

४-८-३४ अल्जेरिआमधील कान्स्टंटाईन या शहरांत एक दारुडा ज्यू शिपाई प्रार्थनेच्या वेळीं एका मशिदींत शिरला आणि त्यानें प्रार्थना करणाऱ्यांना शिव्या दिल्या. मुसलमानांनीं त्यास ठार मारलें. ह्या दंग्याची आग सबंध शहरभर पसरली. मुसलमानांनीं ज्यू लोकांचा चांगलाच समाचार घेतला.

६-८-३४ लेजिस्लेटिव्ह असेंब्लीनें बंगालमधील क्रांतिकारकांविरुद्ध एक बिल पास केलें.

७-८-३४ वर्धा येथें म. गांधींनीं आपलें साप्ताहिक उपोषण सुरू केलें.

८-८-३४ झांजीबारमध्यें हिंदी लोकांच्या हक्कांची जी पायमल्ली चालली आहे तिच्यासंबंधीं

चौकशी करण्याकरितां मि. के. पी. मेनन् यांना हिन्दुस्थान सरकारनें झांजीबारला पाठविलें.

हॉलिवुडमधील प्रख्यात व श्रीमंत सिनेमा स्टार्स कम्युनिस्ट पार्टीला मदत करतात असें पोलिसांच्या मुख्यानें लॉस ॲन्जल्स येथें प्रसिद्ध केलें.

९-८-३४यु. स्टेट ऑफ अमेरिकेचे एक अधिकारी लेहमन यांनीं एका बिलाला मंजुरी दिली कीं प्रत्येक खाजगी व पब्लिक शाळेमधील मास्तरनें रुजूं व्हावयाच्या अगोदर एकनिष्ठ राहण्याची शपथ घेतली पाहिजे.

१०-८-३४ साताराचे प्रसिद्ध काँग्रेस कार्यकर्ते रा. सोमण हे प्रचंड बहुमतानें कौन्सिलांत निवडून आले.

१२-८-३४ सौ. कमला नेहरू ह्या अत्यवस्थ असल्यामुळें संयुक्तप्रांत सरकारनें पं. जवाहरलाल नेहरूंची तात्पुरती सुटका केली.

सिऽव्हा येथें एका पाद्रयानें आपला हात सर्पदंशामुळें कसा सुजला याचीं मजेदार कारणें लोकांना सांगितलीं. तो म्हणाला : जीझसनें मला सापाकडून चाववून घेण्यास सांगितलें.

१३-८-३४ दोन निग्रोंनीं एका गोऱ्या मनुष्याचा खून केला. या कारणाबद्दल त्यांचा कोर्टामार्फत चौकशी होण्याच्या अगोदरच त्यांना गोऱ्यांनीं ॲशलंड येथें ठार मारलें.

१५-८-३४ आर्मी बिलाची चर्चा लेजिस्लेटिव्ह असेंब्लींत चालू असतां सर अब्दुल रहिमान यांनीं हिंदी अधिकाऱ्यांच्या दर्जाची सूचना मांडली. नेहमींप्रमाणें सरकारकडून ह्या सूचनेस हरकत घेण्यांत आली. पण अध्यक्षांनीं ती पूर्णपणें कायदेशीर ठरविली.

१९-८-३४:—९: १ ह्या प्रमाणांत जर्मन लोकांनीं मतें देऊन प्रेसिडेंट व चॅन्सेलरच्या जागेवर हिटलरची निवडणूक केली.

पंडित मालवीय नवीन नॅशनॅलिस्ट पार्टीचे अध्यक्ष म्हणून निवडून आले.

२१-८-३४ ब्रुकलिन येथें एका श्रीमंत कंपनीची बँकामध्यें ठेव ठेवणारी चिलखती मोटार भर दिवसा लुटण्यांत आली. चोरांनीं ४ लक्ष डॉलर्स पळविले.

नुकत्याच झालेल्या जलप्रलयापासून व दुष्काळापासून चीनचें अपरिमित नुकसान झालें.अंदाज १ अब्ज डॉलर्स.

२२-८-३४ ओरिझाना येथें तद्देशीय शेतकऱ्यांनीं तेथें (सॉल्ट रिव्हर व्हॅली) काम करणाऱ्या हिंदु व जपानी कामकऱ्यांना हुसकावून लावण्याची धमकी दिली.

२३-८-३४ सर्व हिंदुस्थानभर खळबळ उडवून देणारें मंदिर प्रवेश बिल मागें घेण्यांत आलें.

दहाच दिवसांपूर्वीं सोडलेले पंडित नेहरू यांना सरकारनें पुनः तुरुंगांत नेलें.

२४-८-३४ शोण नदाला महापूर आल्यानें बिहार प्रान्तांत जलप्रलय झाला. हिंदुस्थान सरकारनें पोलादावर जकात बसविली म्हणून बेल्जमनें हिंदी कच्च्या मालावर बहिष्कार घालण्याचें ठरविलें.

२६-८-३४ सरकारी अंदाजावरून बघतां फरान्सनें ११ कोटी फरँकचे सोनें जमा केलें.

२८-८-३४ जनरल ओडफी यांना उत्तर आयर्लंडमध्यें येण्याची बंदी करण्यांत आली.

३१-८-३४ लेजिस्लेटिव्ह असेंब्लीची बैठक समाप्त झाली.

## सप्टेंबर १९३४

१-९-३४ अमेरिकेंत प्रचंड संप सुरू झाला. संपांत १० लक्ष मजूर सामील आले.

२-९-३४ नुकतेच तुरुंगांतून सुटलेले सरहद्द गांधी खान अबदुल गफूरखान यांचें अलाहाबाद येथें जाहीर भाषण झालें.

३-९-३४ कमांडर इव्हॅन्जलीन बुथ ह्यांना सालव्हेशन आर्मीचे मुख्य म्हणून निवडण्यांत आलें.

७-९-३४ पुणें येथें मुस्लीम परिषद सर अकबर हैदरी यांच्या अध्यक्षतेखालीं सुरू झाली.

८-९-३४श्री. ना. म. जोशी मजूर परिषदेकरितां जिनिव्हास गेले.

९-९-३४ वर्धा येथें पं. मालवीय व कांग्रस

पक्षीय लोक ह्यांच्यांत तडजोडीच्या वाटाघाटी सुरू होत्या. त्यांचा निराशाजनक शेवट झाला. माद्रिद येथें सोशालिस्ट,कम्युनिस्ट व सिंडिकॅलिस्ट यांनीं मिळून एक सार्वजनिक संप केला त्याचें पर्यवसान दंग्यांत झालें. २००० लोक पकडण्यांत आले.

१०-९-३४ पंजाब सरकारनें पुष्कळ कम्युनिस्ट मताच्या संस्था बेकायदा ठरविल्या.

१२-९-३४ लेबांग खटल्याचा नेमलेल्या स्पेशल ट्रिब्युननें निकाल सांगितला. ३ क्रांतिकारकांना फांशीची शिक्षा झाली.

१३-९-३४ राष्ट्रसंघाच्या पक्षपातीपणामुळें चिडून त्याच्या कमिटीशीं सहकार्य करणार नाहीं असें पोलंडनें जाहीर केलें.

१७-९-३४ म. गांधी यांनीं एक पत्रक प्रसिद्ध करून आपलें पुढील धोरण जाहीर केलें. कांग्रेसनें आपल्या अटींना मान्यता दिली नाहीं तर आपण कांग्रेस सोडून जाऊं असें जाहीर केलें.

१८-९-३४ लीग ऑफ नेशन्सनें रशियाला लीगचा सभासद करून घेतलें.

१९-९-३४ सर ओसबोर्न स्मिथ ह्यास रिझर्व्ह बँकेचे गव्हर्नर नेमण्यांत आलें.

२०-९-३४ 'इस्लामचा इतिहास' ह्या पुस्तकाचे लेखक नथुराम यांचा कराचीस भर कोर्टांत मुसलमानानें खून केला.

२२-९-३४ ब्ल्यू शर्टस्च्या समितीचे मुख्य व युनायटेड आयर्लन्ड पार्टीचे अध्यक्ष जनरल ओडफी यांनीं आपल्या जागेचा राजिनामा दिला.

२३-९-३४ लोकशाही स्वराज्य पक्षानें काँग्रेसशीं केलेला ठराव रद्द केला. पुढाऱ्यांच्या व मित्रांच्या आग्रहाला बळी न पडतां म. गांधींनीं काँग्रेसचें धुरिणत्व सोडण्याचा निश्चय जाहीर केला.

२४-९-३४ पुणें येथें बाँब स्फोटाच्या खटल्याचा निकाल लागून रा. लिमये व रा. सुखटणकर यांना अनुक्रमें १॥ व २॥ वर्षें अशा शिक्षा झाल्या.

२५-९-३४ सिलोनच्या राजाचें सिंहासन परत करण्यांत आलें.

२६-९-३४ जगांतील सर्वांत मोठी आगबोट क्वीन मेरी ही पाण्यांत ढकलण्याचा समारंभ क्वीन मेरीच्या हस्तें करण्यांत आला.

२८-९-३४ पुणें येथें गोखले हॉलचा उद्घाटन समारंभ सर कॉसवजी जहांगीर यांचे हस्तें पार पडला.

२९-९-३४ लवकरच होणाऱ्या मुंबई काँग्रेसचे अध्यक्ष म्हणून बाबु राजेन्द्रप्रसाद यांची निवड करण्यांत आली.

३०-९-३४ इटली व ॲबिसिनिया यांनीं शांततेचें व मित्रत्वाचें धोरण स्वीकारल्याचें जाहीर केलें.

३१-९-३४ काँग्रेस सोशालिस्ट परिषद बनारस येथें सुरू झाली.

## आक्टोबर १९३४

२-१०-३४ गांधीजयंति चोहोंकडे उत्साहानें साजरी झाली.

स्पेनच्या मुख्य प्रधानांनीं राजिनामा दिला.

३-१०-३४ मुंबई येथें ना. शास्त्री यांनीं सध्यांच्या राजकीय स्थितीवर उद्बोधक भाषण केलें.

४-१०-३४ बडोद्याचे अधिपति श्री. सयाजीराव यांचे बंधु श्री. संपतराव गायकवाड वयाच्या ७० व्या वर्षी मृत्यु पावले. हे विद्वान्, भाषाप्रेमी व सज्जन गृहस्थ होते.

६-१०-३४ मुंबई येथें मुंबई व उपनगर जिल्ह्यांचें साहित्य संमेलन वयोवृद्ध साहित्यसेवक श्री. केळुसकर यांचे अध्यक्षतेखालीं भरलें.

९-१०-३४ युगोस्लाव्हियाचे राजे अलेक्झांडर हे फरान्समध्यें गेले असतां मार्सेलीस बंदरांत त्यांचा एका माथेफिरूनें खून केला. त्यांच्याबरोबर सुप्रसिद्ध फरेंच मंत्री मॉ. बार्थ्यु हेही मारले गेले.

१२-१०-३४ बाबु सुभाषचंद्र बोस ह्यांचे बंधु श्री. शरच्चंद्र बोस हे लेजिस्लेटिव्ह असेंब्लीकरितां बिनविरोध निवडून आले.

१५-१०-३४ सोलापूर येथें भूकंपाचे धक्के.

फरान्सचे माजी अध्यक्ष व मुख्य प्रधान एम. पांकारे मृत्यु पावले. म. गांधींनीं एक पत्रक काढून कॉंग्रेसमधून सेवानिवृत्त होण्याचा

आपला निर्धार जाहीर केला. तसेंच कॉन्ग्रेसची रचना दुरुस्त करण्याची योजनाही मांडली.

२०–१०–३४ लंडन–मेलबोर्न रेस सुरू. ५०००० डॉलर्स व २५००० डॉलर्सचीं दोन बक्षिसें आहेत. यशस्वी उमेदवारांत स्कॉट व ब्लॅक यांचा नंबर वर लागतो.

२१–१०–३४ पुणें येथें जातिनिर्णय विरोधी परिषद् सुरू झाली.

२२–१०–३४ कै. विठ्ठलभाई पटेल यांची पहिली पुण्यतिथि ठिकठिकाणीं साजरी झाली.

२३–१०–३४ ग्रेटब्रिटन, जपान व अमेरिका यांच्यांत आरमार बाबत वाटाघाट सुरू झाली.

२४–१०–३४ पुणें येथें डेक्कन एज्युकेशन सोसायटीस ५० वर्षें पुरीं झालीं म्हणून सुवर्ण महोत्सव करण्यांत आला.

अखिल भारतीय समाजसत्तावाद्यांची परिषद सुरू.

२५–१०–३४ मुंबई येथें अखिल भारतीय जातिनिर्णय विरोधी परिषद सुरू. अध्यक्ष–रामानंद चतुर्जी.

२६–१०–३४:-४८ वी राष्ट्रीय सभा, मुंबई (अध्यक्ष–बाबु राजेंद्रप्रसाद.)

२७–१०–३४ नील नांवाच्या निग्रोलास्यानें एका गोऱ्या स्त्रीवर हल्ला केला म्हणून बेजबाबदार जमावानें त्याला जेलमधून बाहेर काढलें व त्यास हालहाल करून फ्लोरिडा येथें ठार मारिलें.

३०–१०–३४ इटालीमध्यें ‘ वूल्फ बॅलिला ’ चळवळ सुरू झाली. आपल्याकडील बालवीर चळवळीप्रमाणेंच ही एक चळवळ आहे.

सयामच्या राजे साहेबांनीं राज्यत्यागाची धमकी दिल्यामुळें त्या देशांत कठिण परिस्थिति निर्माण झाली.

## नोव्हेंबर १९३४

१–११–३४ पश्चिम ऑस्ट्रेलियानें ऑस्ट्रेलियन कॉमन वेल्थ मधून फुटून निघण्याकरितां अर्ज केला.

बाल्कन तहावर सह्या करणारांची अंकारा येथें परिषद.

६–११–३४ अमेरिकेंत चुरशीच्या निवडणुकी होऊन प्रे. रुझव्हेल्ट यांचा डिमोक्राटिक पक्ष बहुमतानें निवडून आला.

हाऊस ऑफ कॉमन्समध्यें नॅशनल लॉटरीज बिल नापास झालें.

७–११–३४ बोल्शेव्हिक क्रांतीचा १७ वा वाढदिवस.

९–११–३४ फरान्समध्यें ‘ क्रूस ’ कॅबिनेट घडून आलें.

११–११–३४ चालु महिन्यांत मुंबई येथें होणाऱ्या चौरंगी सामन्यांतील हिंदु खेळाडूंची निवडणूक होऊन पुण्याचे प्रो. देवधर यांना कॅप्टन नेमण्यांत आलें.

१२–११–३४ नानकिंगच्या सैन्यानें चिनी कम्युनिस्टांचें मुख्य शहर तुइकीन घेतलें.

मुसोलिनीनें ‘ कॉर्पोरेशन असेंब्ली ’ उघडली.

१४–११–३४मुंबई इलाख्यांतील लेजिस्लेटिव्ह असेंब्लीच्या निवडणुकी झाल्या. कॉंग्रेसचे उमेदवार सर्वत्र निवडून आले. श्री. काकासाहेब गाडगीळ व श्री. बाबूराव जेधे हे महाराष्ट्रातर्फे प्रचंड बहुमतानें निवडून आले.

१५–११–३४ युगोस्लाव्हियानें हंगेरियन लोकांची हकालपट्टी सुरू केली.

१६–११–३४ फरान्सीस बिडले यांची अमेरिकन नॅशनल बोर्डाचे चेअरमन म्हणून निवडणूक.

फिनफेल पार्टीतर्फे डी व्हॅलेरा निवडून आले.

चॅको येथें शांतता प्रस्थापित करण्याकरिता राष्ट्रसंघानें केलेल्या प्रयत्नास अमेरिकेची मान्यता.

१७–११–३४ वऱ्हाडतर्फे लो. अणे व नागपूरतर्फे बॅ. अभ्यंकर यांची असेंब्लीवर निवडणूक.

११–११–३४ फ्रेंच राज्याविरुद्ध सिरियन लोकांनीं मत प्रगट केलें.

पॅराग्वेनें राष्ट्रसंघाची योजना फेटाळली.

२०–११–३४ प्रेसिडेंट रुझवेल्टना पदच्युत करणारा एक कट उघडकीस आला त्यांत न्यूयार्कमधील वॉलस्ट्रीट (शेअरबाजार) च्या लोकांचें अंग होतें.

२१–११–३४ जॉइन्ट सिलेक्ट कमिटीचा रिपोर्ट प्रसिद्ध झाला.

पास दाखवून भाकरी देण्याचें रशियानें बंद केलें.

युगोस्लाव्हियानें हंगेरीविरुद्ध आपल्या तक्रारी राष्ट्रसंघापुढें मांडल्या.

२३–११–३४ जपान–वॉशिंग्टन तह बदलून घेणार असें जपाननें जाहीर केलें· जपानचें नाविक दळ इंग्लंड व अमेरिकेच्या तोडीचें असलें पाहिजे असें जपानचें म्हणणें.

२३–११–३४ प्रॉटेस्टंट चर्चच्या भांडणांत हात न घालण्याचें जर्मन प्रधानांनीं जाहीर केलें.

पॅरीस येथें फ्रान्स व रशियाचें असें ठरलें कीं जर्मनीनें फ्रान्सवर हल्ला केल्यास रशियानें फ्रिान्सला मदत करावी.

२४–११–३४ ब्रिटिश सरकारच्या मँचुकुओ तेलविक्रीच्या मक्त्याबद्दल निषेध. अमेरिकेनें ब्रिटनची बाजू घेतली.

सोव्हिएट निशाण उभारणें हा राजद्रोह होत नाहीं असा कलकत्ता चीफ प्रेसिडेन्सी मॅजिस्ट्रेटनें नकाल दिला.

२५–११–३४ मराठी वाङमय परिषद, पुणें येथें श्री. राजवाडे यांच्या अग्निहोत्र मंदिरांत भरली.

२६-११-३४ पं. नथुराम यांचा खून केल्याबद्दल अबदुल कायूम यास झालेली फांशीची शिक्षा अपिलांत कायम झाली.

२९–११–३४ साऊथ वेस्ट आँफिरकेनें युनिअनमध्यें सामील होण्याचें ठरविलें.

३०–११–३४. ३६ तासांचा आठवडा अमेरिकेंतील ५००० गिरण्यांत सुरू झाला.

बाल्टिक संस्थानांची पहिली जाहीर सभा भरली.

## डिसेंबर १९३४

१–१२–३४ रशियाचे एस्. एम्. किरोव्ह यांचा खून.

२–१२–३४ ऑल इंडिया मुस्लिम युनिटी बोर्डाच्या सभेनें जॉईन्ट कमिटीच्या रिपोर्टाचा निषेध केला.

३–१२–३४ झारच्या लोकमतानें ठरलेल्या ह्यावर फ्रान्स व जर्मनीनें सह्या केल्या. पॅरिसला फ्रान्सची वसाहत–परिषद सुरू.

३–१२–३४ किंग कॅरोल यांनीं रुमानियांत सोव्हिएट प्रधानास प्रथमच येऊं दिलें.

४–१२–३४ आयरिश पार्लमेंटमध्यें फिनफेल पार्टीचा विजय.

६–१२–३४ सार प्रांताच्या योजना–घटनेस इंग्लंडनें मदत करण्याचें कबूल केलें. इटली व ॲबिसिनिया यांच्यांत लढा सुरू झाला.

६–१२–३४ फ्रान्स व सोव्हिएट यूनियनमध्यें राजकीय तह.

ब्रिटन व पोलंड यांच्यांत कोळशासंबंधीं तह झाला.

काँग्रेसनें जॉइंट कमिटीच्या रिपोर्टाचा निषेध केला.

१०–१२–३४ राष्ट्रसंघानें युगोस्लोव्हिया व हंगेरी यांचें भांडण फेंटाळून लाविलें.

हिंदी सरकारतर्फे सर फ्रँक नॉईस यांचे अध्यक्षतेखालीं रस्ते परिषद सुरू झाली.

११–१२–३४ जॉ. पा. कमिटीच्या रिपोर्टावर हाऊस ऑफ कॉमन्समध्यें चर्चा.

सरहद्द प्रांतांत जाण्याची परवानगी मिळण्याबद्दल म. गांधींनीं व्हॉईसरॉय लॉर्ड विलिंग्डन यांच्याशीं केलेला पत्रव्यवहार प्रसिद्ध केला.

१२–१२–३४ प्रे. रुझवेल्ट यांनीं लेजिस्लेशनचा प्लॅन जाहीर केला. त्यांत युद्ध झाल्यास फायदा होईल असें दाखविलें आहे.

हाऊस ऑफ कॉमन्सनें इंडिया रिपोर्टास मान्यता दिली.

सिंगापूर येथें ब्रिटिश सैन्याच्या हालचाली सुरू झाल्या.

१३–१२–३४ पर्शियाच्या सरहद्दीवरील शहरावर अफगाणांनीं हल्ला केला.

१५–१२–३४ अमेरिका, अर्जेंटिना, ब्राझील, व चाईल यांनीं चॅको (Chaco) येथील शांततेबद्दल बोलणीं सुरू केलीं.

सरहद्द गांधी खान अबदुल गफुरखान यांस १२४ अ कलमाखालीं २ वर्षें सक्तमजूरी.

हिंदुस्थानच्या उत्तरेस भूकंपाचा पुनरुद्रेक–तिबेटमध्यें धक्के.

१६–१२–३४ तारीख १५ व १६ रोजीं पूर्व तुर्कस्तानमध्यें भूकंपानें बऱ्याच खेड्यांचा नाश झाला.

मुसोलिनीनें अबिसिनिया व इटली यांच्या भांडणांतील रशियाची मध्यस्थी झिडकारिली.

१८–१२–३४ फरेंच मंत्रिमंडळानें सैन्याकरितां जादा रक्कम मंजूर केली.

जपानच्या प्रीव्ही कौन्सिलनें आरमारी तह मोडण्याचें ठरविलें.

डॉ. सत्यपाल ह्यांना १ वर्ष स. मजूरी.

१९–१२–३४ बेकारांना मदत करण्याचे ठराव कॉमन्समध्यें पास झाले.

२०–१२–३४ आयरिश लोक ब्रिटिश नागरिक नाहींत असें ठरविणारें सिटिझनशिप बिल आयरिश लोकसभेंत पास झालें.

२१–१२–३४ सुप्रसिद्ध रशियन झिनिव्हिफ यांना त्यांच्या राहत्या घरीं नजरकैदेंत ठेवण्यांत आलें.

२२–१२–३४ मुंबईपासून २० मैलांवरील पोवाई तलावाच्या कांठीं अल्ट्राव्हायोलेट किरणांच्या साहाय्यानें रोगप्रसार करणाऱ्या डासांना पकडण्याचा यशस्वी प्रयोग झाला.

हंगेरीच्या मुख्य प्रधानानें शेजारी राष्ट्रांना शांततेच्या तहास बोलाविलें.

२४–१२–३४ छत्तारीच्या नबाबसाहेबांचे अध्यक्षतेखालीं भरलेल्या मुस्लीम कॉन्फरन्सच्या कार्यकारी मंडळानें जॉइंट पार्लमेंटरी रिपोर्ट निराशाजनक आहे असा अभिप्राय व्यक्त केला.

२५–१२–३४ महाराष्ट्र साहित्य संमेलन बडोदें. अध्यक्ष, रा. सा. ना. गो. चाफेकर संमेलनांत २१ ठराव मंजूर झाले.

अश्लील वाङ्मयाविरुद्ध एक ठराव प्रचंड बहुमतानें पास झाला.

२७–१२–३४ रा. एस्. एम्. जोशी यांस २ वर्षे सक्त मजूरी.

२८–१२–३४ लिबरल फेडरेशनचें अधिवेशन पुणें येथें पं. हृदयनाथ कुंझरू यांचे अध्यक्षतेखालीं सुरू झालें.

२९–१२–३४ जपाननें वॉशिंग्टनचा आरमारी तह मोडला.

अहमदाबाद येथें बृहन्महाराष्ट्रीय परिषद. अध्यक्ष सरदार–किबे.

सरहद्द पुढारी डॉ. खानयांच्यावरील निर्बंध उठविल्याचें पंजाब सरकारनें त्यांस कळविलें.

३०–१२–३४ लिबरल फेडरेशननें जॉ. पा. कमिटीचा रिपोर्ट फेटाळून लाविला.

पॅरॅग्वेनें बोलिव्हियाच्या हेडक्वार्टर्सवर निकराचा हल्ला केला

३१–१२–३४ दक्षिण आफ्रिकेचे माजी प्रधान जनरल स्मटस् यांची रायटरच्या प्रतिनिधीनें मुलाखत घेतली असतां सरकारशीं सहकार्य करण्याचा सल्ला आपण गांधीजींना दिला असल्याचें त्यांनीं सांगितलें.

लंडन टाईम्स या पत्राला १५० वर्षें पुरीं झालीं.

## जानेवारी १९३५

१–१–३५ कराची येथें अखिल भारतीय महिला परिषद, जॉइन्ट पार्लमेंटरी रिपोर्टाचा निषेध.

अखिल भारतीय वर्णाश्रम स्वराज्य संघाची सातवी परिषद, अहमदाबाद.

२–१–३५ नागपूरचे सुप्रसिद्ध काँग्रेस पुढारी व असेंब्लींत नुकतेच निवडून आलेले बॅ. अभ्यंकर यांना मुंबई येथें देवाज्ञा झाली.

कलकत्ता इंडियन सायन्स काँग्रेस सुरू.

३–१–३५ इंग्लंड व आयर्लंड यांच्यांत व्यापारी तह झाला.

४–१–३५ मुसलमान पुढारी ना. आगाखान हे विलायतेहून परत आले. त्यांनीं मुसलमानांना उपदेश केला कीं सरकारनें दिलेल्या सुधारणा स्वीकारा.

७–१–३५ फरान्स व इटली यांच्यांत तह झाला.

नॅशनल इन्स्टिटयूट ऑफ सायन्स या संस्थेचें कलकत्ता येथें उद्घाटन.

८–१–३५ आजरें (इचलकरंजी) येथें मुसलमान जमाव अनावर झाल्यामुळें त्यांच्यावर गोळीबार झाला.

९-१-३५ हिंदुस्थान व ग्रेट ब्रिटन यांमधील व्यापारी तहावर सह्या.

१०-१-३५ दे. भ. बाबू सुभाषचंद्र बोस हे हिंदुस्थान सोडून प्रकृतिस्वास्थ्याकरितां युरोपांत गेले.

१४-१-३५ रेडिओ प्रदर्शन मुंबई.

१५-१-३५ सारमधील मतनोंदणीचा निकाल लागला. जर्मनीला शें. ९१·८ मतें अनुकूल पडलीं.

पंजाब व सर्व पश्चिम भागांत कडक थंडीनें कहर उडविला.

१६-१-३५ कै. न्यायमूर्ति रानडे यांचें वाङमयस्मारक म्हणून 'विज्ञानबोध' हा ग्रंथ पुणें येथें प्रसिद्ध झाला.

१७-१-३५ लॉईड जॉर्ज यांचें इंग्लंडच्या सुधारणेबद्दल नवीन घटनेवरील पहिलें भाषण.

१९-१-३५ असेंब्लींत स्वतंत्र पक्षाची स्थापना.

२१-१-३५ सोमाली लँडच्या सरहद्दीवर परेचांची अबिसीनिअनांकडून कत्तल.

२२-१-३५ नरेंद्र मंडळामध्यें संस्थानिकांनीं फेडरेशनमध्यें सामील होण्याबद्दल ठराव मंजूर केला.

२३-१-३५ जपाननें मँचुको सैन्यासह चीनवर चाल केली.

नायट्रो अमोनिया नांवाच्या स्फोटक द्रव्याचा शोध. (विलिंग्टन) यू. एस्. ए.

२४-१-३५ हिंदी सुधारणांच्या मसुदा कायद्याचें लंडनमध्यें प्रसिद्धीकरण.

वर्धा जिल्ह्यांत प्राथमिक शिक्षकांचा संप.

सर अब्दुल रहीम लेजिस्लेटिव्ह असेंब्लीचे अध्यक्ष झाले.

२५-१-३५ श्री. अणे यांच्या नेतृत्वाखालीं असेंब्लींत राष्ट्रीय पक्षाची स्थापना.

आजरें गोळीबारासंबंधीं चौकशी कमिशनची नेमणक.

२६-१-३५ हिंदुस्थानांत राष्ट्रीय सभेच्या आज्ञेवरून स्वातंत्र्यदिन पाळण्यांत आला.

२७-१-३५ सांगली येथें गजानन मिलमध्यें संप.

झांजीबार येथील हिंदी लोकांच्या परिस्थितीबद्दल श्री. मेनन यांचा रिपोर्ट प्रसिद्ध झाला.

२९-१-३५ साहरा वाळवंटांत बर्फाची वृष्टि

३०-१-३५ हिंदी व ब्रिटिश व्यापारी करार एकदम रद्द करण्याचा ठराव. लेजिस्लेटिव्ह अॅसेंब्लींत मंजूर झाला.

### फेब्रुवारी १९३५

२-२-३५ मध्यप्रांत कौन्सिलांत जे. पी. सी. रिपोर्टाविरुद्ध उपसूचना मंजूर.

३-२-३५ पुण्यांत स्वदेशी प्रदर्शनाचें उद्घाटन.

५-३-३५ अखिलचंद्र दत्त हे राष्ट्रीय पक्षाचे सभासद, असेंब्लीचे डेप्युटी प्रेसिडेंट म्हणून निवडून आले.

६-२-३५ इंडिया बिलाचें हाऊस ऑफ कॉमन्समध्यें दुसरें वाचन.

७-२-३५ देऊं केलेल्या स्वराज्यघटनेबद्दल असेंब्लींत नापसंती व्यक्त झाली.

११-२-३५ इटली-अॅबिसिनिया वादाचा निकाल लावण्यासाठीं ३५ हजार खडी फौज उभारण्याचें इटलींत जाहीर झालें.

१२-२-३५ मेमेल प्रांत परत मिळवण्याबद्दल जर्मनींत विद्यार्थ्यांनीं चळवळ केली.

इटलीनें-अबिसिनियाकडून नुकसानभरपाई व माफीची मागणी केली.

इंडिया बिल बिनबोभाट पास करण्यासाठीं पार्लमेंटच्या सर्व पक्षीयांचें संगनमत.

१४-२-३५ सुप्रसिद्ध वैमानिक लिंडबर्ग याच्या मुलाचा बळी घेणारा दरवडेखोर हॉटमन याला देहांत शासन.

नाझी पुढाऱ्यांना स्वीडनमध्यें अटक.

१५-२-३५ मुम्बई कौन्सिलमध्यें जे. पी.सी. रिपोर्ट विचारांत घेण्याचें नाकारण्यांत आलें.

१६-२-३५ मराठा व्यापारी कारखानदार परिषद, पुणें (अध्यक्ष डॉ. शिरगांवकर).

१८-२-३५ ब्रिटिश आर्मस् इन्क्वायरी कमिशन नेमलें गेलें.

लष्करासंबंधीं गुप्त बातमी फोडल्याबद्दल

नाझी पक्षियांनीं दोन स्त्रियांचा वध केला.

२०–२–३५ अबिसिनियाबरोबर इटली युद्धास तयार असल्याचें इटालियन डिफेन्स कौन्सिलनें जाहीर केलें.

२१–२–३५ बर्लिन येथें २०० कम्युनिस्टांवर खटला भरण्यांत आला.

बेकारी निवारणाकरितां हिटलरनें सक्तीनें कर्ज घेण्याचा हुकूम केला.

ॲबिसीनियानें इटलीबरोबर सलोख्यानें वागण्याचें कबूल केलें.

२२–२–३५ असेंब्लींत रेल्वे बजेटवरील चर्चेंत सरकारचे तीन प्रचंड पराभव. (भुलाभाई देसाई, गोविंद वल्लभपंत व मौलवी शफी दाउदी यांच्या निंदाव्यंजक पुस्त्या मंजूर झाल्या).

२३–२–३५ पॅरॅग्वे राष्ट्रसंघांतून फुटला.

ब्रह्मी कौन्सिलांत निंदाव्यंजक ठराव पास झाल्यामुळें अध्यक्ष सर ग्रॅनव्हील यांचें अध्यक्ष-पदावरून उच्चाटन.

२२–२–३५ शस्त्रसंन्यास परिषदेच्या आर्मस् ट्रॅफिक कमिटीची बैठक.

२५–२–३५ मुंबईस हिंदी संस्थानिकांची खास बैठक व सुधारणाबिलास विरोध.

२६–२–३५ वऱ्हाड प्रांताकरितां स्वतंत्र हाय-कोर्ट स्थापन होणार असें जाहीर झालें. रेव्हरंड उत्तम यांस हिंदुमहासभेचे अध्यक्ष म्हणून निवडण्यांत आलें.

२७–२–३५ बेलजियम व संयुक्त संस्थानें यांच्यांत व्यापारी तह.

२[illegible]–२–३५ ले. असेंब्लींत अंदाजपत्रक सादर झालें.

बॅ. विठ्ठलराव चंदावरकर पुन्हां युनिव्ह-र्सिटीचे व्हाइस चॅन्सेलर झाले.

## मार्च १९३५

१–३–३५ जर्मनीला सार प्रांत पद्धतशीर रीतीनें परत मिळाला.

बाबू राजेंद्र प्रसाद व जीना यांमधील जातिनिर्णय विषयक तडजोडीबद्दल बोलणें अयशस्वी झालें.

२–३–३५ सयामच्या राजेसाहेबांचा राज्य-त्याग. ग्रीसमध्यें बंड. तेथील सरकारनें त्याचा ताबडतोब बीमोड केला.

४–३–३५ ब्रिटनच्या लष्करी खर्चांत व सैन्यांत वाढ करण्यासंबंधीचें शुभ्र पत्रक मुख्य प्रधानांनीं पार्लमेंटला सादर केलें.

५–३–३५ इटली व अबिसिनिया यांमध्यें न्यूट्रल ग्राउंड राखून तडजोडीचे तहाचीं चिन्हें दिसूं लागलीं.

६–३–३५ सर एम. कँबेल यांनीं मोटार ताशीं २७६ मैल वेगानें चालवून आपलें पूर्वीचें रेकार्ड मोडलें.

उत्तर हिंदुस्थानांत भूकंपाचे धक्के बसले.

७–३–३५ लोकनायक अणे यांनीं आणलेली कपात सूचना असेंब्लींत मंजूर व सरकारचा पराभव.

१०–३–३५ पैसाफंड संस्थेचा रजत–महोत्सव.

११–३–३५ ले. असेंब्लीच्या २७ मुसलमान सभासदांचें ऑडिट अकाउंटस् खात्यांत मुसल-मानांस अधिक नोकऱ्या मिळण्याबद्दल व्हाइसरॉय-कडे पत्रक.

१२–३–३५ असेंब्लींत सैन्य खात्याची ग्रॅन्ट १ रु. असावी हा ठराव मंजूर.

रणजी ट्रॉफींतील अखेरच्या सामन्यांत मुम्बईचा संघ विजयी झाला..

गुजराथच्या शेतकऱ्यांना साऱ्यासंबंधीं दिलेल्या सवलतींत वा मिळालीं.

१३–३–३५ ग्रीक बंड मोडलें व ग्रीक बंडखोर पुढारी व्हेनीझोलास इटलींत आश्रयासाठीं आला.

रूमानियानें हिंदी आयातीला मज्जाव केला.

१४–३–३५ हज्जाजचे राजे इब्न सौद व युवराज यांच्या खुनाचा अयशस्वी प्रयत्न.

१५–३–३५ जर्मनींत प्रॉटेस्टंट चर्चचा जमा-खर्च सरकारनें आपल्या ताब्यांत घेतला.

१६–३–३५ हेर हिटलर यानें फर्मान काढून जर्मनींत लष्करी नोकरी सक्तीची केल्याचें जाहीर केलें.

अमृतसर येथें दुसरी शीख राष्ट्रीय परिषद.

१७–३–३५ हिटलरनें रशि सैन्याची पाहणी केली.

१८–३–३५ ग्रेट ब्रिटननें जर्मनीला निषेध-पर संदेश पाठविला.

डॉ. मुंजे यांची महाराष्ट्रांत लष्करी शाळा काढण्याची योजना.

१९–३–३५ कराची येथें गोळीबार. २९ ठार.

२१–३–३५ कॉंग्रेस पुढारी बॅ. शेरवाणी मृत्यु पावले.

विल्यम कॉसग्रेव्ह पुनः आयरिश युनियन पार्टीचे अध्यक्ष.

२२–३–३५ चीनमध्यें पीत नदीला महापूर. १० हजार लोकांना जलसमाधी.

म. गांधींच्या चार आठवड्यांच्या मौन-व्रतास सुरुवात.

जिनिव्हा येथील इस्पितळांत कै. विठ्ठलभाई पटेलांच्या स्मारकाचें सुभाष-बाबूंच्या हस्तें अनावरण.

२३–३–३५ प्रे. रुझव्हेल्ट यांनीं फिलीपाईन बेटाच्या राज्यघटनेस मान्यता दिली.

२३ ते २५ हिटलर सायमन मुलाखत, बर्लिन.

२४–३–३५ जातीय निर्णय परिषद. अध्यक्ष डाक्क्याचे नबाब. परिषदेंत गोंधळ.

मोटर टॅक्सेशन बिल मुंबई कौन्लिांत नामंजूर.

२६–३–३५ अखिल भारतीय विमा परिषद मुंबई अध्यक्ष सर चिमणलाल सेटलवाड.

बेल्जमनें सुवर्णचलन वस्तुतः सोडलें.

रिपब्लिकन पुढाऱ्यांना आयरिश फ्री स्टेटनें अटक केली.

२७–३–३५ जपान राष्ट्रसंघातून निघालें.

२८–३–३५ हेनेन व यु. एस. ए. यांमध्यें व्यापारी तह झाला.

२९–३–३५ उद्यां युद्ध सुरू झाल्यास ६ लक्ष खडें सैन्य उभारतां येईल असें इटलीनें जाहीर केलें.

३०–३–३५ इटली व ॲबिसिनियामधील वाटाघाटी निष्फळ ठरल्या.

## एप्रिल १९३५

१–४–३५ हिंदी रिझर्व बँकेस सुरुवात.

दे. भ. नरीमन मुंबई कॉर्पोरेशनचे मेयर झाले.

पोपनें जगाला लढाईचा इषारा दिला.

३–४–३५ डॉ. अन्सारी राजकारणापासून निवृत्त झाले.

४–४–३५ एडन यांनीं प्रेगमध्यें झेकोस्लो-व्हाकियाच्या अधिकाऱ्यांची भेट घेतली.

सांगलीचे सुप्रसिद्ध वकील व संस्थानी राज-कारणांतील मुत्सद्दी श्री. ग. र. अभ्यंकर यांचा मृत्यु.

पुणें शहर म्युनिसिपालिटीच्या असेंब्ली हॉल-वर राष्ट्रीय निशाण व जुन्या इमारतीवर भगवा झेंडा उभारण्याचा समारंभ.

५–४–३५ सर रॉबर्ट आर्चिबाल्ड रसेल्स यांची हिंदुस्थानच्या सेनापतिपदावर नेमणक.

७–४–३५ वरळी येथें दारूच्या कोठारांत भयंकर स्फोट होऊन प्राणहानि झाली.

ले. असेंब्लीनें फेटाळलेलें फिनान्स बिल व्हॉईसरायांनीं जादा अधिकारांत मंजूर करून कौन्सिल ऑफ स्टेटकडे मंजुरीकरितां पाठविलें.

सुप्रसिद्ध शास्त्रज्ञ व ऑटोमिडीनचे संशोधक डॉ. भिसे ह्या महाराष्ट्रीय गृहस्थाचा मृत्यु.

८–४–३५ बादशहाच्या ज्युबिलीनिमित्त हिंदु-स्थानांतील राजबंदी सुटणार नाहींत असें कॉमन्स-मध्यें जाहीर झालें. !

९–४–३५ असेंब्लीची बैठक समाप्त.

कराचीच्या गोळीबाराबाबत चौकशी करण्याची गरज नाहीं असें मुंबई सरकारनें जाहीर केलें.

मुंबईचे कामगार पुढारी एस्. व्ही. देशपांडे यांस अटक.

११–४–३५ स्ट्रेसा परिषदेस सुरुवात.

१४–४–३५ फैरोझाबाद (आग्रा) येथें हिंदुमुसलमानांत भयंकर दंगा. ११ हिंदूंना जाळण्यांत आलें.

१५–४–३५ ब्रिटनच्या नव्या बजेटांत ६० लक्ष पौंडांची शिल्लक रहाणार असल्याचें जाहीर झालें

१६–४–३५ बाबू शरच्चंद्र बोसांचा असेंब्लीच्या जागेचा राजिनामा.

१७–४–३५ महिला विद्यापीठ व ठाकरसी ट्रस्ट यांमध्यें समाधानकारक तडजोड.

१८–४–३५ रायगड किल्ल्यावरील शिवाजी महाराजांचा ५ वा महोत्सव. अध्यक्ष रा. सा. गो. स. सरदेसाई.

अलीगढ विद्यापीठाच्या बाबतींत मौ. शौकतअल्लींनीं स्टेशनवर दोघांस दुखापत केली.

२०–४–३५ हिंदी साहित्य संमेलन सुरू. अध्यक्ष म. गांधी.

हिंदू महासभेचें अधिवेशन कानपूर येथें सुरू अध्यक्ष रे. उत्तम.

ट्रेड युनियन काँन्ग्रेसची सभा अध्यक्ष–हरनाथ शास्त्री.

२१–४–३५ फर्ग्युसन कॉलेज व डेक्कन एज्युकेशन सोसायटींचा सुवर्ण महोत्सव. अध्यक्ष सर सी. व्ही. रामन.

फोर्मोसा बेटांत प्रचंड भूकंप

२२–४–३५ अखिल भारतीय रॉय दिन.

डॉ. परांजपे यांची लखनौ विद्यापीठावर कुलगुरूच्या जागेवर नेमणूक.

२४–४–३५ साताराचे सुप्रसिद्ध वकील दादासाहेब करंदीकर यांचा नागपूर येथें मृत्यु.

ऑल इंडिया काँग्रेस वर्किंग कमिटीची बैठक सुरू.

२७–४–३५ सुर्वे–रसेल कमिशनचा आजरे गोळीबार संबंधींचा निर्णय प्रसिद्ध झाला.

अमेरिकेच्या चांदीच्या धोरणामुळें मेक्सिकोनें चांदीचलन बंद केलें.

२८–४–३५ विदर्भ प्रांतिक काँग्रेस परिषद अकोला. अध्यक्ष पं. गोविंद वल्लभपंत.

३०–४–३५ कलकत्ता कॉर्पोरेशनचे मि. फजलूल हक्क हे अध्यक्ष झाले.

**मे १९३५**

१–५–३५ कर्नाटक राजकीय परिषदेचें अधिवेशन.

२–५–३५ फ्रान्स व रशिया यांमधील तहनाम्यावर संमतीच्या सह्या झाल्या.

३–५–३५ फिलिपाईन्स बेटांत बंडाळी सुरू झाली.

६–५–३५ इंग्लंडचे पंचम जार्ज बादशहा यांच्या राज्यारोहणाचा रौप्य ज्युबिली महोत्सव.

७–५–३५ मीरत कटाच्या खटल्यांतील मजुरांचे पुढारी श्री. डांगे यांची तुरुंगांतून सुटका.

८–५–३५ आजरें प्रकरणीं कोल्हापूर सरकारच्या ठरावाची अंमलबजावणी मेअखेर तहकूब होते.

११–५–३५ इटली–अबिसीनिया वाद लवादाकडे नेण्याची खटपट सुरू. ऑस्ट्रियाचे चॅन्सेलर हर शुस्निग यांनीं सीनार मुसोलिनींची गांठ घेतली. ऑस्ट्रियाचें स्वातंत्र्य अबाधित राहण्यास व तेथें परत राजसत्ता स्थापण्यास इटलीनें मदत करावी अशी वाटाघाट झाली.

बाल्कन करारावर सही करणाऱ्या राष्ट्रांची बुखारेस्ट येथें परिषद.

कलकत्ता विश्वविद्यालयांत पुस्तकें हलविण्याच्या जागेवर इंग्रजी शिक्षण घेतलेल्या मजूरांची नेमणूक.

१२–५–३५ पुण्याहून मोटारनें लंडनला जाण्यास निघालेले बॅ. खाजगीवाले लंडनला पोंचले.

मार्शल पिल्सुडस्की (पोलंड) यांचा मृत्यु.

१३–५–३५ फरान्स व इटली यांमधील वैमानिक करारावर सह्या.

१४–५–३५ रशियाचे स्टॅलिन व फरान्सचे परराष्ट्र मंत्रि लावाल यांची भेट. फरान्स व रशियांत सलोखा वाढला.

१९–५–३५ राजबंदी दिन.

२०–५–३५ इंडिया बिलाच्या तिसऱ्या वाचनास सुरुवात.

२१–५–३५ राजबंदी दिनाची बातमी छापण्याची मनाई केल्यानें सरकारच्या निषेधार्थ बंगालमधील वृत्तपत्र बंद.

२४–५–३५ मध्यप्रांत सेक्रेटरीएटच्या नागपूर येथील इमारतींना आग लागली.

२५–५–३५ इटली–अबिसीनिया वादांत ब्रिटनच्या मध्यस्थीमुळें तडजोडीची आशा.

२६–५–३५ अबिसीनिया व इटली यांचे भांडणाबाबत एडन यांनीं इटलीकडून लवादास मान्यता मिळविली.

२८–५–३५ अकरा वर्षांपूर्वी झालेला एक विवाह अलीपूर येथें बेकायदा ठरला.

२९–५–३५ जपानच्या चीनकडे १४ मागण्या गेल्या.

३१–५–३५ क्वेट्टा येथें भूकंपानें हाहाःकार उडविला.

## जून १९३५

५–६–३५ सकेशा विधवांना विठोबाच्या पदस्पर्शपूर्वक दर्शनाचा कायदेशीर हक्क मिळाला.

६–६–३५ इंडिया बिलाचें तिसरें वाचन मंजूर झालें.

७–६–३५ ब्रिटिश कॅबिनेट बदलून बाल्डविन मुख्य प्रधान झाले. भारतमंत्रिपदाची जागा झेटलंड यांस मिळाली.

८–६–३५ अर्वाचीन इतिहास परिषद सुरू. अध्यक्ष डॉ. सर शहफत अदमदखान.

१०–६–३५ जपानच्या मागण्या चीननें मान्य केल्या.

१३–६–३५ इंग्लंडमध्यें येत्या सार्वत्रिक निवडणुकींत भाग घेण्यासाठीं मि. लॉईड जार्ज, लॉर्ड स्नोडन, सर बेसिल ब्लॅकेट (हिंदुस्थान सरकारचे माजी फडणीस) यांच्या सहीनें एका नव्या पक्षाचें पत्रक प्रसिद्ध झालें.

१४–६–३५ क्वेट्टा येथें ज्यांचीं घरेंदारें होतीं अशा लोकांना कांहीं अटींवर तेथें जाण्याची सरकारनें परवानगी दिली.

श्रीसमर्थ वाग्देवता मंदिर धुळें याचा श्रीमंत सौ. महाराणी इंदिराबाईसाहेब होळकर यांच्या हस्तें उद्घाटन समारंभ.

अमेरिकेच्या संयुक्त संस्थानांत लोकसभेनें 'राष्ट्रीय पुनर्रचना कायदा' पुन्हां नवा बनवून त्याची अंमल बजावणी ताबडतोब करविण्याचें ठरविलें.

कौन्सिल ऑफ् स्टेटची मुदत वाढली.

१५–६–३५ नागपूरचे प्रसिद्ध पुढारी रा. रुईकर यांना राजद्रोहाच्या आरोपावरून अटक.

१६–६–३५ मुसोलिनी व सर चिमणलाल सेटलवाड मुलाखत. (इटलींत.)

१७–६–३५ कँटनजवळ चीन व जपान यांच्यांत चकमकी.

क्वेट्टाच्या भूकंपपीडितांच्या साहाय्यार्थ ब्रिटिश पार्लमेंटनें पन्नास हजार पौन्ड रक्कम मंजूर केली.

२३–६–३५ मौ. शौकतअल्ली यांस कराचींत शिरण्याची बंदी.

२४–६–३५ सर तेजबहादुर सप्रु यांस हेग येथें आंतरराष्ट्रीय न्यायाधीश नेमण्यांत आलें.

२५–६–३५ आयर्लंडमधील एका पोटनिवडणुकींत डी व्हॅलेरा पक्षाचा उमेदवार निवडून आल्यामुळें डी. व्हॅलेरास आयरिश डेलमध्यें हुकमी बहुमत मिळालें.

२७–६–३५ जपानच्या मागण्या चीननें मान्य केल्या.

२७–६–३५ मोटारनें लंडनला गेलेली बॅ. खाजगीवाले प्रभृति मंडळी परत आली.

२८–६–३५ दहा हजार बंडखोरांनीं चिनी सरकारच्या ठाण्यावर हल्ला केला.

३०–६–३५ लो. ना. अणे, बॅ रामराव देशमुख, डॉ. मुंजे, श्री. केळकर या डेमोक्रॅटिक पक्षाच्या लोकांची पुणें येथें खाजगी बैठक.

## जुलै १९३५

४–७–३५ लॉर्ड लॉईड हे त्यांची एकहि सूचना मंजूर न झाल्यानें कॉमन्स मधून उठून गेले.

६–७–३५ सिनॉर मुसोलिनी यांनीं अबिसीनियाचा लढा अखेरपर्यंत लढविणार असें जाहीर केलें.

१०–७–३५ ब्रह्मपुत्रा नदीचे उगमाकडे एक ४ मैल रुंद व ५२ मैल लांब असा प्रचंड बर्फाचा डोंगर सरकत येत असल्याची बातमी कळते.

# दौरे

## श्री. न. वि. गाडगीळ
## यांच्या दौऱ्याची हकीकत

ता. २१ जुलै रोजीं काँग्रेस पार्लमेंटरी बोर्डानें श्री. जेध्यांना व मला काँग्रेसचे असेंब्लीकरतां उमेदवार म्हणून कायम केलें. त्यापूर्वी श्री. सोमणांच्या निवडणुकीसंबंधानें मी सातारा–कऱ्हाड–इस्लामपूर वगैरे भागांतून हिंडून आलों होतों. ता. २२ जुलै १९३४ पासून ११ नोव्हेंबर १९३४ पर्यंत म्हणजे ११२ दिवसांत ५४०० मैलांचा प्रवास रेल्वे, मोटार, बैलगाडी, सायकल व पायीं असा नर्मदेच्या दक्षिण तीरापासून तों कृष्णेच्या उत्तर तीरापर्यंत केला. मध्यविभाग मतदारसंघ हा पूर्व व पश्चिम खानदेश, नाशीक, नगर, पुणें, सातारा व सोलापूर अशा सात जिल्ह्यांचा असून सुमारें १॥ लक्ष चौरस मैलांचा प्रदेश आहे व सुमारें ४८००० मतदार या प्रदेशांत आहेत. ह्या मतदारांपैकीं शेंकडा ६५ मतदार खेडेगांवांत असून अवघे शेंकडा ३५ मतदार शहरांत व शहरालगतच्या भागांत आहेत. काँग्रेसची निष्ठा जरी सर्वत्र असली तरी ती खेडेगांवांतून जास्त आहे. ह्या तीन महिन्यांत मी सुमारें ३६२ ठिकाणीं निवडणुकीसंबंधानें व्याख्यानें दिलीं. व बहुतेक ठिकाणीं मि. जेधेही माझ्याबरोबर होते. या मतदारसंघांत ३९० पोलिंग स्टेशनस् होतीं व प्रत्येक पोलिंग स्टेशनवर काँग्रेस पक्षातर्फे काम करणारांची संख्या सांगावयाची झाल्यास, १०००० काँग्रेसचे कार्यकर्ते निवडणुकीच्या कामीं काँग्रेसला यश यावें म्हणून खटपट करीत होते. विशेषतः १९३० ते १९३४ पर्यंतच्या सत्याग्रहाच्या लढ्यांत शिक्षा झालेले ४६०० काँग्रेस कार्यकर्ते हे प्रमुख होते. पूर्व व पश्चिम खानदेश या दोन जिल्ह्यांत काँग्रेसनिष्ठा व संघटन हें सर्वांत जास्त आहे. व विशेषतः तापी नदीच्या कांठावरील तालुके, बार्डोलीचे जवळ असल्याकारणानें सर्वस्वी काँग्रेसमयच आहेत. निवडणुकीचे निमित्तानें काँग्रेसचा संदेश लहानसहान खेड्यांपर्यंत सुद्धां पोंचला गेला व किती माणसांनीं भाषणें ऐकलीं याचा अदमासच पाहिजे असल्यास जवळजवळ २ लाख माणसांचे कानांवर ही हकीकत गेली. दौऱ्याचे कामीं शेतकरी मंडळी रस्त्यावर तासनतास व्याख्यान ऐकावयास जमत. निवडणुकीचे संबंधांत जातिनिवाडा, सनातन धर्म व हिंदुमुसलमान वगैरे प्रश्न असूनसुद्धां व त्या बाबतींत शेतकरी वर्गाची एका दृष्टीनें दिशाभूल करण्याचा प्रयत्न झाला असूनसुद्धां त्या वर्गावर त्याचा कांहींएक परिणाम झाला नाहीं. उलट माझीं सुधारक व साम्यतावादी मतें मी उघड बोलून दाखवीत असून त्याचा विपर्यास केला असतांनासुद्धां जनतेंतील काँग्रेसनिष्ठा कायम राहिली. जो काय विरोध होतो तो सुशिक्षित वर्गाकडून; विशेषतः ब्राह्मण वर्गाकडून. व त्याचें कारण काँग्रेसचें जातीय निवाड्याचें धोरण हें होतें. त्यांत काँग्रेसनिष्ठा नव्हती असें मात्र नव्हे. सप्टेंबरांत मी पूर्व खानदेशांत होतों, आक्टोबरांत पुणें जिल्हा, साताराचा थोडा भाग व पश्चिम खानदेश या भागांत होतों. नोव्हेंबरांत नाशिक, नगर, सोलापूर, सातारा व पुणें या जिल्ह्यांत हिंडलों.

---

## महाराष्ट्र प्रां. कॉन्ग्रेस कमिटीचे अध्यक्ष
## श्री. देव यांचा दौरा

२४-२-३५ फेब्रुवारी–सकाळीं पुण्याहून प्रयाण सायंकाळीं घोलवड येथें आगमन, हरिजन वस्तींत सामुदायिक प्रार्थना. व नंतर व्याख्यान. रात्रौ बोर्डी येथें व्याख्यान व पालघरकडे रवाना.

२५-२-३५ पालघर येथील कार्यक्रम. नंतर

आसपासच्या दोन खेड्यांत व्याख्यान. विषय "कॉंग्रेसचा संदेश"

२६–२–३५ तारापूर येथें व्याख्यान व चिंचणी येथें कार्यकर्त्यांशीं चर्चा. रात्रौ डहाणू येथील कार्यक्रम,

२८–२–२५ उंबरगांव येथें कार्यकर्त्यांशी चर्चा.

१–३–३५ रोजीं दुपारीं पुण्यास प्रयाण.

* * *

### पश्चिम खानदेश

ता. ५–३–३५ रोजीं धुळ्याहून कासाऱ्याकडे प्रयाण. दुपारीं २ वाजतां कासारें येथें आगमन. प्रथम ग्रामसंघटनेच्या दृष्टीनें ग्रामनिरीक्षणाचा कार्यक्रम उरकण्यांत आल्यावर बाजारपट्टींत व्याख्यानाचा कार्यक्रम झाला. सायंकाळीं साक्री येथें श्री. बाळूभाई मेहता यांच्या अध्यक्षतेखालीं "कॉंग्रेसची संघटना व सभासद वाढविण्याची आवश्यकता" ह्या विषयावर व्याख्यान. रात्रौ निजामपूर येथील व्याख्यानाचा कार्यक्रम.

६–३–३५ रोजीं निजामपूर येथें स्थानिक कार्यकर्त्यांशीं चर्चा व 'जवाहर वाचनालयास' भेट. जैताणें येथील घोंगड्यांच्या विणकामाचें निरीक्षण. दुपारीं नंदुरबार येथें आगमन. भगिनी समाजाला भेट व चर्चा, विद्यार्थी वर्गापुढें व्याख्यान व जाहीर सभा.

७–३–३५ रोजीं सकाळीं नवापूर येथें कार्यकर्त्यांशीं चर्चा व रात्रौ तळोद येथें जाहीर सभा.

८–३–३५ रोजीं प्रकाशें येथें कार्यकर्त्यांशीं चर्चा व रात्रौ शहादें येथें जाहीर सभा.

९–३–३५ रोजीं सकाळीं येथील कार्यकर्त्यांशीं चर्चा. दुपारीं दोंडाईस आगमन व दोंडाईचें मदाने आणि ब्राम्हणें येथील कार्यकर्त्यांची बैठक व चर्चा. सायंकाळीं शिंदखेडें येथें जाहीर सभा.

१०–३–३५ रोजीं शिंदखेडें येथील कार्यकर्त्यांशीं हिंदुमहासभेच्या धुळें येथील पुढाऱ्यांशीं चर्चा. रात्रौ जाहीर सभा.

११–३–३५ रोजीं तिसरे प्रहरीं गरताड व कमखेडें येथील उत्साही व तरुण कार्यकर्त्या मंडळीशीं चर्चा. रात्रौ जाहीर सभा.

१२–३–३५ रोजीं सकाळीं अर्थे येथें व्याख्यान. सायंकाळीं गरताड येथें सभा.

### जिल्हा पूर्वखानदेश

१३–३–३५–सायंकाळीं सहा वाजतां अंमळनेर येथील जाहीर सभेचा कार्यक्रम उरकण्यांत आल्यानंतर मारवाड येथील शेतकरी परिषदेचा कार्यक्रम झाला. त्या वेळीं आसपासच्या पंधरा खेड्यांचे लोक जमले होते.

१४–३–३५ रात्रौ बहादरपूर जाहीर सभा.

१५–३–३५ पातोंडे, दहिवद व नांदेड सभा.

१६–३–३५ सकाळीं अकूलखेडें येथें सभा. सायंकाळीं चोपडें व रात्रीं अडावत येथें व्याख्यान.

१७–३–३५ सकाळीं यावल येथें कार्यकर्त्यांशीं चर्चा. सायंकाळीं न्हावी येथें जाहीर सभा. रात्रौ भालोद येथें व्याख्यान.

१८–३–३५ सकाळीं खिरोदे येथील आश्रमास भेट व कार्यकर्त्यांशीं चर्चा.

२०–३–३५ रोजीं कासोदे येथें आसपासच्या सात खेड्यांतील ५०० लोकांचे समोर व्याख्यान. दुपारीं एरंडोल येथील हातकागद तयार करण्याच्या कारखान्यास भेट. नंतर एरंडोल, पिंप्री येथें ३० खेड्यांच्या लोकांसमोर व्याख्यान. रात्रौ धरणगांव येथील कार्यक्रम.

२१–३–३५ ममुराबाद येथील कार्यक्रम.

### जिल्हा नाशिक

२५–३–३५ रोजीं सायंकाळीं नाशिक येथें आगमन. कार्यकर्त्यांशीं विचारविनिमय. रात्रौ जाहीर सभा.

२६–३–३५ सायंकाळीं – पिंपळगांव–वसवंत येथें स्थानिक कार्यकर्त्यांबरोबर चर्चा व सायंकाळीं श्री. दादासाो गद्रे यांच्या अध्यक्षतेखालीं व्याख्यान, रात्रौ वडनेर येथें सभेचा कार्यक्रम.

२७–३–३५ रात्रौ सटाणें येथें व्याख्यान.

२८–३–३५ तेहराबाद, सोमपूर व नामपूर येथील कार्यक्रम.

२९–३–३५ नांदगांव येथें जाहीर सभा. रात्रौ मनमाड येथें व्याख्यान. व लगेच पुण्यास रवाना.

### जिल्हा सातारा

१८–६–३५ तासगांव येथें सभा.

१९–६–३५ विटें येथें सभा.

२०–३–३५ म्हसवड येथें सभा.

२१–३–३५ वडूज व कोरेगांव येथील कार्यक्रम आटोपून पुण्यास परत.

---

## बाबू राजेंद्रप्रसाद यांचा
# महाराष्ट्रांतील दौरा

११-५-३५ पुण्याहून राजेंद्रबाबू महाराष्ट्र प्रांतिक कॉंग्रेस कमेटीचे अध्यक्ष श्री. शंकरराव देव रात्रीं १० च्या मेलनें बेळगांवकडे रवाना.

१२-५-३५ राजेंद्र बाबूंचें बेळगांवीं सायंकाळीं आगमन. रात्रीं बेळगांव कार्यक्रम.

१३–५–३५ स. ६। वाजतां महराष्ट्राच्या दौऱ्यास सुरुवात. सावंतवाडी येथें सुमारें ९। वाजतां आगमन. थैली १५६ रुपये व मानपत्र. कार्यक्रम संपल्यानंतर वेंगुर्ल्याकडे प्रयाण. वेंगुर्ला येथें आगमन व कार्यक्रम. मानपत्र चांदीच्या करंडकांतून व थैली १५१ रु.; वेंगुर्ल्याहून मालवणास रवाना. वाटेंत कुडाळ व कट्टा येथें सत्कार व प्रत्येकीं ५१ रु. ची थैली अर्पण. मालवण येथें १ वाजतां आगमन; भोजनोत्तर कार्यक्रम, मानपत्र चांदीच्या करंडकांतून व थैली ५०१ रु. मालवण तालुक्यातर्फे, व ५०१ रु. रत्नागिरी जिल्ह्यातर्फे. पांच वाजतां रत्नागिरीस प्रयाण. वाटेंत कणकवली येथें सत्कार. कणकवली येथें रु. १२५ ची थैली अर्पण.

१४-५-३५ सकाळीं रत्नागिरी कार्यक्रम. मानपत्रें नगरसभा व जि. लोकलबोर्ड. थैली रु. ४००. वाटेंत संगमेश्वर भेट. नंतर देवरूख येथील कार्यक्रम. मानपत्रें ता. लो. बो. व नागरिकांर्फे थैली रु. २५१. तेथेंच चिपळूण (१०१ रु. थैली), राजापूर (थैली ३२–८). मलकापूर (थैली रु. ८७–२) घेऊन कोल्हापूर येथें सायंकाळीं ६ ला आगमन, मुद्दाम सजविलेल्या मोटारींतन मिरवणूक. मिरवणुकीचा थाट कांहीं और होता. मिरवणुकीनंतर कार्यक्रम; अत्यंत प्रचंड सभा. थैली २५५ रु. व मानपत्र नागरिकांतर्फे. वाटेंत कामेरी (थैली रु. १७) व बोरगांव येथील सत्कार–सभा (शेतकऱ्यांची) वगैरे कार्यक्रम आटोपून रात्रीं इस्लामपुरास आगमन व तेथेंच मुक्काम.

ता. १५-५-३५ सकाळीं इस्लामपूर येथील कार्यक्रम (मानपत्र नगरसभेतर्फे व थैली १०१ रु.) उरकून कऱ्हाडकडे रवाना. वाटेंत रेठरें येथें सभा, मानपत्र व थैली ५१ रु. ची. ९ वाजतां कऱ्हाड येथें आगमन, लगेच कार्यक्रमास सुरुवात थैली रु. १७५–८ अर्पण. कऱ्हाडनंतर तांबवे (शेतकरी) थैली रु. ५१ व विटें येथील कार्यक्रम आटोपून परत कऱ्हाडला आगमन. दुपारीं ३ वाजतां कऱ्हाड सोडल्यानंतर मसूर (थैली रुपये ८२–४–०) (उंब्रज थैली ३५ रु. व मानपत्र) वाई (मानपत्र व थैली १०१) येथील कार्यक्रम उरकले. सायंकाळीं सातारा येथें आगमन मिरवणुकीनंतर सभा. थैली रु. ५०१ व मानपत्रें नागरिक व नामदेव अस्पृश्य समाजातर्फे. रात्रीं सातारा येथें मुक्काम.

१६-५-३५ सकाळीं कोरेगांव (रु. ५१), पुसेगांव रु. १०) बुध (रु. ५१) खातगूण (रु. २५), खटाव (रु. ५१), वडूज (रु. २५) व कातुरखटांव येथील स्वागताचा स्वीकार व (थैली रु. २५) घेतल्यानंतर म्हसवड येथें दुपारीं ४ वाजतां आगमन. म्हसवड येथील कार्यक्रम (थैली रु. ११५) उरकल्यानंतर पंढपुरास सोलापूर जिल्ह्याच्या दौऱ्यासाठीं रवाना. रात्रीं ८ वाजतां पंढरपूर येथील कार्यक्रम (थैली रु. २५१). लगेच कुर्डुवाडीकडे रवाना. तेथील कार्यक्रम आटोपल्यानंतर अल्पाहार व झोप. कुर्डुवाडी. येथें थैली रु. १२५ व रु. ११ कुर्डुगांव येथें

१७-५-३५ सकाळीं ७ वाजतां इंदापुरास प्रयाण. तेथील कार्यक्रम (मानपत्र नागरिकांतर्फे

व १०१ रु. थैलीचें आश्वासन) आटोपून बार्शीस आगमन. बार्शीचें बादशाही थाटाचें आगमन. झाल्याबरोबर भोजन व विश्रांति. दुपारीं ३ चे सुमारास कार्यक्रमास सुरुवात. (मानपत्र नागरिकांतर्फे चांदीच्या करंडकांतून व थैली रु. १००१) कार्यक्रम उरकल्यानंतर वाटेंत वैराग (सं.७५) घेऊन सोलापूर येथें सातचे सुमारास आगमन. रात्रीं ८वाजतां सोलापूर येथील कार्यक्रम (मानपत्र व थैली रु. १६८७) आटोपल्यानंतर रात्रींच्या पॅसेंजरनें पुण्याकडे रवाना.

१८-५-३५ सकाळीं पुणें स्टेशनवर आगमन व लगेच महाडला रवाना. महाड येथें आगमन भोजन व विश्रांति. दुपारीं ४॥ वाजतां कार्यक्रम ( मानपत्र नगरसभेतर्फे व थैली रु. २५१ ) उरकल्यानंतर वाटेंत गोरेगांव ( मानपत्र व थैली रु. १०१ ) चौल ( मानपत्र व थैली रु. १०१ ) व नागांव येथील कार्यक्रम उरकून अलिबागेस रात्रीं ९ चे सुमारास आगमन. अलिबाग येथें 'कॉंग्रेस हाऊसच्या पायाचा दगड राजेंद्र बाबूंच्या हस्तें घातला. मानपत्रें जि. लो. बोर्ड व नगर सभा थैली व (रु. १०१.) येथेंच स्त्रियांच्या संस्थेतर्फे ५१ रु. ची थैली.

१९-५-३५ सकाळीं अलिबाग सोडलें व सासवनें ( थैली रु. ११२ आ. ४ ) येथील व भुवनेश्वर येथील कार्यक्रम आटोपल्यानंतर पेण येथें आगमन. पेण येथें भोजन व कार्यक्रम. पेण येथें थैली रु. १७५ (११५ थैलीसाठीं व ६० रु. राजबंदी दिनासाठीं) व मानपत्रें. कार्यकर्त्यांशीं चर्चा. येथील विशेष कार्यक्रम. ४ चे सुमारास पनवेलकडे रवाना. वाटेंत चौक येथें थैली ( रु. ३० ), पनवेल येथें ६॥ चे सुमारास आगमन व लगेच कार्यक्रमास सुरुवात. थैली रु. ५०१. राजबंदी दिन रु. १०१ व मानपत्रें. कार्यक्रमानंतर भोजन झाल्यावर कल्याण येथे रात्रीं ९ वाजतां आगमन. १०-३८ ला राजेंद्र बाबू पाटणाकडे रवाना.

* * * *

२-६-३५ रोजीं रात्रीं खार येथें सभा व नंतर विलेंपार्लें येथें आगमन. ता. ३ रोजीं सकाळीं विलेंपार्लें येथील लोकमान्य वाचनालयास भेट व घाटकूपरकडे रवाना. वाटेंत सांताक्रुझ येथील खादी भांडारास भेट देऊन घाटकूपर येथें आगमन. घाटकपूर मानपत्र. रु. ८ आ. ४ किरकोळ थैली व राजबंदी फंडाकरितां ५२१ रु. ची थैली दुपारीं पालघरकडे रवाना. गाडींतच वसईची थैली. चार वाजतां पालघर येथें आगमन. खादी-भांडार उद्‌घाटन व कार्यक्रम. आसपासच्या कित्येक खेड्यांतील लोक सभेस हजर. पालघर ग्रामपंचायत, लो. बो. व अन्य ठिकाणच्या ग्रामपंचायतीतर्फे बाबूजींना मानपत्र समर्पण. डहाणूकडे रवाना. बेटेगांव येथें ५१ रु. ची थैली. चिंचणी येथें मानपत्र. डहाणू येथें रात्रीं आगमन. ८४६ रु. ची. थैली व अनेक संस्थांतर्फे मानपत्रें व पुष्पहार अर्पण. ता. ४ रोजीं सकाळीं भिवंडीकडे रवाना. वाटेंत उंबरगांव व वाडें येथें अनुक्रमें ५० व ५१ रु. ची थैली. भिवंडी येथें कार्यक्रम. मानपत्रें व १५७-४-३ पै. ची थैली. दुपारीं ठाणें. नंतर घणसोलीस प्रयाण. शेतकऱ्यांच्या परिषदेपुढें भाषण व परत ठाण्यास आगमन. रात्रौ ठाणें येथील सभा. लो. बोर्ड व म्युनिसिपालिटीतर्फे मानपत्रें व ६२७ रु. ची थैली समर्पण. रात्रौ चिंचवडकडे रवाना.

ता. ५ रोजीं सकाळीं चिंचवड येथें आगमन व कार्यक्रम. १०१ रु. ची थैली अर्पण. लगेच पुण्याकडे रवाना. लष्कर) सभा म्यु. तर्फे ५०२ रु. थैली. मानपत्र. लोकशक्ति मंदिरास भेट व सर्वपक्षीय पुढाऱ्यांशीं चर्चा. सेवासदनास भेट व सासवडकडे रवाना. सासवड येथें १०१ रु. ची थैली. सायंकाळीं पुण्यास परत. पुण्याची प्रचंड जाहीर सभा व १७९२ रु. ची थैली. मावळ तालुक्यातर्फे ७५ रु. ची थैली. कार्यक्रम संपल्यानंतर लगेच नगरकडे रवाना. वाटेंत घोडनदी येथील कार्यक्रम व ४१ रु. थैली अर्पण. नगर येथें रात्रीं ११ वाजतां आगमन. भव्य स्वागत.

ता. ६-६-३५ रोजीं सकाळीं गांवांतील प्रमुख लोकांशीं थोडी चर्चा झाल्यावर जाहीर सभा. सभेंत म्यु. तर्फे मानपत्र व १२९१-४-०

रु. ची थैली अर्पण. लगेच बेलापूर–टिळक नगरकडे रवाना. वाटेंत भिंगार, बांबोरी, राहुरी, देवळाली व बेलापूर येथें स्वागत, मानपत्रें व ३५४ रु. च्या थैल्या अर्पण. ११ वाजतां बेलापूर टिळकनगर येथें आगमन, तेथेंच भोजन व विश्रांति. दुपारीं तेथील कार्यक्रम. मानपत्रें व ५०२ रु. ची थैली अर्पण. लगेच संगमनेरकडे रवाना. संगमनेर व कोपरगांव येथील कार्यक्रम व अनुक्रमें ३५२ रु. व ४०१ रु. च्या थैल्या. रात्रीं सिन्नर येथील कार्यक्रम (१०२ ची थैली) आटोपून नाशिककडे रवाना. रात्रींच नाशिक येथें प्रचंड सभा. म्यु. तर्फे मानपत्र व ५०६ रु. ची थैली.

ता. ७–६–३५ रोजीं सकाळीं येवल्याकडे रवाना. वाटेंत पिंपळगांव, वडनेर, चांदवड, व लासलगांव या चार ठिकाणीं कार्यक्रम व ३२९ रु. च्या थैल्या. येवलें येथें ११ वाजतां आगमन. भव्य स्वागत. सायंकाळीं येवलें कार्यक्रम व २७५ रु. ची थैली अर्पण. मनमाड येथें ७१ रु. ची थैली अर्पण, नंतर नांदगांव येथें आगमन. नांदगांव येथील कार्यक्रम व २५९ रु. ५ आ. ची थैली.

ता. ८–६–३५ रोजीं सकाळीं पिंपळनेर (जि. प. खा.) कडे प्रयाण. वाटेंत मालेगांव, दाभाडी व सटाणें येथें कार्यक्रम. मानपत्रें व ४७१ रु. थैल्या अर्पण. ११ वाजतां पिंपळनेर येथें आगमन, मानपत्र व १६१ रु. ची थैली व नंदुरबारकडे रवाना. वाटेंत कासारे, मालपूर, साक्री, महीर व निजामपूर येथें स्वागत, मानपत्रें व ६१९ रु. च्या थैल्या अर्पण. रात्रौ नंदुरबारची प्रचंड सभा. मानपत्रें व नंदुरबार, नवापूर, तळोदें, शहादे व प्रकाशें या सर्व ठिकाणीं मिळून २१६३ रु. च्या थैल्या.

ता. ९–६–३५ रोजीं सकाळीं धुळ्याकडे प्रयाण. वाटेंत दोंडाईचे, शिंदखेड, डांगोरणें व कापडणें येथील कार्यक्रम व ६३२ रु. च्या थैल्या. दुपारीं ११ वाजतां धुळें येथें आगमन म्यु. तर्फे मानपत्र. व ४ वाजतां कार्यकर्त्यांशीं चर्चा व सभा. सभेच्या वेळीं अनेक संस्थांतर्फे पुष्पहार अर्पण व १००१ रु. ची थैली. सवाई. मुक्टि येथील ५१ रु. थैली.

सायंकाळीं अमळनेर येथें आगमन. सभा–मानपत्र व थैली रु. १००३ ची समर्पण व नांदेडकडे रवाना. रात्रौ नांदेड येथील कार्यक्रम.

ता. १०–६–३५ रोजीं सकाळीं फैजपूरकडे रवाना. वाटेंत चहार्डी येथें ७१ रु. ची थैली. चोपडा येथें मानपत्रें आणि ६०२ रु. ची थैल्या–अडावद आणि यावल येथें १९० रु. च्या थैल्या, दुपारीं ३ वाजतां फैजपूर येथील कार्यक्रम ९९ रु. ची थैली व सावदा ५० रु. ची थैली. स्टेशनवरून भुसावळकडे रवाना. सायंकाळीं ५ चे सुमारास भुसावळ स्टेशनवर आगमन. हरिजन वस्तीची पहाणी व हरिजनांच्या शाळेच्या इमारतीचा कोनशिला समारंभ. ग्रामोद्योग–प्रसारक दुकानाचें उद्‌घाटन व जाहीर सभा. मानपत्र व ७२८ रु. ची थैली लगेच जळगांवकडे रवाना. जळगांव येथील कार्यक्रम रु. ६०९–५ ची थैली. उरकून पाचोरा येथें आगमन.

ता. ११–६–३५ रोजीं सकाळीं पाचोरा येथें कार्यक्रम. २८६ रु.ची थैली व चाळीसगांवकडें प्रयाण. चाळीसगांव येथील कार्यक्रम ४५२ रु.ची थैलीं व येलोर लेणीं पहाण्याकरतां तिकडे प्रयाण दुपारच्या एक्सप्रेसनें जळगांवकडे प्रयाण. जळगांव येथें वकील व डॉक्टर वर्गातर्फे२८५१ रु.ची थैली. व म्यु. तर्फे मानपत्र. लगेच ममुराबाद येथील आश्रमास भेट देऊन व तेथें जमलेल्या शेतकरी समाजाला काँग्रेस कार्याला पाठिंबा देण्याबद्दल चार शब्द सांगून एरंडोलकडे रवाना. एरंडोल येथील प्रचंड सभा. मानपत्र व रुपये २८२–१–९ची थैली आणि लगेच जळगांवकडे रवाना. जळगांव येथें कार्यकर्त्यांशीं चर्चा. व रात्रौ वर्ध्याकडे प्रयाण.

प्रत्येक जिल्ह्यांतील भेट दिलेलीं ठिकाणें व जिल्ह्यांत मिळालेल्या वर्गणीच्या रकमा पुढें दिल्या आहेत:—

(१) रत्नागिरी – ८ ठिकाणें रु. २४७३–३
(२) सातारा – २१ ,, रु. १७६८–३
(३) सोलापूर – ५ ,, रु. ३८६२
(४) कुलाबा – ११ ,, रु. १५१८–८
(५) मुंबई उपनगर जि. ३,, रु. ५२९–४
(६) ठाणें–१२ ,, रु. २९७१–८–९
(७) पुणें–६ ,, रु. २४९८–१०
(८) अहमदनगर–९ रु. २९००–१
(९) नाशिक–१२ रु. २००४–४
(१०) पश्चिम खानदेश–१० रु. ४५००
(११) पूर्व खानदेश १८ रु. ४६९६–११

एकूण ठिकाणें १११ रक्कम जमा २९७२२ रु. ५–९ एकूण रकमेंत १६४५ रु. डेटेन्यू-फंडाचे व रु. ५१६—२ आ. क्वेट्टा रिलीफ फंडाचे आहेत.

## हिंदु महासभेच्या महाराष्ट्रीय प्रचारकांचा दौरा

अखिल भारतीय हिंदु महासभेच्या आगामी अधिवेशनासाठीं स्वागतमंडळाचे सभासद नोंदण्याचें व शाखा स्थापन करण्याचें काम महाराष्ट्रांत सुरू झालें आहे. सोलापुरचे पुढारी श्री. रामभाऊ राजवाडे सोलापूर जिल्ह्यांत हिंडत आहेत. गेल्या २४ तारखेस त्यांनीं बार्शी येथें 'हिंदुमहासभेचें कार्य' या विषयावर सुंदर व्याख्यान दिलें व तेथें शाखा स्थापिली. शाखेच्या कार्यकर्त्यांत बार्शीचे प्रमुख सद्गृहस्थ आहेत. पंढरपूर येथील शाखेचें काम व्यवस्थित चाललें आहे. श्री. राजवाडे यांचें पंढरपूर येथें श्रीरुक्मिणी देवीच्या पटांगणांत जाहीर व्याख्यान झालें. नंतर ते करमाळ्याहून माढ्यास गेले. माढ्यास शाखा स्थापन होऊन तिला तेथील अनेक प्रमुख गृहस्थांचें साह्यच मिळालें आहे. पुढें श्री. राजवाडे व हिंदुमहासभेचे चिटणीस श्री. भिडे यांनीं नाशिक जिल्ह्यांत प्रचार केला. सिन्नर व मालेगांव येथें प्रमुख सद्गृहस्थांशीं खाजगी चर्चा केली. मालेगांव येथें शाखा स्थापन झाली असून रा. ब. पोफळे हे तिचे अध्यक्ष आहेत. तसेंच नांदगांव, सिन्नर व येवलें येथेंही शाखा स्थापन झाल्या व प्रमुख गृहस्थांचें ह्या कामीं साहाय्य मिळालें. नाशिक जिल्ह्यांत दोनशें सभासद मिळाले आहेत. पुढें श्री. भिडे व श्री. राजवाडे यांनीं खानदेशांत चाळिसगांव, धुळें, सिंदखेड, शिरपूर, नंदुरवार येथें जाऊन जाहीर व्याख्यानें दिलीं. प्रमुख हिंदु गृहस्थांशीं खाजगी चर्चा केली. धुळें व सिंदखेड येथें शाखा स्थापल्या असून चाळिसगांव, नंदुरबार व शिरपूर येथील शाखा पुन्हां जोमानें कार्य करूं लागल्या आहेत.

# सरकारी अहवाल

## आरोग्यखातें

### (सन १९३३ चे रिपोर्टावरून)

इलाख्याची लोकसंख्या १९३२ सालीं २,२१३५,३२९ व १९३३ सालीं २,२४,३०,५६५ होती.

जन्मसंख्याः—गेल्या १०-१५ वर्षांपेक्षां या वर्षींचा हा आंकडा वाढत्या प्रमाणांतच आहे हें खालील कांहीं आंकड्यांवरून समजेल.

| वर्ष सरासरी | जन्मसंख्या | जनन प्रमाण |
|---|---|---|
| १९०१–१० | ६१७७३६ | ३३.४२ |
| १९११–२० | ६६९७९४ | ३४.२० |
| १९२१–३० | ६८७२५६ | ३५.८६ |
| १९३१ | ७८६५७१ | ३६.०७ |
| १९३२ | ७८२९१७ | ३५.९० |
| १९३३ | ७९३७३३ | ३६.३९ |

इलाख्यांतील एकूण २८ जिल्ह्यांपैकीं पश्चिम खानदेशांत जन्मप्रमाण सर्वांत जास्त (४९.२६) व हैद्राबादेंत सर्वांत कमी (१४.५२१) पडलें.

खेड्यांतील जनन प्रमाणः—तालुके,पेटे व महाल मिळून एकूण १८३ आहेत. त्यांपैकीं चौदा ठिकाणीं ५०; ९४ ठिकाणीं ४० ते ५०; व ५७ ठिकाणीं ३५ ते ४० असें जनन प्रमाण पडलें. मुळशी तालुका (पुणें) येथें ६८.६३, बार्डोली तालुका (सुरत) येथें ५९.३४ असें प्रमाण होतें, तर खुद्द पुणें शहरांत तेंच प्रमाण १७.८१ व अंबरनाथ तालुक्यांत २०.११ असें होतें.

शहरांतील जनन–प्रमाणः— शहरांत हें प्रमाण बरेंच कमी पडलें. एकूण ८५ शहर भागांपैकीं २४ ठिकाणीं ४०, २१ ठिकाणीं ३० ते ४०, ३० ठिकाणीं २० ते ३० असें प्रमाण पडलें. खालील दहा ठिकाणचें प्रमाण दर चौ. मैल लोकवस्तींत २० चेही पण खालीं पडलें, हें पुढें दिलेल्या आंकड्यांवरून निदर्शनास येईल. अमळनेर (१९.९) कल्याण (१९.८९), संगमनेर (१९.३४), सातारा (१८.६१), यावल (१८.४३), पुणें सबर्बन (१८.१०), येवलें (१७.१३), उरण (१४.६५), मनमाड (११.०९) व रत्नागिरी (१०.२४).

अव्यवस्थित नोंदपद्धतीमुळें वरच्या आंकड्यांत चूकही असेल. या सर्व बाबतींत म्युनिसिपालिटींनीं बरेंच लक्ष घातलें पाहिजे. मुंबई शहरांत गुदस्तापेक्षां २०६१ जन्म (प्र. १.७८) जास्त झालें.

लिंगः—एकूण ७९३७३३ जन्मसंख्येपैकीं ४९२२२७ मुलगे व ३८१५०६ मुली होत्या. म्हणजे मुलगे व मुली यांचें प्रमाण अनुक्रमें १०८.०५ : १०० असें पडलें.

उपजत मृत्युः— एकूण १२५७६ होते. म्हणजे १०० जिवंत मुलांमागे १.५८ मृत-जन्म असें हें प्रमाण पडलें. मुंबई शहरांत हें बरेंच जास्त म्हणजे ७.६३ होतें.

मृत्युः—गेल्या तीन वर्षांपेक्षां या वर्षीं मृत्यु जरा जास्त झाले. १९३२ सालीं ५०२४७४ मृत्यू तर १९३३ सालीं ते ५४०८७७ झाले.

शहरें व खेडीं यांचें मृत्यु–प्रमाणः—अनुक्रमें २५.८३ व २४.५४ असें होतें.

जिल्हेवार मृत्युः—पश्चिम खानदेश, सुरत, भडोच, खैरा व पंचमहाल या जिल्ह्यांशिवाय बहुतेक सर्व ठिकाणीं मृत्यु वाढत्या प्रमाणांतच झाले; विजापूर (३८.७०), सोलापूर (३६.६१) धारवाड (३४.३५), अहमदाबाद (३०.०९), बेळगांव (२९.६५), कर्नाटक (२९.१०) व नगर (२९.०८).

खेड्यांतील मृत्युप्रमाणः-फक्त एकाच तालुक्यांत हें प्रमाण जास्त (चौ. मै. लोकवस्तीस ५०) होतें. ८ ठिकाणीं ४० ते ५०, १४ ठिकाणीं ३५ ते ४०, ३४ ठिकाणीं ३० ते ३५, व १०९ ठिकाणीं २० ते ३० असें प्रमाण होतें. बाकी उरलेल्या ठिकाणीं २० चेही खालीं होतें.

शहरांतील मृत्युप्रमाण:—हें सर्वांत जास्त ५४.६४ (नवलगुंद), व कमी ६.५६ (उरण) असें होतें. ८ ठिकाणीं ४० चे वर, १४ ठिकाणीं ३०–४०, ३० ठिकाणीं २०–३० व ३३ ठिकाणीं २० चे खालीं होतें.

जन्म मृत्यु:—हें खालील आंकड्यावरून तेव्हांच लक्षांत येईल.

| | खेडीं | शहरें | एकूण |
|---|---|---|---|
| जन्म:— | १३९९६४ | ६५३७६९ | ७९३७३३ |
| मृत्यु:— | ४३२०९६ | १०८५८१ | ५४०६७७ |

**मृत्यु, त्यांचीं कारणें व दर हजारीं प्रमाण:—** हें खालील कोष्टकांत १९३२ सालाबरोबर तुलनात्मक दृष्टीनें दाखविलें आहे:—

| रोग | संख्या (१९३३) | प्रमाण (३३) | संख्या (१९३२) | प्रमाण (३२) |
|---|---|---|---|---|
| पटकी | ७७९७ | .३६ | १३५३ | .०६ |
| देवी | ७७४१ | .३६ | २६९९ | .१२ |
| प्लेग | २४५६० | १.१२ | १४४४६ | .६६ |
| दोषी ताप | १९६५२७ | ९.०१ | १९५२५० | ८.९५ |
| हगवण, अमांश | २३१६२ | १.०६ | २२६१० | १.०४ |
| श्वसन रोग | १००२०० | ४.५९ | ९३५२४ | ४.२९ |
| जखमा | ८४९६ | .३९ | ८१७२ | .३८ |
| इतर कारणें | १७२११४ | ७.९० | १६४४२० | ७.५४ |
| सर्व कारणें | ५४०६७७ | २४.७९ | ५०२४७४ | २३.०४ |

वरील कोष्टकावरून एक गोष्ट नजरेस एकदम येते कीं, प्रत्येक सदरांतील यंदाचा आंकडा वाढत्या प्रमाणांत आहे, व पटकी, देवी, प्लेग, श्वसन–रोग व इतर रोग यांचें प्रमाण तर फार वाढलें आहे.

बालमृत्यु:—एक वर्षाखालील वयाचे १२७५२५, मृत्यु झाले. म्हणजे १००० नोंदलेल्या जन्मांशीं १६०.६७ असें प्रमाण पडलें. १९३२ चें प्रमाण हजारीं १५६.३९ होतें. वर्गवारी एक महिन्याखालील ५१६४०, आठवड्याखालील २८६७८, आठवड्यावरील २२९६२, १ ते ६ महिने ४४६७५, ६ ते १२ महिने ३१२१२.

**१९३३ मधील बालमृत्यु व त्यांची गेल्या कांहीं वर्षांतील बालमृत्यूशीं तुलना:—**

| वर्ष | बारा महिन्याचे आंतील मृत्यू | | | नोंदविलेली जननसंख्या | | | बालमृत्यूचे जननसंख्येशी दर हजारी प्रमाण | | | बालमृत्यूचें एकंदर मृत्यूसंख्येशीं शेंकडा प्रमाण |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | मुलगे | मुली | एकूण | मुलगे | मुली | एकूण | मुलगे | मुली | एकूण | |
| १९३० | ७२४९७ | ६१६७३ | १३४१७० | ३७२२०५ | ३४४७४७ | ७१६९५२ | १९४.७८ | १७८.७९ | १८७.१४ | २४.०६ |
| १९३१ | ६९६४४ | ५७४९९ | १२७१४३ | ४०९१०० | ३७७४७१ | ७८६५७१ | १७०.२३ | १५२.३२ | १६१.६४ | २४.४८ |
| १९३२ | ६६७६२ | ५५६६६ | १२२४३८ | ४०६४७ | ३७५९७० | ७८२९१७ | १६४.०५ | १४८.०९ | १५६.३९ | २४.३६ |
| १९३३ | ६९२७० | ५८२५७ | १२७५२७ | ४१२२२७ | ३८१५०६ | ७८३७३३ | १६८.०४ | १५२.७० | १६०.६७ | २३.८९ |

खेडीं व शहरांतील बाल मृत्यु:—शहर व खेडें यांतील हें प्रमाण हजारीं अनुक्रमें २१९.१८ व १४८.१४ असें आहे. बाल–मृत्यूचे सर्वांत जास्त

प्रमाण सोलापूर भागांत (२२३.०३) व कमी नबाबशहा (९१.२०) येथें पडलें. खालील प्रमुख ठिकाणीं प्रमाण बरेंच वाढलें आहे:-येवलें (४३२) बार्शी (३८८), पुणें (३६०), पंढरपूर (३५४), नाशिक (३४६), सातारा (३१५), सुरत (२९३) अहमदाबाद (२७५), सोलापूर (२३०), लारखाना (२१९) व कराची (१७३).

कांहीं प्रमुख गांवांतील आंकडे-स्थिति:—

मुंबई:—लोकसंख्या ११,६१,३८३; यंदाची जन्मसंख्या ३०,६७० व मृत्युसंख्या २७,०२३ होती, यांत ८२९० बालमृत्यु होते म्हणजे हा आंकडा गुदस्तापेक्षां जास्तच आहे. मृत्यूचीं मुख्य कारणें व मृत्युसंख्या (१) कॉलरा, १५ (२) देवी २६५७ (३) प्लेग ४८, (४) इन्फ्ल्युएंझा ७६. अहमदाबाद लोकसंख्या ३१००००. जन्मसंख्या १६४१५ व मृत्युसंख्या १२७२७ होती यांत ४५१६ बालमृत्यू होते. म्हणजे गुदस्तापेक्षां बालमृत्यु कमी झाले.

मृत्यूचीं मुख्य कारणें:—(१) श्वसनरोग इत्यादि. याशिवाय (२) मेनिंजायटिसचेही कांहीं मृत्यू होते. (३) गोवरानें २७७ रोगी मेले.

पुणें:—लोकसंख्या १६२,९०१, यंदाची जन्मसंख्या ४,७३१ व मृत्युसंख्या ६९०० होती यांत प्लेगनें १,०७९ मृत्यू झाले. याशिवाय न्यूमोनिया ८७०, हिंवताप ४९६, क्षयरोग ५७४, कॉलरा १५, देवी ८५, विषमज्वर ९३, गोंवर ८४ व इन्फ्ल्युएंझा ३०.

कराची:—लोकसंख्या २,४७,७९१. यंदाची जन्मसंख्या ११,६२२ व मृत्यू ६३०७ झाले. म्हणजे गुदस्तापेक्षां २४० मृत्यु कमी झाले.

प्रमुख रोग न्युमोनिया १७३८, क्षय ४८५, गोवर ४४२, विषमज्वर ४६. यंदा बालमृत्यूचेंही प्रमाण कमी होतें.

सोलापूर:—लोकसंख्या १४४६५४. जन्मसंख्या ६९६६. मृत्यूचीं मुख्य कारणें श्वसनरोग, देवी २३८, व प्लेग १४.

येथें बालमृत्यूचें प्रमाण वाढत आहे.

इलाख्याचें सामान्य आरोग्य व प्रमुख रोगांचा वृत्तांत:—इलाख्याच्या यंदाच्या मृत्युप्रमाणांत (२४.७९) गुदस्तापेक्षा (२३०४) वाढ झालेली आहे. निरनिराळ्या सांथी मोठ्या प्रमाणांत येथें आल्या तरीसुद्धां हा आंकडा फार जास्त गेला नाहीं. यावरून सांथीशिवाय इतर रोग मामुली प्रमाणांत होते असें दिसेल. कॉलरा, देवी व प्लेग यांचें प्रमाण मात्र वाढलें आहे. शिवाय खालील गोष्टी लक्षांत घेण्याजोग्या आहेत (१) मृत्यु संख्येपेक्षां जन्मसंख्या वाढत आहे. (२) गुदस्ताच्या जन्मसंख्येपेक्षां यंदाची जन्मसंख्या वाढली आहे. (३) बालमत्यूचें प्रमाण कमी झालें आहे.

(१) ताप:—तापामुळें ३२ सालाइतकेच (१९५२५१) यंदाही (१९६५२७) मृत्यू झाले. पंचवार्षिक सरासरीपेक्षां (२१३२८९) हा आंकडा बराच कमी आहे.

गेल्या तीन वर्षांत तापानें मरण पावलेल्यांची संख्या व त्यांचें प्रत्येक मैलीं चौरस प्रमाण.

| वर्ष | मृत्युसंख्या | प्रत्येक मैलीं चौ. प्रमाण |
|---|---|---|
| १९३० | २२३२७४ | ११.६५ |
| १९३१ | १९५१३९ | ८.९५ |
| १९३२ | १९५२५१ | ८.९५ |
| १९३३ | १९६५२७ | ९.०१ |

ताप या सदराखालीं येणारे निरनिराळे रोग:—

हिंवताप:—मृत्यू:—१९३२—२१०३८; १९३३—३०३७४. सालाबादप्रमाणें शहरापेक्षां (.६६) खेड्यांतून (१.५७) मृत्यूचें प्रमाण जास्त होतें.

खालील जिल्ह्यांतील खेड्यांतून हिंवताप जास्त आढळतो. नाशिक (७.०१), धारवाड (३.२४), पुणें (३.१०), पश्चिम खानदेश (३.१२), नगर (२.१९) हा रोग मुख्यत: आक्टोबर ते डिसेंबरपर्यंत जास्त असतो. एकूण ३०३७४ मृत्यूंपैकीं १०८९२ या तीन महिन्यांत झाले.

खालील प्रमुख शहरांतून या रोगाचें प्रमाण जास्त आहे.

जांबूसार (८.९५), सुरत (४.७५), शिकारपूर (४.६९), पुणें (३.०४).

प्रतिबंधक उपाय:—(१) या कामावर यंदा एकूण ४४ डॉक्टर्स नेमले, व त्यांनीं खालील कामें

केलीं. एकंदर ३५९६ खेड्यांतल्या, हिंवतापाच्या ७१०६७ रोग्यांना व ४७७३० इतर रोग्यांना औषधोपचार झाले. यांतील ६८९४९ मुलांपैकीं २५२८५ मुलांची पांथरी वाढली होती. (२) क्वनाईन फुकट वाटण्यासाठीं ५ ग्रेनच्या ५६५००० व २ ग्रेनच्या १९२१००० गोळ्या देण्यांत आल्या. (३) सर्व तऱ्हेच्या क्विनाईनसाठीं सरकारनें ६९७०० रु. मंजूर केले. एकंदर तपशिलावरून असें दिसतें कीं, शहरापेक्षां खेड्यांतून क्विनाईनची आवश्यकता फारच आहे.

विषमज्वरः—मृत्यु १९३२–५४४५ व १९३३–६२९९.

खालील जिल्ह्यांत मृत्यु जास्त झाले. कुलाबा (७७२), पश्चिम खानदेश (७३२), धारवाड (५८७), ठाणा (५७६), कर्नाटक (३५२), नाशिक (३४९), बेळगांव (३३०), नगर (२९९), पूर्व खानदेश (२५८), व विजापूर (२४७).

कराची शहरांत मृत्युसंख्या बरीच होती. (१९३३–१६४; १९३२–४६). तरी पण म्युनिसिपालिटी व सरकार यांनीं वेळींच उपाय योजल्यानें रोगास आळा पडला.

गोवर—मृत्यु १९३२–६९४४,१९३३–४१९०, अहमदाबाद, धारवाड, सोलापूर, रत्नागिरी, बेळगांव, पूर्व खानदेश व सातारा येथें गोवराचा उपद्रव जास्त झाला.

उलटणारा तापः—अहमदाबादेस एक मृत्यु झाला. काळ्या आजारानें मात्र कांहीं मृत्यु झाले नाहींत.

मेनिंजायटीसः— या सालीं यानें २८ रोगी लागले, पैकीं २२ मेले. याचा उपद्रव सिंधमध्यें फार झाला. उत्तर भागांत अमदाबादेस १७ रोगी लागले व ६ मेले.

फुप्फुसाचे रोगः—या सालचा आंकडा (१००२००) गेल्या वर्षापेक्षां (९३५२४); जास्तच आहे.

इलाख्याचें या रोगाचें मृत्युप्रमाण ४.२९ होतें. पुढील जिल्ह्यांतून मात्र प्रमाण वाढलें आहे. सुरत (८.२५), कैरा (७.९०), अहमदाबाद (६.२९), कराची (६.१०), नाशिक (५.९३) पुणें (५.९२), नगर (५.८०), सोलापूर (५.४२), कुलाबा (५.१४). एकंदरीनें असें आढळतें कीं जानेवारी, मार्च व सप्टेंबर–डिसेंबर या मुदतींत हा रोग बराच फैलावतो.

क्षयरोगः—क्षयाची मात्र १९३२ सालापेक्षां (२१०७०) १९३३ सालीं (२२५२३) बरीच वृद्धि झालेली दिसते.

खेड्यापेक्षां शहरांतून हा रोग जास्त आढळतो. खेड्यांतील प्रदेशापैकीं कोंकण विभागांत हा रोग बऱ्याच मोठ्या प्रमाणांत आहे. कारण मुंबईस हा रोग जडलेले गिरणीचे मजूर कोंकणांत आपल्या घरीं जाऊन वास्तव्य करतात.

न्युमोनिया (फुप्फुस–दाह) मृत्यु १९३३–२२५५२; १९३२–२१४४५. खेड्यांपेक्षां शहरांतून याचें प्रमाण फार आहे. इलाख्याचें प्रमाण १.०३ आहे, तर मुंबई शहराचें प्रमाण ६.३८ आहे.

हगवण व अतिसारः—मृत्यु १९३३–२३१६२, १९३२–२२६१०.

हगवण (Diarrhoea):— मृत्यु १९३३–२०३१४; १९३२–१८८०७. नगर, कैरा, सोलापूर, पंढरपूर, गोकाक, सुरत व पुणें या प्रांतांत हा विकार जास्त प्रमाणांत आहे.

अतिसार (Dysentery):—मृत्यु १९३३–२८४८ (.१३), १९३२–३८०३ (.१७).

रत्नागिरी, कर्नाटक, धारवाड व कैरा या प्रांतांत हा रोग जास्त प्रमाणांत आहे.

सर्पदंशः—मृत्यु १९३३–१६०३, १९३२–१४८९. सर्वांत जास्त मृत्यु रत्नागिरींत (२४२) झाले. सातारा (१२२), ठाणें १२१, अमदाबाद ७२, नाशिक ६७, पुणें ६५, नगर ६२, बेळगांव ६० व सोलापूर ५६.

प्रसूतीचे वेळीं मृत्युः—१९३३–४६११; १९३२ ४१८१. याची विभागणी पुढीलप्रमाणें:—

| | |
|---|---|
| मुंबईशहर— | २३३ |
| उत्तरविभाग— | ६९७ |
| मध्यविभाग— | ९११ |

दक्षिण विभाग— १६४८
सिंध प्रांत— ११२२

घटसर्प:—याचा प्रादुर्भाव फक्त कराचीस झाला ११४ रोगी लागले, त्यांपैकीं २२ मेले.

सांथीचे रोग:—

(अ) कॉलरा:—यंदा सर्व वर्षभर कॉलऱ्याची सांथ जरा जोरांतच होती. मृत्यु १९३३–७७९७, १९३२–१३५३. मागील कांहीं वर्षांचे आंकडे १९२५–५७, १९२६–७३, १९२७–२६१५३, १९२८–६८८१, १९२९-९०८४, १९३०–१५१४२, १९३१–१८६४६, १९३२–१३५३,

सुरत, भडोच, खैरा, अहमदाबाद व कर्नाटक यांशिवाय इलाख्यांतील सर्व जिल्ह्यांतून कॉलऱ्याचा उपद्रव झाला. सिंधमध्यें तर फक्त ३ मृत्यू झाले. पुढील कांहीं जिल्ह्यांतून मात्र हा रोग फारच फैलावला. नगर (२०३३), सोलापूर (१२५२), सातारा (१०२५), बेळगांव (६८८), पूर्वखानदेश (५२५), पश्चिम खानदेश (४४६), पुणें (४७३), नाशिक (४२२), विजापूर (३०२), कुलाबा (३०१), ठाणें (२३१) मुंबई शहरांत मात्र १९३२ सालीं ७ व १९३३ सालीं १५ मृत्यू झाले. मार्च महिन्यापासून रोग भयंकर स्वरूपाचा झाला. व जुलै–आगस्टमध्यें तर त्यानें कहरच उडविला. कॉलरा–शहरें व खेडीं–शहरें ४८५ मृत्यू. खेडीं–७३१२ मृत्यू. खालील शहरांतून जास्त मृत्यू झाले. पंढरपूर (११०), मालेगांव (९९), बारामती (६०), गोकाक, चाळिसगांव, पुणें, बेळगांव, सोलापूर येथील आंकडे १४ ते १८ च्या दरम्यान आहेत.

खालील तालुक्यांतून जास्त मृत्यू झाले. शेवगांव (४.६०), जामखेड (४.४८), नेवासें (३.३७), पाथर्डी (३.१३), कर्जत, (३.९५), शहादे (२.७४), पारनेर (२.५ ) याप्रमाणें मृत्युप्रमाण होतें. इलाख्याचें सरासरी मृत्युप्रमाण ·३६ होतें.

प्रांतवार विभागणी:—

मध्यविभाग:—इतर सर्व विभागापेक्षां यांत मृत्यू जास्त झाले (३५१४); पैकीं नगर, पुणें, नाशिक, ठाणें, कुलाबा या प्रांतांतून प्रमाण जास्त पडतें. एकूण मृत्यूंपैकीं अहमदनगर जिल्ह्यांतच २०३३ मृत्यु झाले. मुंबई सबर्बनमध्यें सर्वांत कमी म्हणजे फक्त चार मृत्यु झाले.

नगर जिल्ह्यांतील ४५५३ रोगी लागले व २०३३ मेले. पहिला रोगी ३ मार्च १९३३ रोजीं नगर तालुक्यांतील जेऊर या ठिकाणीं नोंदला गेला. पैठणच्या यात्रेमुळें रोग फैलावला व शेवगांव, नेवासें, पारनेर, जामखेड इत्यादि सर्व ठिकाणीं पसरला.

पुणें जिल्ह्यांत १०२७ लागले व ४७३ मृत्यु पावले. २ जानेवारी १९३३ रोजीं पंढरपूर तालुक्यांतील वीर या ठिकाणीं पहिला रोगी सांपडला. भिमथडी, पुरंधर, इंदापूर, हवेली व बारामती या तालुक्यांत कहरच झाला.

नाशिक जिल्ह्यांत ९४४ लागले व ४२२ मेले १२ जानेवारी १९३३ रोजीं दिंडोरी तालुक्यांतील जामाल या खेड्यांत रोगी सांपडला. खुद्द नाशिक शहरांत पहिला मृत्यु ९ जानेवारीस झाला, पण तो रोगी पंढरपूरहून आलेला होता.

कुलाबा जिल्ह्यांत:—४७६ लागले व ३०१ मेले. कर्जत तालुक्यांतील कळवली येथें १ जानेवारीस केस झाली, व या महिन्यांतच आंकडा ६७ पर्यंत गेला.

ठाणें जिल्ह्यांत:— २८५ लागले व २३१ मरण पावले. भिवंडी व कल्याण येथें रोगानें कहरच केला.

रत्नागिरी जिल्ह्यांत ७२ रोगी लागले व ५० मेले. सांथ सप्टेंबर ते नोव्हेंबर या महिन्यांत जोरांत होती.

दक्षिण भाग:— यंदा ३२९० मृत्यू झाले. पण गुदस्ता ते फक्त १४६ च होते. जुलैमध्यें सांथ जोराची होती. एकूण ३२९० मृत्यूंपैकीं ३०८५ मृत्यु खेड्यांत झाले व फक्त २०५ शहरांतून घडले. सोलापूर, सातारा, बेळगांव, विजापूर येथें सांथ जोरांत होती; तर कर्नाटक प्रांत एकदम निसटला.

सोलापूर जिल्हा:—मृत्यू १२५२. येथें जुलैमध्यें सांथ जोरांत (४७४) होती. १ मार्च १९३३ रोजीं पंढरपूर तालुक्यांत देगांव येथें

रोग उद्भवला. खुद्द सोलापुरास १२ मार्च ३३ रोजीं केस झाली. पंढरपुरास चैत्र यात्रेमुळें ६ एप्रिल ११३३ ला केस सुरू झाली. पुन्हां आषाढी पालखीमुळें रोगास जोर आला व अशा रीतीनें ११० मृत्यु नोंदले गेले. सोलापूर, मेढे व पंढरपूर या तालुक्यांत मुख्यतः निजामचे राज्यांतूनच रोग आला.

साताराः— ता. २१ एप्रिल १९३३ रोजीं हरोळी येथें रोग उद्भवला व तो मिरज (ज्यूनि.) संस्थानांतून आला. सातारा, तासगांव, कोपरगांव, इ. तालुक्यांत सांथ जोराची होती.

बेळगांवः—या जिल्ह्यांत १६ मार्च १९३३ रोजीं गोकाक येथें प्रथमतः रोग उद्भवला, व ३९ लोक लागून पैकीं १८ मरण पावले. संपगांव, चिकोडी, गोकाक व परसगड येथें सांथ जोरांत होती. खुद्द बेळगांव शहरांत ११ सप्टेंबर १९३३ रोजीं कॉलऱ्याची केस झाली.

विजापूरः—या जिल्ह्यांत विजापुरासच प्रथमतः १६ मे १९३३ रोजीं केस झाली. आक्टोबर मध्यें सांथीचा जोर होता. शिंदगी व इंदि या तालुक्यांत बरेच मृत्यु झाले.

धारवाडः—या जिल्ह्यांत फक्त २३ मृत्यू झाले, पैकीं ६ हुबळीचे होते.

उत्तरभागः– मृत्यु १९३३ – ९७५, १९३२–२४९.

या भागांतील दोन्ही खानदेशांत रोगाचा कहर झाला. गुजराथ प्रांतांत फक्त ४ मृत्यू झाले. नेहमींप्रमाणेंच पूर्व खानदेशांत रोगाची सुरुवात होऊन, तो पश्चिम खानदेशांत पसरला. पूर्व खानदेशांत निजाम राज्यांतून रोग आला व त्यामुळें एकूण १४४९ रोगी लागले, व ५२५ मरण पावले. जामनेर, चाळिसगांव व पाचोरा तालुक्यांतून मृत्युसंख्या फार होती. पश्चिम खानदेशांत ११७१ लागले व ४४६ मृत झाले. या जिल्ह्यांत सगळीकडे नद्या व नाले पसरून त्यांचा स्नान, धुणें व पिण्याचा पाणीपुरवठा यांकडे उपयोग केला जातो व ह्या गोष्टीमुळें कॉलऱ्याच्या फैलावास मदत होते. शहादे व नंदुरबार तालुक्यांत रोग जोरांत होता.

प्रतिबंधक उपायः—पोटॅश परमँगनेट, कॉलऱ्याच्या गोळ्या, इनाक्युलेशन्स इत्यादि नेहमींचे उपाय ताबडतोब अमलांत आणले. इनॉक्युलेशनसाठीं ८ डॉक्टरांची खास नेमणूक केली होती. त्याचा बराच फायदा होऊन ११०६३९ लोकांस टोंचण्यांत आलें. पालख्यांचे बरोबर एकसारखे बदलते डॉक्टर्स असतात त्याऐवजीं कायमचे डॉक्टर्स ठेवण्याची योजना झाली असून तीस सरकारमान्यता मिळाली आहे. निजामराज्यांतून रोगांचा बराच उपद्रव होत असल्यानें असि. डायरेक्टर हे त्या राज्यांतील वैद्यकीय अधिकाऱ्यास भेटले व दोघांचे संमतीनें योजना करून, तिची अंमलबजावणी झाली.

(आ) देवीः—गेल्या वर्षापेक्षां (२६९९) यंदा (७७४१) देवीमुळें बरेच जास्त. मृत्यु प्रमाण ·३६ होतें. पश्चिम खानदेशाशिवाय इलाख्यांतील सर्व जिल्ह्यांतून रोग उद्भवला. जोराची सांथ कर्नाटक (१.५७)येथें होती. पूर्व खानदेश, भडोच, खैरा, अमदाबाद येथें प्रमाण बरेंच कमी (०.०१,) होतें.

शहरें व खेडीं यांतील मृत्युप्रमाणः—

शहरेंः—कुमठा (५.२२), बार्शी (४.५३), गोकर्ण (३.७६), महाड (२.४६), चिपळूण (१.९१) व सोलापूर (१.६५).

खेडींः—तालुके कुमठा (३.६२), शिर्शी (३.२०), होनावर (२.८५), सिद्धपूर (१.७७) व कराची (१.६६). उत्तर भागांत सांथ विशेष जोराची नव्हती. मृत्यू १३१ झाले. दक्षिण भागांत सोलापूर व कर्नाटक जिल्ह्यांत अनुक्रमें ६०९ आणि ६५५ मृत्यु झाले.

मध्यभागांत रत्नागिरी जिल्ह्यांत रोग बराच उद्भवला व त्यामुळें ७५२ मृत्यु झाले. मुंबई शहरांत देवीची सांथ फारच जोरांत आली व एकूण २६५७ मृत्यू झाले. गतवर्षीचा आंकडा फक्त ३१३ आहे. देवीनें झालेल्या ७७४१ मृत्यूपैकीं १८०६ एक वर्षाचे आंतील मुलें होतीं व ३३०३ एक ते दहाच्या दरम्यानचीं होतीं. मार्च महिन्यांत सांथीचा जोर होता (१५८४) मृत्युसंख्या.

(इ) प्लेग अथवा ग्रंथिक सन्निपात:- –

या रोगाची सांथ यंदा गतवर्षीपेक्षां बरीच जोरांत होती. मृत्यु १९३३–२४५६०, (१.१२)
१९३२–१४४४६ (.६६)

जवळ जवळ गेल्या दहा वर्षांत इतक्या जोरानें सांथ आली नव्हती, हें खालील आंकड्यांवरून ध्यानांत येईल.

| | |
|---|---|
| १९२४– ९२१४ | १९२९–१८०१४ |
| १९२५–१२६०१ | १९३०– ५०२६ |
| १९२६– ९८६६ | १९३१– ३५०६ |
| १९२७– ४०७६ | १९३२–१४४४६ |
| १९२८–१३५६३ | १९३३–२४५६० |

विजापूर ८७१०, बेळगांव ६२२२, धारवाड ३७३३, पुणें २२३५, सातारा १७९२, सोलापूर १२५०, खैरा १८१, कर्नाटक १६६, ठाणें १३६, नगर ३६, रत्नागिरी ४९.

पूर्व खानदेश, नाशिक, मुंबई सबर्बन, सिंध येथें प्लेग मुळींच झाला नाहीं. पश्चिम खानदेश, कुलाबा येथें प्रत्येकीं फक्त एकच मृत्यु झाला.

शहरें व खेडीं यांतील मृत्युसंख्या:—

शहरें—२५०९ (.६०).

खेडीं—२२०५१ (१.२५).

शहरभागांतील खालील ठिकाणीं मृत्यु–प्रमाण जास्त होतें. नवलगुंद (२५.४३), अथणी (९.४४), बार्शी (८.६६), अष्टें (७.११), पुणें शहर (६.६२), बागलकोट (५.८३), पुणें सबर्बन (३.७७) व खालील तालुक्यांत मृत्युप्रमाण बरेंच जास्त होतें.

शिंदगी (२६.२०), बागेवाडी (२२.१८), अथणी (१४.६४), मुद्देबिहाल (१२.८२), विजापूर (१०.०३).

प्रांतवार प्लेगचा उपसर्ग:—सर्व विभागापेक्षां दक्षिण विभागांत प्लेगचा प्रादुर्भाव जास्त झाला. १९३२ सालीं १३९४० मृत्यू तर १९३३ सालीं २१८७१ मृत्यु झाले. विजापूर जिल्ह्यांत रोगाचें स्वरूप भयंकर होतें; व त्यानें ८७१० मृत्यु झाले. बेळगांव, धारवाड जिल्ह्यांतून अनुक्रमें ३४३६ व २०७३ मृत्यु झाले. कर्नाटकांत फक्त १६६ लोक मरण पावले.

मध्यविभागांत यंदा २४५७ मृत्यु झाले. १९३२ सालीं ते फक्त १८१ होते. एकट्या पुणें जिल्ह्यांत २२३५ लोक मेले. तेथें सप्टेंबर व ऑक्टोबर महिन्यांत सांथ जोराची होती. पुणें शहरांत प्लेगमुळें १०६९ मृत्यु झाले. पुण्यांत झालेली पहिली केस (१२ जानेवारी १९३३) भोर संस्थानांतून आली होती. सरकार व शहर म्युनिसिपालिटी यांनीं सहकार्य करून तत्परतेनें प्रतिबंधक उपाय योजले. एकूण १३४२८३ लोकांना प्लेग टोंचला व १०२८९४ उंदरांचा संहार केला. याच सुमारास परेळच्या हापकिन इन्स्टिटयूटनें प्लेगच्या लसीचे पुणें येथें निरनिराळे प्रयोग केले व त्यावरून निघालेलीं अनुमानें बरींच उत्साहवर्धक आहेत.

उत्तर विभागांत यंदा १८२ मृत्यु झाले. १९३२ सालीं २०८ मृत्यु झाले होते पैकीं एकट्या खैरा जिल्ह्यांतच १८१ मृत्यु झाले व एक धुळें शहरांत झाला. मुंबईस यंदा ४८ मृत्यु झाले. १९३२ सालीं ते ३७ च होते.

प्रतिबंधक उपाय:-(१) या कामासाठीं मुद्दाम १५ डॉक्टर्स नेमले. (२) इनॉक्युलेशन्स ७२६५६१ लोकांना टोंचलें, व (३) मूषकसंहार व त्यांची तपासणी.

(ई) इन्फ्ल्यूएन्झा—या रोगाची सांथ विशेष जोराची नव्हती. सर्व इलाख्यांत २०६ मृत्यू झाले, पैकीं ७६ मुंबई शहरांतच झाले.

दक्षिणविभाग ७४. मध्यविभाग ४३. उत्तर विभाग ९. सिंध विभाग ५.

### उत्सव व यात्रा

पंढरपूर—यंदाची आषाढी एकादशी ४ जुलै १९३३ रोजीं होती. या निमित्त १४९१४० यात्रेकरी आले. वैद्यकीय तरतूद नेहमींप्रमाणें होतीच· ८ मेडिकल ऑफिसर्स, ११ सॅनिटरी इन्स्पेक्टर्स व १९ मेडिकल विद्यार्थी या कामावर नेमले होते. ते सर्व जाणाऱ्या येणाऱ्या वारकऱ्यांची कसून तपासणी करीत.

कॉलरा हॉस्पिटलमध्यें १७३ लोक घेतले. पैकीं

८३ मरण पावले. एक रोगी देवीचा होता.

आळंदीः—यंदाची कार्तिकी एकादशी १३ नोव्हेंबर १९३३ रोजीं होती. त्या वेळीं कॉलऱ्याचे दोन रोगी सांपडले, त्यांपैकीं एक मरण पावला.

नाशिक व त्रिबकः— निवृत्तियात्रेला २५००० यात्रेकरू आले. व सिंहस्थापैकीं तिसऱ्या हप्त्याला ५२३२३ यात्रेकरू आले. या वेळीं (जुलै १९३३) नाशकास कॉलऱ्यानें २ मृत्यू झाले. पण त्वरित उपाययोजनेमुळें रोग दबला.

याशिवाय दरवर्षाप्रमाणें सौंदत्ती–यल्लामा, यमनूर, गोकर्ण, शुक्लतीर्थ, डाकोर इ. ठिकाणच्याही यात्रा झाल्या. आरोग्यरक्षणाची व्यवस्था वरीलप्रमाणेंच केली होती.

आरोग्य संस्था व त्यांचीं कामें:— एकूण म्युनिसिपालिटचा १५४ आहेत, व त्यांचे ताब्यांत ३१२४०६० लोकसंख्या आहे. यंदा ३८१२२११८ रु. वसूल झाले. पैकीं रु. १८१२७७०१ किंवा ४७.५५ शें. कररूपानें वसूल झाले. यावरून दर माणशीं ५ रु. १२ आ. १० पै कर बसला. सर्वांत हें प्रमाण कराची येथें जास्त (रु.११–६–०) व बेटावद (खानदेश) येथें कमी (रु. ०–६–११) पडले. प्रमुख म्यु. चीं उत्पन्नें व करांचे दरमाणशीं आंकडे खालीलप्रमाणें आहेत. (आंकडे रुपयांचे)

| | उ. रु. | कर रु. | | उ. रु. | कर रु. |
|---|---|---|---|---|---|
| मुंबई | २५ | २२ | पुणे | ११ | ७ |
| कराची | १३ | ११ | सुरत | १० | ८ |
| अहमदाबाद | ११ | १० | सोलापूर | ८ | ५ |

आरोग्यरक्षणार्थ सर्व म्यु. चा सरासरी खर्च दरमाणशीं रु. २–४–११ होतो. पुणें, नाशिक, सोलापूर, हुबळी, विजापूर, अहमदाबाद, सुरत, हैदराबाद, सक्कर इ. म्यु. चा पाणीपुरवठा एक सारखा स्वच्छ ठेवला गेला होता. हैद्राबाद, शिकारपूर, अमदाबाद, सुरत, धुळें, अमळनेर व नंदुरबार येथेंही ड्रेनेजमध्यें बरीच सुधारणा झाली. खेडेगांवांतूनही आरोग्यरक्षणार्थ बरेच प्रयत्न केले. नवीन सरकारी ठरावामाणें खेड्यांतील पाणीपुरवठा सुधारण्यासाठीं जिल्हा लोकलबोर्डांचे ताब्यांत देण्यासाठीं त्या त्या विभागाचे कमीशनरला, पुढीलप्रमाणें खर्चाची मंजुरी मिळाली आहे.

| | | | |
|---|---|---|---|
| उत्तर विभाग | २८००० | सिंध | १८००० |
| मध्यविभाग | २१००० | दक्षिण विभाग | २८००० |
| सरकारजवळ राखून ठेविलेले | | | ५०००. |

वरीलप्रमाणेंच रस्तासुधारणेसाठीं पुढीलप्रमाणें रकमा मंजूर झाल्या.

| | | | |
|---|---|---|---|
| उत्तर विभाग | १७३००० | दक्षिणविभाग | १७६००० |
| मध्यविभाग | २७८००० | सिंध | १७३००० |

आरोग्य मंडळें:—इलाख्यांत अशा एकूण १७ संस्था आहेत; त्यांतील कांहींचीं कामें खालीलप्रमाणें आहेत.

(१) कराची हेल्थ असोसिएशनतर्फें भेरुमल ठाकुरदास सूतिकागृह चालतें. येथें एकंदर यंदा २९८९ बाळंतिणी व गरोदर स्त्रियांची व्यवस्था राहिली.

(२) भडोच सॅनिटरी असोसिएशनतर्फें २९ सदीप व्याख्यानें झालीं. शिवाय यांचेतर्फें भडोच व शुक्लतीर्थ येथें आरोग्यप्रदर्शनेंही भरलीं. यांचेतर्फें दूधतपासणी, लहान मुलांची तपासणी, इ. तऱ्हेचीं बरींच कामें झालीं.

(३) अमदाबाद सॅनिटरी असोसिएशनतर्फे ११ खेड्यांतून बाल–दिन साजरे झाले व सदीप व्याख्यानेंही झालीं.

(४) हमीदअल्ली रेडक्रॉस प्रसूतिगृह लारखानाः—यंदा ८१ बाळंतपणें झालीं. एकूण ३९०६ रोग्यांना औषधोपचार झाला.

(५) सिंध प्रांत रेडक्रॉस सोसायटी या संस्थेतर्फें निरनिराळ्या ठिकाणीं क्षयरोगाची माहिती दिली गेली.

(६) अमदाबाद व भडोच रेडक्रॉस सोसायट्यांनीं सहकार्य करून एकंदर १६ ठिकाणीं औषधोपचाराची व्यवस्था ठेविली. याचा ५४०५५ रोग्यांना फायदा मिळाला.

देवी काढणें:—नवीन देवी टोचणें:—१९३३ व ३४ सालांत ६८८५७७ मुलाना प्रथमतः देवी काढण्यांत आल्या; पैकीं शें. ९४.५५ च्या देवी चांगल्या निघाल्या, शें. ०.०९ च्या नीट निघाल्या नाहींत व शें. ५.३६ चा निकाल समजला नाहीं.

८२ मुलांना पहिल्या देवी निघाल्या नाहींत म्हणून पुन्हां काढल्या.

पुन्हां देवी काढणें:—३०१३५९ लोकांना पुन्हां देवी काढल्या. पैकीं शें. ५२.६८ च्या देवी चांगल्या निघाल्या व शें. ३७.४९ चे निकाल कळले नाहींत.

देवी काढण्याबाबतचा खर्च:—यासाठीं एकूण रु. ५८०१६५-८-६ खर्च म्हणजे प्रत्येकीं १२ आणे ९ पै खर्च होतो. अर्थात् हा सर्व असि. डायरेक्टरांचा पगार यांतच धरल्यामुळें जास्त आहे.

बेळगांव लस काढण्याचा कारखाना:—यंदा १४८८३०५ भाग लस तयार झाली, यापैकीं १४३४५७५ भाग उपयोगांत आले.

थंड हवा कायम राखण्याची नवीन खोली बांधल्यामुळें एकाच वेळीं १००००० भाग उत्तम रीतीनें सांठवून ठेवण्याची उत्ता सोय झाली आहे. याशिवाय लस तयार करण्याचे पद्धतींतही पुष्कळच चांगल्या सुधारणा झाल्या.

जनावरें:—वर्षाचे सुरुवातीस फक्त ७ वासरें होतीं पुढें ६८२ वासरें भाड्यानें घेतलीं. वर्षाचे शेवटीं २४ वासरें शिल्लक होतीं. १८ वासरांची लस वापरण्यास अयोग्य होती.

इलाख्यांतील २५ गांवांतून सक्तीनें देवी काढण्याचा कायदा चालू आहे. यामुळें ३१६ खटले झाले, व यांपैकीं पुष्कळसे (२८५) कराची शहरांतलेच होते. यंदाचे वर्षीं 'पब्लिक हेल्थ ॲक्ट, नांवाचा नवीन कायदा तयार करण्याचा सरकारचा विचार चालू आहे.

---

## पोलीस खात्याचा १९३३ चा अहवाल

### (मुंबई इलाख्याचा. सिंध वगळून)

पोलीसांची संख्या :— डे. सु. पोलीस व त्यांच्या वरच्या प्रांतिक व वरिष्ठ अधिकाऱ्यांची संख्या रेल्वे अधिकारी धरून ३१ डिसेंबर १९३३ रोजीं पर्यंत ६२ होती. त्याचे खालील अधिकारी व शिपाई अनुक्रमें ७०९ व १७३९५ होते. १९३२ सालीं ह्या संख्या अनुक्रमें ७१५ व १७५८६ अशा होत्या. बडोदा कॅन्टोन्मेंट व रेवाकांठा एजन्सी यांचा ताबा व कारभार हिंदुस्थान सरकारकडे आल्यानें पंचमहाल जिल्ह्यांतील ६ सबइन्स्पेक्टरांची कायम बदली गुजराथेंत करण्यांत आली, त्यामुळें अधिकाऱ्यांची संख्या ह्या वर्षीं कमी झाली. त्याचप्रमाणें ह्या जिल्ह्यांतून खालच्या अधिकाऱ्यांपैकीं हेड कॉन्स्टेबल व कॉन्स्टेबल असे सशस्त्रांपैकीं, निःशस्त्रांपैकीं व स्वारांपैकीं मिळून एकंदर १२७ अधिकाऱ्यांची गुजराथ स्टेटस् एजन्सीमध्यें कायम बदली करण्यांत आली. पोलीस सुपरिंटेंडंट, असि. पो. सुपरि. व डे. पो. सुपरि; यांच्या खास हाताखालील २० हेड कॉन्स्टेबल व २८ कॉन्स्टेबल कायमचे कमी करण्यांत आले. तसेंच पंचमहाल, विजापुर व भडोच ह्या जिल्ह्यांतून एकंदर १६ हेड कॉन्स्टेबल व कॉन्स्टेबल कमी करण्यांत आले. बी. बी. ॲंड सी. आय. रेल्वेवरील एका कॉन्स्टेबलची जादा नेमणूक करण्यांत आली. हंगामी पोलिस व अधिकारी यंदा फक्त ६९४ इतकेच होते. कायदेभंगाची चळवळ बंद पडत चालल्यावर ही संख्या कमी करण्यास सुरवात झालीच होती तरीसुद्धां गतवर्षीं हंगामी पोलीस व अधिकारी १२५३ होते.

पोलीस खात्याचा खर्च:—१९३३-३४ च्या सरकारी वर्षांत रेल्वे पोलीस व कचेरी खर्चासुद्धां ह्या खात्याचा खर्च ९८४०४२१ रुपये झाला. मागील वर्षीं हा खर्च १००७१८९९ रु. झाला होता. यंदा खर्च कमी होण्याचीं कारणें:—(१) कायदेभंगाच्या वेळीं नेमलेल्या जादा हंगामी पोलीसांची संख्या कमी करण्यांत आली; (२) रेवाकांठा एजन्सी व बडोदा कॅन्टोनमेंन्ट पोलीस खात्यांचा ताबा व कारभार हिन्दुस्थान सरकारकडे गेला; (३) इन्स्पेक्टर, सबइन्स्पेक्टर व पोलीस प्रॉसिक्यूटर यांच्या भत्त्याचे दर कमी केले; (४) अधिकाऱ्यांच्या तैनातींतील शिपायांची संख्या कमी केली; (२) कॉन्स्टेबलसच्या कांहीं जागा मोकळ्या राहिल्या; (६) एकंदर खर्चाच्या बाबतींत शक्य तों काटकसरीचें धोरण ठेविलें होतें. गेल्या सालीं प्रत्येक पोलीसामागें

(४९९-२-९) रु. खर्च आला होता तो मात्र ह्या वर्षी वाढला व (५०२-१०-१) रु. इतका आला ही वाढ वास्तविक खरी नसून कायम नोकरांची संख्या कमी करण्यांत आली तरी त्यांच्यासाठीं कांहीं दिवसपर्यंत झालेला खर्च मात्र वार्षिक आढाव्यांत उरलेल्या संख्येवरच आकारण्यांत आला त्यामुळें झालेली दिसत आहे.

पोलिसांचें प्रमाणः—चालू वर्षी दर ४.५९ चौ, मैलास व ९२६ लोक वस्तीस एक. मागील वर्षी हें प्रमाण दर ४.२८ चौ. मैलास व ९१८ लोक-वस्तीस एक असें होतें. १९३३ मध्यें इंग्लंड व वेल्स मिळून हीं प्रमाणें १.५४ चौ. मैल व ८५० लोकवस्ती अशीं होतीं.

हत्यारें:—चालू वर्षी १५६९ नवीन बंदुका खडकी आर्सेनल मधून विकत घेतल्या.

शिक्षा :— १९३३ सालीं अधिकारी व शिपाई मिळवून ४६९ जणांना शिक्षा झाल्या. १९३२ मध्यें ४४९ पोलिसांना शिक्षा झाल्या होत्या. शिक्षा होणाऱ्यांचें प्रमाण बी. बी. अँन्ड सी. आय्. रेल्वे पोलिसांत सर्वांत जास्त शें. (५·९२) व अहमदाबाद पोलिसांत सर्वांत कमी शें ·७१ होतें.

बक्षिसें, पदव्या वगैरे:— २ अधिकारी शिपायांना किंग्ज पोलिस मेड्‌ल व ८ जणांना इंडियन पोलिस मेडल मिळालें. एका पोलिस इन्स्पेक्टरला रावसाहेब ही पदवी देण्यांत आली· "गुड सर्व्हिस टिकेटस्" व रोख रकमेचीं बक्षिसें अशीं एकंदर ७४७९ जणांना देण्यांत आलीं. १९३२ मध्यें ही संख्या ७१७४ होती. १९३३-३४ मध्यें बक्षिसें देण्यांत एकंदर ३३,५४१ रु. खर्च झाले. १९३२-३३ मध्यें हा खर्च ३५,७८० रुपये होता.

साक्षरताः— ६३३ अधिकाऱ्यांपैकीं सर्व व १७०७० शिपायांपैकीं १२३५५ साक्षर आहेत १९३२ सालीं ह्या संख्या ६२९ व ११९११ होत्या. यंदाचें साक्षरतेचें प्रमाण शें. ७३·४ आहे. गेल्या वर्षी तें शें. ६९.९ होतें.

राजिनामेः—१९३३ व १९३२ सालीं अनुक्रमें १३१ व १४३ पोलिसांनीं राजीनामे दिले.

रिकाम्या जागा व नवीन उमेदवारः— यंदा ४०१ रिकाम्या जागा होत्या व १०४१ नवीन उमेदवार घेण्यांत आले. १९३२ चे हे आंकडे अनुक्रमें ३६५ व ९६४ असे होते. पेन्शन, मृत्यु, वगैरे कारणांनीं १०९८ जागा रिकाम्य झाल्या. १९३२ सालीं ९७७ जागा रिकाम्या झाल्या होत्या. सरकारी हुकुमाप्रमाणें निकृष्ट वर्गांतील ३९ लोक कामावर घेतले.

खर्चः-हत्यारें, कपडेलत्ते इ. करितां २१७५६८ रु. खर्च झाला. १९३२ मध्यें तोच २३१०९२ रु. झाला होता हत्यारांचीं दुकानें:—यंदा हत्यारांचा परवाना असलेलीं दुकानें २१२ होतीं. १९३२ मध्यें ४२८ होतीं. यंदा ६३९ अधिकाऱ्यां-जवळ पिस्तुलें होतीं पैकीं ५४९ अधिकाऱ्यांनीं पिस्तुलांचा नेम मारण्याचा शिक्षणक्रम पुरा केला.

इमारतीः—पोलीस अधिकाऱ्यांकरितां व शिपायांकरितां नवीन पद्धतीच्या इमारती बांधाव-याची योजना सुरू आहे, त्या बरहुकूम सुरत येथें १२२ पोलीस बराकी बांधण्याचें जें काम सुरू आहे, त्यासाठीं ह्या वर्षी १२००० रु. मंजूर करण्यांत आले.

खेडेगांवांतील पोलीसः— यंदा ३०९ पोलीसांना चांगल्या कामगिरीबद्दल तरवारी व रोख (एकूण रु. १६०३) वगैरे बक्षिसें देण्यांत आलीं. ५५४ पोलीसांनीं काम-गिरी नीट बजावली नाहीं. त्यांपैकीं ५३६ जणांना खात्यातर्फे शिक्षा करण्यांत आली. ५८ पोलीसांवर प्रत्यक्ष गुन्हे केल्याच्या आरोपावरून खटले भरण्यांत आले. पैकीं ४१ जणांवर गुन्हा शाबित झाला.

नाशिक पोलीस ट्रेनिंग स्कूलः—इ. स. १९३३ मध्यें जानेवारींत २९ व जुलैमध्यें ३० उमेदवार सब्-इन्स्पेक्टरच्या शिक्षणक्रमासाठीं घेण्यांत आले. मे १९३३ मध्यें २४ पैकीं २३ उमेदवार (२ सन्मानासह) व नोव्हेंबरमध्यें २१ पैकीं १८ उमेदवार उत्तीर्ण झाले. यंदा सबंध वर्षभर उमेद-वारांचें आरोग्यशिस्त व वर्तणूक चांगली होती.,

मदतः—यंदा मृत्यू पावलेल्या पोलीस शिपायां-च्या ५८ कुटुंबांना मिळून २४६८ रु "पोलीस विधवा-फंडांतून" मदत म्हणून देण्यांत आले.

गुन्हेः—अहवालाचे सालीं दाखल केलेल्या गुन्ह्यांची संख्या १३८५७७ होती. यांपैकीं " कॉग्निझेबल " (वारंटाशिवाय चौकशी करतां येण्यासारखे) गुन्हे २७१११ व वारंटानें चौकशी केलेले गुन्हे (नॉन्–कॉग्निझेबल) १०११९९. १९३२ सालचे हे आंकडे अनुक्रमें १३०७०४ (सर्व गुन्ह्यांची संख्या) ३१०९८, (कॉग्निझेबल) व ८९०२२ (नॉन्–कॉग्निझेबल) असे होते. दाखल केलेल्या गुन्ह्यांचें प्रमाण मागील वर्षापेक्षां पुणें, अहमदनगर, खेडा, पूर्वखानदेश व अहमदाबाद ह्या जिल्ह्यांतून कमी होतें; व सोलापूर व सुरत ह्या जिल्ह्यांतून जास्त होतें. खून, दरोडे, घरफोडी, चोऱ्या वगैरे गुन्ह्यांची संख्या १९३२ सालीं १४०७५ होती ती १९३३ मध्यें १३२१३ इतकीच झाली. खेडा, अहमदाबाद व अहमदनगर ह्या जिल्ह्यांतून दरोडेखोरी व घरफोडीचे गुन्हे बरेच कमी झाल्याचें आढळून आलें. त्याचप्रमाणें पुणें जिल्ह्यांत चोरीचे गुन्हे फारच कमी झाले. लोकसंख्येच्या दरहजारीं मुंबई इलाख्यांत गुन्ह्यांचें प्रमाण १९३२ सालीं १.१९ होतें तें १९३१ मध्यें हें प्रमाण १·२ होतें. हिंदुस्थानांतील इतर प्रान्तांपैकीं ओरिसा व मद्रास ह्या प्रान्तांतच फक्त यापेक्षां कमी म्हणजे १.०१ व ८३. होतें. इतरांत जास्त होतें. मुंबई उपनगर जिल्ह्यांत गुन्ह्यांचें प्रमाण सर्वांत जास्त म्हणजे दर हजारीं ३.९ होतें. १९३२ व १९३३ सालीं अनुक्रमें २६३८५ व २३००२ गुन्ह्यांचा तपास पोलीसांकडून झाला. यांपैकीं इं. पि. खालीं न येणारे गुन्हे अनुक्रमें १०६९४ व ८१९८ होते. पोलिसांना न सांपडलेले गुन्हे १९३२ व १९३३ सालीं अनुक्रमें ७०५९ व ६२०१ होते. न सांपडलेल्या गुन्ह्यांचें एकंदर गुन्ह्यांशीं शें. प्रमाण मुंबई उपनगर जिल्ह्यांत ५४ व पूर्व खानदेशांत ५० होतें; एकंदर शें. २७ होतें. अहवालाचे सालीं पोलिसांनीं भरलेल्या १५९२० खटल्यांपैकीं १५०३२ खटल्यांत आरोपींना शिक्षा झाल्या. १९३२ सालचे हे आंकडे अनुक्रमें १८५३५ व १७६०७ होते. सेशन्स कोर्टामध्यें चाललेल्या ६६३ खटल्यांपैकीं ४८८ चे निकाल लागले. १९३२ मध्यें ७०२ पैकीं ५११ चे निकाल झाले होते. १९३३ व १९३२ सालीं पोलीसांनीं अनुक्रमें २९६९९ व ३७८७८ लोकांना अटक केली. यांपैकीं खटले न होतां ८२३ म्हणजे शें. २.८ इसमांना सोडून देण्यांत आलें; व शें. ७४.८ अपराध्यांना खटले चालून शिक्षा झाल्या. नॉन कॉग्निझेबल गुन्ह्याकरितां १९३३ व १९३२ सालीं अनुक्रमें १५०७७५ व १३६३८२ इसमांना कोर्टापुढें उभे करण्यांत आलें. ८१५६७ इसमांना १९३३ सालीं खटले चालून शिक्षा झाल्या. शिक्षा होणाऱ्यांचें कोर्टापुढें खटले होणाऱ्यांशीं शेंकडा प्रमाण ५४·०९ पडलें. १९३२ मध्यें हें प्रमाण ४८.५९ होतें. १९३३ व १९३२ सालीं ८२९२०८ रु. व ९०८१४१ रु. किंमतीचा माल चोरीस गेला. त्यापैकीं अनुक्रमें २५२२१७ रु. व २७५०२४ रु. किंमतीचा माल सांपडला.

गुन्हेगार जातीः— ह्या वर्षी सुरत, अहमदनगर, नाशिक, बेळगांव, विजापूर, कुलाबा व रत्नागिरी ह्या जिल्ह्यांत इराणी लोकांच्या टोळ्यांनीं बराच त्रास दिला. त्यांच्या पांच पुढाऱ्यांना पकडून, त्यांजवर खटले भरून शिक्षा करण्यांत आल्या. छरा जातीची अहमदाबाद जिल्ह्यांत नडोदा येथें कायम वसाहत करण्यांत आली. अहमदनगर जिल्ह्यांतील हरिगांव येथील फासेपारधी लोकांची वसाहत स्वतंत्र करण्यांत आली व त्यांच्यावरील नियंत्रणें काढून टाकण्यांत आलीं.

निढावलेले गुन्हेगार — यंदा शिक्षा झालेल्या २१४१५ आरोपींपैकीं ३०६४ पूर्वी शिक्षा झालेले व १०६१ निढावलेले गुन्हेगार होते. १९३२ चे हे आंकडे अनुक्रमें २७७२७; २९५७ व ७५१ असे होते. १९३३ च्या १०६१ निढावलेल्या गुन्हेगारांपैकीं ५९ उत्तर भागांतील ( ७५ हून अधिक) व २०२ दक्षिण भागांतील होते.

विशेष कामगिरी :—(१) सांताक्रूझ येथें एका परदेशी इसमानें आपली पहिली बायको व दोन मुली यांचे खून करून त्यांना बंगल्यांत जाळण्याचा प्रयत्न केला. पोलीसांनीं आरोपीस पकडून खटला भरून शिक्षा करविली. (२) नाशिक जिल्ह्यांत सिन्नर तालुक्यांतील चोंडीच्या पाटलाच्या खुनाचा तपास लावून आरोपींस फांशीच्या शिक्षा करविल्या. (३) सोलापूर शहरांतील खोटी नाणीं पाडणारांना पकडून खटले भरले व शिक्षा करविल्या. (४) व्यापाऱ्यांकडून मोठमोठया परदेशी कंपन्यांच्या नांवें आर्डर्स घेऊन मालाऐवजीं विटा भरून पाठवावयाच्या, अशा तऱ्हेचा व्यापार बी. बी. अँन्ड सी. आय्. रेल्वेवर खोटया परदेशी कंपन्यांचे एजंट म्हणून चालविल्याबद्दल दोघां इसमांवर खटले भरून त्यांना शिक्षा करविल्या. (५) लष्करी अधिकारी असल्याचा बहाणा करून व खोटा लष्करी परवाना तयार करून एक खोटी लष्करी तुकडी रेल्वेनें नेण्याचा प्रयत्न केल्याबद्दल भुसावळ येथें पीरजान फकीरशा व त्याचे साथीदार यांजवर खटले भरून शिक्षा करविल्या. (६) केडगांव जवळ इराणी टोळीच्या पांच मुख्यांना पकडून त्यांजवर खटले भरून शिक्षा करविल्या. (७) पश्चिम खानदेशांत शहादा येथें बायकोचा खून करून आत्महत्या करण्याचा प्रयत्न केल्याबद्दल उमार गुमानसिंग परदेशी याजवर खटला भरून शिक्षा करविली. (८) पंचमहाल जिल्ह्यांतील फसवणूकीच्या गुन्ह्याचा तपास लावून आरोपींस शिक्षा करविल्या.

ह्या वर्षीच्या विशेष महत्त्वाच्या गोष्टी :—(१) गोध्रा व पूर्वमहाल तालुक्यांतील भिल्लांचा दंगा पोलीस सुपरिंटेंडंट व सब्डिव्हिजनल मॅजिस्ट्रेट यांना दंग्याच्या ठिकाणीं जाऊन जादा पोलिसांच्या मदतीनें दंगा मोडावा लागला. (२) धुळें येथील गिरणी कामगारांचा संप-संपवाल्यांची बंडखोरी वृत्ति दिसून आल्यामुळें पोलीसांना लाठीमार करावा लागला. (३) नाशिक-त्र्यंबकेश्वर येथील सिंहस्थ पर्वणीची जत्रा. या ठिकाणीं पोलीसांना विशेष त्रास पडला नाहीं. (४) नाशिक येथील गोदावरी नदीचा पूर-पुरांतील माणसें व माल काढण्याच्या बाबतींत पोलीसांनीं पुष्कळ मदत केली. (५) मालेगांव येथील १९३२ मधल्या दंग्यानंतरची जातिवैमनस्याची धुसफूस शमली नव्हती म्हणून १६ सशस्त्र शिपायांची तुकडी तेथें ठेवावी लागली.

२८ जुलै १९३३ रोजीं व्हायसरॉय साहेब पुण्यास आले होते. त्या वेळीं पोलीसांनीं नेहमींप्रमाणें दक्षता ठेविली होती.

कायदेभंगाची चळवळ बहुतेक संपुष्टांत आली होती. या वर्षी फक्त १४४९ इसमांवर खटले झाले. १९३२ मध्यें ८३७९ जणांवर झाले होते.

गुप्त पोलीस खातें:—या खात्यानें १९३३ व १९३२ सालीं अनुक्रमें २१८ व २४१ गुन्ह्यांची चौकशी केली. २१८ पैकीं १९ इतर व १९९ राजकीय व गुप्त स्वरूपाचे असे होते.

इतर कामें:—सार्वजनिक वाहनांना परवाने देणें व त्यांजवर देखरेख ठेवणें; कैद्यांना तुरुंगांतून बाहेर नेणें-आणणें; सरकारी तिजोरींतून पैसे नेणें-आणण्याच्या वेळीं बरोबर जाणें; वगैरे नेहमींची कामें. ह्या वर्षी पोलीसांनीं २१८६२३ समन्स व वारंटें बजावलीं; १०७३ आगी विझविण्यास मदत केली; ७४७३३ बेवारशी कुत्रीं मारलीं; मॅजिस्ट्रेटकडून आलेल्या १०७५ प्रकरणांत चौकशी केली; ३२८९९ बारीक गुन्ह्यांची चौकशी केली; १३३० आत्महत्येच्या प्रकरणांची चौकशी केली; ५७२२ अपघातांची (पैकीं ८४३ रेल्वेंतील) व ४९६ संशयित किंवा आकस्मिक मृत्यूंबद्दल चौकशी केली; लष्करांतील १३ फरारी शिपायांचा तपास केला. ७४६ भयंकर गुन्ह्यांपैकीं ६७५ गुन्ह्यांचे जागीं गॅझेटेड पोलीस ऑफिसर प्रत्यक्ष गेले होते. १९३३ सालीं १०१८० मोटारी रजिस्टर केल्या व १३६९५ मोटार हाक्यांना (परीक्षा घेऊन) मोटार हांकण्याचे परवानें दिले.

निरनिराळया गुन्हेगार जातींबद्दल थोडक्यांत माहिती १९३३ चे शेवटीं गुन्हेगार जाती म्हणून

नोंदलेले ९५६५ लोक होते. १९३२ च्या शेवटीं १९८५८ होते. खेडा जिल्ह्यांतील वाघरी लोकांचीं नांवें काढून टाकून नव्या नियमांप्रमाणें त्यांचें रजिस्ट्रेशन करण्याचें ठरल्यानें ही संख्या कमी झाली आहे. चालू वर्षी २३३५ लोक कायद्या-प्रमाणें नवीन नोंदले गेले. ११६ मेले. १८३४ चीं नांवें वर्तन सुधारलें म्हणून काढून टाकण्यांत आलीं. १०५६३ लोकांचीं नांवें इतर कारणां-करितां काढण्यांत आलीं; यांतच खेडा जिल्ह्यां-तील वाघरी वगैरे लोक येतात. खालील गुन्हेगार जाती प्रमुख असून त्यांची संख्या व शिक्षा होणा-ऱ्यांचें प्रमाण दिलें आहे:—(१) बेरड ४७१ (शें. ५०.७); (२) भामटा रजपूत १९० (शें. ३३.७); (३) भामटा टकारी २०२ (शें. ११.९); (४) भिल्ल १९०० (शें. ६.६) (५) हरिण शिकारी ६९८ (शें. ५.९); (६) कैकाडी १३४ (शें. ८.९); (७) लामाणी १३११ (शें. ३.३); (८) मांगगारुडी ५१२ (शें. १६.६); (९) रामोशी ५९७ (शें ५.२); (१०) सानशी २५० (शें. १६); (११) वाघरी २७७ (शें. ८.७).

---

वऱ्हाड–मध्यप्रांत येथील

## सरकारी कारभाराचें सिंहावलोकन

(वर्ष १९३३–३४)

प्रांताधिपति–१५–९–१९३३ पासून हि. ए. सर एच. सी. गोवॅन बी. ए. (ऑक्स.) के. सी. एस. आय. इ.

प्रांतिक कायदेमंडळ— अहवालाचे सालीं एकूण २४ दिवसांच्या तीन बैठकी झाल्या. सरकारी ठराव–सी. पी. प्राथमिक शिक्षणदुरुस्ती बिल (१९३२), सी. पी. लँड रेव्हिन्यू (चवथें दुरुस्ती) बिल (१९३२), सी. पी. म्युनिसिपॅलिटी (दुरुस्ती) बिल (१९३३), सी. पी. अबकारी (दुरुस्ती) बिल (१९३३), सी. पी. अफू ओढ-ण्याबद्दल (दुरुस्ती) बिल (१९३३), सी. पी. ग्रामपंचायत (दुरुस्ती) बिल (१९३३), खाजगी सावकारींतील व्याजबट्ट्याबद्दलचें (दुरुस्ती) बिल (१९३४). हीं बिलें सिलेक्ट कमिटीकडून आल्यावर कायदेमंडळांत पास झालीं. तसेंच पशुरोग, कोर्ट ऑफ वॉर्डस्, सावकारी–नियंत्रण इरिगेशन, तंबाखू–कर, हिंदु धर्मादाय ट्रस्ट वगैरे, संबंधींचे ठराव लोकमत अजमावण्यासाठीं पाठ-विण्यांत आले. बिनसरकारी ठराव–नागपूर युनिव्हर्सिटी (दुरुस्ती) बिल (१९३२), उद्योग धंद्यास सरकारी मदतीचें बिल, म्युनिसिपालिटी संबंधीं (दुरुस्ती) बिल (१९३२), स्थानिक स्वराज्य (दुरुस्ती) बिल वगैरे ठराव पास झाले. तसेंच अल्पवयस्कांचें धूम्रपान, खेडेगांवांतील स्वच्छता व सामाजिक नियंत्रण, दुय्यम शिक्षण, जमीन मालकी, शेतकऱ्यास मदत वगैरेसंबंधीचे ठराव लोकमत समजून घेण्यासाठीं प्रसिद्ध कर-ण्याचें ठरलें. अनियंत्रित कारखाने, अविभक्त इस्टेटीसंबंधाचीं बिलें फेटाळण्यांत आलीं. प्रांतिक दिवाण–नामदार बी. जी. खापर्डे व नामदार रा ब. के. एस. नायडू एक्झिक्युटिव्ह कौन्सिलर नाम-दार इ. गॉर्डन व नामदार इ. राघवेंद्रराव.

जमीनमहसूलवगैरे–मागणी २२५३१०१० रुपये. पैकीं वसूल २००१६२१० रुपये. मागील वसूल बाकी ५१७७६०५ रु. पैकीं २३४०७६७ रु. वसूल झाले. रयतवारी जमीन बाकी ६५१४८८ रु. पैकीं ५५६३३६ रु. वसूल झाले. सारावसुली-करितां यंदा व गेल्या वर्षी अनुक्रमें १००३९ व ११८६६ दावे लावले. तगाई कर्ज–वर्षाचे सुरु-वातीस १११३६८९३ रु. होतें. यंदा व गेल्या वर्षी अनुक्रमें १६६८२३६ रु. व २०१६३८० रु. कर्ज देण्यांत आलें. यंदा कर्ज व व्याजवसुली अनुक्रमें २०७९२०२ रु. व २४८८३६ रु. झाली. व्याजाचा दर १.३ सर्वसाधारणपणें होता. लागवडीची जमीन ७९१४ एकरांनीं वाढली. दर एकरीं सारा-पट्टी १ रु. २ पै होती. जमीन महसूल खात्याचा अहवाल खंडाचें उत्पन्न-यंदा व गेल्या वर्षी अनुक्रमें १७८३४२०५ रु. व १७९१४७३३ रु. होतें. एकूण रयतवारी जमीन १२३२८६८ एकर. ५८९५९ रु. वसूल येण्याजोगी १९८४७० एकर जमीन पडीत राहिली.

वॉर्ड इस्टेटी एकूण ३२. एकूण उत्पन्न १७५५०००. रु. पैकीं जंगलाचें उत्पन्न २६१००० रु. होतें तें वाढून ३४६००० रु. झालें. खर्च रु. १६२७००० सरकारी व्यवस्थेबद्दल प्रमाण शें. १८.४९ खर्च पोलिस खातें-वर्षाचे सुरवातीस मागील वर्षी पुनःसुरूं झालेली कायदेभंगाची चळवळ बंद पडली. तसेंच खादी-प्रसार, जंगलसत्याग्रह व हरिजनचळवळ यानींही विशेष जोम धरला नाहीं. लोक अन्नाला मोताद नसले तरी त्यांची सांपत्तिक स्थिति निकृष्ट होती. सागर, हुशंगाबाद व अकोला जिल्ह्यांत जातिवैमनस्यें व हरिजन चळवळीमुळें किरकोळ दंगे झाले. नागपूरच्या मॉडेल मिल्समध्यें व वर्ध्याच्या पुलगांव मिल्समध्यें तसेंच अकोला, बडनरा व एलिचपूर येथें गिरणी कामगारांत असंतोषाचें वारें होतें. यंदा व गेल्या वर्षी अनुक्रमें ४३०२१ व ४५०३५ खटले नोंदले गेले. दरोडे व चोरी शें. २५ नीं कमी झाली. एकूण २५७९२ आरोपितांपैकीं १५८५३ स शिक्षा झाल्या. गेल्या वर्षी हे आंकडे अनुक्रमें २६८२० व १६६६३ होते. अहवालाचे सालीं पामगड, जयजयपूर (विलासपूर जिल्हा) व हिंगणी (वर्धा जि०) येथें जादा पोलिस ठेवण्यांत आले. पोलिसांची अधिकृत संख्या यंदा मागील वर्षाप्रमाणेंच होती. पोलिस खात्याकरितां इमारती वगैरेसाठीं अहवालाचे सालीं ९१००० रु. मंजूर झाले. पोलिस अधिकाऱ्यांस बक्षिशी म्हणून २२५९९ रु. वाटण्यांत आले, त्यांपैकीं ११८७६ रु. मॅजिस्ट्रेट व खाजगी लोकांनीं दिले. पोलिस खात्यातर्फे साहाय्याबद्दल खाजगी इसमांस ७९४४ रु. रोख बक्षिस दिले. पोलिसखात्यांत गैरवर्तणुकीबद्दल ४ अधिकारी व १२६ शिपाई बडतर्फ केले व ८१ अधिकारी व ४३१ शिपायांस शिक्षा झाल्या. फौजदारी गुन्हे यंदा व गेल्या वर्षी अनुक्रमें ५०६६९ व ५०५६७ दाखल झाले. दंड झालेल्यांच्या संख्या अनुक्रमें २९४६१ व २९२६७ होत्या, व कैदेच्या व फटक्यांच्या शिक्षा यंदा अनुक्रमें ७२९१ व ५३० आरोपींस झाल्या. दिवाणी दावे-१५११०२ (गेल्या वर्षी १३६९८०). गेल्या वर्षीपेक्षां यंदा निकाल झालेल्या दाव्यांची संख्या शें. १४.९ नें वाढली. याचें कारण कांहीं ठिकाणीं सबजज्जांची संख्या व अधिकार वाढविले हें होय. एकूण १९५५२२ दाव्यांपैकीं एकदशांश दाव्यांचे पूर्ण निकाल झाले. वकिलांची संख्या यंदा व गेल्या वर्षी अनुक्रमें १७६४ व १३६७ होती. कोर्टाचे ताब्यांतील इस्टेटींची संख्या १०४० होती. ग्रामपंचायतींची संख्या ६५ नें वाढली व सर्व ग्रामपंचायतींपुढें एकूण १०२१७ दावे सुनावणीस होते. तुरुंगखातें-एकूण कैदी ५२९९ (१९३२ पेक्षां ६२१ जास्त); तुरुंगांत तयार झालेल्या मालाची किंमत व त्यावरील फायदा अनुक्रमें १७३७७ रु. व ९५८४ रु. होता. खर्च ६४८८५९ रु. गेल्या वर्षी ७०७४३५ रु. काटकसरीमुळें कमी. सैन्यखातें-ऑक्झिलियरी फोर्स-१४ अधिकारी व ५०८ सैनिक; नागपूर युनिव्हर्सिटी ट्रे. कोअर ५ अधिकारी व ३३७ सैनिक. म्युनिसिपालिटया- एकूण ७४; सभा १९८९ पैकीं ३०९ कोरम नसल्यानें तहकूब. उत्पन्न शिलक व कर्जसुद्धां ६५४७००० रु. (पैकीं सरकारी मदत ४४५००० रु.) अबकारी व स्थानिक कर अनुक्रमें ८३५००० रु. व १४९४००० रु. खर्च ६४६९००० रु. नागपूर इंप्रूव्हमेंट ट्रस्टला पैशाच्या अभावीं यंदा कांहीं काम करतां आलें नाहीं. तरीपण सदर ट्रस्टचें एक प्रातिनिधिक मंडळ अलाहाबाद, कानपूर व लखनौ येथील इं. ट्रस्टचें कार्य पाहून आलें. डिस्ट्रिक्ट कौन्सिलें-उत्पन्न रु. ७१३९५२४; मागील शिल्लक २७९३९५४ रु. खर्च ७०१०४६४ रु. शिक्षणाप्रीत्यर्थ इमारतीसुद्धां २८६२१९१ रु. खर्च झाला; त्यापैकीं १००७०७६ रु. सरकारी मदत होती. शाळांची संख्या ३९२८, विद्यार्थी २९२४७७; पैशांच्या कमतरतेमुळें सक्तीच्या प्राथमिक शिक्षणांत मुलींची वाढ झाली नाहीं. आरोग्य खात्याकडे ४२११३१ रु. खर्च झाला. इमारती वगैरेकडे ६९३४१८ रु. खर्च झाला; एकूण डि. कौन्सिलाच्या ताब्यांत असलेल्या १९०१ मैल रस्त्याबद्दल अहवालाचे वर्षी ९१०४१६ रु. खर्च झाला. कोंड

वाडे एकूण १८४८; कोंडवाडा फीचें उत्पन्न ५७६०१७ रु. खर्च ३०५७८४ रु. शेतकी खातें—खर्च ९४६९६७ रु. पैकीं ६३०३५ रु. खास बागांसाठीं. ५१४०५ रु. कापूस व १९१०८ रु. तांदूळ यांचे संशोधनासाठीं झाले. उत्पन्न २३०९०९ रु. ७१६०५८ रुपये खर्चापैकीं ८१११६ रु. इंडियन सेंट्रल कॉटन कमिटी व शेती सुधारणेचें इंपीरियल कौन्सिल ह्या संस्थांकडून देणगी मिळाले होते. शेतकी शिक्षण—पनारखेड शेतकीशाळा—विद्यार्थी ८१; खर्च ७४७४ रु. उत्पन्न २०८१ रु. संशोधन व प्रायोगिक शेती: कापूस तांदूळ वगैरेंची इंपीरियल शेतकी संशोधनमंडळाचें आर्थिक साहाय्यानें होते. खाजगी बीं बियाणें तयार करणारीं १६९३८१२ एकर जमीन होती.यंदा शेतकी खात्यानें १५९५१४ रु. ची शेतीचीं हत्यारें विकलीं. कोऑपरेटिव्ह कर्ज वसुली—सेंट्रल बँकांकडून यंदा व गेल्या वर्षी अनुक्रमें १००३०७६ रु. व १२३०६५४ रु. यंदा कर्जवसुली न झाल्यामुळें २५२५३ एकर जमीन कर्जदारांकडून बिकत घ्यावी लागली. एकूण कर्ज १५३६५९३२ रु. कोऑपरेटिव्ह सोसायटया एकूण ३७९४ सभासद ११४३८९ खेळतें भांडवल ५५४६९९९१ रु. सेंट्रल बँका ३५; खेळतें भांडवल २५२१५६१५ रु. ठेवी—१३०४४३८५ रु. गंगाजळी वगैरे ४२३९५९० रु. निवळ फायदा—३०१७६५ रु. व्याजबाकी २२३१११७ रु. पसतीसपैकीं तेवीस बँकांनीं भागांवर फायदा वाटला नाहीं. रूरलक्रेडिट सोसायटया ३५८९. सभासद ५००४४ खेळतें भांडवल १५२२११७२ रु. कर्ज येणें १२२९८४३४ रु.

पशुवैद्यक खातें—यंदांचे सालीं सांसर्गिक रोगांनीं ३७८०४ गुरें मेलीं. ४,४८,९९३ गुरांना रोगप्रतिबंधक इलाज (इनाक्युलेशन) केले. दवाखाने—१०३, पशुवैद्य १३२.

हवामान पीकपाणी वगैरे—पावसाची सरासरी मध्यप्रांत ५६ इंच; वऱ्हाड ४२.५ इं. गेल्या ६६ वर्षांची सरासरी अनुक्रमें ४८.७ व ३४.२ इंच. पिकें एकूण ४३२३३५ एकर (मध्यप्रांत ४०६२६२ व वऱ्हाड २६०७३ एकर) जमीन गेल्या वर्षीपेक्षां जास्त. पैकीं दोन पिकें निघणारी जमीन शें. ६ प्रमाणांत जास्त. पाऊस यथास्थित झाल्यानें पाटाचे पाण्याखालीं ११४०७८ एकर कमी जमीन (गेल्या वर्षीपेक्षां) यंदा भिजली. तांदूळ—उत्तम. पीक १३.२ आणे (गेल्या वर्षी १३.९ आणे). एकूण उत्पन्न १६५६९०० टन (तांदूळ). ज्वारी १०.९ आणे (गेल्या वर्षी १०.२ आणे). कापूस ऑगस्ट ,सप्टंबर मधील अतिवृष्टीमुळें व आक्टोबरमधील अकल्पित पावसानें बरेंच नुकसान झालें. पीक ८.७ आणे (गेल्या वर्षी ९.२ आणे). एकूण उत्पन्न ७३२७०० गांसडया. जंगलें—क्षेत्रफळ १९६०४ चौरस मैल. जंगलांतील रस्ते—१०१५६ मैल; त्याबद्दल खर्च ११०७३४ रु. रायपूर जंगलांतील ट्रामरस्त्यावर यंदा २३९६९ रु. खर्चाशिवाय मिळाले. जंगलकायद्याविरुद्ध २७०५७ गुन्हे झाले. यंदा २१ आगींनीं ५४९३७ एकर जंगल जाळलें. उत्पन्न एकूण ४४०६०११ रु. पैकीं जंगलसफाईमुळें झालेल्याझाडांची विक्री २३५८३३ रु. व खर्च ३३४३३९९ रु. अबकारी खातें उत्पन्न ५७०८००० रु. (गेल्या वर्षी ५७६१००० रु.) विलायती दारू शें. ३८ टक्के ताडी शें. ९ टक्के व अफू शें. ७ टक्के या प्रमाणांत अबकारीचें उत्पन्न कमी झालें. बेकायदा दारू गाळण्यास बराच आळा बसला. दारूची किंमत शें. १५ प्रमाणांत कमी असूनही आर्थिक दुस्थितीमुळें गेल्या वर्षापेक्षां शें. ३६ टक्के दारू यंदा कमी खपली. अफू:—गेल्या वर्षापेक्षां ४१९ शेर कमी खप दरहजारी यंदा ७ शेर अफू खपली. दहा वर्षांपूर्वी हें प्रमाण २३ शेर होतें. याचें कारण हल्लीं अफूची किंमत फार वाढविली आहे व अफू ओढण्यास प्रतिबंध केला आहे. गांजाची किंमत दर शेरी ५५ रु. वरून ४० रु. केल्यानें खप शें. २१ टक्के वाढला आहे. खाणी ६५. गेल्या सालीं ७२ होत्या. मँगॅनीजच्या सहा खाणी मंदीमुळें बंद पडल्या. कोळशाच्या खाणी यंदा चांगल्या चालल्या. उत्पन्न २४५८८९ रु. यंदा खाणींत १३२ अपघात झाले त्यांपैकीं १२५ विशेष दुखापतीचे होते. त्याबद्दल नुकसानभरपाई म्हणून यंदा ३७११ रु. देण्यांत

आले. कारखाने–संख्या ९५६ (गेल्या वर्षी ९३०) पैकीं चालू ७३५. हंगामी कारखाने ६२२. मजूर ६१६२७. संप ४ झाले; दोन एका आठवड्यांत मिटले. बाकीचे दोन तीन महिनेपर्यंत चालूं होते. अपघात–२८०; ५९ भयंकर. नुकसान भरपाई एकूण २९७५ रु. उद्योगधंदे–विद्युत्शक्ति २७१२५ किलोवॅट. चांदा येथें विद्युत्शक्तीची सोय सुरूं झाली. उद्योगशाळा ३८६; खर्च–३०३१५ रु. पब्लिक वर्क्स खर्च ३२०७००० रु. पैकीं २८०८००० रु. दुरुस्ती. बाकीचा नवीन कामें यांजवर. इमारतीवर खर्च–५८०००० रु. खडीचे रस्ते एकूण–४८६८ मैल; साधे–२२६७ मैल. इरिगेशन खातें पाटाच्या पाण्याखालीं जमीन यंदा ३५१७६८ एकर; गेल्या वर्षी ३८६८२७ एकर. खारंग व महानदी विभागांतील मुदती संपल्यानें पाटाखालील जमिनीचें क्षेत्रफळ यंदा कमी झालें. खर्च २८४७७६ रु. यंदा सर्व महत्त्वाचीं इरिगेशनचीं कामें पुरीं झालीं. उत्पन्न निवळ ९७७००० रु. चालू खर्च ८३६००० रु. महानदी व छत्तीसगड विभागांत शुद्ध बीं तयार करण्याचे प्रयत्न चालूं आहेत. द्रुग जिल्ह्यांत यंदा ५६००० मण सुधारलेले बीं तयार झालें.

जननमरण इत्यादि–जनन–६८६२७० स्त्री–पुरुष जनन प्रमाण १०० स १०५.६; मृत्यु–४११७९९. दर हजारी लोकसंख्येस प्रमाण २६.५. बालमृत्यु–दर हजारीं जननास २००. आतां-पर्यंत सर्वांत हें प्रमाण कमी असल्याचें दिसून येतें. ४८ ठिकाणीं शिशुसप्ताह भरले. मृत्यु-कारणें–सर्व प्रकारचे ताप २३१८५१; कॉलरा २१५२, प्लेग १२००. वैद्यकीय मदत–सरकारी फिरते दवाखाने–३३; ४९५४ खेड्यांत मिळून ८०२७३ रोग्यांस औषधें दिलीं. आरोग्यविषयक ९१५९ व्याख्यानें झालीं. दवाखाने ३२९ (२८ सरकारी; ३०२ स्थानिक कौन्सिलांचे, २८ रेल्वेचे, बाकीचे खाजगी). २९०७४६९ इसमांस औषधपाणी देण्यांत आलें. शस्त्रक्रिया एकूण १०११२८. खात्याचें उत्पन्न–१४८३५०९ रु. (सरकारी मदत ६५७२१५ रु. डि. कौन्सिलांकडून १३२०२४ रु. म्युनिसिपालिट्यांकडून १३४२०६ रु. ) खर्च–१२४२८२१ रु. स्वच्छता–म्युनिसिपालिट्यांस सरकारी मदत–६२१९७ रु. पैकीं ३०००० रु. बालारोग्य व १६५९४ रु. उंदीर मारण्यासाठीं. खेडेगांवांतील स्वच्छता–उत्पन्न २२००६२ रु. खर्च २०७९१५ रु. यंदा ६८८६३१ जणांस देवी टोचल्या. सामान्यतः एक वर्षाखालील शें. ८२ मुलांना (म्युनिसिपल हद्दींतील) देवी टोचण्यांत आल्या. देवीखात्याचा खर्च–१९८९४० रु. पैकीं डि. कौन्सिलकडून १३९७६५ रु. खर्च झाला. नागपूरच्या वेड्यांच्या इस्पितळांत ४६५ वेड्यां-करितां ९६५०९ रु. खर्च झाला. सामान्यतः दर माणशीं दरमहा ६ रु. १२ आ. खर्च आला.

शिक्षणखातें–शिक्षणसंस्था ५७७६ ( गेल्या वर्षी ५६४५ होत्या). विद्यार्थी ४८२७१८ (गेल्या वर्षी ४६८३५१). खर्च रु. १०१७४८०९ (गेल्या वर्षी ९७९२२२० रु.) दर विद्यार्थ्यामागें खर्च २९ रु. १० आ. नागपूर विद्यापीठाच्या शेतकी पदवीधरास एलएल. बी. च्या पदवी परीक्षेस बसण्याची परवानगी देण्यांत आली आहे. तसेंच हिंदी, उर्दू व मराठी भाषांच्या परीक्षा व शिक्षण त्याच भाषांतून देण्याचें ठरविलें. तसेंच पुराण भाषाही मातृभाषांतून हव्या तर शिकवाव्यात व परीक्षा द्याव्यात असें ठरलें. निकृष्ट व जंगली विद्यार्थ्यांस १९४० पर्यंत परीक्षा फी माफ आहे. यंदा युनिव्हर्सिटीच्या सर्व परीक्षांस २२१४ विद्यार्थी बसून त्यांपैकीं १३१९ विद्यार्थी पास झाले. जबलपूर 'येथें हितकारिणी सभेचीं' दोन कॉलेजें विद्यापीठास जोडून घेण्यांत आलीं. नाग-पूर विद्यापीठाचें उत्पन्न १७३७५९ रु. खर्च–१४८३२६ रु. सरकारी मदत ४२५०० रु. शास्त्रीय धंदेशिक्षणाची योजना तयार होत आहे.

कॉलेज विद्यार्थी–२२५०. खर्च ५९८२१४ रु. (सरकारी खर्च–३५४२३३ रु. फीचें उत्पन्न २२६३६१ रु.). दर विद्यार्थ्यामागें वार्षिक खर्च २६६ रु. यंदा एकूण १३ संशोधनात्मक निबंध प्रसिद्ध झाले. हायस्कूल शिक्षण–३५८० विद्यार्थी परीक्षेस बसले. १७१६ पास झाले. हायस्कुलें ६८

विद्यार्थी ८६४९. दुय्यम इंग्रजी शाळा १८९; विद्यार्थी २८०१२खर्च रु. २०५१८१५. दर विद्यार्थ्यामागें खर्च ५६ रु. देशी दुय्यम शाळा ३६७. विद्यार्थी ७१७०१. सक्तीचें प्राथमिक शिक्षण—४५६ ठिकाणीं चालूं होतें. ९४२६८ रु. प्राथमिक शाळा—४२३७; विद्यार्थी ३१२४५५. वऱ्हाडांत उमरावती, बुलढाणा व यवतमाळ जिल्ह्यांत प्राथमिक शिक्षणाची प्रगति विशेष झाली. प्राथमिक शिक्षक—गेल्या वर्षी काटकसरीकरितां शिक्षकांचा पगार $\frac{1}{3}$ नें कमी केला. सागर जिल्ह्यांत व इतर कांहीं ठिकाणीं शिक्षकांना दरमहा दहा रुपये पगार मिळतो. स्त्री-शिक्षण:—मुलींच्या शाळा ५१२. मुली ४१८५४(गेल्या वर्षी हे आंकडे अनुक्रमें ४८५ व ३९०११ होते). कॉलेजांत गेल्या वर्षी व यंदा अनुक्रमें ५० व ७३ स्त्री विद्यार्थिनी होत्या. दुय्यम इंग्रजी शिक्षण—२३ शाळा १५८५ मुली. देशी दुय्यम शाळा—३९ मुली ५१२४. प्राथमिक शाळा—४३५. पैकीं २५३ सरकारी. मुली—३३९४४; एकूण मुली (मुलांच्या शाळांतील धरून) ६६७४९ (गेल्या वर्षी ६०६५३); पैकीं पहिलींत ३६२३४ मुली. स्त्रीशिक्षण संस्था—दुय्यम १; शिक्षक १८ प्राथमिक—८ (पैकीं ५ मिशनच्या); शिक्षक (शिक्षण घेत असलेले) ३४५. मुसलमानांचें शिक्षण—एकूण विद्यार्थी ५१३०९ पैकीं कॉलेजमध्यें २०३.निकृष्ट जातींचें शिक्षण—विद्यार्थी ५१७९५गेल्या वर्षी ४८२७८). पैकीं ४६४४६ मुलगे व ३४१९ मुली म्ह. शें. ९० चे वर प्राथमिक शिक्षण घेत आहेत. स्पेन्स ट्रेनिंग कॉलेज, जबलपूर—२६ पदवीधर व ८० इतर विद्यार्थी अध्यापन शिक्षण घेत होते. त्यांपैकीं अनुक्रमें ८ व ७ बिनशिष्यवृत्तीचे होते. शिष्यवृत्ती अनुक्रमें ३५ ची २५ रु. व ३० ची २० रु. करण्यांत आली आहे. यंदा २२ बी. टी. व ३४ ट्रेंड टीचर झाले. नॉर्मल स्कूल्स—८ खर्च २१०३६७ रु. दर विद्यार्थ्यामागें खर्च २७८ रु. १२ आ. ३२२ प्राथमिक व ९२ दुय्यम ट्रेंड शिक्षक झाले. बालवीर—संख्या ३३७०२(२०४८ अधिकारी; १४७२ रोव्हर, १६५७२ स्काऊट, १३६१० कब्स "चिमखडे" बालवीर). नागपूरच्या सरकारी इंजिनियरिंग कॉलेजमध्यें १२५ विद्यार्थी होते. प्रकाशन—१५५ पैकीं ६९ मराठी, ४१ हिंदी, २१ इंग्रजी. ५० शैक्षणिक वर्तमानपत्रें व नियतकालिकें—६३ (यंदा २३ नवीन सुरू झालीं). विज्ञान व वाङ्मय संस्था—१६१ (११६ खाजगी).

नोंदणी खातें—११६१५१ कागद नोंदले. शें. ९ वाढ. त्यांची एकूण किंमत ६७८७९४६४ रु. (शें. ८.५ वाढ) जमिनीच्या किंमती हळुहळू वाढत आहेत. खात्याचें उत्पन्न— ५२२६०३ रु. (शें. ६ वाढ). खर्च जातां निव्वळ उत्पन्न ३५९००६ रु. उत्पन्नाशीं खर्चाचें प्रमाण शें. ३५. खर्च—१८४२२९ रु.

प्रांतिक उत्पन्न—कंसांतील आंकडे मागील वर्षाचे आहेत. ७२४८६७८३ रु. (६९४०१३९२ रु.) पैकीं हिंदुस्थान सरकारकडून ३५६१८९८ रु (४३७७७७३ रुपये). खर्च—७५६९२५१८ रु. (७०७४९७६३ रु. ) हिं. सरकार ६२६३७११ रु. (६५१२१०३ रु. ) उत्पन्नाचीं महत्त्वाचीं अंगें—हिं. सरकारकडून उत्पन्नावरील कर ३४५३८२९ रु. (३८५३४२२ रु.) हिं. सरकारास व्याजाबद्दल १५२३१५७ रु. (१७४५९०८). पेन्शनें—३५५९०० रु. (३७६७०८ रु.) किरकोळ बाबी २५ लाख.

प्रांतिक उत्पन्नाचीं उपांगें—जमीनमहसूल—२२४१६४२३ रु. (२४४६६५४८ रु.) अबकारी ५७०३८५९ रु. (५७६०५५२ रु.); स्टॅंप्स ५८०२९६७ रु. (५७२२७६५ रु.); जंगल ४४०६०१२ रु. (४२९०१६८ रु.); दुष्काळ फंड २७३७२९९ रु. (१२५८२३२ रु. ); प्रांतिक कर्जें वसूल आगाऊ ६१०९००० रु. (३२९००००)

प्रांतिक खर्चाचीं उपांगें—जमीन महसूल खातें १७९८४७७ रु. (१८८९२७३ रु.); अबकारी खातें १०००३१२ रु. (८१२२६५ रु. जंगलखातें ३३६९८६७ रु. (३२४८८२१ रु.) चालू महत्वाच्या कामावरील कर्जाबद्दल व्याज ३१०४६९९ रु. प्रांतिक कारभार ६२४२१८० रु. न्यायखातें २५६८६९९ रु. पोलिसखातें ५७२७७१६ रु.

शिक्षण खातें ४८९१८९१ रु. (४६७७४८८ रु.). शेतकी खातें-१४४९८१४ रु. सिव्हिल वर्क्स ५२८६७६७ रु. (५११७३३० रु.) पेन्शनें वगैरे २९२०८९४ रु. (२६८०८६९ रु.); दुष्काळफंड २८०३९४१ रु. (११४८१२१ रु.)-

## विमाखातें १९३३.

(हिंदुस्थानसरकारचे विमागणक श्री. मुकर्जी यांनीं प्रसिद्ध केलेल्या वार्षिक अहवालावरून).

इंडियन लाईफ ॲशुअरन्स कंपनीच्या १९१२ च्या कायद्यान्वयें, व इंडियन इन्शुरन्स कंपनीच्या १९२८ च्या कायद्यान्वयें नोंदलेल्या विमा कंपन्यांची संख्या ३१९ आहे. ह्यांपैकीं १६९ हिंदुस्थानांत (६८ मुंबई इलाखा, ३१ बंगाल, २६ मद्रास, १९ पंजाब व बाकीच्या इतर प्रांतांत) व १५० हिंदुस्थानाबाहेर स्थापन झालेल्या आहेत. ह्या १५० पैकीं ७१ युनायटेड किंगडम्मध्यें (ब्रिटिश बेटांत), ३१ ब्रिटिश साम्राज्यांत व वसाहतींत, १८ युरोपखंडांत, १६ युनायटेड स्टेटस् (अमेरिका), ९ जपानांत व ५ जावा बेटांत स्थापन झालेल्या आहेत. हिंदी कंपन्यांपैकीं १२४ फक्त आयुष्याच्या विम्याचा व्यवहार करतात, उरलेल्या ४५ पैकीं, १६ आयुष्येतर विम्याचें काम करितात व २९ दोन्ही कामें करतात. ह्याच्या उलट 'हिंदीतर' १५० विमा कंपन्यांपैकीं १२६ कंपन्या आयुष्येतर विम्याचें, ११ फक्त आयुष्य विम्याचें व १३ दोन्ही कामें करतात (ह्यावरून हिंदीतर कंपन्यांचा व्यवहार व्यापारास व उद्योगधंद्यास जास्त उपयुक्त आहे असें दिसतें). १९३२ चा अहवाल प्रसिद्ध झाल्यानंतरच्या वर्षांत ३० नवीन हिंदी कंपन्या (८ मुंबई इ., ५ बंगाल, ४ मद्रास, ४ पंजाब, ३ बिहार-ओरिसा इ.) निघाल्या. कांहीं २५ वर्षांपेक्षां जास्त काळ चालू असलेल्या जुन्या कंपन्या सोडल्या तर दहा वर्षें काम करून सुद्धां भागीदारांस मुळींच फायदा न वाटलेल्या बऱ्याच कंपन्या आहेत. गेल्या चार वर्षांत ६४ नवीन आयुष्याच्या विमाकंपन्या स्थापल्या गेल्या. नवीन कंपन्यामुळें विमाकंपन्यांत भयंकर चढाओढ सुरू होते व सुरुवातीच्या खर्चांतच बहुतेकांचें भांडवल खलास होतें. अलीकडे तीन वर्षांपेक्षां जास्त काळ योग्य काम करतां न आल्यानें पांच विमा कंपन्यांनीं दिवाळें काढलें. ह्यावरून नवीन विमा कंपन्या काढणें इष्ट नाहीं हें दिसून येतें. १९३२ त आयुष्य-विमा उतरणाऱ्या कंपन्यांचा (विभागणी योजनेअन्वयें व्यवहार करणाऱ्या कंपन्या सोडून) नवीन व्यवहार १३९००० पॉलिसी मिळून २७¾ कोटी रुपयांचा झाला; त्यांचें प्रिमियमचें उत्पन्न दीड कोटी रुपयांचें होतें. वरीलपैकीं हिंदी कंपन्यांचा व्यवहार १,१३००० पॉलिसी, १९ कोटी रु. किंमत व एक कोटी प्रिमियम उत्पन्नाचा झाला ब्रिटिश कंपन्यांनीं ३.४कोटी रु. ब्रिटिश साम्राज्य व वसाहतींतील कंपन्यांनीं ५ कोटी व एका जर्मन कंपनीनें ४० लाखांचा व्यवहार केला. वरील नवीन व्यवहारांपैकीं हिंदी कंपन्यांची दर पॉलिसीची सरासरी १६७४ रु. व हिंदीतर कंपन्यांची ३३७६ रु. होती. १९३२ चे अखेर सर्व कंपन्यांच्या १७८ कोटी रुपये किंमतीच्या ७७४००० पॉलिसी चालू होत्या व त्यांचें प्रिमियम उत्पन्न नऊ कोटी रुपयांचें होतें. ह्यांपैकीं हिंदी कंपन्यांचा व्यवहार असाः- ५५४००० पॉलिसी, १०२ कोटी रु.किंमत व पावणेपांच कोटी रुपये प्रिमियम (हप्त्यांचें) उत्पन्न. अहवालाचे सालीं वार्षिक वेतन (ॲन्युइटी) व्यवहार ७९००० हजारांचा (१६००० हिंदी ६३००० हिंदीतर) झाला. सालअखेर अन्युइटी चार लाखांच्या (पैकीं हिंदी १६०००० रु. च्या) चालू होत्या. इंडियन लाइफ ऑफिसें-१५३. पैकीं ११६ प्रोप्रायटरी व ३७ म्युच्युअल. म्युच्युअल ३७पैकीं १७, १९१२ पूर्वी व २० नंतर. व प्रोप्रायटरीपैकीं १९१२ पूर्वी १७ व नंतर ९९ स्थापिलीं. हिंदी विमाकंपन्यांचा ब्रि. पूर्व आफ्रिका व पौर्वात्य देश (इराण वगैरे) हिंदुस्थान बाहेरचा विमा व्यवहार ७२ लक्ष रुपयांचा.हप्त्यांचें उत्पन्न सव्वा चार लाख रु.१९३२ अखेर चालू असलेले विमे ४ कोटी २० लक्ष रु किंमतीचे, हप्त्यांचें उत्पन्न २१॥ लाखांचें. हिंदी

कंपन्यांची प्रगति: कंसांतील आंकडे एकूण चालू विम्याचे आहेत.–नवीन व्यवहार १९२३–५८५ लक्ष रु. (३९ कोट रु.) १९३१–१७७६ लक्ष रु. (९८ कोट रु.), १९३२ अखेर–१९६६ लक्ष रु. (१०६ कोट रुपये). हिंदी विमा कंपन्यांची १९१२च्या कायद्यान्वयें १,१२,४९,००० रु.किंमतीचे (दर्शनी) सरकारी रोखे घेतले आहेत. वार्षिक हप्त्याचें उत्पन्न–१९२३–२४९ लक्ष रु. १९३१–५८७ लक्ष रु. १९३२ अखेर ६८८ लक्ष रु. लाइफ फंड –२५ कोट रु. (१९३२ मध्यें २.६ कोटींची वाढ झाली). ह्यावर व्याज सरासरी शें. ५.६ टक्के मिळालें.

विमागणकाकडून तपासून आलेल्या ५६ विमा कंपन्यांच्या व्यवहारांवरून असें दिसतें कीं ४८ कंपन्यांच्या जमेंत वाढ असून, ८ कंपन्यांना तूट आली. एकूण वाढ २६३ लक्ष रु. (वाटणी–२२८ लक्ष रु. विमेदारांना व २० लक्ष रु. भागीदारांना).

पोस्टल विमाखातें–१८८३ पासून सरकारनें पोस्ट खात्यांतील लोकांकरितां सुरू केलें. पण सध्यां सर्व मुलकी (सिव्हिल) नोकरांस त्याचा फायदा घेतां येतो. १९३२ व १९३३ चे अनुक्रमें आकडे–पॉलिसी संख्या ६४८४ व ४२१५ विमा किंमत ९८१५००० रु. व ८११७००० रु. हप्त्यांचें उत्पन्न ४२८००० व ३८०००० रु. एकूण चालू पॉलिसी संख्या ८३१६५ व ८४७२६ त्यांची किंमत अनुक्रमें १५८८८९००० रु. व १६२४३९००० रु. एकूण उत्पन्न ८११३८००० रु. व ८४२४००० रु. लाइफ फंड ४९१४७००० रु. व ५३९००००० रु. १९३२ मार्च अखेर व्हॅल्युएशनप्रमाणें सरप्लस–७४ लक्ष रु.पैकीं ४७॥ लक्ष रु. विमेदारांस द. सा. द. शें. १.२ दरानें बोनस म्हणून वाटलें.

आयुष्येतर (आग, अपघात, मरीन वगैरे) विमा व्यवहार–अडीच कोटी रुपयांचें प्रिमियम उत्पन्न. पैकीं हिंदी कंपन्यांचे ६६ लक्ष रुपयांचें; व हिंदीतर कंपन्यांचें १८१ लक्ष रुपयांचें. उत्पन्नाचीं उपांगें–हिंदी आग २८॥ लक्ष रु., मरीन–७॥ लक्ष रु. व इतर ५८ लक्ष रु. हिंदीतर कंपन्या-आग ९७॥ लक्ष रु.मरीन ३६॥ लक्ष रु. व इतर ४७, लक्ष रु. हिंदीतर कंपन्यांत ब्रिटिश बेटांतील कंपन्यांचें उत्पन्न १२३॥ लक्ष रु. साम्राज्य व वसाहतींतील कंपन्यांचे ३८ लक्ष रु. अमेरिकन संयुक्त संस्थानें १३ लक्ष व बाकीचें इतर. अशी विभागणी आहे. हिंदी कंपन्यांचा हिंदुस्थानाबाहेर आयुष्येतर विम्याचा अजमासें एक कोटी रु. प्रिमियम उत्पन्नाचा व्यवहार यंदा झाला.

हिंदी कंपन्यांचा व्यवहार––३१.६६ कोट रुपये जमा. पैकीं २१.८ कोट रु. किंमतीचे रोखें (सर्व प्रकारचे) आहेत. गहाणावर वगैरे कर्जाऊ येणें–४.६ कोट रु. हिंदुस्थानाबाहेर रोख्यांत गुंतविलेले ६० लक्ष रु.

हिंदीतर कंपन्यांचा हिंदुस्थानांतील व्यवहार एकूण जमा अजमासें ३८ कोट रु. पैकीं ३२.२ कोट रु. ब्रिटिश बेटांतील विमा कंपन्यांचे आहेत. वरील ३८ कोटी पैकीं ३४ कोट रुपये हिंदुस्थानांतच सर्व प्रकारच्या विम्यांमुळें जमा आहेत.

प्रॉव्हिडंट विमा सोसायट्या–३६९. बहुतेक विभागणी योजनेप्रमाणें व्यवहार करतात. प्रांतवारी बंगाल २२१, मुंबई ५०, मद्रास ६१, बाकीच्या इतर प्रांतांत. सदर ३६९ पैकीं ७४ आयुष्य–विम्याचें (इतर विमा कंपन्याप्रमाणें) व २९५ विभागणी योजना वगैरे पद्धतीचें विम्याचें काम करतात.

कांहीं प्रमुख महाराष्ट्रीय व महाराष्ट्रांत विशेषेंकरून व्यवहार करणाऱ्या काहीं हिंदी विमा कंपन्यांचा १९३२ अखेर संपणाऱ्या वर्षांत पुढील प्रमाणें आयुष्य–विम्याचा व्यवहार झाला.रुपयांचे आंकडे हजारांचे आहेत. (कोष्टक कॉ. ३ ते ६)

| विमा कंपनीचें नांव | यंदा पॉलिसी दिल्या | (२) मधील पॉलिसींची किंमत रु. | नवीन वार्षिक प्रिमियमच्या उत्पन्नांत वाढ रुपये | यंदा मृत्यूबद्दल रक्कम दिला रुपये | मुदत संपल्या-मुळें रक्कम दिली रुपये | डिव्हिडंड शें. टक्के जाहीर झाला १९३२ |
|---|---|---|---|---|---|---|
| भारत, लाहोर | ३३१५ | ४७६२ | २८३ | ३६८ | ५१० | १५ |
| बॉंबे म्युच्युअल, मुंबई | ४५२३ | ७२७८ | २७४ | २२२ | ४३ | ० |
| बॉंबे लाईफ, मुंबई | ३०८७ | ५६४३ | ३०२ | २५० | ८४ | ८ |
| कॉमनवेल्थ, पुणें | ८८५ | ९५८ | ५० | ४११ | ० | ६ |
| एंपायर ऑफ् इंडिया, मुंबई | ५९३० | १०३७६ | ५३५ | १०३६ | २१०० | ४९३ |
| हिंदुस्थान कोऑप. कलकत्ता | ८७८३ | १४१७३ | ६७२ | ४७५ | ३७७ | ० |
| न्यू इंडिया, मुंबई | ३८१६ | ७९९० | ५५३ | ३१ | ० | ० |
| ओरिएंटल, मुंबई | २८१९३ | ५४४१३ | २९१४ | ३९७६ | ४५२८ | ३७॥ |
| वेस्टर्न इंडिया, सातारा | ३०५१ | ३६४९ | १५६ | ११९ | ५० | १० |
| झेनिथ, मुंबई | ११८६ | २३२४ | १२९ | ८५ | ५० | ७॥ |

## शिक्षण.

(मुंबई इलाख्याचा १९३३–३४ चा सरकारी अहवाल).

एकंदर शिक्षण संस्था–१५६७४ सरकारमान्य, व १०५६ मान्य नसलेल्या मिळून एकूण १६७३०. मागील वर्षीं १९३१–३२ पेक्षां २८८ संस्था कमी होत्या; यंदा मागील वर्षापेक्षां १४१ कमी होत्या. सरकारमान्य १५६७४ संस्थांची वर्गवारी–(१) १३७५० पुरुषांकरितां व १९२४ स्त्रियांकरितां. (२) १८ आर्टस् कॉलेजें, ११ धंदेशिक्षणाचीं कॉलेजें, ७१४ दुय्यम शाळा, १४६१६ प्राथमिक शाळा, व ३१४ विशिष्ट शाळा. यंदा आर्टस् कॉलेजें दोन व दुय्यम शाळा २८ जास्त झाल्या तर प्राथमिक व विशिष्ट शाळा अनुक्रमें ७८ व ३५ कमी झाल्या. शाळा बंद होण्याचें मुख्य कारण विद्यार्थ्यांच्या संख्या कमी झाल्यानें स्थानिक बोर्डांस शाळा परवडत नाहींत.

इलाख्यांतील २६८५९ शहरीं व खेडेगावां-पैकीं १०६५९ गांवीं (गेल्या वर्षीं १०७६३) शाळा होत्या. साधारणतः दर साडेअकरा चौरस मैलांस एक असें शाळांचें प्रमाण आहे. विद्यार्थी संख्या–१३७४२९६ (४२२०९ नी वाढ) पैकीं १३३२५२४ सरकारमान्य व ४१७७२ इतर शिक्षण संस्थांतील. वर्गवारी १०२५९२८ मुलें, व ३०६५९६ मुली. इलाख्याच्या एकूण लोक-संख्येशीं शेंकडा प्रमाण ६.११ (गेल्या वर्षीं ५.९५ होतें). गेल्या वर्षापेक्षां वाढ–१९२४४ मुलें व १५०८८ मुली.

जातवारी–कंसांतील आंकडे गत वर्षाबद्दलचे आहेत (१) हिंदु (अ) पुढारलेले वर्ग ३२२९३३ शें. प्रमाण २४.२ (३०९८६६, शें. प्रमाण २३.९) (ब) मध्यम वर्ग ५३६६३९ शें. ४०.३ (५२२०३४ शें. ४०.२ ); (क) मागास-लेले वर्ग १३८३१४ शें. १०.४ (१३४३३० शें. १०.३) एकूण हिंदु ९९७८८६ शें. ७४.९ (९६६२३० शें. ७४.४ ); (२) मुसल-मान २३५५४८ शें. १७.७ टक्के (२३४१४६ शें. १८.१); (३) युरोपियन अँग्लो इंडि-यन ५५४० शें. ०.४ (५४८९ शें. ०.४ (४) हिंदी ख्रिस्ती–३९३४१ शें. २.९

( ३९०७० शें. ३ ); (५) पारशी–१८२६६ शें. १.४ (१७९०३ शें. १.४ ); (६) इतर सर्व जाती ३५९४३ शें. २.७ (३५३५४ शें. २.७); एकूण १३३२५२४ (१२९८१९२).

खर्च–एकूण ३९८०९६१० रुपये (१९३२-३३ सालीं रु. ३८१७१८४६ ) सदर खर्चाची तरतूद पुढीलप्रमाणें झाली. (१) सरकारी रु. १७६१७१६८ म्हणजे शें. ४४.२ (गेल्या वर्षी शें. ४४.४ ); (२) स्थानिक बोर्डाकडून रु. ७७१२३२८ म्हणजे शें. १९.४ (गेल्या वर्षी शें. १८.९ ) (३) फीचें उत्पन्न रु. ९२२३४९४ म्हणजे शें. २३.२ टक्के (गेल्या वर्षी शें. २२.२ टक्के) (४) इतर ५२५६६२० रु. म्हणजे शें. १३.२ (गेल्या वर्षी शें. १४.५).

सरकारी खर्च कोठें कसा झाला तें–(१) मुंबई विद्यापीठ व उच्चशिक्षण १०४२३१६ रु. शें. ५.९ (गेल्या वर्षी १०९९३०१ रु. शें. ६.५); (२) दुय्यम शिक्षण–२१३२७०७ रु. शें. १२.१ गेल्या वर्षी २११६७०० रु. शें. १२.५ (३) प्राथमिक शिक्षण–रु. १०९६७९५० शें. ६२.३; (गेल्या वर्षी १०३५९११२ रु. शें. ६१.१) (४) शिक्षण १०१४३०७ रु. शें. ५.७ (गेल्य वर्षी ९८९९०१ रु. शें. ५.८); (५) देखरेख व तपासणी–१३२१९७६ रु. शें. ७.५. (गेल्या वर्षी १२८५६११ रु. शें. ७.६) (६) इमारती १६४३४७ रु. शें. १ (गेल्या वर्षी १३५७०९ रु. शें. ०.८); (७) इतर किरकोळ ९७३५६५ रु. शें. ५. ५ (गेल्या वर्षी ९६४३२७ रु. शें. ५.७) याशिवाय इंग्लंडमध्यें ११७१६१ रु. खर्च सरकारनें केला. १९३३–३४ मधील महत्वाच्या गोष्टी (१) १९३४ मार्चमध्यें पुण्याचें डेक्कन कॉलेज बंद करण्यांत आलें. (२) दि लिंगराज कॉलेज, बेळगांव व चेलासिंग व शीतळदास कॉलेज शिकारपूर व साइक्स लॉ कॉलेज-कोल्हापूर हीं कॉलेजें मुंबई विद्यापीठांत सुरूं झालीं (३) १९३३ च्या जुलै महिन्यांत पुणें येथें सरकारनें भरविलेली प्रांतिक विद्यापीठविषयक–विशेषतः महाराष्ट्र विद्यापीठाच्या स्थापनेची मागणी संबंधीं बोलाविलेली–परिषद. (४) ग्रामसुधारणेची योजना सरकारनें सुरूं केली. (५) पुणें येथील डिप्रेस्ड क्लासेस होस्टेल (सरकारी निकृष्ट जाती करितां वसतिगृह) व त्यांना मदत करण्याचें काम, तसेंच रेफर्मेटरी (अल्प वयस्क बंदिशाळा) स्कूल्स् शिक्षण खात्याकडून काढन सरकारनें निकृष्ट जातीकरितां नेमलेल्या अधिकाऱ्याकडे देण्यात आलीं.

शिक्षण खातें–सरकारी नोकर १४८९; प्राथमिक शाळांतील शिक्षक १६९; अखिल भारतीय सरकारी शिक्षण खात्यांतील कायम ३० अधिकाऱ्यांपैकीं १९ हिंदी व ११ युरोपिअन होते. मुंबई प्रांतिक खात्यांतील १८ अधिकारी सर्व हिंदी होते. शाळांवर देखरेखीचा सर्व खर्च सरकारनें केला. शाळा तपासणीच्या ११६६२५९ रु. सरकारी खर्चापैकीं ५३८५३९ रु. सरकारी तपासकांचा खर्च व बाकीचे स्थानिक बोर्डस् तपासणीकरतां मदत म्हणून दिले. चालूं सालीं सरकारी शिक्षणखात्यांतील नवीन नोकरांचे कमी केलेले पगाराचे दर सुरू केले.

मुंबई विद्यापीठ–२२ आर्टस् कॉलेजें व १२ धंदेशिक्षणाचीं कॉलेजें विद्यापीठास जोडलेलीं आहेत. एकूण कॉलेज विद्यार्थी १६४३० गेल्या वर्षी १५३०६ होते. ब्रिटिश हद्दींतील कॉलेजांतील १३६३७ विद्यार्थ्यांपैकीं १०४०९ आर्टस् व ३२२८ धंदेशिक्षणाच्या कॉलेजांत होते. स्त्री–विद्यार्थिनी १११६ (१५० नीं वाढ) ९७५० आर्टस् कॉलेजांत, ११४१ धंदेशिक्षण कॉलेजांत.

विद्यापीठाचा जमाखर्च–जमा १२८६३६३ रु. खर्च ११०११६२ रु. गेल्या वर्षी अनुक्रमें १२५०८४० रु. व ९२३७४० रु. सरकारी मदत ११७००० रु. काटकसरीकरितां विद्यापीठाच्या माहिती-कचेरी (इन्फर्मेशन ब्यूरो) ची सरकारी वार्षिक ५००० ची देणगी यंदापासून बंद करण्यांत आली. १९३३–३४ चे परीक्षांचे निकाल–एम्. ए. १७९ पैकीं ११४ उत्तीर्ण; बी. ए. १५७९ पैकीं १०६८ उत्तीर्ण; एम्.एस्.सी. ४२ पैकीं ३१ उत्तीर्ण. बी. एस्सी. ५७८ पैकीं ३९६ उत्तीर्ण; इटर

आर्टस् २६०३ पैकीं १५४८ उत्तीर्ण; इंटर सायन्स १७४४ पैकीं ८००; मॅट्रिक्युलेशन १८४३६ पैकीं ८७४७ उत्तीर्ण; सर्व कॉलेजांतील प्रथम-वर्ष परीक्षा ५०६५ पैकीं ३५३६.

पदवीपरीक्षेनंतरचें उच्च शिक्षण हा विद्यापीठापुढील अत्यंत महत्त्वाचा विषय असून, अहवालाचे सालीं सिंडिकेटच्या सभासदांची एक समिति मुंबई बाहेरील शिक्षणकेंद्रीं सदर शिक्षणाची चांगली सोय कशी करतां येईल याबद्दलची चौकशी करीत आहे.

मुंबई विद्यापीठानें चालविलेली अर्थ व समाज-शास्त्र-शिक्षण संस्था—विद्यार्थी ६५; पैकीं २३ संशोधन करितात. यंदा ११ विद्यार्थ्यांनीं एम्. ए. करितां निबंध लिहिले, त्यांपैकीं ९ पहिल्या वर्गात व २ नुसते उत्तीर्ण झाले. १७ विद्यार्थी एम्. ए. परीक्षेस बसले त्यांपैकीं १३ उत्तीर्ण झाले.

यंदा सर्वांत महत्त्वाची गोष्ट म्हटली म्हणजे विद्यापीठानें मुंबईस सुरू केलेली रासायनिक धंदे-शिक्षणाची सोय. सदर संस्थेकरितां सरकारनें मुंबईच्या रॉयल इन्स्टिटयूटमधील एक भाग दिला असून सदर संस्थेमुळें उद्योगधंद्यास शास्त्रीय शिक्षणाची जोड मिळाल्यानें बरीच मदत होईल असें वाटतें.

लष्करी शिक्षण—यंदा यू. टी. सी. मध्यें अधिकारी व रिक्रूट वगैरे मिळून लष्करी शिक्षण घेणाऱ्यांची संख्या ११२० होती; त्यापैकीं यंदा नवीन ४६२ जणांची भरती झाली. चिंचवड येथील वार्षिक कँपला ६६४ लोक हजर होते. सर्व कंपनींतून पूर्ण भरती होती यावरून लष्करी शिक्षणाची आवड बरीच आहे हें दिसून येईल. यू. टी. सींत कमींत कमी तीन वर्षें असणाऱ्याकरितां मुंबई विद्यापीठांत लष्करी शिक्षणाची सर्टिफिकेट परीक्षा खास लष्करी अधिकाऱ्यांकडून घ्यावी व अशा तऱ्हेनें लष्करी शिक्षणाचा विद्यापीठाचे अभ्यासक्रमांत समावेश व्हावा अशा योजनेचा सध्यां विचार चालू आहे.

प्रांतिक विद्यापीठाविषयींची परिषद:— पुणें मुक्कामीं नामदार गव्हर्नर व शिक्षणमंत्री यांचेशीं विचारविनिमय करण्याकरितां श्री. जयकर यांचे पुढाकारानें महाराष्ट्रांतील अनेक शिक्षणतज्ज्ञ व शिष्ट मंडळी यांचेसह भरली होती. तींत प्रांतिक विद्यापीठें स्थापन होण्याविरुद्ध एकंदर मत दिसलें, तसेंच युनिटरी किंवा रेसिडेन्शिअल विद्यापीठाकडे बराच कल दिसला. परंतु त्याबद्दल फारसा विचार झाला नाहीं. त्यामुळें महाराष्ट्र विद्यापीठ स्थापनेविषयींचा विचार तहकूब ठेवावा लागला.

विद्यापीठाची शिक्षणविषयक माहिती-कचेरी:— ब्रिटिश बेटांत शिक्षणासाठीं जाणाऱ्या विद्यार्थ्यांचे गेल्या वर्षी ७१ व यंदा ११९ अर्ज आले. परदेशच्या शिक्षणसंस्थांचीं माहितीपत्रकें वगैरे २९९१ कचेरींत यंदा होतीं. यंदा परदेशी शिक्षणाबद्दल १७९८ चौकशीपत्रें कचेरींत आलीं. ह्यावरून कचेरीची उपयुक्तता दिसून येते. व्यायाम, आरोग्य, वैद्यकीय तपासणी वगैरे शारीरिक शिक्षणाबद्दल १९३३ च्या नोव्हेंबरमध्यें विद्यापीठानें भरविलेल्या परिषदेंत पुढील महत्त्वाचे ठराव पास झाले (१) विद्यापीठास जोडलेल्या प्रत्येक कॉलेजांत शारीरिक शिक्षणाची सिंडिकेटनें मान्य केलेली अशी योजना चालू करावी; (२) ह्याबाबत विद्यापीठानें एक 'शारीरिक शिक्षण समिती' कायम करावी; (३) शारीरिक शिक्षण पद्धति प्रत्येक कॉलेजानें सोयीप्रमाणें ठेवण्यास मुभा असावी; (४) प्रत्येक कॉलेजच्या मुख्याध्यापकांनीं कॉलेजांत चालू ठेवलेल्या शारीरिक शिक्षणाबद्दल वार्षिक अहवाल कळवावे.

इतर— विद्यापीठापुढें यंदा असलेल्या दोन महत्त्वाच्या गोष्टी म्हणजे मॅट्रिक्युलेशन परीक्षा व आर्टस् व सायन्स अभ्यासक्रम वेगवेगळे ठेवणें. मॅट्रिकच्या परीक्षेच्या बाबतींत अभ्यासक्रम सोपे करण्याचे यत्न होऊन विद्यापीठानें त्याप्रमाणें योजनाही केली आहे.

कॉलेज शिक्षण—आर्टस् कॉलेजें २२; विद्यार्थी १०४०९ (८११ नें वाढ) पैकीं ९६५ विद्यार्थिनी (१३७ नें वाढ); सरकारी कॉलेजांत २४९०, खाजगी कॉलेजांत ७९१९. विद्यार्थ्यांची

जातवारी: हिंदु पुढारलेले ६७७९ (४३४ नीं वाढ); हिंदु मध्यम ८५९ (१३९ नें वाढ); मागासलेले हिंदु ८१; पारशी १०१० (११० नें वाढ); मुसलमान ६१९ (४५ नें वाढ); हिंदी ख्रिस्ती ५२१ (२२ नें वाढ); युरोपिअन व अँग्लो इंडिअन ४२ (१० नें वाढ); बाकीच्या इतर जाती ४९८ (५० नें वाढ).

खर्च–२३०११३४ रु. (१०९६०४ रु. नीं वाढ) खर्चाची तरतूद शें. २१. प्रांतिक सरकारकडून; शें. ६३.५ फीचें उत्पन्न. शें. १५.५ इतर. सरकारी कॉलेजांचा खर्च–६४५०८२ रु. पैकीं सरकारला २५४८४७ रु. बिनसरकारी कॉलेजांचा खर्च गेल्या वर्षी १३६९३२२ रु. होता तो यंदा १४७६८२३ रु. झाला व सरकारी मदत १६९३३२ रु. होती ती १६८८०० रु. झाली. दर विद्यार्थ्यामागें सरकारी कॉलेजांत खर्च २९७ रु. (११७ रु. सरकारला); बिनसरकारी कॉलेजांत १८७ रु. (२४ रु. सरकारचा.) सरकारी मदत ५ टक्के दरसाल कमी झाली. त्याचप्रमाणें नवीन कॉलेजांस मदत द्यावी लागली याकरितां यंदापासून टर्मची फी मुंबई-कराचींत ७० रु. व इतर ठिकाणीं ६० रु. घेण्यात यावी असें ठरविण्यांत आलें. बहुतेक सर्व कॉलेजांतून जादा शिकवणीची सोय समाधानकारक रीतीनें चालू आहे. पुण्याच्या फर्ग्युसन कॉलेजांत स्त्री विद्यार्थ्यांकरितां वसतिगृह वाढविण्यांत आलें; तसेंच सर परशुरामभाऊ कॉलेजांत व सुरतच्या कॉलेजांत वसतिगृहें वाढविलीं. मुंबईच्या रॉयल इन्स्टिटयूट ऑफ सायन्समध्यें यंदा ९१ विद्यार्थी पदवी परीक्षोत्तर शिक्षण घेत होते. ते व सर्व अध्यापक संशोधन करता). यंदा एकण ३४ (पैकीं १९ रसायन शास्त्रांतील संशोधनात्मक निबंध तयार झाले. १७ निबंधांचे निकाल लागून पदवी एम्. एस्सी. देण्यांत आली खर्च–१७९२२९ रु. (७७९७ रु. नें वाढ) पैकीं ७९७७४ रु. देणगी, ४३१८८ रु. फी. सरकारी मदत ५५४६१ रु. दर विद्यार्थ्यामागें खर्च ६०६ रु. धंदेशिक्षणाचीं कॉलेजें १२. एंजिनिअरिंग कॉलेज विद्यार्थी १९५ (१४३ हिंदु) खर्च २०६६१५ रु. शें. ७५ सरकारी. दर विद्यार्थ्यामागें खर्च १०५४ रु. यंदापासून "सिव्हिलकडे" ५० चे ऐवजीं ३० व "मेकॅनिकल" व "इलेक्ट्रिकल" कडे प्रत्येकीं १० ऐवजीं २० विद्यार्थी घेतले जातात. कराचीचें एंजिनियरिंग कॉलेज–विद्यार्थी १६५ (९६ हिंदु, २५ मुसलमान, ४४ इतर) खर्च ९७९२० रु. (३०९७० रु. सरकारी) दर विद्यार्थ्यामागें खर्च ६८५ रु.

व्यापारी कॉलेज, मुंबई–विद्यार्थी ३९०.(२५५ हिंदू, ५६ पारशी) खर्च ७०६२७ रु. दर विद्यार्थ्यामागें १७९ रु. शेतकी कॉलेज, पुणें विद्यार्थी १४२ गेल्या वर्षापेक्षां ३६ कमी) खर्च १३५९३४ रु. पैकीं १०८४३३ रु. सरकारकडून. दर विद्यार्थ्यामागें खर्च–९५१ रु.

ग्रँट मेडिकल कॉलेज, मुंबई–विद्यार्थी ६०७ पैकीं ७९ विद्यार्थिनी. खर्च २६७४८७ रु. पैकीं सरकारी ९५३७६ रु. दर विद्यार्थ्यामागें खर्च ४४१ रु. गो. सुं. मेडिकल कॉलेज, परेळ–मुंबई कॉर्पोरेशन चालवितें. विद्यार्थी ३७४ खर्च–२१४१४९ रु. दर विद्यार्थ्यामागें ६८२ रु. खर्च.

लॉ–कॉलेजें ४. विद्यार्थी १२५५ पैकीं मुंबईच्या सरकारी कॉलेजांत ५९९. सेकंडरी ट्रेनिंग कॉलेज मुंबई–विद्यार्थी १०० (१६ विद्यार्थिनी) खर्च ६०७२१ रु. दर विद्यार्थ्यामागें खर्च ६०१ रु. पैकीं सरकारी ५५९ रु. सदर अध्यापकशाळेचा इलाख्यांतील दुय्यम शाळांतील अध्यापनास अतिशय उपयोग होत आहे. सदर शाळेंतील "अध्यापकविद्यार्थिनी" एकंदरींत जास्त हुषार असतात असें येथील मुख्याध्यापकाचें मत आहे !

दुय्यम–शिक्षण–मुलांच्या शाळा ५७१ (२६ नें वाढ); विद्यार्थी एकूण १००९५९ (३८३७ नीं वाढ शें. ४ वाढ). शें. ४६ हायस्कूलमध्यें, शें. ५४ मिडल्स्कूल (इ. १ ते ३) मध्यें, शाळा–२९ सरकारी विद्यार्थी ९०७६, म्युनिसिपल व लोकलबोर्डें–१५५ विद्यार्थी ४७०४, सरकारी मदत असलेल्या खाजगी-२६३, विद्यार्थी ६५५२८ सरकारी मदत नसलेल्या ५८, विद्यार्थी १११२९.

विद्यार्थ्यांची जातवारी– हिंदु ७७३९८ शें.

७ वाढ; मुसलमान ११८८९ शें. ४.७ वाढ; पारशी ४६०३ शें. १.७ वाढ. इतर ७०६९ शें. १०.७ वाढ. मागासलेल्या हिंदूंत शें. ७ वाढ ही प्रागतिक आहे. खर्च ५९४८७१७ रु. शें. ३.९ टक्के वाढ. फीचें उत्पन्न शें. ५९; सरकारी मदत शें. २२.९. इतर शें. १३.९. डि. लो. बोर्डें व म्युनिसिपालिटचा शें. ४.२ उपरिनिर्दिष्ट शाळांत प्राथमिक शाळांना जोडून असलेल्या इंग्रजी वर्गाचाच बहुतेक समावेश होतो. एकूण खर्चापैकीं शें. १६.६ खर्च सरकारी शाळाकरितां होतो. त्यापैकीं शें. ४०.५ फीचें उत्पन्न होतें. खर्चाची वर्गवारी दर विद्यार्थ्यामागें–सरकारी शाळांत १०९, रु. बोर्डांच्या शाळांत ४३॥ रु., खाजगी सरकारी मदतीच्या शाळांत ५४ रु. सरकारी मदत नसलेल्या शाळांत ६५ रु.

शाळातपासकांचे अभिप्राय मुंबई विभाग— सरकारी 'सरकारमान्य असलेल्या शाळांस इतर शाळांच्या कमी दर्जामुळें विद्यार्थ्यांच्या दर्जांत अभ्यासक्रम कमी प्रतीचे असल्यास किंवा नापास झालेल्या विद्यार्थ्यांसही सवलती इतर शाळांत जास्त मिळत असल्यानें, विद्यार्थ्यांच्या संख्येवर परिणाम होतो. हा त्रास विशेषत: मुंबई शहरांत फार होतो.

मध्यविभाग सरकारी– "विद्यार्थ्यांचें ध्येय मॅट्रिक परीक्षेंत पास होणें हेंच जवळ जवळ असल्यानें पुस्तकी ज्ञान व तेंही घोकंपटीच्या स्वरूपाचें. हाच अभ्यासक्रम बहुतेक शाळांतून दिसून येतो. शाळेच्या अभ्यासक्रमांत इतर धंद्यांचे शिक्षणाची सोय करतां आल्यास मॅट्रिकपर्यंत न जाणाऱ्या विद्यार्थ्यांच्या आयुष्यक्रमास थोडेंसें चांगलें वळण लागेल; ह्याशिवाय पुस्तकी ज्ञानाशिवाय जगांतील इतर बाबींचें सर्वसामान्य ज्ञान विद्यार्थ्यांस देण्याची सोय हवी आहे. ह्याकरितां धंदेशिक्षण दुय्यम शाळांतूनहि ऐच्छिक म्हणून ठेवावयास हवें" शिक्षण माध्यम-इ. १ ते ५ मध्यें बहुतेक सर्व शाळांतून इंग्रजीखेरीज इतर विषय मातृभाषांतून शिकविण्यांत येतात. मॅट्रिकचे परीक्षेस मातृभाषेंतून कांहीं पेपर लिहिण्याची परवानगी देण्यांत आली आहे. त्याचा फायदा इतिहास शें. ७० व पुराणभाषा शें. ५९ ह्या प्रमाणांत १९३४ च्या मॅट्रिकच्या विद्यार्थ्यांनीं घेतला.

विषयवारी अध्यापन व शिक्षण यावर अभिप्राय "इंग्रजी–एक आधुनिक उपयुक्त व आवश्यक भाषा म्हणून महत्त्व जास्त; एकंदरींत पाहतां भाषेंतील शिक्षण असमाधानकारक. कांहीं थोड्या शाळांत उत्तम. बाकी सर्व शाळांत अगदीं वाईट. याचें कारण ज्याचें इंग्रजी उत्तम आहे असे अध्यापन कुशल शिक्षक फारच थोडे असतात! ह्याकरितां सुरवातीस उत्तम इंग्रजी उच्चारांचा अभ्यास चांगला करून घेतला पाहिजे. "डायरेक्ट" पद्धतीनें शिकविण्यास विद्यार्थ्यांचें मन पारखून आपले धडे व्यवस्थित रीतीनें तयार करून शिकविणारे अध्यापक शाळांतून हवेत. तसेंच लिहितांना व्याकरण व वाचतांना इतर इंग्रजी वाचनाची गोडी लागावयास हवी. सध्यांच्या मॅट्रिकच्या सामान्य विद्यार्थ्यांस आपले विचार शुद्ध इंग्रजींत चूक न करितां मांडणें अशक्यच आहे. मध्यविभागचे इन्स्पेक्टरांचा अभिप्राय–इंग्रजीचें मान कमी असण्याचीं कारणें म्हणजे शाळांतील सर्व यत्तांतून इंग्रजी लिखाण फार थोडें करवून घेतलें जातें; मॅट्रिकच्या जवळ जवळ जों विद्यार्थी जातो तों घोकंपट्टीकडे त्याचें लक्ष्य जास्त जातें व विद्यार्थ्याकडून अभ्यास करवून घेण्याची शिक्षकांची अपात्रता हीं होत. **गणीत**–ट्रेनिंग स्कूलमध्यें शिकलेल्या गणीत अध्यापकांनीं अलीकडे गणीत विषय शिकविण्यांत बरीच सुधारणा केली आहे. गणितांतील अंकगणित, बीजगणित व भूमिति यांचा परस्पर संबंध योग्य तऱ्हेनें समजावून देऊन गणीत विषयाची आवड उत्पन्न करून त्यापासून व्यवस्थितपणा, अचूकपणा व परीक्षणशक्ति वाढविणें हें व्हावयास पाहिजे. हल्लीं तसें कांहींच न होतां मुलांस क्रमिक पुस्तकांतील अभ्यासक्रम संपविणें व यांत्रिक पद्धतीनें गणितें सोडविणें ह्यापलीकडे कांहींच होत नाहीं. त्यामुळें विद्यार्थ्यांस गणित विषय रुक्ष वाटतो. तसा वाटूं न देणें हें शिक्षकांनीं लक्षांत ठेवलें पाहिजे. इतिहास–

शिक्षणाचेंही असेंच आहे. इतिहास विषय भविष्य कालाकरितां उपयोगी आहे व त्याकरितां भूत कालांतील घडामोडींची माहिती जितकी सर्वांगपूर्ण व मनांत ठसण्याजोगी होईल व इतिहासाचें ज्ञान वाढलें जाईल असें केलें पाहिजे. विद्यापीठांतील अभ्यासक्रमांत इतिहास शिकणारे थोडे असतात त्यामुळें पदवीधर शिक्षकांनाच यथार्थ व संपूर्ण ज्ञान नसतें आणि त्यामुळें विद्यार्थ्यांस इतिहासाचें महत्त्व कळण्याइतकें मनोरंजक अध्यापन होत नाहीं. **भूगोल**–पुष्कळ शाळांतून अलीकडे भूगोलाच्या अध्यापनांत सुधारणा झाली आहे. तरी नवीन देशाचें भूगोलज्ञान करून देतांना सर्व दृष्टींनीं याचें महत्त्व पटवावयास हवें. **शास्त्रें**–बाहेर गांवच्या शाळांतून प्रयोगशाळांची व्यवस्था समाधानकारक नसल्यानें तेथें अध्यापन साधारण असतें. सरकारी शाळांत चांगलें असतें. ड्रॉइंग–यंदा उत्तेजनार्थ म्हणून सरकारनें २३७६२ रु. मदतीदाखल दिले. **परीक्षांचे निकाल**–प्राथमिक परीक्षा ६२०७ पैकीं ३५८७ विद्यार्थी उत्तीर्ण. १९ बक्षिसें दिलीं. दुसरी (इंटरमीजिएट) परीक्षा ३१५१ पैकीं २२३० विद्यार्थी उत्तीर्ण. ३२ बक्षीसें वाटली. मध्यविभागाचे शाळा तपासकांचा शेरा–शें. ८० शिक्षकांना अध्यापनाची आवड अगर अध्यापनाचें विशिष्ट शिक्षण नसतें. तसेंच वर्गांत शिकविलेलें मुलांना सहज समजेल व त्यांची विचारशक्ति जागृत होईल अशा तऱ्हेनें शिकविणें हें पुष्कळ बी. टी. अगर एस्. टी. सी. पदव्या मिळविलेल्या अनुभविक शिक्षकांसही साधत नाहीं. त्यामुळें रोजचा अभ्यासक्रम मनोरंजक होऊन त्यापासून ज्ञानसंपादन आनंददायक करणें ही गोष्ट कुठेंच दिसून येत नाहीं.

इलाख्यांतील १६५ शाळांत मुलांच्या सहकारी संस्था उत्तम कार्य करीत आहेत. त्याशिवाय वाद-सभा, सहली, मासिकें, चित्रकला, प्रथमोपचार, आरोग्य–शिक्षण, बागकाम, सुतारकाम वगैरे विषय कित्येक शाळांतून चालू आहेत.

वसतिगृहें–विद्यार्थी ४०३३ (गेल्या वर्षी ३८६९). प्रत्येक विद्यार्थ्याचा मासिक खर्च–मुंबई विभाग १० रु., मध्यविभाग ९ ते १५ रु., उत्तर विभाग ७॥ ते १०॥ रु., दक्षिण विभाग ४। ते ९॥ रु. सिव (सरकारी शाळा) १० रु. सर्वसामान्य ९ रु.

बालवीर संख्या––४२८७९ (४८१३ नीं वाढ); उत्तर व दक्षिण विभागांत अनुक्रमें २५०० व २३०० नीं वाढ. यंदा कराची, धारवाड, मुंबई वरळी, सोलापूर, सातारा, विजापूर, सक्कर, शिकारपूर, भडोच, नीरा वगैरे ठिकाणीं बालवीरांचे मेळावे भरले होते; वरीलपैकीं ७।८ ठिकाणीं ना. गव्हर्नर साहेबांचे अध्यक्षतेखालीं मेळावे भरले होते. मुंबई इलाखा बालवीर संस्थेस सरकारनें यंदा २१००० रु. ची मदत केली. शारीरिक शिक्षण–अलीकडे बहुतेक सर्व ठिकाणीं शाळांतून शारीरिक शिक्षणाबद्दल उत्साह दिसून येतो.

शिक्षक–मुलांच्या दुय्यम शाळा–सरकारी ४७१ पैकीं ३५३ ट्रेन्ड, ३६२ पदवीधर; बिनसरकारी ४९२३ पैकीं ५७९ ट्रेन्ड व २०१८ पदवीधर. एकूण शें. १७.३ ट्रेन्ड. शें. ४४ पदवीधर. वरील आंकडे प्रगति दर्शवितात. उत्तरविभाग शाळातपासकांचा अभिप्राय : बिनसरकारी शाळांतील पदवीधर शिक्षक बहुतेक पहिल्या व दुसऱ्या वर्गांत (ऑनर्स मिळविलेले) पास झालेले नसतात; याचें कारण शिक्षकांच्या पगाराचें मान फार कमी असतें, त्यामुळें अनुभव अगर अध्यापन कलेचें शिक्षण नाहीं व त्यामुळें विद्वान् शिक्षक मिळणें जवळजवळ अशक्यच असतें. मुंबई विभागाचे शाळातपासक म्हणतात–"पुष्कळ शाळांतून कायम शिक्षक नसतात, तसेंच अनुभविक व ट्रेंड शिक्षक ठेवण्यास पगाराचें नियमित वाढतें मान अगर प्रॉव्हिडंट फंड नसल्यानें अननुभवी तरुण पदवीधर केवळ "परवडतात" म्हणून ठेविले जातात व त्यामुळें शिक्षणाची दुर्दशा असते.

प्राथमिक शाळांतील इंग्रजीचें शिक्षण–१६८ शाळांत हे वर्ग असून विद्यार्थ्यांची संख्या ५२७२ आहे. अशा शाळांत विद्यार्थ्यांची संख्या वाढती आहे. कारण त्यांत बहुतेक शेतकरी वर्गांतील विद्यार्थी असून दूर शहरीं मुद्दाम इंग्रजी शिक्षणासाठीं मुलें ठेवणें ह्या लोकांना आर्थिक दृष्टचा शक्य नसतें. नादारी–निकृष्ट वर्गांतील फी देण्यास

असमर्थ अशा विद्यार्थ्यांस नादारी मिळूं शकते. इतर नादारीचें धोरण १९३२ मध्यें आखल्याप्रमाणें "महाराष्ट्र सांवत्सरिक १९३४" मध्यें पान १४७वर दिल्याप्रमाणें चालूं आहे. नादारीमुळें ६७००० रु. उत्पन्न कमी झालें; तसेंच बिनसरकारी शाळांस १७५७० रु. नादारीचें उत्पन्न भरून काढण्यास दिलें. शिष्यवृत्त्या–"महाराष्ट्र सांवत्सरिक १९३४" पान १४९ पहा. क्रमिक पुस्तकें वगैरे–यंदा ४१७ मंजुरीसाठीं आलीं त्यापैकीं ११३ क्रमिक, १५१ ग्रंथसंग्रहालयाकरितां व १९ बक्षिसें वगैरे करितां मंजूर झालीं.

इंग्लिश–टीचिंग स्कूल्स्–४५; मुलांच्या २३ व मुलींच्या २२. विद्यार्थी १०२७५ मुलगे व ६५१६ मुली, एकूण १६७९१. खर्च–११०६११२ रु. (४६२६७ रु. नीं वाढ). शें. ६० फी. शें. १८.४ सरकार व शें. २१.६ इतर अशीं उत्पन्नांचीं अंगें आहेत. दर विद्यार्थ्यामागें वार्षिक खर्च– ६७ रु. शिक्षक ८२३ पैकीं ४१३ ट्रेंड (१३५ शिक्षक, २७८ अध्यापिका).

प्राथमिक शिक्षण–शाळा मुलामुलींच्या–१४६१६ (७८ कमी झाल्या); विद्यार्थी–११६८५६४ (२८२०५ वाढ). शाळा–३४ सरकारी, १०१८३ डि. लो. बोर्डांच्या, १७२७ म्युनिसिपल, २४७८ खाजगी (सरकारी मदत असलेल्या), १९४ खाजगी (सरकारी मदत नसलेल्या). प्राथमिक शाळांत सरासरी विद्यार्थी ८०. शें. ३१ मुलगे. शिशुवर्गांत व एकूण संख्येच्या शें. ८९ मुलगें प्राथमिक शाळांत पहिल्या चार वर्गांत मिळून असतात; व मुली शिशुवर्गांत शें. ४४ व इयत्ता ४ पर्यंत शें. ९५ असतात. प्राथमिक शाळा–दोन खेड्यांस किंवा दर ९.६ चौ. मैलांस एक प्राथमिक शाळा. एकूण २६८५९ खेडीं व शहरें मिळून १४६१६ शाळा आहेत, **१६२०० गांवीं शाळा नाहींत.** शाळा नसलेल्या निम्या गांवांची लोकसंख्या २५०चे आंत आहे. **सुमारें २००० गावें ५०० च्या वर वस्तीचीं असून तेथें शाळा नाहींत.** तेथें लोकल बोर्डांनीं मदत करून खाजगी शाळा काढण्यास उत्तेजन द्यावें. खर्च रु. १९९३८०००८ (८,२४,४२२ रु. वाढ). सरकारी खर्च–१०९६७९५० रु. (६०८८३८ नीं वाढ.) सरकारी खर्चांतील वाढ १९३२–३३ मधील शें. १९। टक्के, पगारकपात १९३३–३४ मध्यें शें. १२ केल्यानें झाली आहे. खर्चाची शेकडेवारी–शें. ५५ सरकारी; शें. ३२.१ बोर्डफंड, शें. ३.२ फी. शें., १.७ इतर. वार्षिक दर विद्यार्थ्यामागें खर्च सरकारी शाळा–२६ रु. (सरकारला २५ रु. ५ आ.) डि. लो. बोर्ड शाळा १४ रु. १४ आ. म्युनिसिपल शाळा २२ रु. ७ आ. खाजगी सरकारी मदत असलेल्या शाळा १६॥ रु. वार्षिक सरासरी फी–प्राथमिक शाळेंत ९ आणे. खाजगी शाळांत २ रु. ५ आ. ५ पै. म्युनिसिपल शाळेंत ४ आ.

शाळा इमारती–डि. लो. बो. च्या शें. ४७.४ शाळा, चावडी, धर्मशाळा, देवळें वगैरे कोणतेंही भाडें (अगर सोयी) नसलेल्या जागांत भरतात. शें. २८ शाळांना बोर्डाच्या मालकीच्या जागा आहेत. प्राथमिक शाळांतील अध्यापक–अध्यापिका ३७६६९ (गेल्या वर्षी ३७२९१). पैकीं ट्रेंड शिक्षक शें. ४८.५. शिक्षकांचे पगाराचे बाबतींत हल्लींचें मान लढाईनंतरच्या महागाईच्या दिवसांत कायम केलें आहे. हल्लीं त्या मानानें धान्यादिकांची स्वस्ताई आहे त्यामुळें प्राथमिक शिक्षणाची वाढ होण्यास नवीन शिक्षकांस पगाराचें मान डि. लो. बोर्डांनीं कमी ठेवलें पाहिजे. कांहीं प्राथमिक शाळांतून इ. ५ ते ७ शेतकीविषयक उपयुक्त शिक्षण दिलें जातें. अशा शाळा ८० असून त्यांत २६८८ विद्यार्थी यंदा होते. व्ह. फा. परीक्षा १९१०६ पैकीं ८३६६ म्हणजे शें. ४३.६ विद्यार्थी उत्तीर्ण झाले. उर्दू व्ह. फा. परीक्षा १०६२ पैकीं ४१० उत्तीर्ण.

मुंबई म्युनिसिपालिटी–प्राथमिक शाळा ४७१ विद्यार्थी ८४१६५ शिक्षक २१६७ शें. ५२ ट्रेंड. खर्च ३२०११९१ रु. सरकारी मदत ७२९७७४ रु. मुंबई शहरांत दर विद्यार्थ्यामागें खर्च ४८.४ रु. येतो तर इतरत्र फक्त १५.२ रु. येतो.

ट्रेनिंग कॉलेजें व संस्था ३१ (१२ पुरुष व

१९ स्त्री शिक्षकांकरितां) विद्यार्थी १५५५. पैकीं ७७५ अध्यापक, ७८० अध्यापिका. ९१२ हिंदु (पैकीं ५९ डिप्रेस्ड क्लासेस पैकीं), २८३ मुसलमान, २९२ हिंदी ख्रिस्ती, ६८ इतर. ३१ संस्थापैकीं १४ सरकारी, १२ खाजगी, २ म्युनिसिपल व ३ इतर आहेत. सरकारी संस्थांतून यंदा ५९४ ट्रेंड अध्यापक व १०६ ट्रेन्ड अध्यापिका बाहेर पडल्या व इतर संस्थांतून अनुक्रमें ५२ व १६३ ट्रेंड झाले. खर्च–४३५३१२ रु. (१२८३६ नी वाढ) शें. ८१.५ खर्च सरकारी. सरकारी संस्थांत वार्षिक दर पुरुष शिक्षकामागें ३१९ रु. व स्त्री शिक्षकाकरितां ५५३ रु. येतो. तर खाजगी संस्थांत अनुक्रमें १५६ व १६३ रु. येतो. धुळें व पुणें येथील 'शिक्षक पालक संघ' उपयुक्त कार्य करीत आहेत.

इतर संस्था–"कला" शाळा ४ विद्यार्थी ६३३, वैद्यकशाळा ४ विद्यार्थी ८४७; एंजिनिअरिंग शाळा २ विद्यार्थी ३३९, औद्योगिक संस्था ५० विद्यार्थी ३१९१; व्यापारी शाळा ३३ विद्यार्थी १७०३; शेतकी शाळा २ विद्यार्थी ४८, इतर ४८ विद्यार्थी १७६७ (इतर म्हणजे संस्कृत पाठशाळा मकताब, गायनशाळा वगैरे) व्यापारी परीक्षा–जी. डी. सी. ३३ पैकीं ११ उत्तीर्ण. सर्टिफिकेट परीक्षा २६ पैकीं २० निरनिराळ्या विषयांतून पास झाले. अकौंटन्सी डिप्लोमा बोर्ड–जी. डी. ए. परीक्षा, १९३३–९६५ पैकीं १८९ पास. एंजिनिअरिंग शाळा–पुणें विद्यार्थी २४४. मेकॅनिकल व इलेक्ट्रिकल एंजिनिअरिंगची आवड जास्त दिसून येते. खर्च–५४९३९ रु. कराचीच्या असल्याच संस्थेंत ९५ विद्यार्थी असून शिवाय बिनतारेचें शिक्षण १८ विद्यार्थी घेत होते. औद्योगिक संस्था–ह्या डिरेक्टर ऑफ इंडस्ट्रीजच्या ताब्यांत असतात. मुंबईच्या व्ही. जे. टेक्निकल इन्स्टिटयूटमध्यें यंदा ५९४ विद्यार्थी होते. तेथें चार कोर्स मेकॅनिकल इलेक्ट्रिकल व सॅनिटरी इंजिनियरिंग, अप्लाईड केमिस्ट्री, कॉटन टेक्स्टाईल वगैरेंचे चार चार वर्षांचे शिक्षणक्रम आहेत. संस्थेचा खर्च–२४८३८० रु. शें. ४८ सरकारी व शे. ४८.५ फी. बाकीचा मुंबई म्युनिसिपालिटीकडून. इतर ३८ औद्योगिक शाळा औद्योगिक शिक्षणाकरितां नेमलेल्या कमिटीच्या देखरेखीखालीं आहेत. त्यांत सर्व प्रकारचें औद्योगिक शिक्षण दिलें जातें. सदर कमिटीनें परीक्षा, तपासणी वगैरे केली. कमिटीचा खर्च १४१०२ रु. संस्थांना मदत ४३६७५ रु. मेडिकल स्कूल्स ३ सरकारी; पुणें, अहमदाबाद व हैदराबाद येथें विद्यार्थी अनुक्रमें ३०७१८८ व ११९ मुंबईच्या नॅशनल मेडिकल कॉलेजांत यंदा २३३ विद्यार्थी होते "कला" शिक्षणाच्या शाळा–सर जे. जे. आर्ट स्कूल. विद्यार्थी ४२५. खर्च–१२१९१७ रु. पैकीं सरकारी ८९७८४ रु. ह्या शाळेच्या कांहीं माजी विद्यार्थ्यांनीं विलायतेंतहि उत्तम यश संपादिलें आहे. संगीत शाळा–९ विद्यार्थी १६१९. प्राथमिक शाळांतून संगीताचें प्राथमिक शिक्षण अभ्यासक्रमांतच समाविष्ट केलेलें आहे. वर निर्देशिलेल्या ९ संगीत शाळांना यंदापासून सरकारी मदत काटकसरीच्या धोरणामुळें बंद करण्यांत आली आहे.

स्त्री–शिक्षण–विद्यार्थिनी संख्या ३१४५९० शें. ५ वाढ. (मुलांत फक्त शें. २.५ वाढ आहे). शिक्षणसंस्था २०३१ (७१ नीं वाढ); १९२४ सरकारमान्य. यत्तावारी कॉलेजें १११६; दुय्यम. शाळा २३३१५; प्राथमिक शाळा २७९३०० वगैरे जातवारी संख्या जातींतील स्त्री संख्येशीं शेंकडा प्रमाण पुढारलेले हिंदु–१०४२२९ शें. १२.४ मध्यम हिंदू ९२७२३ शें. १.८ मागासलेले हिंदू २०४०८ शें. १. मुसलमान ६००१ शें. ३·११ पारशी ८०५४ शें. १८.७ इतर ११२६५ शें. ६.६ हिंदी ख्रिस्ती १४८५३ शें. ११.९ युरोपियन व अँग्लो इंडियन ३०५७ शें. १९.८.

खर्च ६६१८३०० रु. सरकारी शें. ३६.५ लो. बोर्डें व म्युनिसिपालिटिचा शें. २७.५ फी शें. १६.४ इतर १९.६ **दुय्यम शिक्षणांत पुढारलेल्या हिंदु वर्गांतील मुलींच्या संख्येंत यंदा शें. २० वाढ झालेली दिसून येते !** प्राथमिक शिक्षण–शाळा १७६७ मुली १८०५९५. शें. ४४ शिशुवर्ग. शें. ९५.२ इ. ४ पर्यंत मुलींची व्ह. फा. परीक्षा ३९३३ पैकीं १५०४ (शें. ४३) उत्तीर्ण झाल्या. गर्ल गाईड

संख्या ४३८ नीं वाढून ८३९८ झाली. सरकारी मदत ६७०९ रु.

अँग्लोइंडियन व युरोपिअनांच्या खास शाळांतून शें. ३० प्रमाणांत युरोपियनेतर घेतात. यंदा अशा सर्व शाळांतून ५५२४ पैकीं शें. ७७.८ युरोपिअन व बाकीचे इतर विद्यार्थी होते. त्याशिवाय इतर कॉलेजांतून १२४३ युरोपिअन विद्यार्थी आहेत एकूण २४९२ मुलगे व ३०४८ मुली मिळून ५५४० युरोपिअन विद्यार्थी शिक्षण घेत आहेत. खर्च १४११४७६ रु. शें. ४४. फी शें. ३४ सरकार शें. २२ इतर. शिक्षक ३७० पैकीं २५५ ट्रेंड शिष्यवृत्तीकरितां सरकारी खर्च ८१६० रु. मुसलमानांचें शिक्षण-सिंध खेरीज इलाख्यांतील विद्यार्थी संख्या सर्व प्रकारची १६७५६४. शें. २.४ वाढ. खर्च अजमासें ४५९४००० रु. सरकारी २०१२००० रु. (खास मुसलमानांच्या शिक्षणसंस्थाकरितां खर्च २३१७७५१ रु. पैकीं सरकारी १०१८९६० रु.). मुसलमानांत उच्चशिक्षण वाढावें म्हणून सरकार त्यांस जादा सवलती देतें. उदाहरणार्थ, शिष्यवृत्त्या आर्टस कॉलेज ४२ प्रत्येकीं १५ रु. इंजिनियरिंग कॉलेज ३ प्रत्येकीं ३० रु. कॉमर्स कॉलेज एक २५ रु. लॉ-कॉलेज ३ प्रत्येकीं २० ते २५ रु., दुय्यम शिक्षण-विद्यार्थी ९६०१ शें. ७ वाढ. प्राथमिक शिक्षण १४३५५६ शें. २.४ नीं वाढ. मुसलमान स्त्री-शिक्षण-एकूण विद्यार्थिनी ४१०२२. मक्ताव व मुल्ला शाळा-२२८ विद्यार्थी १२३६९ सिंधमध्यें मुसलमानांचे शिक्षण लोकसंख्या शें. ७२.८ मुसलमान विद्यार्थी ७५९२३ शें. ५.२ कमी. खर्च २५३२२५२ रु. शें. ४७ सरकारी. कॉलेजांतील शिष्यवृत्त्या सरकारी ४८ प्रत्येकीं २० रु. शिवाय इतर २९ प्रत्येकीं १५ ते ६० रु. मासिक दुय्यम ३९८९ विद्यार्थी शें. २.६ वाढ. शिष्यवृत्त्या-सरकारी खास मुसलमानांसाठीं ७०० प्रत्येकीं ७ ते १२॥ रु. महिना. याशिवाय अनेक सवलती उत्तेजनार्थ सरकार देतें. प्राथमिक शिक्षण-७४४७८ विद्यार्थी शें. ३ कमी. शिष्यवृत्या डि. लो. बोर्डांच्या खास मुसलमानांसाठीं ७२९ प्रत्येकीं १ ते ३ रु. मुल्ला शाळांत प्राथमिक शाळाच्या शें. ४० मुलें आहेत., खर्च ४५६५२७ रु. सरकारी २०५७५२ रु. मध्यम व मागासलेल्या वर्गाचें शिक्षण-लोकसंख्या शें. ५९ मध्यम, व शें. २१ मागाललेले, शिक्षणांतील शेंकडेवारी लोकसंख्येशीं पुढारलेल्या वर्गांत शें. २० मध्यम वर्गांत शें. ५.२ मागासलेल्या वर्गांत वर्गांत शें. ३.७. निकृष्ट वर्ग-विद्यार्थी ७०४७६ शें. ५ वाढ. जंगली जाती वगैरे विद्यार्थी २५१३६ शें. ६ वाढ. सेटलमेंट स्कूलस विद्यार्थी रात्रींच्या व दिवसांच्या शाळांत अनुक्रमें ४०६ व ३१३६ रेफर्मेटरी स्कल्स ३ विद्यार्थी ६९४ (३९४ हिंदू २६४ मुसलमान, ३६ ख्रिस्ती). खर्च १२९९५२ रु. शें. ८१ सरकारी, शिक्षण-नेहमींचें व धंदे शिक्षण.

पंगूंचें शिक्षण-एकूण संस्था ३ आंधळचाकरितां व ४ बहिरे व मुके यांजकरितां. विद्यार्थी अनुक्रमें १२९ व १५४. खर्च एकूण ५५६८५ रु. सरकारी मदत १५८३५रु. दर विद्यार्थ्यामागें खर्च २०२ रु. वार्षिक. प्रौढ शिक्षण संस्था १२८, विद्यार्थी ५४६२, खर्च ७७६९६ रु. पैकीं ९८३२ रु. सरकारचा, १३९१९ बोर्डांचा, ९२८५ रु. फी. उत्पन्न व ४४६६० रु. इतर उत्पन्न.

---

## मुम्बई सरकारचें अन्दाजपत्रक

(सन १९३४-३५)

| मुख्य खातीं | जमा रु. | खर्च रु. |
|---|---|---|
| जमीन महसूल | ४७७९८००० | ६२९०००० |
| अबकारी | ३५२७१००० | ४७४५००० |
| स्टँप्स् | १५६००००० | २३०००० |
| व्याज | १३९८३००० | २१४१२००० |
| ठेवी, अॅडव्हान्स व प्रांतिक कर्जवसुली | २९०३२००० | १२२६१००० |
| जंगलखातें | ४८३०००० | ३२७१००० |
| पाट, बंधारे, नौकानयन, वगैरे | ५६८८००० | १२५१४००० |
| न्यायखातें | १९७८००० | ६८२८००० |
| आरोग्यखातें | १८०८००० | २५९२००० |
| शिक्षणखातें | १६१६००० | १८०३२००० |
| वैद्यकखातें | १४९४००० | ४६५०००० |

| खातें | जमा रु. | खर्च रु. |
|---|---|---|
| तुरुंग व कैद्यांच्या | | |
| वसाहती | ३४०००० | २०९४००० |
| पोलीसखातें | ७३८००० | १७६०२००० |
| शेतकीखातें | ४६५००० | २५८०००० |
| उद्योगखातें | १०००० | ४०८००० |
| राज्यकारभांरांतील | | |
| इतर अंगें | १४८२००० | ५४७००० |
| सिव्हिल वर्क्स | ४१७२००० | ९०४३००० |
| बॉंबे डेव्हलपमेंट | | |
| स्कीम | ७६०००० | ३६६९०० |
| स्टेशनरी व छपाई | २६०००० | १२६४००० |
| सुपरॲन्युएशनकडे | १०१९००० | ९७०४००० |
| दुष्काळ निवा. फंड | ११९०००० | .... |
| इतर | ३०९०००० | २६२७००० |
| जादा | ४१७०००० | ११५००० |
| कागद नोंदणीखातें | १६२०००० | ६२८००० |
| ठराविक | | |
| (शिडयूल्ड) कर | १८५०००० | २८००० |
| राज्यकारभारखर्च | .... | २०६२४००० |
| बंदरें व बंदर– | | |
| अधिकारी खर्च | .... | ७००० |
| शास्त्रीयखातींखर्च | .... | ९२००० |
| इंग्लंडमध्यें खर्च | .... | ३८६२००० |
| प्रांतिक वसुलाबाहेरील खर्च | | |
| (१) इरि. नवीन | | |
| कामें खर्च | .... | १६५९१००० |
| (२) बॉम्बे डे. स्की | .... | २८७००० |
| (३) आरोग्य खातें | .... | ३१००० |
| (४) प्रां. व प. वर्क्स | .... | ६२००० |
| (५) पेन्शनें खरेदी | .... | १३३१००० |
| शिल्लक सुरवातीस | ९६५४००० | |
| अखेर | | ७१८७१०० |
| एकूण | १८९९१९००० | १८९९१९००० |

# चालू उद्योग



## १ कॉंग्रेसचें ग्रामसंघटनेचें कार्य

पश्चिम खानदेश जिल्ह्यांत ग्रामसंघटनेचें कार्य खालील तीन ठिकाणीं चालू आहे.

(१) सवाई मुकटी (तालुका शिंदखेडे) लोकसंख्या १२००, (२) कापडणें (तालुका धुळें) लोकसंख्या ३००० , (३) कासारें (तालुका साक्री) लोकसंख्या ३०००.

वरील तीन ठिकाणचे कांहीं विशेष खालीं नमूद करण्यांत येत आहेत.—

१. सवाई मुकटी:—येथील 'समर्थ उद्योग-मंदिरांत' सध्यां ५ माग असून विणकामांत तयार झालेले तरुण शेतकरीच ते चालवितात. येथें बाहेरगांवचें व इतर जिल्ह्यांतील सूतहि विणावयास येतें. त्याचप्रमाणें बाहेर गांवाहून व इतर जिल्ह्यांतून विणकामाचें व कांतणें, पिंजणें इत्यादि सर्व क्रियांचें यथाशास्त्र शिक्षण घेण्यासाठीं तरुण येतात. गांवांत सुमारें १२।१५ माणसें वस्त्रस्वावलंबी आहेत. व शिवाय बरींच माणसें खादीधारी आहेत. लग्नसमारंभादि कार्यांत शक्य तितका कमी खर्च करावयाचा, राहणी साधी ठेवावयाची, राष्ट्रीय कार्यांत प्रसंगानुसार सामील व्हावयाचें, चहा, परदेशी साखर व परदेशी कापड यांचा निषेध करावयाचा अशी गांवची प्रवृत्ति झालेली आहे. स्त्रीपुरुषांसाठीं चरांच्या संडासांची थोडीशी योजना केलेली असून चरांतून निघणारें सोनखत शेतांत वापरण्यांत येत असतें.

२. कापडणें:—येथील 'हनुमान उद्योग मंदिरांत' २ माग असून ते सवाई मुकटीच्या समर्थ उद्योग मंदिरांत शिकून तयार झालेले तरुण शेतकरीच चालवितात. येथें ५०।७५ माणसें वस्त्रस्वावलंबी असून शिवाय पुष्कळ लोक खादीधारी आहेत. खादींतच लग्नें करण्याचा रिवाज येथें रूढ होत असून सवाई मुकटीपेक्षां येथें अधिक वधूवरांचीं खादींत लग्नें झालेलीं आहेत. येथें हंगामानुसार सूतहि मोठ्या प्रमाणांत निघतें व गांवच्या महार विणकरांपैकीं कित्येक विणकर हें सूत विणून देतात. येथील तरुणहि राष्ट्रीय कार्यांत प्रसंगानुसार सामील होत असतात.

३. कासारें:—येथें नुकतेंच कार्य चालू झालें असून अद्यापपावेतों ग्रामसफाईपेक्षां इतर बाबींकडे विशेष लक्ष पुरविण्यास सवड झाली नाहीं. ग्रामसफाईचें कार्य मात्र विशेष तीव्रतेनें केलें जातें. सूत कांतणें, पिंजणें इत्यादि कामें हळू हळू वाढत जातील असें गांवचें वातावरण आहे.

वरील तिन्ही ठिकाणीं खादीनिष्ठ लोकच या सर्व कार्यांत विशेष लक्ष घालीत असून शेतकरी समाजांत साध्या राहणीचा व काटकसरी जीवनाचा प्रसार व्हावा एतदर्थ हरप्रकारें खटपट चालू आहे.

---

## २ खादी

### महाराष्ट्रांतील उत्पत्ति, विक्री व वस्त्रस्वावलंबनस्थिति

महाराष्ट्रांत खादीउत्पत्तीचें काम इ. स. १९२५ पासून सुरू झालें. त्याचा प्रारंभ खानदेश व नगर ह्या जिल्ह्यांत झाला. परंतु या जिल्ह्यांत चांगले रहाट व चांगले विणकर ह्यांची कमतरता असल्यामुळें, हें काम जरी सुरू राहिलें तरी नांवारूपास येऊं शकलें नाहीं. पुढें इ. स. १९२६ मध्यें मध्यप्रांतांतील चांदा व भंडारा या जिल्ह्यांत तें सुरू करण्यांत आलें. परंतु एका महार जातीशिवाय दुसरी कोणतीही जात कांतण्याचें काम करीत नव्हती व करण्यास तयार नाहीं. अशा स्थितींत सूत जास्त प्रमाणांत होणें संभवनीय नव्हतें.

काजीपेठ बलारशा रेल्वे सुरू झाल्यापासून चांद्याहून पुढें निजामच्या राज्यांत प्रवेश करणें

सुलभ झालें. तिकडे इकडच्या उलट ब्राह्मण व वैश्य सोडून इतर सर्व जातींत कांतणें सुरूं असून विणकर लोक खादी तयार करून आधती विकण्यास आणीत असल्यामुळें ती स्वस्त व मुबलक मिळूं शकते. मिलच्या चढाओढीमुळें तिकडील धंदाही बुडूं लागला होता. परंतु तो अजून जीव धरून असल्यामुळें वाढूं शकला. बाजारांत विक्रीस टिकण्यासारखा माल तयार करण्यास, मालांत पुष्कळ सुधारणा करणें जरूर होती व त्याकरितां कसून प्रयत्न केला गेला. या प्रयत्नामुळेंच महाराष्ट्र शाखा खादी उत्पत्तीच्या कामांत स्वावलंबी होऊं शकली. महाराष्ट्रांत प्रारंभीं उत्पत्ति नसल्यासारखीच होती आणि म्हणून परप्रांतांतून खादी आणवूनच गरज भागवावी लागत असे. परंतु आतां या शाखेची खादी महाराष्ट्राला पुरून इतर ठिकाणीं पाठविण्याजोगी होऊं लागली आहे व मालही सर्व तऱ्हेचा आणि सुंदर निघूं लागला आहे.

**महाराष्ट्र चरखा संघाचीं खादी उत्पत्तिकेंद्रें**

केंद्र—सावली (जि. चांदा स्टे. मूलमरोडा B. N. Ry. ) वार्षिक उत्पत्ति ३०,००० वार विशेष माल, मध्यम नंबराच्या सुताचें सर्व तऱ्हेचें कापड. विशेषतः धोतरें, लुगडीं, पातळें व रंगीत वटीव कोटाचें कापड.

केंद्र—सिंदेवाही (जि. चांदा स्टे. सिंदेवाही वार्षिक उत्पत्ति १५००० वार विशेष माल—रंगीत वटीव कोटिंग.

केंद्र—किन्ही (जि. भंडारा, पो. साकोली) वार्षिक उत्पत्ति ८००० वार विशेष माल—पांढरी दोसुती.

केंद्र—बारेगुडा (पो. तांडूर, जि. असिफाबाद, निजाम स्टेट) वार्षिक उत्पत्ति १८००० वार. विशेष माल २७ व ३६ इंची सदऱ्याचें कापड.

केंद्र—वायलाल (पोस्ट व स्टेशन पोटकापल्ली, निजाम स्टेट) वार्षिक उत्पत्ति १८०००, वार. विशेष माल—कापड, चादरी व टावेल.

केंद्र—मेटपल्ली (जि. करीमनगर, निजाम स्टेट) वार्षिक उत्पत्ति ८०००० वार; विशेष माल—सर्व तऱ्हेचा माल, कार्यालयातर्फेंहि कताईचें काम करविलें जातें. त्यांत २० ते ३५ नं. च्या सुताची उत्पत्ति वाढली आहे. त्यामुळें महाराष्ट्रीय पातळें, लुगडीं व खण उत्तम होऊं लागले आहेत.

चरखा संघाच्या महाराष्ट्र शाखेंत महत्वाचें खासगी उत्पत्ति केंद्र फक्त एकच असून तें निजाम संस्थानांत जगडमपल्ली येथें आहे. मुंबईचे शेठ सूरजी वल्लभदास हे त्याचे चालक आहेत.

महाराष्ट्रांत वरील खादी उत्पत्तीचें काम महाराष्ट्र चरखा संघामार्फत त्या संघाचे उत्साही सेक्रेटरी श्री. अ. वा. सहस्रबुद्धे यांच्या नेतृत्वाखाली चालतें.

**महाराष्ट्रांतील खादीच्या संस्था**

(१) टिळक विद्यालय तुमसर—खादी शिक्षण.

(२) टिळक विद्यालय, नागपूर—खादीशिक्षण व खादी भांडार चालविणें.

(३) कन्याश्रम वर्धा—खादीशिक्षण विशेषतः टकळीवर खास गतिपूर्वक सूत कांतण्यास शिकविणें.

(४) सत्याग्रहाश्रम, नालवाडी (वर्धा)—खादी शिक्षण.

(५) ग्रामसेवा मंडळ, नालवाडी, वर्धा—१२ केंद्रें ग्रामसेवेच्या दृष्टीनें चालविण्यांत येत आहेत प्रत्येक ठिकाणीं खादी शिक्षण.

(६) चक्रविद्या मंदिर, अकोला—खादी शिक्षण.

(७) टिळक विद्यालय, खामगांव-सूत कातणें, खादी फेरी व भांडार चालविणें.

(८) ग्रामसेवा मंदिर, फत्तेपूर—ग्रामसेवेबरोबर वस्त्र-स्वावलंबन-प्रचार.

(९) पू. खा. खादी सेवा संघ जळगांव—पूखानदेशांत खादी काम करणें जळगांव येथें भांडार चालविणें.

(१०) खादी कार्यालय चोपडे—खादी उत्पत्ती, खादी शिक्षण, वस्त्रस्वावलंबन व प्रचारकार्य.

(११) वस्त्रस्वावलंबन कार्यालय—चहार्डी—वस्त्र—स्वावलंबन.

(१२) खादी कार्यालय, असोदें–खादी शिक्षण व वस्त्रस्वावलंबन–प्रचार.

(१३) खादी कार्यालय, ममुराबाद–वस्त्र-स्वावलंबन–प्रचार.

(१४) हनुमान मंदिर, कापडणें–वस्त्र–स्वावलंबन–प्रचार

(१५) समर्थ उद्योग मंदिर, सवाई मुकटी–ग्रामसेवा व वस्त्रस्वावलंबन–प्रचार.

(१६) उद्योग मंदिर, सटाणा–खादी शिक्षण, वस्त्रस्वावलंबन प्रचार व तालुक्यांत संघटनेचें काम.

(१७) खादी कार्यालय, मालवण–खादी भांडार चालविणें, खादी फेरी व वस्त्रस्वावलंबन-प्रचार.

(१८) वस्त्रस्वावलंबन प्रचार मंडळ, सातारा–वस्त्रस्वावलंबन प्रचार व सातारा येथें सूत वर्ग.

(१९) ग्रामसेवाश्रम, वळिवडें (कोल्हापूर)–वस्त्रस्वावलंबन-प्रचार व ग्रामसेवा.

(२०) आश्रम सासवड–ग्रामसेवा व वस्त्र-स्वावलंबन-प्रचार.

(२१) ग्रामसेवाश्रम, यलमर मंगेवाडी (पंढरपूर)–ग्रामसेवा व वस्त्रस्वावलंबन प्रचार.

## महाराष्ट्रांतील खादी–विक्री केंद्रें

(सन १९३४ ची विक्री)

| भांडाराचें नांव | | एकूण विक्री. |
|---|---|---|
| १ गोंदिया | रु. | १५३००–१२–६ |
| २ नागपूर सीताबर्डी | " | १६४६९–१२–९ |
| ३ नागपूर महाल | " | २२८१०– ९–० |
| ४ वर्धा | " | ३३९४८– ९–६ |
| ५ अमरावती | " | १४८३३– १–० |
| ६ अकोला | " | १५६३७– १–३ |
| ७ धुळें | " | २७२१८– १–६ |
| ८ अहमदनगर | " | ७६५६–१५–३ |
| ९ नाशिक | " | ८७३०–१३–० |
| १० दादरस्टॉक (१०महिने) | " | ६२७८–११–० |
| ११ दादर (दोन महिने) | " | ४३०६–१४–० |
| १२ पुणें | " | ४८१७४– ४–९ |
| १३ सातारा | " | ७४१६– ३–९ |
| १४ कोल्हापूर | " | ३३१००– १–० |
| १५ सोलापूर | " | ७३५४– ९–० |
| १६ हैदराबाद | | २३३०३– ४–१ |
| १७ निजामाबाद | | २९७४–१०–६ |
| १८ नांदेड | | ६६७३–१२–९ |
| १९ वस्त्रागार, वर्धा | | ५०८८–१२–९ |
| २० इतर कार्यालयें | | २९८७– ६–९ |
| एकूण | | ३१०२६४–११–१० |

## ३ जुन्नरी कागद

जुन्नरी कागद फार वर्षांपासून प्रसिद्ध आहे. अवघ्या ५० वर्षांपूर्वी जुन्नरमध्यें कागदाचे ६० कारखाने होते व त्यांतून १०००–१२०० स्त्री-पुरुष काम करीत होते. त्याच ठिकाणीं आज ५ घरांतून हा कागदाचा धंदा जेमतेम धुगधुगी धरून राहिलेला आहे! परदेशी व देशी गिरण्यांच्या कागदानें हा पुराणा धंदा जवळ जवळ ठार मारला.

जुन्नर हें इतिहासप्रसिद्ध ठिकाण पुण्याहून ५५ मैलांवर उत्तरेकडे आहे. त्या ठिकाणीं नदीच्या कांठावर ओसाड दिसणाऱ्या भागांत कांहीं पडकीं घरें, फुटके हौद व उखळलेल्या फरशा दिसतात. त्या आवारांत पांच घरांतून जुन्नरी कागद तयार होतो.

कागद कसा तयार होतो? — जुनी रद्दी (छापलेली नव्हे हातानें लिहिलेली चालेल) घेऊन ती फाडून, एका सिमेंटनें बांधलेल्या हौदांत दोन तीन दिवस भिजत टाकतात. नंतर फरशीच्या खडबडीत भागावर ती भिजलेली रद्दी पाणी घालून मळण्यांत येते, गोळा होण्याइतकी ती मळली गेली, म्हणजे नदीवर तसे गोळे धुवून आणतात, त्यायोगें शाई वगैरे घाण धुवून जाते. नंतर पुन्हां मळतात व पुन्हां धुतात. अशा रीतीनें मळणें धुण्याची क्रिया तीन वेळ झाली म्हणजे रद्दी इतकी मऊ होते कीं ती पाण्यांत टाकल्याबरोबर पाण्याशीं एकजीव होते. नंतर चुनासिमेंटनें बांधलेल्या ४×२×४ अशा हौदांत पाणी भरून त्यांत मळून तयार झालेले रद्दीचे गोळे टाकून काठीनें खूप घुसळतात, म्हणजे कागद तयार करण्याचा रांधा

तयार झाला. एका लाकडी चौकटीवर गवताच्या बारीक काड्यांची २८×३० एक सुंदर चटई ठेवून नंतर कागद काढणारा इसम लाकडी चौकट चटईसह त्या हौदांतील रांध्यांत झटकन बुचकळून काढतो; त्यायोगें एक पांढरा नाजूक थर बसतो, व पाणी चटईंतून गळून खालीं पडतें. पुन्हां एकवार ती चौकट पाण्यांतून बुचकळून काढतो म्हणजे जरूर त्या जाडीचा कागदाचा थर तयार होतो. ओला कागद चटई फरशीवर पालथी टाकून ती सोडवून घेतात. असे ओले कागद एकावर एक बरेच बसविल्यानंतर त्यावर वजन व दाब ठेवून त्यांतील पाणी काढून टाकतात व नंतर त्यांतील एकएक कागद सोडवून भिंतीवर वाळण्यासाठीं चिकटवितात. वाळलेला कागद हा कच्चा कागद. हाच टिपकागद. त्यावर दोन्ही बाजूंनीं गव्हाची खळ लावून वाळल्यानंतर गुळगुळीत दगडानें तो कागद घोटतात. यानंतर लिहावयास योग्य असा कागद तयार होतो. सामान्यतः याच पद्धतीनें हातचा कागद तयार करतात.

जुन्नरी कागद हा व्यापारी लोक हिशेबाच्या वह्यांकरितां पूर्वींपासून वापरीत असत; व पूर्वी कोर्टदरबारींसुद्धां हा कागद वापरण्याचा शिरस्ता असे. कारण कागद १००—१५० वर्षांपेक्षांही अधिक टिकणारा आहे. परंतु दिवसेंदिवस इतर गिऱ्हाइकांबरोबरच व्यापारी वर्गही परदेशी कागद हिशोबासाठीं वापरूं लागल्या मुळें जुन्नरी कागदाची गिऱ्हाईकी झपाट्यानें कमी होत गेली व हा एक खेड्यांतील धंदा मरणोन्मुख झाला! व्यापारी वर्ग व इतर स्वदेशीप्रेमी मंडळी याकडे थोडें अधिक लक्ष पुरवितील तर हा धंदा पुन्हां वर डोकें काढील .

जुन्नरी कागदाचें माप २६×२७ इंच असतें व अशा २४० कागदांच्या गड्डीचें वजन सामान्यतः २० पौंड भरतें. जुन्नरी टिपकागद सध्यां निघूं लागले आहेत. त्यांची किंमत २४० च्या गडीला ८ रु. पडते. लिहावयाच्या कार्डांचा कागदही तेथें तयार होतो; कार्डें ४ आण्यास शंभर मिळूं शकतात.

महाराष्ट्रांत जुन्नरासारखाच एरंडोल (पू. खानदेश) व दौलताबाद याहि ठिकाणीं हातकागद तयार होऊं लागला आहे. हा कागद महाराष्ट्र प्रांतिक कॉंग्रेस कचेरी पुणें नं. २ येथ विकत मिळूं शकतो.

---

### ४ डेक्कन एज्युकेशन सोसायटीच्या
## नव्या योजना

पन्नाशीच्या उत्सवप्रसंगीं डेक्कन एज्युकेशन सोसायटीच्या तहाहयात सभासदांनीं, सोसायटीच्या पुढील कार्याची दिशा आखून कांहीं नवीन योजना विधायक स्वरूपांत जनतेपुढें मांडल्या आहेत. सध्यां शाळा-कॉलेजांतून मिळत असणाऱ्या शिक्षणानें विद्यार्थ्यांचा पुढील आयुष्याचा प्रश्न मुळींच सुटत नाहीं. अशा स्थितीत कांहीं तरी शिकलें पाहिजे म्हणून शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थ्यांना पुढील मार्ग दाखविणें हा या योजना आखण्यांत चालकांचा मुख्य उद्देश आहे. योजना पुढील प्रमाणें आहेत.

(१) होतकरू आणि बुद्धिमान पदवीधरांना पुढील अभ्यासासाठीं व संशोधनासाठीं साधनें उत्पन्न करून त्यांच्यांत पुढील अभ्यासक्रमाविषयीं आवड उत्पन्न करणें. या योजनेप्रमाणें पुढील अभ्यासक्रम पतकरणाऱ्या विद्यार्थ्याला दोन—तीन वर्षें टिकेल अशी दरमहा २५ रुपयांची शिष्यवृत्ति द्यावी आणि दरसाल, दर एक विषयासाठीं, एक तरी शिष्यवृत्ति देतां यावी, अशी व्यवस्था करण्याचा संस्थेचा विचार आहे. संशोधन व पुढचा अभ्यास करण्यासाठीं साधारणपणें पुढचे विषय ठेवण्यांत येतील. (१) स्वभाषा, (२) पुराण भाषा, ( Classical Languages ) (३) इतिहास (४) अर्थ आणि राज्यशास्त्र, (५) तर्कशास्त्र, तत्त्वज्ञान, (६) गणित, (७) भौतिक शास्त्र, (८) रसायन शास्त्र, (९) वनस्पती आणि प्राणिशास्त्र, व (१०) भूगर्भ शास्त्र.

या सर्व उद्योगाला लागणारीं उपकरणें विकत घेणें संस्थेस सध्यांच्या स्थितींत शक्य नसल्यानें त्यासाठीं एक निधि जमविण्याचेंही ठरलें आहे.

(२) सर्वसाधारण विद्यार्थ्यांना धंदेशिक्षणाची सोय करून देणें.

या योजनेनें साबण, मेणबत्त्या, रंग व वॉरनिश तयार करण्यास शिकविण्याचे वर्ग काढून युनिव्हर्सिटीचा डिप्लोमा मिळविण्याइतकी विद्यार्थ्यांची तयारी करून द्यावी असा संस्थेचा विचार आहे. हें कार्य सुरू करण्यास ४०,००० रुपयांचें भांडवल व २०,००० रु. किंमतीची इमारत संस्थेजवळ असणें जरूर आहे. या कार्यांत वार्षिक पांच हजार रुपयांपर्यंत खर्च येईल; त्यापैकीं दोन एक हजार रुपये फीतून वसूल होतील. उरलेल्या तीन हजारांसाठीं संस्थेला आज पाऊण लाखाची देणगी हवी आहे.

(३) **मॅट्रिक्युलेशन व व्यापार आणि धंदे-शिक्षण देणारी जोड शाळा काढणें**:—साधारणपणें इंग्रजी पांचवी इयत्ता झालेल्या विद्यार्थ्यास या शाळेंत प्रवेश मिळेल. परंतु अशा शिक्षणाचा स्वतंत्रपणें पाया घालावयाचा म्हटल्यास प्रारंभींच २ लाख रुपये भांडवल व ६ लक्षांचा कायमनिधि लागेल. म्हणून असल्या अवाढव्य देणगीची जनतेपुढें मागणी करण्यापूर्वी कार्यास सुरुवात करतां यावी म्हणून एक योजना संस्थेनें तयार केली आहे. ती म्हणजे गांवांतील कांहीं औद्योगिक संस्थांशीं सहकार्य करून त्या संस्थांतर्फे विद्यार्थ्यांना शिक्षण देणें. दररोज सकाळ संध्याकाळ कांहीं तास औद्योगिक शिक्षण व दुपारीं कांहीं तास नेहमीचें मॅट्रिकचें शिक्षण विद्यार्थ्यांस दिलें जाईल. फीचें उत्पन्न अर्थातच शिक्षण देणाऱ्या सर्व संस्थांना वाटून दिलें जाईल. औद्योगिक प्रत्यक्ष शिक्षणाशिवाय जें तात्त्विक शिक्षण द्यावें लागेल त्यासाठीं त्या त्या धंद्यांत प्रवीण असे शिक्षक ठेवणें भाग पडेल. ह्या कामीं सुरुवातीला ५ हजार रु. भांडवल व वीस हजारांचा कायम निधि पुरे होईल असा अंदाज आहे.

(४) शिक्षण विषयाचा डिप्लोमा मिळण्याचीही सोय करण्याचा सोसायटीचा विचार आहे. त्याकरितां लागणाऱ्या साधनांसाठीं व ग्रंथालयाकरितां पांच हजार रुपये लागतील. शिक्षकांचा खर्च फीतून निघेल असा भरंवसा आहे.

वरील नव्या तऱ्हेचें शिक्षण देणाऱ्या योजनांखेरीज खेड्यापाड्यांतून ज्ञानाचा प्रसार व्हावा व तेथील लोकांना रोजच्या व्यवहारांत आवश्यक असें शिक्षण मिळावें म्हणूनहि कांहीं मार्ग आखले आहेत. त्यांचा उपयोग खेड्यांतील लोकांना तर होईलच परंतु संस्थेच्या विद्यार्थ्यांना सुद्धां सध्यांच्या शिक्षणानें असल्या प्रकारचें कार्य करण्यांत जो एक प्रकारचा तिटकारा वाटतो तो न वाटतां असें शिक्षणप्रसाराचें कार्य करण्याचा प्रत्यक्ष अनुभव मिळेल.

पुष्कळ गांवांना वाचनालयें नसतात व कांहीं ठिकाणीं असलींच तर त्यांत आवश्यक पुस्तकें, त्यांची व्यवस्थित मांडणी व देण्याघेण्याची पद्धत यांचा अभाव असतो. ही स्थिति नाहींशी करण्यासाठीं गांवोगांवच्या लायब्ऱ्यांना त्यांच्या व्यवस्थेचें ज्ञान होऊन त्यांना उपयुक्त पुस्तकें कांहीं मुदतीपुरतीं पुरवावीं असा विचार आहे. ज्या गांवीं अजिबात लायब्ररी नसेल त्या गांवीं एका पेटींतून पुस्तकें पाठविलीं जातील. पेटी प्रत्येक गांवीं एक आठवडाभर ठेविली जाईल. ही सोय ज्या लायब्ऱ्यांना व गांवांना हवीशी वाटेल त्यांना नाव नोंदविण्याची फी पडेल. तिचा विनियोग खर्चाकडे केला जाईल. तरी सुद्धां सुरुवातीला दोन हजार रुपये भांडवल व आठ हजारांचा कायम निधि लागेलच. याशिवाय खेड्यांसाठीं फिरती शाळा व खेड्यांतील शाळांच्या शिक्षकांसाठीं वर्ग काढण्याचें योजिलें आहे. संस्थेचे प्रचारक खेडोखेडीं जाऊन शिक्षणाचें महत्त्व, आरोग्य, प्रथमोपचार, गांवांतील स्वच्छता, रोज लागणाऱ्या हत्यारांची माहिती व तीं दुरुस्त कशीं करावीं याचे ज्ञान, गृहरचना, घरगुती औषधें, व खेळ यांचें ज्ञान व्याख्यानद्वारें, मॅजिक लँटर्नचे साहाय्यानें व प्रत्यक्ष रीतीनें देतील. साधारणपणें प्रत्येक गांवीं चार दिवसांचा कार्यक्रम होईल आणि त्यांत ज्ञान प्रसाराच्या निमित्तानें व्याख्यानें, खेळ, कीर्तनें व प्रदर्शन यांची दंगल उडून जाईल. प्रचारकार्यार्थ संस्थेला विद्यार्थ्यांचे व इतरांचे सहाय्याची फारच जरूर आहे व हें कार्य सर्वस्वी स्वयंसेवेनेंच करावें

लागेल. म्हणजे त्याबद्दल पगार मिळणार नाहीं.

नंतर संस्थेच्या माजी व बाहेरगांवच्या विद्यार्थ्यांसाठीं एक मंदिर बांधण्याचा विचार आहे. त्यांत राहण्याजेवण्याची व वाचनालयाची सोय करण्यांत येईल. ही सोय करतांना खर्च कमी येण्याची व्यवस्था संस्था करणार आहे. या इतर गोष्टींबरोबरच फर्ग्युसन कॉलेजच्या विद्यमान विद्यार्थीवर्गासाठीं बोट क्लब काढण्याचाही चालकांचा विचार असून तो थोड्याच अवधींत अस्तित्वांत येईल.

## ५ पांगारकरांचा महद्‍ग्रंथ

**मराठी वाङ्‍मयाचा इतिहास खंड दुसराः**– रा. रा. लक्ष्मणराव पांगारकर, नाशिक, यांनीं मराठी सारस्वताच्या सेवेस आपलें आयुष्य वाहिलें आहे हें प्रसिद्ध आहे. त्यांनीं मोरोपंत, ज्ञानेश्वर, एकनाथ, तुकाराम, मुक्तेश्वर ह्या संतकवींचीं चरित्रें लिहिलेलीं लोकप्रिय झालीं आहेत व मधल्या तीन महात्म्यांच्या चरित्रांचीं तर हिंदी भाषांतरें झालीं असून गुजराथी भाषांतरेंहि होऊं घातलीं आहेत असें समजतें! रा. पांगारकरांसारख्या साहित्यभक्तानें मराठी वाङ्‍मयाचा इतिहास ४० वर्षांच्या अभ्यासानंतर विस्तृतपणें लिहावयास घेतला असून पहिला खंड १९३२ मध्येंच प्रसिद्ध झाला आहे व दुसरा खंड तयार झाला असून चालू सालअखेर बहुतेक प्रसिद्ध होईल. मराठी संतवाङ्‍मयाचे धागेदोरे मूळ वेद, उपनिषदें, गीता, भागवत यांत कसे गोवले आहेत हें त्यांनीं प्रथम दाखविलें असून बौद्ध व जैन यांशीं झगडून वैदिक धर्मीयांनीं कसा विजय मिळविला हें तामीळांचा इतिहास देऊन पूर्वार्धांत दाखविलें आहे. उत्तरार्धांत १ महाराष्ट्र देश व मराठे लोक, २ महाराष्ट्री ऊर्फ मराठी भाषा, ३ मुकुंदराज, ४ महानुभाव पंथाचें मराठी वाङ्‍मय, ५ नाथपरंपरा, ६ श्रीज्ञानेश्वरदर्शन, ७ नामदेव, ८ तत्कालीन संत व त्यांचें वाङ्‍मय, ९ ज्ञानेश्वरीचें अंतरंग १० ज्ञानेश्वरी सृष्टि व ११ नामदेवांची पंजाबांतील कामगिरी अशीं ११ प्रकरणें असून मराठी वाङ्‍मयाचा इतिहास शके १२७२ पर्यंत आणून सोडला आहे. ह्या पहिल्या खंडाचीं ८३२ पृष्ठें असून किंमत रु. ४ वाजवीच आहे. दुसऱ्या खंडांत शके १२७२ते १५७२पर्यंतच्या ३०० वर्षांचा वाङ्‍मयाचा इतिहास दिला आहे. हा खंड अतिशय महत्त्वाचा आहे. ह्यांत शिवकल्याण, नृसिंह सरस्वती, बहिरापिसा, दासोपंत, एकनाथ, मुक्तेश्वर, तुकाराम, रमावल्लभदास, देवदास ह्या व इतर शेपन्नास संतांच्या व कवींच्या वाङ्‍मयाचा इतिहास कालक्रमानुसार पद्धतीनें गोंवला आहे. मुसलमानी राज्यसत्तेचा हा कालखंड असल्यामुळें मुसलमानी सत्तेचा इतिहास व त्याचे महाराष्ट्रावर घडलेले राजकीय, सामाजिक व धार्मिक परिणाम ह्या विषयावर दोन प्रकरणें आलीं आहेत. इतिहास व वाङ्‍मय या दोहोंच्या आधारानें हा भाग सजविला आहे. ह्या काळांत एकनाथ ही प्रचंड विभूति असल्यामुळें त्याच्या वाटचास सहा व तुकोबाच्या वांटचास तीन प्रकरणें आलीं आहेत. हिंदुस्थानांतील देशी भाषांचा प्रपंच व मराठी भाषेचा विस्तार व विकास हीं दोन भाषाविषयक प्रकरणें अति महत्त्वाचीं आहेत. नाथांचे समकालीन संत व तुकोबांच्या प्रभावळींतील कवि हीं प्रकरणें व नाथांच्या समग्र कवितेचें निरीक्षण व विशेषतः नाथांच्या भारुडांचें प्रकरण हीं मोठीं मनोरंजक आहेत. ह्या कालांतील 'हास्यविनोद विडंबनपर' कविता हें छोटेंसें प्रकरणही मोठें मौजेचें आहे. असो. समग्र खंड लौकरच प्रसिद्ध होणार असून तिसऱ्या खंडांत रामदासांपासून तों पेशवाईपर्यंतचा वाङ्‍मयाचा इतिहास यावयाचा आहे.

## ६ पुण्यांत कॉमर्स कॉलेज

पुण्यांतील महाराष्ट्र एज्युकेशन सोसायटी या शिक्षणसंस्थेचा हीरकमहोत्सव गेल्या वर्षीं साजरा झाला. त्याप्रसंगीं चालकांनीं शहरच्या पश्चिम भागांत मुलींचें एक स्वतंत्र हायस्कूल व कॉमर्स कॉलेज सुरू करण्याची योजना जाहीर केली होती. त्याप्रमाणें १९३५

च्या जूनमध्यें मुलींचें स्वतंत्र हायस्कूल सुरू झालें आहे; व युनिव्हर्सिटीनें नेमलेली कमिटी गेल्या एप्रिल महिन्यांत येऊं शकली असती तर कॉमर्स कॉलेजही यंदाच सुरूं झालें असतें. यंदा म्हणजे १९३५ मध्यें कमिटीचा रिपोर्ट वगैरे होऊन कॉलेजची योजना सर्व टप्प्यांतून पार पडून १९३६ जूनमध्यें सुरूं होईल असा बळकट भरंवसा वाटत आहे.

मुंबई इलाख्यांत बी. कॉम्. व एम्. कॉम्. या पदव्या देणारें कॉमर्स कॉलेज फक्त एकच असून मुंबई बाहेरही उच्च व्यापारी शिक्षण देणाऱ्या संस्था थोडयाच असल्यानें त्या कॉलेजांत प्रवेश न मिळाल्यानें पुष्कळांस निराशेनें परत जावें लागतें. खेरीज मुंबईचा खर्च न झेपल्यानें पुष्कळांना व्यापारी शिक्षण घेण्याची इच्छा मनांतच ठेवावी लागते. या दृष्टीनें पुण्यास निघणाऱ्या कॉलेजबद्दल सर्वांची सहानुभूति आहे. या कॉलेजच्या सल्लागार मंडळांत महाराष्ट्रांतील व्यापारी संस्था, उद्योगधंदे व बँका, लाइफ इन्शुरन्स कंपन्या अशा अनेक संस्थांमध्यें काम करणाऱ्या प्रसिद्ध व्यक्तींचा समावेश केलेला आहे. श्री. ग. स. मराठे अॅक्चुअरी, प्रि. ध. रा. गाडगीळ वगैरे प्रमुख व्यक्तींची या कामीं सक्रिय सहानुभूति आहे.

कॉलेजची सोय प्रारंभीं डेक्कन जिमखान्यावरील म. ए. सोसायटीचे इमारतींत होणार असून पुढें स्वतंत्र इमारतीची सोय होईल. कॉलेजच्या पूर्व तयारीची सर्व व्यवस्था श्री. ए. व्ही. वापट, सेक्रेटरी, म. ए. सोसायटी, सदाशिव पेठ पुणें यांजकडे आहे.

---

## ७ पुणें शहर म्युनिसिपालिटीची
## डांबरी रस्ते करण्याची योजना

पुणें शहर म्युनिसिपालिटीचे हद्दींतील रस्त्यांची परिस्थिति पाहतां असें आढळून येतें कीं, उन्हाळ्यांत अतिशय धूळ होते व साधारण वाऱ्याचे झुळकीसरशी अगर एकादी मोटारगाडी वेगानें गेल्यास धुळीचा लोळ उठतो व पायीं चालणाऱ्या लोकांस व रस्त्याचे बाजूचे इमारतींत राहणारे लोकांस धुळीचा अत्यंत त्रास होतो. शिवाय धुळीमुळें नाना तऱ्हेचे रोग उत्पन्न होत असल्यामुळें नागरिकांस आरोग्यदृष्ट्याहि ती हानिकारक आहे. पावसाळा सुरू झाल्यानंतर जोरानें पाऊस झाल्यास रस्त्यावरील चिखल धुवून जातो; परंतु पाऊस जोराचा न पडतां झिमझिम सुरूं झाली म्हणजे जिकडे तिकडे पातळ चिखल बनून पुण्याच्या रस्त्यांत प्रसिद्ध रबडी होऊन नागरिकांस पायीं चालणें अत्यंत त्रासाचें होतें. तशांत प्रत्येक रस्त्यांतून मोटारी व लॉरी वेगानें जात असल्यामुळें चोहोंकडे चिखल उडून नागरिकांची स्थिति अत्यंत केविलवाणी होते. ही परिस्थिति उत्पन्न होण्याचीं कारणें कोणतीं व तीं नाहींशीं करण्यास काय उपाय करावे लागतील याचा खालीं विचार केला आहे.

### हल्लींच्या रस्त्यांची स्थिति.

पुणें शहरांतील बहुतेक रस्ते बोळाखेरीजकरून "येरवडा दोन-इंची खडीनें" करण्यांत येतात. य बहुतेक रस्त्यांवर डबराचा पाया नाहीं. परंतु हे रस्ते खडीनें २।३ वर्षांनीं सारखे केले गेल्यामुळ खडीचा थर ९ इंचापासून १५ इंचांपर्यंत पुरेसा कठिण तयार झाला असून रस्त्याची उंचीहि वाढली आहे. त्यांस नवीन पायाची आवश्यकता आहेच असें वाटत नाहीं. मुख्यतः रस्त्यांची चांगली परिस्थिति राखण्यासाठीं रस्त्यांस चांगल्या प्रकारचा कँबर (पोंग) घ्यावा लागतो व हा कँबर दोन्ही बाजूंस सारख्या लेव्हलवर गटारें असल्यास पूर्ण होतो. परंतु हीं गटारें एका लेव्हलला नसल्यामुळें रस्त्यास जसा कँबर यावयास पाहिजे तसा येत नाहीं. शिवाय बहुतेक ठिकाणीं हीं गटारें नसल्यामुळें व कच्चीं गटारें बुजविलीं गेलीं असल्यामुळें योग्य कँबर देण्याचा प्रयत्न केला असतांहि तो यशस्वी होत नाहीं. कोणताही रस्ता तो बाजूस गटारें असल्याखेरीज पूर्ण होत नाहीं. पुणें शहरांतील रस्त्यांची स्थिति मात्र याच्या उलट आहे. गटारें भरलीं गेलीं असल्यामुळें प्रत्येक चौकामध्यें असलेल्या कच्च्या क्रॉस गटारांतून पावसाचें पाणी नीटपणें जाऊं शकत

नाहीं व प्रत्येक क्रॉस गटाराचे तोंडीं पावसाचें पाणी तुंबून राहतें. ही परिस्थिति मोठा पाऊस पडतो तेव्हां होते; परंतु झिम्झिम् पाऊस पडत असतांना जे थोडें पाणी पडतें तें कच्च्या बुजविलेले गटारावर जाऊन तेथेंच थबकून राहिल्यानें अतिशय चिखल होण्यास कारणीभूत होतें. पडलेल्या पावसाचें सर्व पाणी योग्य ढाळ न राहिल्यानें रस्त्यावरच मुरून तें खडीमध्यें जातें व त्यामुळें खडीखालील माती वर येऊन अधिक चिखल होण्यास मदत होते. तशांत जड वाहनांची वाहतूक जोरानें चालू असल्यामुळें त्या चिखलांत झिम्झिम् पडणाऱ्या पावसाचें पाणी मिळून सर्वच राड होऊन रस्ता चिखलमय होऊन जातो तशांत या कच्च्या गटारामध्यें १९१६ सालचे सुमारास ड्रेनेजच्या बांधलेल्या कुंड्या गटारांत मध्येंच येत असल्यामुळें जें थोडें पाणी वाहून गेलें असतें तेंहि न जातां या कुंड्यांमुळें तेथेंच तुंबून राहतें. अशा प्रकारची स्थिति झाल्यानंतर नागरिक आपले सोयीसाठीं घरांत जातांना त्रास होऊं नये म्हणून साहजिकच राडेरोडे मुरूम वगैरे दारापुढें टाकतात. हे टाकलेले ढीग जरी कांहीं वेळ मालकांस सोयीचे वाटतात तरी थोडक्याच काळांत ते चिखलमय होऊन सर्व घरांच्या समोर व रस्त्यावर अधिक चिखल होऊन तो सर्व रस्त्यावर पसरून जातो व या कारणानें रस्त्याचे ढाळ व सेक्शनही बदलतात. शिवाय म्युनिसिपालिटीचे रस्ते बऱ्याच ठिकाणीं अरुंद असल्यामुळें व त्यांवरील वाहतूक पी. डब्ल्यू. डी. चे रस्त्यांवरून जाणाऱ्या वाहतुकीपेक्षां पुष्कळ पटीनें अधिक असल्यामुळें जड वाहनांच्या बेसुमार वाढलेल्या वाहतुकीस हल्लीं करणेंत येत असलेल्या पद्धतीचे रस्ते अगदींच कुचकामी ठरतात. ठराविक वाहनें ठराविक रस्त्यानें जाण्याचे निर्बंध नसल्यामुळें खडी न घातलेल्या बोळामध्यें सुद्धां २ टनांच्या लॉरीज वावरतांना दिसतात. अशा प्रकारें रस्त्यांची यापुढें नासधूस होऊं नये व नागरिकांस कोणत्याही प्रकारचा उपसर्ग पोहोंचूं नये म्हणून त्यांचे सुखसोयीसाठीं कांहीं उपायांची योजना करणें जरूर वाटल्यावरून खालीं दर्शविलेल्या गोष्टींचा विचार करणें आवश्यक आहे.

(१) वाहतुकीच्या दृष्टीनें रस्ता अधिक मजबूत व बिनचिखली व योग्य पाणढाळांत करणें.

(२) प्रत्येक रस्त्यांत पाणी जाण्यासाठीं योग्य प्रकारचीं गटारें बांधणें.

(३) वाहतुकीवर नियंत्रण घालणें.

(१) वाहतुकीच्या दृष्टीनें रस्ता अधिक मजबूत करणें. पब्लिक वर्क्स खात्यामध्येंहि सरकारचे जे पहिल्या दर्जाचे रस्ते आहेत त्यांची हल्लींची परिस्थिति पाहूं जातां अधिक पैसे खर्च करूनही पूर्वीपेक्षां वाईट आहे. ही स्थिति सुधारण्यासाठीं सरकारी खात्यांतून वेगवेगळे प्रयत्न करण्यांत येत आहेत. त्यांचे रस्त्याचे बाजूस गटार जरूर असतें. त्या रस्त्यावरून मोठ्या लॉरीज वेगानें धांवत जात असल्यामुळें रबरी टायरचे खालीं व्हॅक्यूम होऊन खडी पंपाप्रमाणें जमिनींतून वर ओढून घेतली जाते. त्यामुळें रोलरनें बसविलेली खडी निखळल्यामुळें त्या ठिकाणीं एकामागून एक असे खडे निघून खड्डेपडण्यास सुरुवात होते. अशा प्रकारें खडे पडण्यास एकदां सुरुवात झाली म्हणजे तो रस्ता वाईट होण्यास फारच थोडा अवधी पुरेसा होतो. असे खड्डे पडूं नयेत म्हणून त्या रस्त्यावर सारखा मुरूम, वाळू, किंवा बाजूची माती पसरण्यांत येते. त्यामुळें मोटारी जात असतांना धुळीचे लोट उडतात हें प्रत्येकानें पाहिलें असेल. परंतु अशा प्रकारें त्या रस्त्यावर वाळू, मुरुम वगैरे पसरणें हा रस्त्याचें आयुष्य वाढविण्याचा किंवा तो कायमचा टिकाऊ बनविण्याचा उपाय नाहीं. फक्त योग्य अशा वाळू अगर मुरुम पसरण्यानें रस्ता थोडा जास्त टिकूं शकतो. अशा प्रकारें मुरुम किंवा माती टाकून अधिक चिखलमय असलेल्या शहरांतील रस्त्यांस या पद्धतीचा अवलंब करतां येण्यासारखा नाहीं. रस्त्याचें आयुष्य अधिक वाढविण्यासाठीं सरकारी तज्ञाकडून वेगवेगळ्या ठिकाणीं बरेच प्रयोग करण्यांत आलेले आहेत. नाशिक स्टेशन रोडवरील वेगवेगळ्या पद्धतीनें रस्ते करण्याचे प्रयोग करण्यांत

आले आहेत. पुणें येथें सोलापूर रोडवर रेस कोर्सचे पलीकडे सिमेंटचा वेगळ्या पद्धतीचा रस्ता प्रयोगादाखल करण्यांत आलेला आहे. नगर रोडवर नामदार आगाखान यांचे बंगल्याचे बाजूस दोन्ही बाजूस डांबरी व सिमेंटचा रस्ता तयार करण्यांत आला आहे. या बाबतींत डांबरी किंवा सिमेंटचे रस्त्याखेरीज दुसऱ्या तऱ्हेचा रस्ता चांगल्या परिस्थितींत ठेवणें शक्य नाहीं असा तज्ञांचा अभिप्राय आहे. मुंबई, अहमदाबाद, वगैरे म्युनिसिपालिटयांमध्येंहि असाच अनुभव आल्यामुळें सिमेंटचे व डांबरी रस्ते करण्यांत आले आहेत. व याच अनुभवाप्रमाणें पुणें शहरांत डांबरी व सिमेंटचे रस्ते करणें आवश्यक झालें आहे. ह्या टिकाऊ पद्धतीनें रस्ते करण्यानें दुसरी एक मुख्य सोय ही होते कीं, रस्त्याखालून पावसांत येणारे चिखलास प्रतिबंध होतो व चिखलामुळें होणारे गैरसोयीचें निराकरण होतें. हें डांबरी किंवा सिमेंटचे रस्ते करण्याचें काम अत्यंत खर्चाचें असतें. विशेषतः पहिल्या प्रतीच्या डांबरी रस्त्यापेक्षां सिमेंटच्या रस्त्यास लागणारा खर्च सुमारें तिप्पट अधिक असतो. सिमेंटच्या रस्त्याचें आयुष्यही त्याचप्रमाणें अधिक असेल असें म्हणतात; परंतु त्याचा हिंदुस्थानांत प्रत्यक्ष अनुभव यावयाचा आहे. पुणें शहर म्युनिसिपालिटीची स्थिति लक्षांत घेतां सिमेंटचे रस्ते करण्याऐवजीं डांबरी रस्तेच करणें अधिक सोयीचें होईल असें दिसतें. कारण शहरांतील अरुंद रस्त्यांमध्यें ड्रेनेज व पाण्याचे मोठे नळ, तसेंच प्रत्येक घरमालकाचे ड्रेनेज व पाण्याचे घरजोड, त्याचप्रमाणें इलेक्ट्रिक केबल्स, टेलिफोन व टेलिग्राफ वायर्स यांचें सारखें रस्त्यांत जाळें असल्यामुळें ते रिपेअर करतेवेळीं सिमेंटचे कामास फोडून तें जोडणें अत्यंत जिकिरीचें व व खर्चाचें होईल. व सिमेंटचा जोडही नीट होत नाहीं. अशा परिस्थितींत डांबरी रस्त्याचें काम हें कमी वेळांत व थोडक्या खर्चांत होऊन तें पूर्ववत् थोडक्या खर्चांतच रिपेअर करतां येण्यासारखें आहे. म्हणून पुणें शहरांतील रस्त्यांचा विचार करतांना शहरांतील रस्त्यांचे तीन प्रकार केले आहेत.

(१) पहिल्या नंबरचा अधिक वाहतुकीचा रस्ता.

(२) कमी वाहतुकीचा रस्ता.

(३) बोळ.

(१) पहिल्या वर्गाचे रस्ते हे प्रिमिक्स टारमॅकडम पद्धतीनें रस्ते करणें हें त्यांतल्या त्यांत अधिक टिकाऊ व कमी खर्चाचें आहे. या रस्त्याचे कामीं प्रथम खडी मिक्सरमध्यें टाकली जाऊन ती डांबरामध्यें मशीननें कांहीं काळपर्यंत नीट मिसळून गेल्यानंतर मग रस्त्यावर टाकण्यांत येते. दुसऱ्या पद्धतीनें कोरडें रुलिंग करून डांबर ओतण्यांत येतें. तें डांबर किती ओतावयाचें यासंबंधीं नियम आहेत. ते खर्चाचे दृष्टीनें कमी अधिक टाकण्यांत येणारें डांबर मिक्सर इतकें एकजीव होऊं शकत नाहीं. त्यामुळें या सेमीपेनिट्रेशन प्रोसेसनें रस्ते तयार करण्याच्या पद्धतीचा पुणें शहरांतील रस्ते करण्यास उपयोग होणार नाहीं. प्रिमिक्स पद्धतीनेंच मार्केट मधील रस्ता तयार करण्यांत आला आहे. व तो रहदारीनेंच गुळगुळीत झाला आहे. रस्ता झाल्यावरोबर प्रथम दर्शनी त्याचें स्वरूप खडखडीत दिसतें. परंतु दोन तीन महिन्यांचे अवधींतच वाहतुकीमुळें एकजीवपणा व पृष्ठभागावर गुळगुळीतपणा येतो.

ज्या रस्त्यांवर अधिक वाहतुक नाहीं, अशा रस्त्यांवर एक इंची टारमॅकॅडम–पद्धतीनें रस्ते केल्यास ते पुरेसे टिकाऊ होतील असें तज्ञांचें मत आहे.

(२) बोळामध्यें डांबरी किंवा सिमेंटचे–रस्ते न करतां त्या बोळावर कायमची दगडी फरशी केल्यास ते पक्के सुधारतील असा अंदाज आहे.

रस्ते कोणत्या पद्धतीनें केले असतांना पुणें शहरास अधिक उपयोगी पडतील याची माहिती वर दिलेलीच आहे. परंतु नुसते रस्ते करून चालणार नाहीं. गटारेंही आवश्यक आहेत. तीं गटारें दगडांचीं कायमचीं पक्कीं बांधणें झाल्यास त्यास फार मोठा खर्च येईल. म्युनिसिपालिटीचे रस्ते अरुंद असल्यामुळें ती गटारें उघडीं ठेवतां

यावयाचीं नाहींत. तीं बंद करून मधोमध जाळी ठेवणें झाल्यास या कामाचा खर्च फारच वाढेल म्हणून रस्त्याचे दोन्ही बाजूस सिमेंट कॉंक्रीटचीं गटारें करणें सोयीचें होईल. घरमालकाच्या जोत्यापासून सरासरी दोन फूट जागा रिकामी ठेवून खांडकी वसवून या दोन खांडकीमधील भाग २॥ इंच जाडीचा रोलिंग करून टारमॅकेडम पद्धतीनें खडी भिजवून पहिला थर तयार करावयाचा व त्यावर अर्धा इंच जाडीचा सील कोट करावयाचा व त्यास पाणी ताबडतोब वाहून जाण्यास लागणारे तज्ञांनीं ठरविलेलें ढाळ द्यावयाचे. हीं खांडकीं व मालकाचें जोतें यांमधील भाग अदमासें २ ते ३ फूट रुंदीचा, ३ इंच जाडीच्या सिमेंट फरशीनें झांकावयाचा व त्याची लेव्हलही या खांडकीपेक्षां कमी ठेवावयाची. या फरशीस गटाराप्रमाणें सुमारें ६ इंच खोली ठेवावयाची त्यामुळें त्यावर फरशी घालण्याची आवश्यकता राहणार नाहीं. घरमालकांसही त्यांवरून जातांना त्रास होणार नाहीं. जेव्हां थोडा पाऊस पडतो तेव्हां या गटारांतून पाणी सहजच वाहून जाईल. परंतु जेव्हां वर्षांतून सुमारें ५।६ वेळां मोठा पाऊस पडतो तेव्हां थोडा वेळपर्यंत रस्त्याचे बाजूंस थोडें पाणी सांचेल. तथापि गटारास बरोबर स्लोप दिल्यामुळें तें पाणी फार वेळ टिकणार नाहीं. मुंबईसारख्या मोठ्या शहरामध्येंहि मोठालीं स्टॉर्म वॉटर गटारें बांधलीं असतांदेखील मोठा पाऊस आला असतां रस्त्यावर कांहीं तास गुडघ्यापेक्षांहि अधिक पाणी साचतें हें पुष्कळांनीं पाहिलें असेलच. परंतु या थोडा वेळ पाणी सांचण्यानें, केलेल्या डांबरी रस्त्यास किंवा सिमेंटचे फरशीस कोणत्याही प्रकारचा अपाय होणार नसल्यामुळें असें काम करणें खर्चाचे दृष्टीनेंहि सोईचें होईल असें वाटतें. हें गटारांतून वाहणारें पाणी नागझरी, माणीक नाला, पेशवा नाला, अगर नदी ह्यांमध्यें ताबडतोब जाण्यासाठीं कांहीं ठिकाणीं मोठालीं गटारें बांधावीं लागतील. यांचाही विचार केला पाहिजे. व त्याबाबत म्युनिसिपालिटीस काय खर्च येईल त्याचा अंदाजांत समावेश केला पाहिजे.

( ३ ) रस्त्यावर वाहतुकीवर नियंत्रण घालण्यासाठीं मे. कलेक्टरसाहेब यांजकडून म्युनिसिपालिटीकडे लिहून आलें आहे व रस्त्याचे सुरक्षिततेच्या दृष्टीनें म्युनिसिपालिटीनें त्याचा जरूर विचार करावा.

वर नमूद केलेल्या पद्धतीनें गटारासहित डांबरी रस्ते व फरशीचे बोळ आणि स्टार्म वॉटर ड्रेनेजची योजना केल्यास म्युनिसिपालिटीस काय खर्च येईल याचा पुढीलप्रमाणें अंदाज केला आहे.

( १ ) पहिल्या प्रतीचे रस्ते गटारासहित.

टार मॅकॅडमचे पद्धतीनें खडीचा थर रोलींग करून २॥ इंच जाडीचा घालणें व त्यावर अर्धा इंच जाडीचा सीलकोट रोलिंग करून बसविणें खाचखळगे, खडी, प्रीमिस्कमध्यें मिळवून ती घालणें व योग्य कॅंबर व ढाळ देणें रस्त्याचें दोन्ही कडेस ६ इंच खांडक्या बसविणें. जरूर त्या ठिकाणीं क्रॉस गटारें योग्य मापाचीं घालणें. ड्रेनेज जवळ नळ, रस्ता करते वेळीं, मोडतोड झाल्यास नीट करणें व रस्त्याचे दोन्ही बाजूस सिमेंट कॉंक्रीटची दोन इंच जाडीची कांक्रीट नकाशांत दाखविलें प्रमाणें घालणें, वगैरे कामें करणें.

(२) दुसऱ्या प्रतीचे रस्ते डांबरी गटारासहित-टार मॅकॅडमचे पद्धतीनें खडीचा थर १ इंच जाडीचा रोलिंग करून बसविणें व बाकी सर्व रस्त्याचे कामावर पहिल्या प्रतीचे रस्त्यांत वर्णन केल्याप्रमाणें खड्डे प्रीमिस्कनें भरणें, लेव्हल करणें, योग्य ढाळ कंबर देणें क्रॉस गटारें योग्य मापाचीं घालणें सिमेंट कांक्रीटची वॉटर टेबल्स करणें वगैरे

(३) स्टार्म वॉटर गटारें वगैरे.

सिमेंट कॉंक्रीटचीं गटारें १२, १५ व १८ इंच रुंदीचीं व खोलीचीं माणिकनाला, नागझरी नाला, नदी वगैरे पासून अदमासें र. फू. ४०००० आकार १०००००. जरूरीप्रमाणें जरूर त्या रस्त्याकडे पावसाचें पाणी जाण्याकरितां करणें.

कांटिन्जन्सीज ५ टक्के ११,८७,९३०

एकूण रक्कम १२४७३२७

वरील सुचविलेली योजना सुमारें १२॥ लाखांची आहे. हीं कामें म्युनिसिपालिटीस खर्चाचे दृष्टीनें कशाप्रकारें करितां येतील हा महत्त्वाचा प्रश्न आहे. शहर सुधारणा होण्यासाठीं पाणी पुरवठा व ड्रेनेज हीं अत्यंत महत्त्वाचीं कामें आहेत. व तीं रस्ते डांबरी करण्यापूर्वीच करावीं लागतात. तीं कामें बहुतेक १९३३ सालापर्यंत पुरीं झालीं आहेत. व जोंपर्यंत अपुरीं होतीं तोंपर्यंत रस्ते डांबरी करण्याचा प्रश्नच उद्‌भवला नव्हता. परंतु त्या अडचणी नुकत्याच गेल्या सालापासून दूर झाल्यानें म्यु.टीनें सिमेंटचा व डांबरी रस्त्याचा प्रश्न हातीं घेतला व प्रथमतः लकडीपूल व मार्केट या ठिकाणीं सिमेंटचा व डांबरी रस्त्याचा उपयोगहि करण्यांत आला. ड्रेनेज व पाणीपुरवठा या कामीं म्यु. टीनें बरीच मोठी रक्कम खर्च केल्यामुळें ३६ लक्ष रुपयांचे या बाबतींत दरसाल कर्जाचे मोठे हप्ते द्यावे लागतात. त्यामुळें चालू उत्पन्नांतून डांबरी रस्त्यासारखी कांहीं अंशीं बुडीत खर्चाचीं कामे चालू उत्पन्नाच्या रकमेंतून करतां येतील असें वाटत नाहीं. याकरितां नवीन कर बसवून अन्य रीतीनें या खर्चाची तरतूद करावी लागेल. तरी अंदाजांत धरलेलीं कामें सुमारें ४ वर्षांत पुरीं होतील व त्यास लागलेली रक्कम सुमारें १० वर्षांत सव्याज परत देणें झाल्यास म्युनिसिपालिटीस कमींत कमी अदमासें सव्वा लाख रुपयांचा हप्ता भरावा लागेल. ही अधिक लागणारी रक्कम रस्त्याच्या दरवर्षी होत असलेल्या चालू खर्चामधूनच बरीचशी देतां येण्यासारखी असल्यामुळें किती रकम शिल्लक राहूं शकेल याचा प्रथम विचार करूं.

रस्त्याच्या कामासाठीं खर्च होणाऱ्या बाबी खालीलप्रमाणें चालू सालचे बजेटांत आहेत.

| | | |
|---|---|---|
| (१) | रस्ता दुरुस्ती | ५५००० |
| (२) | बोळ दुरुस्ती | २४००० |
| (३) | गटारें | १२००० |
| (४) | चिखल काढणें | ३५०० |
| (५) | रस्त्यावर पाणी घालणें | १४००० |

एकण १०८५०० ( म्हणजे सुमारें ११००००) इतके रुपये खर्च होतील.

पुणें शहरांतील टा. प्लॅ. स्की. रस्ते व शहरांतील बोळ धरून सुमारे ९३ मैल लांबीचे रस्ते आहेत. त्यापकीं ५३ मैलांचे रस्ते डांबरी करण्याचे अंदाजांत धरले आहेत २० मैलाचे बोळ फरशीचे करणें व २० मैल लांबीचे रस्ते दुरुस्त ठेवण्यासाठीं दरसाल चालू बजेटपैकीं सुमारें ५०००० रुपये दरसाल ठेवावे लागतील. बाकीचें सुमारें ५५००० रुपये या कर्जफेडीतील हप्तें देणेंसाठीं परत घेतां येतील. डांबरी रस्ते झाल्यानंतर रस्त्यावर पाणी टाकावें लागणार नाहीं असें गृहीत धरलें असल्यामुळें चालू बजेटांत पाण्यासाठीं देण्यांत आलेली रक्कम सर्व न धरतां सुमारें ४००० रुपये दरसाल लागतील असें धरलें आहे म्हणजे दरसालाचा हप्ता भरण्यास १२५००० रुपयांपैकीं फक्त ५५००० रुपये चालू खर्चांतून मिळतील व रु॰ ७०००० ची तरतूद नवीन टॅक्स मधून करावी लागेल. ही रक्कम जादा कर बसवून कशी वसूल करावयाची तें पुढें पाहूं.

पुणें शहरामध्यें सुमारें २० ते २५ हजार सायकली असतील असा अंदाज आहे. सायकलवाले रस्त्यांचा पूर्ण उपयोग घेत आहेत हल्लीं खाचखळगे असलेल्या रस्त्यापासून त्यांनाही बराच त्रास होत आहेच परंतु ते रस्ते चांगल्या स्थितींत ठेवण्यासाठीं त्यांच्याकडून म्यु. टीस कोणतेही प्रकारचा मोबदला मिळत नाहीं. त्या करितां प्रत्येक सायकलीमागें दरसाल रु. २ कर बसविल्यास खर्च वजा जातां सुमारें रु. ४०००० उत्पन्न होईल. अशाच प्रकारचा सायकल टॅक्स नागपूर व जबलपूर म्युनिसिपालिटीनें बसविलेला आहे. हा कर वसूल करतांना फार अडचण पडेल अशा प्रकारचे आक्षेप येण्याचा संभव आहे. परंतु शहरांतील हल्लीं कांहीं वाहनें जशीं चुकतात त्याप्रमाणें यांतलीं कांहीं चुकलीं म्हणून टॅक्स अजिबात न बसविणें बरोबर होणार नाहीं. पुणें म्युनिसिपालिटीचा एक बिल्ला प्रत्येक

सायकलवाल्यास लावणें भाग पाडावें. पुणें शहरामध्यें प्रत्येक सायकलीमागें तांबडा काचेचा खडा बसविण्यासंबंधीं पोलीस अधिकाऱ्यांनीं जनतेस जाहीर नोटीस देऊन फक्त ८ दिवसांतच त्याची अम्मलबजावणी करून दाखविली. तशाच प्रकारें म्युनिसिपालिटीस करणें अशक्य होणार नाहीं असें आम्हांस वाटतें. याखेरीज गरीब लोकास त्रास न होईल अशा प्रकारचा मोटार टॅक्स हा आहे. पुणें शहरामध्यें सुमारें ४ महिने मुंबई सरकारचें ठाणें येथें असल्यामुळें व रेसीसचा सीझन चालू असल्यामुळें रोज राजेरजवाडे व मुंबईतील धनिक लोक यांच्या हजारो मोटारी पुणें शहरामध्यें बाहेरून येतात. त्या मोटारीवर म्यु. टीचे रस्ते वापरूनसुद्धां ह्या मोटारवाल्यांकडून कांहीं कर वसूल करण्यांत येत नाहीं. तर टोल टॅक्सचे रूपानें बराचसा कर म्यु. टीस वसूल करतां येईल. याखेरीज बऱ्याच संस्थानिकांच्या मोटार गाड्या त्यांच्या संस्थानामध्यें रजिस्टर होऊन त्या महिनेच्या महिने पुणें शहरांत रहातात; अशा मोटारीवरही पुणें शहर म्युनिसिपालिटीला मोटार व टोल टॅक्स घेणें भाग पाडणें जरूर आहे. त्याचप्रमाणें मोटार लॉऱ्या या पुणें शहरामध्यें बाहेर गांवाहून वाहतुकीचें काम करतात. त्या मोटारीस म्यु. टीचा टॅक्स नसतो. परंतु सुमारें अर्धा दिवसपर्यंत त्या सिटी म्यु. टीमध्यें असतात. अशा मोटारीस म्यु. टीचा मोटार टॅक्स व लोड टॅक्स देणें भाग पाडलें असतां अन्यायाचें होणार नाहीं. सदर मोटारीचे बाबतींत पुणें शहर व लष्कर सबर्बन यांचा संबंध फार जवळचा असल्यामुळें कदाचित् थोडासा त्रास होण्याचा संभव आहे. परंतु सदर म्यु. टी बरोबर इतर जकातीचे कराप्रमाणें कांहीं ठराविक हिस्सा ठरविल्यास त्या म्यु. टीकडून हरकत येईल असें वाटत नाहीं. याखेरीज तिसरी बाब ही बैलगाड्यांची आहे. पुणें शहराच्या आसपास असलेल्या बऱ्याच बैलगाड्या पुणें शहरामध्यें येऊन धंदा करतात. त्या मालानें भरून आल्या असल्यास त्यास नियमाप्रमाणें कर द्यावा लागतो. परंतु याखेरीज बऱ्याच गाड्या पुणें शहरामध्यें येऊन दिवसभर धंदे करतात व रात्रीचे वेळीं घरीं जातात. अशा गाड्यांस म्यु. टी. च्या इतर बैल गाड्यांप्रमाणें लायसेन्स घेणें भाग पाडावें, अगर मधून मधून येणाऱ्या ज्या गाड्या असतील त्यांना निदान ८१ टोल टॅक्स बसविण्यांत यावा. नगर म्यु. टीमध्यें अशा गाड्यांवर व मोटारींवर व लॉरींवर टोल टॅक्स बसवून सुमारें ४२००० वस्तीमध्यें सुमारें १२००० चे उत्पन्न वाढविलें आहे असें समजतें. करितां वर सुचविल्याप्रमाणें मोटारीवर व बैलगाड्यावर कर बसविल्यास डांबरी रस्त्याकरितां येणाऱ्या हप्त्यास लागणारी रक्कम सहज वसूल होण्यासारखी आहे असें दिसून येईल.

पुणें शहरामध्यें ड्रेनेज वॉटर सप्लाय हीं कामें बहुतेक पुरीं झालेलीं आहेत. डांबरी रस्ते व सर्व शहरभर विजेचे दिवे याच गोष्टींची तूर्त उणीव भासत आहे. विजेच्या दिव्यासंबंधीं इलेक्ट्रिक सप्लाय कंपनीशीं वाटाघाट करून स्पेशल दर ठरविण्यांत आले आहेत. परंतु त्याचा कायम निकाल झाला नाहीं. करितां या दोन्ही बाबींची अंमलबजावणी केल्यास ३–४ वर्षांमध्यें पुणें शहरची सुखसोयीच्या व आरोग्याच्या दृष्टीनें मोठीच सुधारणा होईल.

---

## ८ प्रभाकर परफेक्ट सेफ्टी स्टोव्ह.

अलीकडे होऊं लागलेल्या स्टोव्हच्या अपघातांचीं हृदयद्रावक वर्णनें व त्याबाबत मुंबईचे कोरोनेर रावबहादूर आठवले साहेब यांनीं केलेली खरमरीत परंतु कळकळीची टीका वाचून श्री. ओगले यांचें लक्ष या विषयाकडे वळलें. त्यांनीं बाजारांत प्रचलित असलेल्या अशा प्रकारच्या सर्व स्टोव्हजूचें बारकाईनें निरीक्षण करून व साधारण मध्यम स्थितींतील स्टोव्ह वापरणाऱ्या आपल्या समाजाच्या गरजांकडे लक्ष देऊन हा स्टोव्ह बनविला आहे.

आजकाल अशा प्रकारचे स्टोव्ह बाजारांत सेफ्टी स्टोव्ह म्हणून विकले जात आहेत हे परदेशांतून बनवून आणलेले आहेत. प्रभाकर परफेक्ट

सेफ्टी स्टोव्हचे लोखंडी पत्रा, तार, एनामल वगैरे सामान स्वदेशी असून बर्नरसह सर्व भाग यांचेच कारखान्यांत तयार केलेले आहेत.

प्रभाकर स्टोव्हला परफेक्ट सेफ्टी स्टोव्ह असें नांव दिलें आहे. तें अशासाठीं कीं, प्रेशरपंप नसल्यामळें टांकींतील तेलावर दाब येत नाहीं. इतर स्टोव्हमध्यें टांकीतील तेलावर दाब येतो, निपलमध्यें कांहीं अडकल्यास तो दाब वाढत जातो व त्याचा परिणाम स्टोव्हची टाकी फुटून तेल चोहोंकडे उडण्यांत व भडकण्यांत होतो. प्रभाकर स्टोव्हमध्यें असले अपघात होण्यास जागाच नाहीं.

प्रभाकर स्टोव्हला तापविण्याकरितां स्पिरीटची मुळीसुद्धां गरज लागत नाहीं. त्यामुळें स्पिरीट पेटून भडकण्यानें होणारे अपघात टळतात. इतर स्टोव्हसंबंधीं अपघात होतात त्यामध्यें स्पिरीट पेटून झालेल्या अपघातांची संख्या बरीच मोठी असते. स्पिरीटची बाटली स्टोव्हच्या नजीक ठेवल्यानें, तें लवंडल्यानें, किंवा जळत्या स्पिरीटमध्यें आणखी स्पिरीट ओतत असतांना असे अपघात घडतात. प्रभाकर स्टोव्ह पेटविण्यास स्पिरिट लागत नसल्यानें अशा तऱ्हेचे अपघात होण्यास वाव नाहीं.

कित्येक वेळां नेसत्या वस्त्राचे सहाय्यानें किंवा सोधन्यानें बायका चुलीवरील भांडीं उतरतात. असें करणें चुकीचें तर खरेंच, आणि तेंच बहुधा अपघातास कारण होतें. प्रभाकर स्टोव्हमध्यें असले अपघात होऊं नयेत म्हणून भांडें उतरतांना ज्वाळा झांकून टाकण्यासाठीं एका सरक तबकडीची योजना केली असून ती वापरण्यासहि अतिशय सोपी आहे. त्यामुळें अशा तऱ्हेचे अपघातहि प्रभाकर स्टोव्ह वापरल्यानें होण्याची धास्ती राहिलेली नाहीं.

स्टोव्हच्या निपलमध्यें कचरा अगर पिन्स अडकल्यानें कित्येकदां अगदीं ऐन घाईच्या वेळीं किती खोटी होते अगर कामही बंद पडून कसा घोंटाळा होतो याचा अनुभव प्रत्येक स्टोव्ह वापरणारास आहेच. प्रभाकर स्टोव्हमध्यें पिन्स वापरण्याची जरूरच लागत नसल्यानें तो अगदीं हुकमी व वक्तशीर काम देणारा झाला आहे.

---

## ९ महाराष्ट्र प्रांतिक हरिजन सेवक संघ

### सन १९३४-३५ सालचा सहामाही अहवाल
### ( आक्टोबर १९३४ ते मार्च १९३५ )

सन १९३४ सालांत महाराष्ट्र प्रांतिक हरिजन सेवक संघाच्या जिल्हा व तालुका शाखा मिळून एकंदर १४ शाखा होत्या. चालू सालीं चार नवीन शाखांचें काम सुरू झालें आहे. (१) पूर्वखानदेश जिल्हा शाखा, (२) करमाळा तालुका शाखा, (३) अक्कलकोट संस्थान शाखा व (४) मालेगांव तालुका शाखा.

संघाचें कार्य:—महाराष्ट्रांतील हरिजन सेवक संघाचें कार्य मुख्यत: शैक्षणिक आहे. हरिजन मुलामुलींना शाळेंत जाण्यास प्रोत्साहन देणें, त्यांना पाटचा, पेन्सिली, पुस्तकें पुरविणें, क्वचित् प्रसंगीं मुलांना कपडे देणें, तसेंच शिक्षणासाठीं शिष्यवृत्त्या देणें, हरिजन विद्यार्थ्यांसाठीं नवीन वसतिगृहें सुरू करणें व चालू असलेल्या वसतिगृहांस मदत करणें वगैरे प्रकारच्या शैक्षणिक बाबी हरिजन सेवक संघानें हातीं घेतल्या आहेत. शिक्षणाबरोबरच मुलांमुलींना स्वच्छतेच्या संवयी लावणें, नित्य स्नानाची पद्धत सुरू करणें व आरोग्य रक्षणाचें महत्त्व त्यांच्या मनावर बिंबविणें, तसेंच वैद्यकीय सल्ला देऊन मोफत औषधें देणें वगैरे कामेंहि हरिजन सेवक संघानें हातीं घेतलीं आहेत. याखेरीज स्पृश्य हिंदू व हरिजन यांना निरनिराळ्या उत्सवप्रसंगीं एकत्र आणून त्यांच्यामध्यें प्रेम व भ्रातृभाव उत्पन्न करणें व अस्पृश्यतेची कल्पना नष्ट करणें या बाबीकडेहि हरिजन सेवक संघाकडून विशेष लक्ष पुरविलें जातें.

शाळा:—खेड्यापाड्यांतून अथवा शहरांतहि हरिजनांच्या वस्तींत अगर नजिक शाळा नसतात. त्यामुळें हरिजनांच्या मुलांमुलींना शाळेंत जाण्यास प्रोत्साहन मिळत नाहीं. ही अडचण दूर करण्यासाठीं हरिजन सेवक संघानें जरूर व शक्य तेथें शाळा उघडण्याचा उपक्रमहि केला आहे. खालील ठिकाणीं सध्यां अशा प्रकारच्या शाळा चालू आहेत. सोलापूर शहर १, नाशिक २, अंबरनाथ व अंबरनाथाच्या पांच मैलांतील टापूंत

५, रत्नागिरी जिल्ह्यांत सावंतवाडी नजिक ४, व भुसावळ येथें भंग्यांच्या मुलांसाठीं एक अशा तेरा शाळा चालविल्या आहेत. या तेरा शाळांत मिळून २७५ मुलें व ८० मुली शिक्षण घेत आहेत.

रात्रींच्या शाळा: — मुलांच्या शाळा खेरीज वयस्क हरिजनांसाठीं खालील चार ठिकाणीं रात्रींच्या शाळाहि सुरू करण्यांत आल्या आहेत. सोलापूर १, अमळनेर १, अंबरनाथ १ व पंढरपूर १ सुमारें ११० वयस्क हरिजन या रात्रींच्या शाळेंत शिकण्यास येतात.

शिष्यवृत्त्या:— मार्चअखेरच्या सहामाहींत एकंदर ५९ हरिजन विद्यार्थ्यांना रु. १०७७–२–० च्या शिष्यवृत्त्या देण्यांत आल्या आहेत. या ५९ विद्यार्थ्यांपैकीं ६ विद्यार्थिनी आहेत.

रघुमल शिष्यवृत्त्या:— वरील शिष्यवृत्त्या खेरीज रघुमल ट्रस्ट फंडांतून गेल्या सहा महिन्यांत पंधरा विद्यार्थ्यांना (चार मुली) रु. २७०–२–० च्या शिष्यवृत्त्या देण्यांत आल्या आहेत.

परीक्षा फी:—हरिजन विद्यार्थी विश्वविद्यालयाच्या निरनिराळ्या परीक्षेस बसतात. त्या परीक्षांच्या फीस मदत म्हणून गेल्या सहा महिन्यांत रु. २३९ इतकी रक्कम निरनिराळ्या विद्यार्थ्यांना त्यांच्या गरजेप्रमाणें देण्यांत आली.

पुस्तकें वगैरे:— गरजू हरिजन विद्यार्थ्यांना पाटचा-पेन्सिली-पुस्तकें वगैरे मोफत देण्यांत आली. त्या कामीं रु. ४१९–११–६ खर्च करण्यांत आले.

साबण, कपडे वगैरे:— गरीब हरिजन मुलामुलींना शक्य तेथें कपडे वाटण्यांत येतात. रोजचें स्नान व स्वच्छता राखण्यासाठीं साबणहि फुकट वाटण्यांत येतो. या कामीं संघानें रु. २२५ आणे १५ व ६ पै खर्च केले आहेत.

औषधी मदत:—खेड्यापाड्यांतून व शहरांतूनहि हरिजनांना औषधपाणी मिळण्याची अडचण पडते. ही अडचण अंशत: दूर करण्यासाठीं सोलापूर मेडिकल रिलीफ असोसिएशन या संस्थेनें सोलापूर येथें हरिजनांसाठीं एक मोफत दवाखाना सुरू केला आहे. गेल्या सहामाहींत सुमारें ६००० हरिजन रोग्यांनीं या दवाखान्याचा फायदा घेतला. या कामीं हरिजन सेवक संघानें केवळ औषधाप्रीत्यर्थ म्हणून रु. २३३–८–० खर्च केले आहेत. याखेरीज पाली, चोपडें, नासिक या भागांतील हरिजन सेवक संघाच्या शाखांनीं वेळोवेळीं जरूर ती मदत केली आहे.

मिश्र समारंभ:— मकर संक्रांतीच्या सणानिमित्त पुणें, अहमदनगर व रत्नागिरी जिल्ह्यांतील कांहीं खेड्यांत हरिजन व स्पृश्य हिंदू यांचे एकत्र तिळगूळ समारंभ हरिजन सेवक संघांनीं घडवून आणिले. सदर प्रसंगीं हरिजन व स्पृश्यहिंदू यांनीं एकमेकांस तिळगूळ दिला तसेंच या प्रसंगीं हरिजन व स्पृश्य स्त्रियांनीं एकमेकांस हळदीकुंकू दिलें.

सार्वजनिक सत्यनारायण:— रत्नागिरी जिल्ह्यांत माडखोल या खेड्यांतील हरिजन वस्तींत एक सार्वजनिक सत्यनारायण करण्यांत आला. स्पृश्य हिंदूंनीं त्यांत भाग घेऊन हरिजनांकडून तीर्थप्रसाद घेतला.

होलिका संमेलनें:— होळीच्या सणांत बीभत्स गाणीं गाणें, चिखल व घाण एकमेकांवर फेकणें या गोष्टी हिंदू समाजांत रूढ आहेत. गेल्या धूलीवंदनाच्या दिवशीं अहमदनगर येथें हरिजन सेवक संघाकडून या प्रकारास आळा घालण्यांत आला व स्पृश्य हिंदू व हरिजन यांची एक मिरवणूक काढण्यांत आली. तसेंच हरिजन वस्तीची स्पृश्य हिंदू पुढाऱ्यांनीं साफसफाई केली. सोलापूर येथें होळीच्या सणानिमित्त हरिजन सेवक संघानें स्पृश्य व हरिजन मुलांचे खेळाचे सामने घडवून आणले. मिश्र सामने लोकांस आवडलेले दिसले.

सदीप व्याख्यानें:— रत्नागिरी संघाचे उत्साही चिटणीस श्री. म.तु. वालावलकर यांनीं 'स्वच्छता', 'दारूचे दुष्परिणाम', 'खेड्याचे आरोग्य' व मृतमांस वर्ज्य करणें' या विषयांवर रत्नागिरी जिल्ह्यांतील निरनिराळ्या खेड्यांत मॅजिक लॅंटर्नच्या द्वारें २८ व्याख्यानें दिलीं.

शेतकऱ्यांना बैलाची मदत:— ठाणें जिल्ह्यांतील अंबरनाथाच्या आसपास हरिजन शेतकऱ्यांची स्थिति फारच हालाखीची आहे. शेती

करण्यास बैल व इतर साधनें त्यांच्याजवळ नाहींत त्यामुळें शेतांत धान्य पिकविणेंहि त्यांना कठिण होतें. ही त्यांची अडचण दूर करावी म्हणून अंबरनाथ हरिजन सेवक संघानें मुंबईच्या 'गोग्रास गोजीवदान मंडळाच्या' सहाय्यानें गरीब हरिजन शेतकऱ्यांस रु. १२७–६–० खर्च करून २४ बैल विकत घेऊन दिले.

हरिजनांना नौकऱ्या:— संघानें आपल्या नेरनिराळ्या शाळांतून सात हरिजन शिक्षकांस नौकरीस लाविलें आहे. त्याखेरीज संघामार्फत हरिजनांना नौकऱ्या मिळवून देण्याचा प्रयत्न केला जातो. अमळनेर येथील गिरणींत तेथील शाखेनें २५ हरिजनांना नौकऱ्या मिळवून दिल्या.

हरिजनांच्या कर्ज निवारणाची योजना:— पावसाळ्याच्या प्रारंभीं हरिजन शेतकऱ्यांना आपल्या चरितार्थाकरितां दिढी व्याजानें धान्य कर्जाऊ घ्यावें लागतें. दरवर्षी ही व्याजाची फेड करतां करतांच शेतकऱ्यास कठिण जातें; मग मुद्दलाची गोष्ट तर बाजूसच राहिली. ही अडचण दूर करावी म्हणून श्री. बंडोपंत गद्रे यांनीं सुमारें रु. ५०० चें धान्य देऊन एक हरिजनांच्या मदतीसाठीं साहुचकारी पेढी काढिली आहे. या पेढींतून शेतकऱ्यांना अगदीं अल्प व्याजावर कर्जाऊ धान्य दलें जातें. व हंगामांत त्यांनीं कर्जफेड करावी अशी योजना करण्यांत आली आहे. या योजनेमुळें शेतकऱ्यांना नवीन कर्ज होत नाहीं. पण जुन्या कर्जाची फेड कशी करावी हा पाली संघापुढें एक मोठा प्रश्न आहे. या पेढीचें भांडवल नियमित असल्यानें सध्यां एकदोन खेड्यांतच हा प्रयोग करून पाहण्यांत येत आहे. ही योजना यशस्वी झाल्यास हरिजन शेतकऱ्यांचा कर्जाचा प्रश्न सोडविण्यास मदत होईल असें वाटतें.

हरिजन वसतिगृहें:— महाराष्ट्रांत हरिजन सेवक संघांनीं स्थापन केलेलीं व संघाच्या देखरेखीखालीं चालू असलेलीं अशीं एकंदर पांच वसतिगृहें आहेत. (१) अहमदनगर येथील वसतिगृहांत २५, (२) धुळें ७, (३) बार्शी १०, (४) जामनेर ७ व (५) अमळनेर ६ याप्रमाणें वसतिगृहांत मुलें आहेत. या सर्व वसतिगृहांवर गेल्या सहामाहींत रुपये ११९८–१–६ इतका खर्च झाला. दर मुलामागें दरमहा सरासरी रु. ३-११-० इतका खर्च येतो असें म्हणण्यास कांहीं हरकत नाहीं. वसतिगृहांत राहणाऱ्या मुलांवर चालकांच्या सहवासामळें सुसंस्कार होत असल्यामळ त्यांची राहणी व आचारविचार यांत ताबडतोब फरक झालेला दृष्टीस पडतो. त्या वसतिगृहापासून हरिजन मुलांना मोठा फायदा होतो असें म्हणावयास हरकत नाहीं.

मदतीनें चाललेलीं वसतिगृहें:— हरिजन संघामार्फत चाललेल्या वसतिगृहाखेरीज हरिजनांनीं चालविलेलीं अशीं इतर वसतिगृहें महाराष्ट्रांत ठिकठिकाणीं आहेत. अशा वसतिगृहासहि शक्य व जरूर तेथें हरिजन सेवक संघानें मदत केलेली आहे. नाशिक येथील छत्रपति बोर्डिंगास तेथील एक वकील श्री. पु. ह. गद्रे यांनीं आतांपर्यंत वेळोवेळीं स्वतः व मित्रांकडून बरीच मदत पोहोंचविली आहे. याशिवाय श्री. गद्रे हे नियमितपणें आपला रोजचा रिकामा वेळ वसतिगृहाच्या विद्यार्थ्यांमध्यें घालवितात व त्यांना नवीन वळण लावण्याचा प्रयत्न करतात हें त्यांस भूषणावह आहे.

वाचनालयें:— पुणें शहर संघानें शहरांतील हरिजन वस्तींत हरिजनांच्या उपयोगाकरितां (१) मंगळवार पेठेंतील गाडीतळ, (२) भांबुर्डा येथील मांग–वसाहत, व (३) ढोरगल्ली या तीन ठिकाणीं वाचनालयें उघडलीं आहेत. त्यांचा फायदा हरिजन चांगल्या रीतीनें घेत आहेत.

चिटणिसांचा दौरा:— महाराष्ट्र प्रांतिक हरिजन सेवक संघाचे चिटणीस श्री. बा. ज. मराठे यांनीं गेल्या सहामाहींत हरिजन कार्यानिमित्त खालील ठिकाणांस वेळोवेळीं भेटी दिल्या.

ठाणें जिल्ह्यांतील अंबरनाथ येथें ऑक्टोबर १९३४ मध्यें ते गेले होते. अंबरनाथजवळ दीड मैलावर 'कोहोज' या खेड्यांत हरिजन सेवक संघाच्या मदतीनें रु. २५० खर्च करून हरिजनांच्या उपयोगासाठीं एक नवीन विहिर बांधण्यांत आली आहे. या विहिरीचें पुरें झालेलें बांधकाम त्यांनीं

प्रत्यक्ष पाहिलें. त्याचप्रमाणें अंबरनाथच्या आसपास पांच मैलांच्या टापूंत अंबरनाथ संघानें सुरूं केलेल्या चार शाळाहि त्यांनीं तपासल्या. लोकलबोर्डाच्या शाळा नाहींत अशा खेडेगांवांत या शाळा सुरूं करण्यांत आल्या आहेत. या चारही शाळांतील मास्तर हरिजन आहेत. अंबरनाथहून श्री. मराठे हे कल्याण येथें गेले. तेथील हरिजनांसंबंधीं सहानुभूति बाळगणाऱ्या प्रमुख लोकांची भेट घेऊन तालुका संघ स्थापन करण्यासंबंधीं त्यांनीं वाटाघाट केली. कल्याण येथें तालुका संघाची शाखा लवकरच स्थापन होईल असें वाटतें. तेथून श्री. मराठे नाशिक येथें गेले. तेथील संघाचे आक्टोबर १९३३ पासून सप्टेंबर १९३४ अखेरचे जमाखर्च त्यांनीं तपासले व त्यासंबंधीं कांहीं सूचनाहि नाशिक संघास केल्या. डिसेंबरच्या पहिल्या पंधरवड्यांत प्रांतिक संघाचे चिटणीस पाली येथें गेले होते. त्या वेळीं संघाच्या स्थापनेपासून सप्टेंबर १९३४ अखेरचे संघाचे हिशेब त्यांनीं तपासले. तसेंच गद्रे यांच्या सहकारी पेढीमार्फत चाललेल्या हरिजनांच्या कर्जमुक्ततेचीहि त्यांनीं पहाणी केली. डिसेंबरच्या शेवटल्या आठवड्यांत दिल्ली येथें भरलेल्या मध्यवर्ति हरिजन सेवक संघाच्या सभेसहि श्री. मराठे गेले होते. चालू सालीं हरिजनांच्या पिण्याच्या पाण्याचा प्रश्न प्रामुख्यानें हातीं घेऊन तो सोडविण्याचा प्रयत्न सर्व प्रांतिक संघांनीं करावा, असें या सभेंत ठरलें.

फेब्रुवारी महिन्याच्या प्रारंभीं श्री. मराठे हे सोलापूर जिल्ह्यांत दौऱ्यावर गेले होते. त्या जिल्ह्यांत ते एकंदर बारा दिवस फिरले. या मुदतींत त्यांनीं सोलापूर, अक्कलकोट, पंढरपूर, अकलूज, माढें, कुर्डूवाडी, बार्शी व करमाळा ह्या ठिकाणांस भेट दिली. अक्कलकोट संस्थानचे दिवाण श्री. व्ही. बी. परुळेकर यांची त्यांनीं भेट घेऊन हरिजन सेवक संघाच्या कार्यास त्यांची सहानुभूति मिळविली. अक्कलकोट येथें एक नवीन संघ स्थापन करण्यांत आला. अकलूज येथें प्रमुख व्यापाऱ्यांच्या भेटी घेऊन संघाच्या कार्यास साहाय्य करण्याचें त्यांजकडून अभिवचन घेतलें. तसेंच तेथील हरिजन वस्तीस भेट देऊन त्यांच्या अडचणी समजून घेण्याचा त्यांनीं प्रयत्न केला. सोलापूर जिल्हा संघानें बार्शी येथें श्री. शेटे वकील यांच्या नेतृत्वाखालीं एक वसतिगृह सुरूं केलें आहे. या वसतिगृहाचीहि चिटणिसांनीं पाहाणी केली. तसेंच बार्शी व अकलूज येथें स्पृश्य हिंदू व हरिजन यांच्यापुढें त्यांनीं संघाच्या कार्यासंबंधीं जाहीर व्याख्यानेंही दिलीं. बार्शी येथील हरिजन वस्तीची त्यानीं पाहाणी केली. कुर्डूवाडी व करमाळे येथील प्रमुख वकील व व्यापारी यांना संघाच्या कार्याची माहिती देऊन त्यांना संघाचे सभासद करण्यांत आलें. त्याच प्रसंगीं सोलापूर शहर संघामार्फत चाललेल्या शाळा व स्नानगृहें यांची तपासणी केली. सोलापूर येथें रा. ब. डॉ. मुळे यांच्या नेतृत्वाखालीं चाललेलें हरिजन बोर्डिंग त्यांनीं पाहिलें. तसेंच सोलापूर जिल्हा संघ, सोलापूर शहर संघ व मोफत दवाखाना वगैरेंचे एक वर्षाचे जमाखर्च त्यानीं तपासले.

हरिजन परिषदः— सुधागड तालुका तिसरी हरिजन परिषद ता. २ मार्च १९३५ रोजीं उन्हेरे येथें पनवेलचे वकील श्री. वेदक यांच्या अध्यक्षतेखालीं झाली. या परिषदेस श्री. मराठे हे हजर होते. परिषदेंत हरिजनांना शिक्षणाच्या बाबतींत मदत करण्याबद्दल, पिण्याच्या पाण्याची सोय करण्याबद्दल व संस्थानच्या नौकरींत हरिजनांना घेण्याबद्दल संस्थानचे राजेसाहेबांस विनंति करणारे ठराव पास झाले.

सामान्य विचारः— हरिजन सेवक संघाच्या कार्याचें विहंगम दृष्टचा अवलोकन केलें तर असें दिसून येईल कीं, ज्या भागांत आपला सर्व वेळ हरिजनांच्या कार्यांत खर्च करणारे व अल्प वेतनावर संतुष्ट राहून कार्य करणारे सेवक लाभले आहेत त्या भागांत कार्याचा उठाव अधिक दिसतो. पाली येथें कांहीं महिन्यांपासून असेच एक कार्यकर्ते काम करीत आहेत. त्यांच्या प्रयत्नानें तेथील हरिजनांत विशेषतः मुलांमध्यें सूत कातणें, गवताच्या चटया विणणें वगैरे कामांची बरीच प्रगति

❁ महाराष्ट्र सांवत्सरिकाच्या मजकुराचा कागद डेक्कन पेपर मिलचा वापरला आहे.

झाली आहे. त्या मुलांनीं आतांपर्यंत बारा हजार वार सूत कातलें आहे. त्यांनीं विणलेल्या गवताच्या चटया पुण्याच्या प्रदर्शनांत हरिजन सेवक संघाच्या स्टॉलवर ठेवण्यांत आल्या होत्या. भुसावळ येथेंहि आपला सर्व वेळ या कामास देणारे असे कार्यकर्ते लाभल्यानें तेथील भंगी वस्तींत एक शाळा उत्तम रीतीनें चालली असून शाळेखेरीज मुलामुलींच्या रोजच्या आयुष्यांत स्वच्छता, आरोग्य व टापटीप ही कशी निर्माण करतां येईल याकडे हे कार्यकर्ते लक्ष पुरवीत असून मुलींना आपले केस विंचरणें, रोज स्नान करणें, आपले कपडे व शरीर स्वच्छ ठेवणें वगैरे बाबींचें प्रत्यक्ष शिक्षण देण्यांत येतें. या सर्व प्रयत्नांचा अस्पृश्यता निवारण्याचे कामीं विशेषतः खेड्यांतील प्रश्न सोडविण्याचे कामीं किती उपयोग होत असेल हें जरी निश्चित रीतीनें सांगतां येत नसलें तरी चांगल्या प्रयत्नांना व न्याय्य मार्गाला चांगलेंच फळ येणार या खात्रीनें हरिजन सेवक संघाचे प्रयत्न चालू आहेत.

---

## १० सरस्वती मठ संस्थेची ग्रामसुधारणेची योजना

सरस्वती मठ संस्थेनें गेलीं सात वर्षें खेड्यापाड्यांतून मुख्यतः प्राथमिक शिक्षण देण्याचें कार्य यशस्वी रीतीनें चालविलें आहे. त्या बरोबरच नवीन पद्धतीनें ग्रामसुधारणा करण्यासाठीं एक नवीन योजना तयार केली आहे. आजपर्यंतच्या अनुभवावरून असें दृष्टोत्पत्तीस आलें आहे कीं, नुसतें प्राथमिक शिक्षण देण्यांत वेळ, पैसा व मेहनत बरीचशी वायां जाते, ती जाऊं नये व या चळवळीचा खेड्यांतून झपाट्यानें व जोमानें प्रसार व्हावा म्हणून नव्या योजनेचा अवलंब करावयाचा आहे. निरनिराळ्या विषयांतील दर्दी माणसांनीं उदाहरणार्थ, फिजिकल कल्चरिस्ट, पोवाडे गाणारे, मॅजिक लँटर्ननें व्याख्यानें देणारे वगैरेंनीं एकत्र जमून एका सोयीच्या ठिकाणीं मुक्काम करावयाचा व सर्वांनीं आपापलें काम करावयाचें. यालाच 'व्हिलेज कल्चर कँप' असें नांव दिलें आहे. या योजनेनें ग्रामसुधारणेचें काम लवकर व सुलभतेनें होईल व यांत निरनिराळे कार्यक्रम एकामागून एक होणार असल्यानें खेड्यांतील प्रजेला त्याबद्दल औत्सुक्य वाटून शिक्षणाची आवड वाढेल यांत शंका नाहीं. या उपक्रमास संस्थेनें गेल्या मे महिन्यांतच सुरुवात केली आहे.

---

## ११ हिंदी प्रचारसंघ

हिंदुस्थानच्या उन्नतीस ज्या कांहीं अनेक बाधक गोष्टी आहेत त्यांतच सबंध हिंदुस्थानांत एक भाषा नसणें अगर एकच लिपी नसणें ही मोठी उणीव म्हणून गणिली जाते. ही अडचण नाहींशी करण्याकरितां प्रत्येक प्रांतानें आपापला बोजा उचलला पाहिजे. महाराष्ट्रांत ही जबाबदारी पुणें येथील 'हिंदी प्रचार संघानें' उचलली आहे. संघाची स्थापना २१ जून १९३४ रोजीं गांधीजींचे हस्तें झाली. संघ उघडण्याचें खरें श्रेय दे. भ. न. वि. गाडगीळ व श्री. ग. र. वैशंपायन यांनाच दिलें पाहिजे. या द्वयानें संघाची प्राथमिक सभा बोलाविली. त्या सभेंत शके १८५६ करितां कार्यकारी मंडळाची निवड झाली ती येणेंप्रमाणें— अध्यक्ष श्री. राघवेंद्र शर्मा. चिटणीस ग. र. वैशंपायन. सदस्य—१ श्री. अ. ज. करंदीकर, (२) का. गो. पाषाणकर, (३) पोपटलाल शहा, (४) न. वि. गाडगीळ, (५) ग. द. देशपांडे. संघातर्फे ९ सप्टेंबर १९३४ व १० फेब्रुवारी १९३५ रोजीं परीक्षा घेण्यांत आल्या. दोन्ही वेळां मिळन ४७ लोक परीक्षेस बसले. त्यांत सप्टेंबरमध्यें १७ व फेब्रुवारीमध्यें ३० अशी संख्या असून त्यांत अनुक्रमें ४ व ७ अशा स्त्रियाहि होत्या.

ता. १ ऑगस्ट १९३४ पासून स्त्रियांकरितां सेवासदनमध्यें वेगळा वर्ग काढण्यांत आला तो आजहि चालू आहे. केवळ शिकणारांचे सोयीसाठीं संघाच्या कामाच्या निरनिराळ्या वेळा ठेवाव्या लागतात. प्रसंगीं तीन किंवा चार विद्यार्थ्यांकरितां सुद्धां वेगळी वेळ ठरवून वर्ग चालवावा लागतो, परंतु असें असतांना सुद्धां पहिल्याच वर्षाचें

काम पुष्कळच समाधानकारक आहे असें परीक्षांवरून म्हटलें पाहिजे. संघातर्फे शिक्षकांचें काम श्री. वैशंपायन, श्री. भिडे व श्री. मोडक यांनीं चालविलें त्याबद्दल संघ त्यांचा आभारी राहील यांत संशय नाहीं. डिसेंबरच्या २ तारखेपासून ९ तारखेपर्यंत मद्रास येथील द. भा. प्रचार सभेचे आज्ञेनुसार हिंदी सप्ताह पाळण्यांत आला. सप्ताहांत ठिकठिकाणीं हिंदी प्रचारावर भाषणें झालीं. सप्ताहाचा समारोप श्री. न. चिं. केळकर यांचे हस्तें झाला. त्या वेळीं उत्तीर्ण विद्यार्थ्यांना प्रशस्तिपत्रें देण्यांत आलीं.

संघाचे एकंदर ३३ सदस्य आहेत. सुरुवातीला जरी ही संख्या समाधानकारक असली तरी पुढच्या सालांत ती बरीच फुगल्याशिवाय महाराष्ट्रानें आपला वाटा बरोबर उचलला असें म्हणतां येणार नाहीं. संघाजवळ २२७ मासिकें व २७ इतर पुस्तकें येवढेंच वाङ्मय तूर्त आहे. वेगवेगळ्या ठिकाणीं शिकविण्यास तयार असे शिक्षक, शिकण्यास भरपूर विद्यार्थी व द्रव्यसाहाय्य या गोष्टींची संघास अत्यंत जरूरी आहे. इकडे महाराष्ट्रीय जनता लक्ष देईल अशी चालकांना उमेद आहे.

शके १८५७ चें कार्यकारी मंडळ.—

अध्यक्ष—न. वि. गाडगीळ., एम. एल. ए.

उपाध्यक्ष—राघवेंद्र शर्मा.

मुख्य चिटणीस—ग. र. वैशंपायन. दु. चिटणीस—आ. वा. मोडक. सदस्य दा. वि. गोखले, नारायणदासजी धूत, कनकमल मुनोत, वि. मा. देशमुख, पोपटलाल शहा.

---

## १२ डॉ. मुंजे यांची
## लष्करी शिक्षणाची योजना

मी १९३१ सालीं गोलमेज परिषदेकरितां इंग्लंडला गेलों असतांना हाल्टन येथील 'ब्रिटिश स्कूल ऑफ बॉय् मेकॅनिक्स' पाहिलें. त्या वेळीं तेथें बारा ते अठरा वर्षें वयाचे ३५०० विद्यार्थी शिकत होते. त्यांचें शिक्षण रॉयल एअर फोर्स (ब्रिटिश वैमानिक दल) करितां पूर्वतयारी म्हणून देतात, व त्यांना रोज हातखर्चाकरितां (पॉकेट मनि) म्हणून प्रत्येकीं १२ आणे देतात. सर्व खर्च ब्रि. सरकार करतें. मला तेथील सर्व प्रकार पाहून विशेष आश्चर्य वाटलें व ह्यांतच ब्रिटिशांच्या साम्राज्यवर्धनाचें मूळ आहे असें खात्रीनें पटलें, त्यामुळें मला हिंदुस्थानांतही ह्याच नमुन्याची शाळा स्थापन करून लष्करी बाण्याचें सर्व प्रकारचें शिक्षण द्यावयाची सोय व्हावी अशी कल्पना सुचली. तेव्हांपासून मी ह्या कार्यासाठीं अविरत झटत आहें. अशा कार्यासाठीं आरंभ म्हणजे पैशापासून.तो मिळविण्याच्या मी उद्योगास लागलों त्यांत मला अनेक अडचणी आल्या व कित्येक वेळां अनपेक्षित यशही मिळालें. कांहीं महिन्यांपूर्वी मी धुळें येथें हायस्कूलचे संमेलनासाठीं अध्यक्ष म्हणून गेलों असतां तेथें तेथील दानशूर धनिक श्रीमान प्रतापशेठ यांची गांठ घेतली. तेथें आमचें प्रस्तुत लष्करशाळेसंबंधीं मोकळेपणानें सुमारें अर्धा तासच बोलणें झालें व शेठजींनीं आपल्या नेहमींच्या उदार स्वभावानुसार माझ्या योजनेकरितां एक लक्ष रुपयांचें आश्वासन दिलें. माझी "मध्यवर्ती हिंदु लष्करी शिक्षण संस्थेची" योजना त्यांनीं अभ्यासून मग पुढीलप्रमाणें पत्र धाडलें:—

"डॉ. मुंजे हे बरेच वर्षें हिंदु महासभेचे उत्साही कार्यवाह असून, वरिष्ठ कायदेमंडळाचे सभासद असतांना, त्यांनीं हिंदी सैन्याच्या हिंदीकरणाच्या प्रश्नास विशेष चालना दिली होती. हल्लीं ते "मध्यवर्ती हिंदु लष्करी–शिक्षण संस्था" स्थापून तिच्यातर्फे एक "लष्करी शिक्षणाची शाळा" हिंदु तरुणांना प्राथमिक लष्करी शिक्षण देण्याकरितां उघडण्याच्या उद्योगांत आहेत. हिंदु तरुणांत लष्करी बाणा वाढून, लष्करी पेशाची आवड उत्पन्न व्हावी असा त्यांचा हेतु आहे; म्हणजे थोडक्यांत हिंदु लोकांत लष्करी बाण्याचें पुनरुज्जीवन व्हावें म्हणून त्यांनीं लष्करी शिक्षणासंबंधीं एक योजना केली आहे. तिला सुरुवातीस सुमारें तीन लक्ष रुपये

खर्च येईल असा अंदाज आहे.

सदर योजना पूर्णपणें अभ्यासून मला डॉ. मुंजे यांस सदर कार्याकरितां आर्थिक मदत करावी अशी अंतस्फूर्ति झाली, व म्हणून मी आनंदानें व स्वखुषीनें त्यांस सदर कार्यासाठीं एक लक्ष रुपये देत आहें. सदर संस्था लौकरच नोंदली जाईल. डॉ. मुंजे यांच्या विनंतीवरून मी सध्यां सदर संस्थेचा खजिनदार म्हणून काम पाहणार आहें, सदर संस्थेची कचेरी सध्यां तात्पुरती धुळें येथें राहील.

हिंदुस्थानांतील उदार धनिक व सुखवस्तु लोकांनीं सदर उपयुक्त कार्यास उदारपणें मदत करावी अशी शिफारसवजा विनंति करून, डॉ. मुंजे यांस त्यांच्या अंगीकृत कार्यांत उत्तम यश मिळो, व सदर संस्था लौकरच स्थापिली जावो अशी मी आशा करतों.

(सही) मोतीलाल माणिकचंद
उर्फ प्रताप शेठ.

सरदार गृह, मुंबई
१२-३-३५.

" सरकार अशी संस्था काढूं देईल काय?" असा प्रश्न कित्येक हिंदी विशेषतः हिंदु गृहस्थांकडून मला विचारण्यांत येतो. ह्या बाबतींत आपल्या मनांत असल्यास खास होऊं शकतें हें लक्षांत ठेवावें. विशेष पुरावा म्हणून पुढील पत्राचा शंका दूर होण्यास उपयोग होईल. सदर योजना तयार करण्यापूर्वी मी हि. ए. सर फिलिफ चेटवूड, हिंदुस्थानचे सरसेनापति यांस भेटलों व त्यांशीं बोलणें केलें. ता. १-४-१९३२ रोजीं त्यांच्याकडून आलेल्या पत्रांत ते म्हणतात " आम्हीं तुम्हांस शक्य तितकें साहाय्य करतों, याबद्दल आपली खात्री असूं द्या, " पुढें ता. २९-४-३२ रोजीं आलेलें त्यांचें पत्र पुढीलप्रमाणें आहे:-

सिमला, २९ एप्रिल १९३२

प्रिय डॉ. मुंजे,

माझ्या एप्रिलच्या पत्राप्रमाणें आम्हीं तुम्हांस कोणत्या प्रकारें साहाय्य करतां येईल याचा विचार केला. तुम्हीं सुचविलेल्या पुढील दोन प्रकारांपैकीं कोणत्याही एका प्रकारानें आम्हीं तुम्हास साहाय्य करूं शकूं. (१) जालंदर व झेलम येथील लष्करी शाळांत प्रत्येकीं एक याप्रमाणें तुमचे दोन लष्करी शिक्षक घ्यावयाचे; किंवा (२) प्राथमिक, लष्करी व शारीरिक शिक्षण व कवाईत हे विषय शिकविण्याकरितां एक दोन व्हाइसरॉय कमिशन असलेले अधिकारी कांहीं काळ तुम्हांस द्यावयाचे. वरील पहिल्या प्रकाराबद्दल माझें असें म्हणणें आहे कीं तुम्हीं पाठविलेल्या इसमांनीं लष्करी शाळेंतच राहणें अवश्य आहे, कारण त्याशिवाय त्यांना लष्करी शाळेंत अवश्य अशी शिस्त कशी राखावी हें समजणार नाहीं. शिवाय वर्गाबाहेरील खेळ वगैरे कार्यक्रमाचें, व दुय्यम शिक्षकांवर देखरेख करण्याचें काम तेथें नेहमीं प्रत्यक्ष पाहिल्याखेरीज समजणार नाहीं. याकरितां लष्करी शाळेंतील शिक्षकांचे वसतिगृहांत तुमच्या इसमांस जागा देण्यांत येईल. मात्र त्यानीं तेथील शिस्तीप्रमाणें राहिलें पाहिजे. सदर लष्कर शिक्षणाची फी आम्ही घेणार नाहीं; मात्र तेथें राहण्याचा, जेवणाचा, धोबी, हजाम, फर्निचर-भाडें, वगैरेबद्दल होणारा सुमारें दरमहा खर्च रु. ४५ द्यावा लागेल. वरील दुसऱ्या प्रकाराबद्दल असें कीं, कोणत्याही हिंदी लष्करी अधिकाऱ्याला स्वतःचें लष्करी शिक्षण व शिस्त एक वर्षभर सोडतां येत नाहीं. तुम्हांस एक वर्षापेक्षां जास्त काल आमचे लष्करी शिक्षक लागल्यास ते वारंवार बदलून पाठविण्याची आम्ही व्यवस्था करूं. त्याबद्दल तुम्हांस त्यांचा पगार जादा कामाबद्दल पगार, भत्ता व जेवणखाण याबद्दल प्रत्येकीं दरमहा १३५ रु. खर्च येईल; ह्याशिवाय त्याला राहण्याकरितां जागा फुकट द्यावी लागेल व त्याच्या जाण्यायेण्याचें रेल्वेचें दुसऱ्या वर्गाचें भाडें द्यावें लागेल.

वरील दोन्ही प्रकारांपैकीं दुसऱ्यांत तुम्हांस जास्त खर्च येईल, ह्याकरितां तुम्हीं पहिल्या प्रकारांत सुचविल्याप्रमाणें तुमचे दोन शिक्षक

लष्करी शाळांत पाठविणें बरें असें मला वाटतें.

वर सुचविल्याप्रमाणें आम्हीं तुम्हांस तुमच्या कार्यांत मदत आनंदानें करूं. आर्मी–फंडातून ( लष्करी–खर्चांतून )तुमच्या शाळेकरितां सध्यां किंवा पुढें केव्हांही कोणत्याही प्रकारें खर्च करतां येणार नाहीं.

( सही ) फिलिप चेटवूड
हिंदुस्थानांतील सरसेनापति.

ह्यापूर्वीं १५ मार्च १९३५ रोजीं माझ्या पत्रास उत्तरादाखल आलेल्या पत्रांत सरसेनापति म्हणतात, " नागपूरजवळ लष्करी शाळा काढण्याचा तुमचा विचार आहे हें वाचन मला आनंद वाटला. उत्तम प्रकारच्या शाळा हिंदुस्थानांत अतिशय थोड्या आहेत.त्यामुळें हिंदुस्थानांतील शिक्षण अपुरें असतें असें माझें कायम मत आहे. म्हणून इंडियन मिलिटरी ॲकेडमीस पोषक असें योग्य तऱ्हेचें लष्करी शिक्षण देणारी शाळा तुम्हीं काढीत आहांत, तिला पूर्ण यश येवो असें मी मनापासून इच्छितों "

---

# कामगार चळवळीचा आढावा

( १९३४-१९३५ )

सांवत्सरिकाच्या १९३४ च्या आवृत्तींत 'कामगार संप' या मथळचाखालीं त्या वर्षीच्या संपाचीं कारणें व मागण्या यांचा निर्देश आहे. प्रस्तुत आवृत्तींत संपानंतरच्या म्हणजे जुलै १९३४ पासून मे १९३५ पर्यंतच्या काळाचा आढावा दिला आहे. मागील आढावा, एकटया मुंबईच्या गिरणी कामगारांच्या संपापुरताच मर्यादित होता. प्रस्तुत अहवाल शक्यतों अखिल हिंदी कामगार चळवळ व तिच्यांतील पक्षोपपक्ष यांना अनुलक्षून लिहिला असल्यानें त्यांत एकांगीपणा राहणार नाहीं व त्यामुळें कामगार चळवळीची सामान्य कल्पना देण्यास तो अधिक उपयुक्त होईल असें वाटतें.

## १ सर्वसामान्य परिस्थिति

प्रधानत: ज्या मागण्यांकरितां म्हणून गेला संप लढविला गेला त्यांतली एकहि मागणी मिटली नाहीं. उलट अनेक कारणांमुळें नाइलाज होऊन ता. २३ जुलै १९३४ रोजीं संप बिनशर्त मागें घेतल्यानंतर जास्त आपत्तींची भर मात्र पडली. तसेंच तात्त्विक व प्रात्यक्षिक स्वरूपाचे कांहीं प्रश्न उपस्थित झाले. त्यांतील मुख्य याप्रमाणें मांडतां येतील.

(१) कामगार चळवळ निव्वळ आर्थिक स्वरूपाची राहिली नाहीं. तर परिणामीं कामकरी—शेतकरी सत्ता प्रस्थापित व्हावी या आकांक्षेनें हिंदी स्वातंत्र्याची चळवळ तदनुकूल मार्गानें चालविली पाहिजे ही गोष्ट अधिक स्पष्ट झाल्यानें तशा मतांचे गट व पक्ष वाढूं लागले.

(२) कामकरी चळवळ ही फक्त वर्ग-युद्धाच्या तत्त्वावरच चालूं शकते ही गोष्ट प्रसिद्ध झाली.

(३) कामगारांचा आर्थिक लढा, राष्ट्रीय स्वातंत्र्याच्या लढयापासून अलिप्त ठेवणें ही गोष्ट सुधारणावादी (जोशी, गिरी वगैरे) व राष्ट्रीय सुधारणावादी (गांधी, कॉंग्रेस) पक्षांना जसें अशक्य झालें तसेंच तें सरकारलाही अशक्य झालें आहे. यामुळें या सर्वांनीं पूर्वीचें बेफिकिरीचें व प्रच्छन्न धोरण सोडून वर्ग—सलोख्याचा प्रचार करण्याकरितां कामगार चळवळीस हात घातला आहे. यामुळें सहिष्णुतेचा व शांततेचा संदेश घेऊन अनेक कॉंग्रेसवाले चळवळींत येऊं लागले. तसेंच सरकारनेंहि वर्ग-समेटासाठीं खास कायदा करून (कन्सीलिएशन अॅक्ट) व स्वतंत्र अधिकारी नेमून कामगारांत शिरकाव करून घेतला आहे (मुंबईच्या लेबर ऑफिसरचे रिपोर्ट पहा.)

(४) पगारकाट, कामाचे तास इत्यादि आर्थिक मागण्यांची चळवळ मालकांविरुद्ध चालवून तात्कालिक परिस्थिति सुधारून घेण्याचें साधन ट्रेड युनियन हें होय. पण या सर्व संकटांचें मूळ, भांडवली समाजरचना व तज्जन्य शासन-संस्था यांत असल्यामुळें त्यांत आमूलाग्र परिवर्तन करण्याची खटपट करणारे पक्ष ते कामगारांचे राजकीय पक्ष होत. हे पक्ष ट्रेड युनियन्सद्वारां काम करीत असतात. यामुळें राजकीय प्रश्नांत मतभेद असला किंवा उत्पन्न झाला तरी तेवढयावरून त्याच धंद्यांत निराळें युनियन न काढतां आपापल्या कार्यक्रमाला त्याच युनियनमध्यें राहून बहुमताचा पाठिंबा मिळविण्याची आवश्यकता स्पष्ट निदर्शनास आल्यानें, पूर्वी निराळचा झालेल्या ऑल इंडिया ट्रेड युनियन कॉंग्रेस व लाल ट्रे. यु. कॉं. या दोन संस्था एक होण्याचें ठरलें.

गेल्या संपांत शेंकडों कामगार व त्यांचे अनुभविक पुढारी पकडले गेल्यानंतर ट्रे. यु. कॉं. चे एक माजी अध्यक्ष कांदळकर व मिरत कटाच्या

खटल्यांतून निर्दोष सुटून आलेले आळवे यांनीं अवांतर प्रश्नावर संप कमिटींत मोठ्या चातुर्यानें फूट पाडली. यामुळें, मिलमालकांचा एक मोठा गट तडजोडीची भाषा बोलूं लागला होता तो फिरला व संप मागें घ्यावा लागला. प्रतिस्पर्धी नामोहरम झाल्यावर त्याला अधिक डंवचल्यावांचून स्पर्धी कधीं तरी स्वस्थ राहील का? याप्रमाणें मिलमालकांनीं पूर्वीची अंदाजीं ४०।४५ टक्के पगारकाट पचवून पुन्हां नवीन २५ टक्क्यांची काट कामगारांवर लादलीच. तसेंच जेथें चार व सहा सांचेपद्धति व रातपाळी नव्हती तेथेंहि हे दोन्ही प्रकार सुरू करण्यांत आले. याचा तादृश परिणाम हा झाला कीं १९३३ पूर्वीं ज्या कपडे खात्यांतील कामगाराला ४०।४५ रुपये पगार सुटे व संपाच्या अगोदर २५ रुपये तरी मिळत त्याला आतां १८–२० रु. वरच निर्वाह करणें भाग पडलें !

पण ही २५ टक्क्यांची जादा काट अप्रत्यक्ष असून मोठ्या खुबीनें केली गेली. कामाचे तास कमी करण्याची कामगारांची मागणी १९२८ पासून चालू होती. जिनिव्हा येथील राष्ट्रांतरीय संघानेंहि या प्रश्नावर बराच नेट धरला होता. या मागणीला अनुसरून सरकारनें पूर्वीच्या दहा तासांऐवजीं नऊ तासांचा दिवस व ५४ तासांचा आठवडा, कायदा करून ठरवून टाकला. यामुळें कामगारांचें एक गाऱ्हाणें मिटलें, असा समज या प्रश्नाकडे वरकरणी नजरेनें पाहाणाऱ्या बाहेरच्या लोकांत पसरला. त्यांना वाटलें, कामगारांच्या सांस्कृतिक व भौतिक सुखस्वातंत्र्याविषयीं खुद्द कार्ल मार्क्सनेंच नाहीं कां म्हटलें कीं, या सुखस्वातंत्र्याचा मूलभूत पाया कामाचे तास कमी होणें हा होय. ( Capital Vol. 3. 95455). तथापि याचा अर्थ तासांबरोबर पगार कमी करावे असा नाहीं. तसें झालें तर कामगार हा ( उत्पादक) कामगारच राहणार नाहीं ! पण कामाचे तास कमी करतांना सरकारनें असा निर्बंध घातला नाहीं. यामुळें मालकांनींहि 'अखिल भारतीय मालीक संघ' काढून पगारकाट किती व कशी करावी हें ठरवून टाकलें. याचा परिणाम असा झाला कीं, एक तासांत कामगार जे मिळवीत असे त्याच्या दुपटीनें तो आतां घालवून बसला ! याकरितांच जिनिव्हा येथील राष्ट्रांतरीय मजूर परिषदेनें चाळीस तासांच्या आठवड्याची घोषणा करतांना पगारकाट न करण्याचा आग्रह धरला आहे. पण दुर्दैव एवढेंच कीं या परिषदेचे ठराव बंधनकारक नसल्यानें नंदनवनांतील पुष्करणींतल्या कारंजांतून थंड व स्वच्छ शतधारा उसळत असल्या तरी तेवढ्यानें कांठांशीं उभा असलेल्या तृषिताची तहान भागत नाहीं !

तथापि यामुळें कामगारांच्या दुसऱ्या एका मागणीला अनायासें तोंड फुटलें. ती मागणी म्हणजे संस्थानांतील कारखान्यांना फॅक्टरी ॲक्ट लागू करणें. वर्षानुवर्ष ती मागणी उपेक्षिली गेली. तथापि आतां ब्रिटिश हिंदुस्थानांतील मालीक वर्गानें, आपल्या गरजेकरितां तिचा आग्रह धरला आहे. जर ही मागणी सरकारनें मान्य केली तर संस्थानांतील कामगारावरील रोजीं तीन तासांचा बोजा तरी कमी होईल; व या दयाशीलपणाबद्दल मालकांवर बाहेरच्या लोकांकडून स्तुतिसुमनांचा वर्षाव होईल. पण मालकांच्या हातून असलें क्वचित दान केव्हां केव्हां व्हावयाचेंच, हें मार्क्सनें १८६७ सालींच लिहून ठेवलें आहे. फॅक्टरी ॲक्टसंबंधीं तो म्हणतो (Cap. Vol. I. 529–30) " भांडवलशाही स्पर्धेंत ज्या क्षेत्रांत (संस्थानें) मजुरी स्वस्त व कामाचे तास अधिक असल्यामुळें नफ्याचें प्रमाण जास्त असतें; तेथें इतर म्हणजे जेथें पगार जास्त व कामाचे तास कमी असतील अशा भागांतले ब्रिटिश हिंदुस्थानांतले भांडवलदार आपल्याकडील व्यवस्थापद्धति सुरू करून नफेबाजी व स्पर्धा हीं समप्रमाण करूं पाहतात. या कारणपरंपरेमुळेंच म्हणजे भांडवलदार वर्गांतील अंतर्विरोधामुळेंच केव्हां केव्हां कामगारांचा फायदा होत असतो.

गेल्या जानेवारी १९३४ पासून धंद्यांत तेजी दिसूं लागतांच गिरण्यांनीं रातपाळ्या सुरू

केल्या; पण ही तेजी दिखाऊ होती हें आतां स्पष्ट झाल्यानें पुन्हां रातपाळ्या बंद होत आहेत व मिल-ओनर्स असोसिएशन तशी खटपट करीत आहे. असें झालें तर पुन्हां बेकारी वाढेल.

संपाच्या मागण्यांत कांहीं राजकीय मागण्या होत्या. कामगारांनीं त्या विलक्षण धडाडीनें लढविल्या होत्या. कम्युनिस्ट पक्षानें तर 'सार्वत्रिक राजकीय संपाची तयारी करा' अशी कामगारांना सूचना केली होती. कॉंग्रेसनें स्वातंत्र्याचा लढा सोडून दिल्याबद्दल तें तिचा तीव्र निषेध करीत क्रांतीच्या मार्गानें निर्भेळ स्वातंत्र्य प्रस्थापनेची घोषणा करीत होते. आगामी सुधारणांविरुद्ध तर सर्वांच्या अगोदर त्यांनीं मतप्रचार व चळवळ सुरू केली होती; या सर्व गोष्टी कामगार चळवळीचें उग्र व व्यापक स्वरूप दर्शविणाऱ्या अशाच होत्या. यामुळेंच तीव्र दडपशाही सुरू झालेली दिसते. लढाऊ धोरणानें चालणाऱ्या ३०-३२ कामगार संस्था बेकायदेशीर ठरविण्यांत आल्या. यांतील मोठा हिस्सा मुंबई व कलकत्ता येथील चळवळीकडे जातो.

बेकायदेशीर ठरलेल्या संस्थांतील:—(१) हिंदी कम्युनिस्ट पक्ष, (२) मार्क्सीस्ट लीग, (३) तरुण कामगार संघ, (४) लालबावटा गिरणी कामगार युनियन, (५) कामगार वाङमय प्रसारक मंडळ, या मुंबईच्या; (१) मिल मजदूर युनियन ही अहमदाबादची; व साम्राज्य विरोधी संस्था ही पंजाबची; तसेंच वरील नांवांशिवाय आर. एस. एन. अँड आय. जी. एन. रेल्वे कंपनीज वर्कर्स युनियन या कलकत्त्याच्या संस्था प्रमुख होत.

या बाबतींत देखील बडोदें संस्थान प्रागतिक होतें. त्यानें कैक महिन्यांपूर्वींच तेथील लालबावटयाची चळवळ व गिरणी कामगारांची युनियन गैरकायदा ठरवून टाकली होती.

शिक्षेचें सत्र देखील अव्याहत चालू आहे. कॉ. रणदिवे, सरदेसाई, एस. एम. जोशी, पी. सी. जोशी, एम. शाहीद, निंबकर वगैरे अनेक (नामावळी शंभरांनीं भरेल.) कार्यकर्त्यांना दीड, दान, अडीच वर्षांच्या शिक्षा ठोठावण्यांत आल्या. कॉ. शेख व श्री. रुईकर हे त्या मार्गावर आहेत. शिवाय गेला संप गैरकायदा असून तो घडवून आणल्याबद्दल मिस्. कारा, कर्णिक, जोगळेकर आदि आठ पुढाऱ्यांवर खटला भरण्यांत आला होता. त्यांत खालच्या कोर्टानें त्यांस निर्दोषी ठरविलें. त्याविरुद्ध सरकारनें अपील गुदरलें आहे.

इमर्जन्सी ॲक्टाखालीं अनेक कार्यकर्त्यांना बेमुदत बेभत्ता डांबून ठेवण्यांत आलें आहे. अधिकारी बंधू, अनंत शेटी, मोटे, स्प्रॅट, घाटे, देशपांडे, खान (शंकर या नांवानें उघडकीस आलेले), डॉ. चारु बॅनर्जी, धरणी, गोस्वामी हे प्रमुख होत. यांत पंजाबचेहि एक कार्यकर्ते होते पण अपीलांत ते मोकळे झाले.

शिक्षा संपवून सुटका झालेल्यापैकीं मिरत कटांतील सुप्रसिद्ध आरोपी कॉ. एस. ए. डांगे यांचा प्रामुख्यानें उल्लेख केला पाहिजे. डांगे यांच्या सुटकेनें मिरत प्रकरणाचा मुंबईपुरता तरी शेवट लागला. या कटापैकीं कॉ. मुझफर अहंमद व उस्मानी हे अजून तुरुंगांत आहेत. तसेंच कॉ. रॉय हेहि अद्याप खितपत पडले आहेत. या सर्वांना राज्यक्रांतीच्या कटाच्या आरोपाखालीं (१२१ अ) शिक्षा झालेल्या होत्या.

याशिवाय ट्रेड डिस्प्यूट्स ॲक्टमध्यें अशी दुरुस्ती करावयाचा सरकारचा बेत चालू आहे म्हणतात कीं, ज्यामुळें कोणाहि अप्रिय मनुष्याचा ट्रेड युनियन चळवळींत शिरकाव होऊं नये.

तथापि आजपर्यंतचें आपलें प्रच्छन्न धोरण सोडून सरकारनें चळवळींत प्रत्यक्षपणें हात घातला ही अत्यंत महत्त्वाची गोष्ट चालू सालीं घडून आली. वर्गविग्रह उग्र बनत चालल्यानें वारंवार संप व लढे उत्पन्न न होतां मालीक मजूर यांच्यामध्यें सलोखा नांदावा याकरितां मुंबई सरकारनें कन्सीलिएशन ॲक्ट करून तें खातें लेबर कमिशनरकडे सोंपविलें; व कामगारांत प्रत्यक्षत: मिसळून त्यांचीं गाऱ्हाणीं मिटविण्याकरितां लेबर ऑफिसरची नेमणूक केली

प्रस्तुत कायद्यान्वयें या अधिकाऱ्यांस कामगार संस्थांच्या कामांत ढवळाढवळ करण्याचाहि अधिकार दिलेला असून मालक व कामगार यांजमध्यें तंटा उपस्थित झाल्यास त्यानें तें प्रकरण हातीं घ्यावें व तसें झाल्यावर युनियननें किंवा इतर कोणीहि संपाचा किंवा संपाला उत्तेजक असा प्रचार करणें गुन्हा ठरविण्यांत आला आहे! लेबर ऑफिसरच्या या अधिकारांमुळें स्वतंत्र ट्रेड युनियन्सच्या अस्तित्वालाहि हानि पोंचल्यावांचून राहणार नाहीं. पण वर्ग-सलोखा नांदावा म्हणून सरकारनें हा सर्व खटाटोप केला असला तरी खुद्द याच अधिकाऱ्यानें सरकारकडे आपल्या कामाचा जो पहिलाच अहवाल पाठविला आहे त्यांत त्यांस मिलमालकांपुढें कसे हात टेकावे लागत आहेत यासंबंधींचा त्यांनीं वाचलेला पाढा उद्बोधक आहे.

चालू वर्षांत हिंदुस्थान सरकारनें Payment of wages बिल पुढें आणलें असून कामगारांना नियमित पगार मिळावे याकरितां कायदा करण्याचें ठरविलें आहे. बिलांत (१) ज्या कारखान्यांत हजारापेक्षां अधिक कामगार काम करतात त्यांनीं महिना भरल्यावर दहा दिवसांचे आंत व त्यापेक्षां छोटया कारखान्यांनीं सात दिवसांचे आंत पगार द्यावा; व (२) दंडादि वसूली करावयाची ती रुपयाला अर्धा आणा या प्रमाणापेक्षां अधिक असूं नये, अशी व्यवस्था सुचविली आहे. कामगारांतर्फे प्रतिनिधि श्री. एन. एम. जोशी यांचें या बाबतींत असें म्हणणें आहे कीं, (१) सरकार महिना भरल्याबरोबर १-२ तारखेस जसें पगार देतें तसा मालकांनींहि देऊन टाकावा. (२) दंडादि वसूल करण्याचा मालकांना हक्कच असूं नये. कामगारानें कांहीं नुकसान केल्याचें आढळल्यास कोर्टांतून न्यायनिवाडा करून घ्यावा.

जिनिवा येथील राष्ट्रांतरीय मजूर परिषदेला हिंदुस्थान सरकारनें पाठविलेल्या प्रतिनिधींपैकीं मि. रामस्वामी मुदलीयार यांनीं तीन ठराव मांडले ते असे कीं, (१) अकराव्या परिषदेच्या ठरावानुसार पगार ठरविण्य करितां एक कमिटी नेमावी. (२) परिषदेनें पूर्वींच पगाराच्या ज्या किमान मर्यादा ठरविल्या आहेत त्यांच्या अनुरोधानें आशियांतील कामगारांना पगार मिळवून देण्यासाठीं योग्य उपाय सुचविण्याकरितां एशियाटिक लेबर परिषद भरवावी. व (३) प्रत्येक देशांतील कामगारांनीं भावी युद्धाविरुद्ध लोकमत तयार होईल असा मतप्रचार करावा. याशिवाय इंग्लंडच्या प्रतिनिधीनें गिरण्यांच्या धंद्यांत कामाचे तास कमी करण्याबाबत, जपानच्या प्रतिनिधीनें कामगारांस समागम–स्वातंत्र्याचा हक्क मिळण्याबाबत, व इटलीतर्फे शेतकीच्या धंद्याची व त्यांत काम करीत असलेल्या मजुरांच्या परिस्थितीची पाहाणी करण्याबाबत असे ठराव मांडले होते. शिवाय बेकारीच्या प्रश्नावर बराच ऊहापोह झाला. त्यासंबंधीं परिषदेच्या अहवालांत असे उद्गार आढळतात:– Unemployment so prevalent today has brought us to a pre-revolutionary state. परिषदेचीं मतें क्रांतिविरोधी आहेत हें सर्वांस माहीतच आहे.

## अंतर्गतपक्ष व लढ्यांचें स्वरूप

पगारकाट रद्द होणें, बेकारांना काम किंवा भत्ता मिळणें, मजुरीच्या दरांत काट न होतां कामाचे तास कमी होणें, म्हातारपण, बाळंतपण काम करीत असतां इजा होऊन व्यंग उत्पन्न होणें या व अशाच आकस्मिक प्रकारांबद्दल बोनस मिळविणें; संघ–प्रचार, व समागम–स्वातंत्र्य, संपाचा अनिर्बंध हक्क, या व अशा तात्कालिक स्वरूपाच्या मुख्यत: आर्थिक मागण्यांवर कामगारांची दैनंदिन चळवळ चाललेली असते आणि कम्युनिस्ट, रॉयीस्ट, कॉंग्रेस–सोशालिस्ट, सुधारणावादी व सरकारपक्षीय अशा मताचे लोक तींत काम करीत असतात. वरील सर्वसामान्य उद्देश जरी सर्वांचे हेच असले तरी ते सिद्ध करण्याचे उपाय व मार्ग यांबद्दल त्यांच्यांत

बरेंच मतभिन्नत्व दिसून येतें. वरीलपैकीं शेवटल्या म्हणजे सरकारपक्षीय गटांत आळवे व कांदळकर हे प्रमुख असून ते सरकारतर्फे नेमण्यांत आलेल्या लेबर ऑफिसरच्या सल्ल्यानें व तंत्रानें काम करीत असतात. कामगारांचीं वैयक्तिक गार्‍हाणीं शक्य तर मिटविणें आणि संप व वर्गाभिनिवेशाच्या चळवळीपासून कामगाराला अलिप्त ठेवणें हीं कामें हा गट सध्यां करीत असतो.

दुसरा गट सुधारणावाद्यांचा असून त्याचे अध्वर्यु श्री. एन. एम. जोशी हे आहेत. सामुदायिक देवाणघेवाणाच्या तत्त्वावर त्यांचा विश्वास असून आत्यंतिक कारणांवाचून ते संपाला संमति देण्यास तयार नसतात. तडजोडीच्या धोरणावर त्यांची चळवळ चाललेली असते हें खरें; पण सरकार किंवा मालकांच्या वजनाखालीं चळवळ चालावी ही गोष्ट त्यांस मान्य नाहीं. हा त्यांच्यांतील व अहमदाबादच्या गांधी युनियनमधील मुख्य फरक होय.

बाकीचे उरलेले तिन्ही गट वर्गविग्रहाचें तत्त्व मानणारे आहेत. यांपैकीं काँग्रेस सोशालिस्ट स्वतःला कामगार पक्षाचे म्हणवीत नाहींत. वर्गविग्रहाचें तत्त्व मान्य करूनहि त्यांच्यांतील लोक मुंबईच्या सरकारपक्षीय युनियनमध्यें काम करतात, यामुळें वाणींत वर्गयुद्ध व कृतींत तद्विरहित असें त्यांचें वर्तन दिसतें. तथापि हा पक्ष एकसूत्री नाहीं. मुंबईंत त्याचें वर्तन वरीलप्रमाणें असलें तरी अहमदाबादेंत तें यापेक्षां निराळें आहे तेथें या पक्षाचे लोक गांधींच्या मजूर–महाजनला वर्गविग्रहाच्या तत्त्वानुसार कसून विरोध करतात! उलट नागपूर व कानपूर येथें पहावें तों तेथें ते राष्ट्रीय सुधारणावादी म्हणजे काँग्रेसशीं मिळतें घेऊन वागतांना दिसतात. डॉक युनियनमधील त्यांचें वर्तन कामगार चळवळीच्या मूलभूत सिद्धांताच्या विरुद्ध आहे. समग्र कामगार वर्गाच्या नैसर्गिक स्फूर्तिजन्य कृतीला उचलून धरणें हा तो सिद्धांत होय. पण शिस्तीच्या नांवाखालीं ही स्वयंस्फूर्ति चिरडून टाकण्याचें काम ते तेथें करीत आहेत!

उरलेल्या दोन पक्षांपैकीं रॉयपक्षीय कार्यकर्ते वर्गयुद्धाचें तत्त्व सर्वस्वीं मानतात. तसेंच, त्यांची प्रत्यक्ष कृतीवर (Direct action) अढळ निष्ठाहि आहे. राष्ट्रीय क्रांति हें त्यांचें लक्ष्य असून ती, कामगार, शेतकरी व गरीब मध्यम वर्गीय लोक यशस्वी करतील असा त्यांचा विश्वास आहे. तथापि या क्रांतींत कामगार तात्काळ पुढारीपण घेण्यास समर्थ आहेत असें त्यांना वाटत नसल्यानें व काँग्रेसचें बहुजन समाजावर जबरदस्त वजन असल्याची त्यांची समजूत असल्यानें ते काँग्रेसची कांस सोडण्यास तयार नाहींत. त्यांच्या मतें काँग्रेस साम्राज्यविरोधी क्रांतिकारी बनूं शकेल. या विचारसरणीमुळें ते क्रांतीनंतरचें सत्ताधारी केंद्र (Organ of Power) म्हणून कॉन्स्टिटच्युअंट असेंब्लीचा पुरस्कार करतात. तथापि तींत मध्यम वर्गाचें बहुमत होऊन सत्ता त्यांच्या हातीं जाण्याचा संभव असल्यानें हा गट नकळत जर्मनींतील सोशल डेमॉक्रॅट पक्षाची भूमिका चालवीत आहे अशी त्याच्यावर उलट टीका ऐकूं येते.

असें असलें तरी कामगार चळवळींत (मुंबई गिरणी कामगार युनियन) ते कम्युनिस्टांबरोबर काम करूं शकतात. याचें कारण ते राष्ट्रांतरीय बाण्याचे क्रांतिवादी असून वर्गयुद्धाचे पुरस्कर्ते आहेत. यामळें त्यांच्याशीं कामगारांच्या आर्थिक लढयांत व दैनंदिन चळवळींत कम्युनिस्टांचा विरोध येत नाहीं.

शेवटचे कम्युनिस्ट मताचे लोक यांचा भर कामगार वर्गाच्या नैसर्गिक स्फूर्तिजन्य कृतीची (Local Initiative) वाढ करण्यावर असून यापुढें ते शिस्तीच्या बंधनांना गौणच मानतात. एकमेव वर्ग या नात्यानें शेतकऱ्यांचें सहकार्य संपादून कामगार राष्ट्रीय क्रांतींत पुढारीपण प्रस्थापित करण्यास समर्थ आहेत अशी त्यांची अनन्य श्रद्धा आहे. यामुळें ते राष्ट्रीय लढयांत कामगारांच्या पुढारीपणाचा आग्रह धरतात. कॉन्स्टिटच्युअंट असेंब्लींतील धोका दिसत असल्यानें त्याऐवजीं ते कामकरी व शेतकरी

यांच्या सोव्हियटचा पुरस्कार करतात. राष्ट्रीय क्रांतीचें प्राथमिक स्वरूप निर्भेळ कामगारवर्गीय नसणार हें ते जाणतात. तथापि ही क्रांति त्यांच्याच पुढारीपणाखालीं यशस्वी होणार असा त्यांचा विश्वास आहे. गांधी व काँग्रेस यांनीं स्वातंत्र्याची चळवळ सोडून देऊन साम्राज्य-शाहीशीं सलोखा केल्यामुळें श्रमजीवि बहुजन समाजावरील त्यांचें वजन ओसरत चाललेलें त्यांस दिसत असल्यानें ते त्यांच्या नादीं लागत नाहींत. कारण, काँग्रेस ही भांडवलदारांची संस्था असल्यानें ती कधींहि क्रांतिकारक होणार नाहीं असें त्यांचें मत आहे.

अहमदाबाद येथील 'मजूर महाजन' ही कामगार युनियन गांधींच्या नेतृत्वाखालीं चालत असली तरी तिची वर्गणी मालक गोळा करतात. अर्थात् तिचें द्रव्यबल मालकांच्या आधीन आहे. तसेंच मालकांच्या आगाऊ संमतीवांचून तिनें कोणतीहि गोष्ट करावयाची नाहीं असें असल्यामुळें या युनियनचे खरे नियंते मालकच आहेत. यामुळें तिला कंपनी युनियन म्हणतात. वर्गयुद्धाविरुद्ध वर्गीय सलोखा हें तिचें ब्रीदवाक्य असल्यानें मालकांच्या हिताचाहि ती दक्षतेनें विचार करते. कामगार चळवळीच्या राष्ट्रान्तरीय स्वरूपावर तर त्यांचा विश्वास नाहींच पण तिचें एकराष्ट्रीयत्वहि आकलन झालेलें नसल्यानें ती ऑ. इं. ट्रे. यु. काँ. पासून पूर्वाश्रमी हरिजनांप्रमाणें अलिप्तच राहाते !

कराची येथील कामगार संस्था देखील आपला दीड तांदूळ निराळा शिजवितात. कामगारांच्या सुखसोई ( Welfare )च्या धोरणावर त्यांचें काम चालतें. या संस्थांचे अध्यक्ष सिंध प्रांतिक काँग्रेस कमिटीचेहि अध्यक्ष आहेत. यावरून त्यांच्यांतील वर्गीय भावनेचा अभाव स्पष्ट होतो.

### ३ कामगारांच्या राजकीय चळवळी

मागें दिग्दर्शित केलेल्या तात्कालिक आर्थिक तक्रारींवर आढाव्याच्या वर्षीं हस्तपत्रकें, सभा, मिरवणुकी आदींच्या द्वारें चळवळ चालूच होती. पण त्याशिवाय राजकीय स्वरूपाच्या चळवळींतहि कामगारांनीं चांगलाच उत्साह दाखविला. यापैकीं प्रतिवार्षिक स्वरूपाचे बेकार दिन, मे दिन, लेनिन दिन, रशियन राज्यक्रांति दिन' स्वातंत्र्य, डेटिन्यू, राजबंदी, आदि दिन व कित्येक सप्ताह झाले. यांच्या निमित्तानें साऱ्या देशांतील कामगारांनीं सभा व मिरवणुकीच्या द्वारें आपल्या राष्ट्रीय स्वातंत्र्यविषयक व राष्ट्रान्तरीय वर्गविषयक भावना व्यक्त केल्या. अनेक प्रकारचे लादले गेलेले निर्बन्ध व दडपशाहीचे कायदे यांविरुद्ध अनेक सभा केल्या.

पण त्याशिवाय दोन महत्त्वाच्या गोष्टींचा निर्देश केला पाहिजे. त्यांतील पहिली जॉ. पा. रिपोर्टाविरुद्ध लोकमत जागृत करण्याकरितां शेकडों सभा भरविल्या, मिरवणुकी काढल्या व हस्तपत्रकें प्रसिद्ध केलीं व कान्ग्रेसला तसेंच काँ. सोशालिस्ट पक्षाला त्या चळवळींत सामील करून घेतलें. एवढ्यावरच न थांबतां सुधारणाविरोधी चळवळीचें सातत्य राखण्याकरितां या दोन्ही व इतर येतील त्या संस्थांची मिळून एक संयुक्त कमिटी नेमावी असा पुकारा केला. तथापि कान्ग्रेसचें स्वतःचेंच धोरण या बाबतींत निश्चित नसल्यानें ही सूचना चौपाटीच्या वाळूकणांत उधळली गेली.

परंतु तेवढ्यानें स्वस्थ न बसतां बाबू राजेंद्र प्रसाद मुंबईत आले असतां कामगार-प्रतिनिधींनीं ता. ३१ मे रोजीं त्यांची भेट घेऊन सुधारणा विरोधी चळवळीविषयी संयुक्त कार्यक्रम करणें कितपत शक्य आहे याविषयीं चर्चा केली. या चळवळीसंबंधानें ऑ. इं. ट्रे. यू. काँ. चें म्हणणें असें कीं हिंदुस्थानावर गुलामगिरी लादणाऱ्या सुधारणा हाणून पाडण्यासाठीं बहुजनसमाजाची प्रत्यक्ष कृतीकरितां तयारी करावी म्हणून दोघांचें सं. मंडळ नेमण्यांत यावें. काँग्रेसचे अध्यक्षांनीं कामगारांचें हें म्हणणें वर्किंग कमिटीपुढें मांडावयाचें वचन दिलें खरें; पण, झालेल्या विवेचनांत त्यांनीं जें मत व्यक्त केलें त्यावरून कामगारांची सूचना हवेंत उडन जाणार असें दिसतें. कारण ट्रे. यु. काँ. च्या सूचनेचा भर प्रत्यक्ष कृतीवर आहे तर राजेंद्र बाबूंचे मतें बहुजन-

समाज याकरितां तयार नाहीं. शिवाय त्यांना ट्रे. यू. कॉं. च्या सहकार्यानें नवीन कार्यक्रम तयार करावयाला नको आहे तर कॉंग्रेसच्या कार्यक्रमांत ट्रे. यू. कॉं. नें भाग घ्यावयास पाहिजे आहे.

दुसरी महत्त्वाची गोष्ट म्हणजे मागल्या वर्षीच्या ऑक्टोबरमध्यें मुंबई येथें भरलेल्या कॉंग्रेस अधिवेशनाच्या प्रसंगीं कॉं.चा निषेध प्रदर्शित केला गेला ही होय. याची जागृति पंधरा दिवस चालू होती. स्वातंत्र्याचा लढा सोडून भांडवलदार वर्गाच्या हितसंवर्धनार्थ कॉंग्रेसनें साम्राज्यशाहीशीं अयुक्त समेट केल्याबद्दल अधिवेशनाच्या पहिल्या दिवशीं कामगारांची मिरवणूक मंडपांत नेऊन हें निषेधप्रदर्शन व्हावयाचें होतें. पण कॉंग्रेस पुढाऱ्यांच्या संमतीनें पोलीस कमिशनरांनीं मिरवणुकीला बंदी केली आणि सशस्त्र पोलिसांचा कडेकोट बंदोबस्त ठेवला. तरीहि या शुद्ध राजकीय स्वरूपाच्या मिरवणुकींत वर्गीय भावनेनें तीन हजारांवर कामगारांनीं भाग घेतला. अर्थातच लाठी हल्ला होऊन मिरवणूक उधळली गेली. साम्राज्यशाहीच्या लाठ्या – बंदुकांच्या पहाऱ्यांत 'स्वातंत्र्यगामी' कॉंग्रेसचें 'शुभकार्य' पार पडलें आणि कामगारांच्या रक्ततर्पणानें कॉंग्रेसच्या अहिंसाव्रताची सांगता झाली.

चालू सालीं ट्रे. यु. कॉंग्रेसनें कॉं. सो. पक्षाशीं कामचलाऊ ऐक्य केलें; पण त्याचा फायदा झाला नाहीं, असें मत ट्रे. यू. कॉं.च्या माजी जन. सेक्रेटरींनीं आपल्या अहवालांत व्यक्त केलें आहे. निरनिराळ्या प्रांतांत कामगारांची व्हॅन गार्ड, वर्कर्स एज, मजदूर, विकली मजदूर, इंडिपेंडंट रेल्वेमेन, इंडियन रेल्वे जर्नल, पोस्टमन वगैरे वृत्तपत्रें प्रसिद्ध होतात. हीं सर्वच वर्गाभिमानी आहेत असें नव्हे.

पण एवढ्यानें चळवळ संपली नाहीं. तिच्यांतील परिणामदृष्ट्या खरें कार्य म्हणजे कामगार वस्तीच्या निरनिराळ्या भागांत वर्ग काढून, कामगारांतूनच पुढारी निर्माण व्हावे म्हणून त्यांस वर्ग भावनेनें तात्त्विक, राजकीय व चळवळविषयक शिक्षण देणें हें होय. हें कार्य मुंबई, कलकत्ता, अहमदाबाद व कानपूर येथें अविच्छिन्नपणें चाललें आहे.

### ४ ट्रेड युनियन्स व यांचे राष्ट्रीय संघ

ट्रेड युनियन्स् व त्यांचे सभासद यांची संख्या तसेंच संघ यासंबंधीचे यंदाचे सर्व प्रकारचे सर्व देशीय आकडे अद्याप उपलब्ध नाहींत. यामुळें येथें कांहीं बाबींत इलाख्याचे व कांहीं बाबींत देशाचे आंकडे दिले आहेत.

येथें एक मुद्दा स्पष्ट केला पाहिजे तो हा कीं, जिला साकल्यानें कामगार चळवळ म्हणतात ती, व ट्रेड युनियन चळवळ, या दोन्ही सदृश दिसल्या व असल्या तरी अक्षरशः त्या एक नाहींत. कारण ट्रेड युनियन्सचें स्वरूप ट्रे. यु. कायद्यानें नियंत्रित व वर्गणी भरणाऱ्या सभासदांच्या संख्याबलानें मर्यादित असतें. **उलट वर्गीय चळवळीवर असें नियंत्रण व मर्यादा हीं नसतात. यामुळें ती अधिक व्यापक व निर्भय असते.**

कामगार चळवळींत भाग घेणारे पक्ष किंवा गट यांचा परिचय मागें झालाच आहे. दैनंदिन चळवळ ट्रेड. युनियन्सतर्फे चालते व त्यांत हे गट भाग घेतात. निरनिराळ्या धंद्यांतील व शहरांतील अनेक युनियन्स मिळून त्यांचे राष्ट्रीय संघ ( कॉंग्रेस ) बनतात. असे दोन संघ आज अस्तित्वांत आहेत. ऑ. इं. ट्रे. यु. कॉंग्रेस व नॅशनल ट्रे. यु. फेडरेशन पैकीं पहिल्या संघांत ५२ युनियन्स समाविष्ट असून त्यांचे सभासद ऐंशी हजारांपर्यंत आहेत. याशिवाय लाल ट्रे. यु. कॉं. ही तिसरी संस्था होती, पण ती आतां ट्रे. यु. कॉं. मध्यें विलीन झाल्यानें दोघींच्या मिळून संलग्न युनियन्स सत्तरपर्यन्त व सभासदांची संख्या लाखापर्यंत भरेल, असा अंदाज आहे. ट्रे. यु. कॉं. चे चालू सालचे अध्यक्ष श्री. रुईकर व ज० सेक्रेटरी श्री. खेडगीकर हे आहेत. या कॉंग्रेसच्या संलग्न युनियन्समध्यें गिरण्या, ट्राम, म्युनिसिपालिट्या, डॉक्स, प्रेस, ज्यूट, लोखंड, खाणी या धंद्यांतील युनियन्सचा भरणा आहे.

नॅ. ट्रे. यु. फेडरेशन हें नागपूरच्या १९२९ ट्रे. यु. कॉंग्रेसमध्यें मतभेद होऊन फूट पडल्यावर पुढील वर्षी सुधारणावादी पक्षांनीं मिळून अस्तित्वांत आणलें. त्यांत ५० युनियन्स सामील असून त्यांचें संख्याबल सवालाखापर्यंतचें आहे. या युनियन्समध्यें जी. आय. पी., एफ. जे. बी., एन. डब्ल्यू., एफ. आय., ए. बी., व बी. एन.; याशिवायच्या इतर रेल्वे; मरीन, पोस्ट, टेलिग्राफ, पोर्टट्रस्ट, खाणी वगैरे धंद्यांतील युनियन्सचा प्रामुख्यानें भरणा असून श्री. जमनादास मेहता हे फेडरेशनचे अध्यक्ष व श्री. आर. आर. बखले हे जनरल सेक्रेटरी आहेत.

मुंबई इलाख्यांतील एकूण धंद्यांत जेवढे कामगार आहेत त्यांपैकीं शें. ३० युनियनचे सभासद आहेत. ही शेंकडेवारी १९३० नंतर कमी होत गेली. याचें एक कारण मालकांनीं युनियनच्या सभासदांवर धरलेलें शस्त्र हें होय. एकूण ११४ युनियन्स रजिस्टर्ड आहेत. पैकीं ५४ मुंबई शहरच्या आहेत. अहमदाबादेस १३ आहेत. त्यांचे सभासद १ ल. १० हजारावर आहेत. याशिवाय मुंबई गिरणी कामगार युनियनसारख्या रजिस्टर्ड नसलेल्या कित्येक युनियन्स आहेत.

चालू वर्षी मार्च ३४ ते एप्रिल ३५ देशांत एकूण १५९ संप झाले. त्यांत सव्वा दोन लाख कामगारांनीं भाग घेऊन ४८ दिवसांचें काम बंद ठेवलें. यांपैकीं १०७ संप निवळ पगारकाटीविरुद्ध होते. मुंबई इलाख्याचा या संपांतील हिस्सा ९२ इतका असून त्यांत पावणेदोन लाख कामगारांनीं भाग घेऊन अठरा दिवसांचें काम बंद पाडलें. साऱ्या देशांतील १५९ संपांपैकीं ९६ संप एकट्या गिरण्यांच्या धंद्यांत झाले यावरून या धंद्यांतील कामगारांचें म्हणजे गिरणी कामगारांचें कामगारलढ्यांतील अग्रेसरत्व स्पष्ट होतें.

जीवितोपयोगी वस्तूंच्या किंमती मागील वर्षापेक्षां महागत आहेत. कापडाला व इतर मालाला मागणी मात्र वाढली आहे. अहमदाबादच्या गिरण्यांतून निघणारें कापड तावडतोब खपून जातें.

### ५ ऐक्याचे यशस्वी प्रयत्न

गेल्या दोन वर्षांत उत्पन्न झालेल्या परिस्थितींतून निरनिराळ्या युनियन्स व पक्ष यांच्यामध्यें किमान कार्यक्रमावर ऐक्य संपादन होण्याची आवश्यकता ध्वनित झालीच होती. तिला संपोत्तर अनुभवांनीं जास्त चालना दिली. यामुळेंच ट्रे. यु. कॉंग्रेसच्या १९३३ च्या कानपूर बैठकीनें लाल ट्रे. यु. कॉं. व नॅ. ट्रे. यु. फेडरेशन यांच्याशीं ऐक्य घडवून आणण्याच्या दृष्टीनें विचारविनिमय करण्यासाठीं एक पोटमंडळ नेमलें होतें. त्याला तेव्हां यश आलें नाहीं पण कलकत्ता येथें गेल्या डिसेंबरमध्यें जें अधिवेशन भरलें त्या वेळीं लाल ट्रे. यु. कॉं. चे प्रतिनिधी आमंत्रणावरून हजर राहिले व त्यांचा ऑ. इं. ट्रे. यु. कॉं. शीं विचारविनिमय होऊन भांडवलशाही व साम्राज्यशाहीच्या हल्ल्यांना तोंड देण्याकरितां परिणामकारक उपाय अमलांत आणतां यावे म्हणून खालील मुद्यांवर ऐक्य घडून आलें:— (१) वर्ग युद्धाच्या तत्त्वास मान्यता. (२) हिंदी कामगारांची ऑ. इं. ट्रे. यु. कॉं. ही एकच मध्यवर्ती संस्था मानावी. (३) एकाच धंद्यांत एकच युनियन असावी म्हणून लाल ट्रे. यु. कॉं. च्या घटक युनियन्सना एक महिन्यांत ट्रे. यु. कॉं. मध्यें समाविष्ट करून घेण्याचें काम करिण्याकरितां संयुक्त कमिटी नेमावी. (४) एकाच धंद्यांत दोन युनियन्स असल्यास त्या दोन्ही कान्ग्रेसीसचें एकीकरण झाल्यावर, एक कराव्या. (५) परराष्ट्रीय संस्थांशीं संबंध ठेवूं नये. (६) जिनीवाला प्रतिनिधी पाठविण्यासंबंधीं दर वर्षाच्या अधिवेशनांत बहुमतानें निर्णय करावा. (७) कॉंग्रेसमधील सर्व पक्ष व गट यांना शिस्तभंग होणार नाहीं अशा तऱ्हेनें मत-प्रचाराचें स्वातंत्र्य असावें. मात्र बहुमताच्या निर्णयाशिवाय कोणत्याहि गोष्टीची अमलबजावणी करूं नये.

वरीलप्रमाणें वर्गविग्रहाचें तत्त्व मानणाऱ्या दोन कॉंग्रेसीस एक झाल्या. परंतु अद्याप नॅ. ट्रे. यु. फेडरेशन एक होण्यास तयार नाहीं. मात्र वेळोवेळीं उत्पन्न होणाऱ्या प्रश्नासंबंधीं धोरण व

कार्यक्रम ठरविण्याकरितां ट्रे. यू. कॉ. शीं विचार-विनिमय करण्याकरतां फेडरेशन एक संयुक्त चर्चामंडळ बनविण्यास तयार आहे; यामुळें या दोन संस्था एक होणें एवढचांत तरी शक्य दिसत नाहीं.

### ६ कामगारांच्या प्रश्नाचें वाङ्मयांत प्रतिबिंब

कामगार हा उत्पादक वर्ग आहे. समाज-जीवन उत्पादनावर चालतें. यामुळें समाजजीवनाच्या प्रतिबिंबांत प्रत्येक घडामोडीच्या छटा उमटलेल्या असणारच. वाङ्मय हें समाजजीवनाचें प्रतिबिंब असल्यानें त्यांत कामगारांच्या प्रश्नाच्या व लढ्याच्या म्हणजेच वर्गकलहाच्या छटा उमटल्यावांचून कशा राहणार? यामुळें आधुनिक वाङ्मयांत व मराठी वाङ्मयांत सुद्धां कामगारांचा दृष्टिबिंदु फांकू लागला आहे. निदान तो समजून घेऊन त्याचें प्रदर्शन करण्याचे प्रयत्न तरी आतां बऱ्याच अंशीं होत आहेत हें आधुनिक लेखनावरून सहज दिसून येतें. याच निखालस कामाकरितां कामगार वाङ्मय प्रसारक मंडळ व श्रमजीविसाहित्य संघ ह्या दोन संस्था अस्तित्वांत आल्या होत्या. पैकीं पहिली दडपशाहीला बळी पडली. वरेरकर व खांडेकर यांचे प्रयत्न याच दिशेनें होत असून काणेकर व राजशेखर हे या बाबतींत बऱ्याच अंशीं निर्दोष कामगिरी करीत आहेत. प्रतिभा, महाराष्ट्र साहित्य आदि मासिकें व कित्येक वृत्तपत्रांत या प्रश्नांचा ऊहापोह होत आहे. पण त्याशिवाय वसंत-व्याख्यानमाला, मुंबई ग्रंथ संग्रहालयातर्फे होणाऱ्या चर्चा, नवमतवादावरील वादविवाद, एवढेंच नव्हे तर साहित्य संमेलनासारख्या निर्लेप संस्थांतूनहि त्यांचा पडसाद उमटूं लागला आहे. या सर्व साहित्यांतून निर्देश करण्यासारखें लेखन म्हणजे खांडेकरांच्या कांहीं गोष्टी, माडखोलकरांचा मुक्तात्मा, जोशांचा गिरणीवाला, काणेकरांचीं पिकलीं पानें व राजशेखर यांचा नवमतवाद हीं पुस्तकें होत.

---

# पृथ्वी–प्रदक्षिणा



## १ रशियाची २ री पंचवार्षिक योजना

या पंचवार्षिक योजनेंत देशाची औद्योगिक पुनर्घटना, खाजगी मालकीची हकालपट्टी व उद्योगधंदे आणि शेतकी यांमधून भांडवलशाहीचें उच्चाटन हींच कामें पुढें चालू ठेवावयाचीं आहेत.

योजनेचे हेतू:—नवीन समाजसत्ता उभारण्याकरितां कामकरी वर्गाला समर्थ करणें; कामगारांना आधुनिक यंत्रपद्धतीचें तात्त्विक व प्रात्यक्षिक शिक्षण देणें; शहरें व खेडीं यांचें दळणवळण वाढविणें; सोव्हिएट युनियनला संरक्षणक्षम करणें व आर्थिक आणि यांत्रिक बाबतींत स्वतंत्र करणें.

घटनात्मक उपाय:—आर्थिक कारभारांतून नोकरशाहीचें उच्चाटन व वैयक्तिक जबाबदारीला उत्तेजन; स्थापत्य व विज्ञानविशारदांची कारकुनींतून मुक्तता करून त्यांची उद्योगधंद्याचे क्षेत्रांत योजना करणें; कामकऱ्यांस उत्तेजन देण्याकरितां काम किती व कसें झालें आहे यावर मजुरीचें प्रमाण ठरविणें, चढाओढीला उत्तेजन देणें व देशाच्या शत्रूविरुद्ध दक्षता बाळगणें.

(१) नवीन यांत्रिक योजनेवर १९३७ पर्यंत १३३,४००,०००,००० रूबल्स खर्च करावयाचे आहेत. यांपैकीं६९,५००,०००,०००इतके उद्योगधंद्यामध्यें, १५,२००,०००,००० इतके शेतकीमध्यें व २६,५००,०००,००० वहातुकीच्या साधनावर खर्च होतील. या दुसऱ्या योजनेंत मूळ भांडवल ८५ मिलियर्ड रूबल्स १९३२ मध्यें होते, तें १९३७ मध्यें १९५ मिलियर्ड रूबल होतील असा अंदाज आहे.

(२) धनोत्पादक धंद्यांची पुनर्विभागणी:—जुन्या केंद्रांची वाढ करून शिवाय उरल प्रांत, पूर्व व पश्चिम सैबेरिया वगैरे ठिकाणीं नवीं केंद्रें उघडलीं आहेत.

व्होल्गा प्रांतांत मोठें पाटबंधाऱ्याचें काम, मध्य व उत्तर भागांत गव्हाची लागवड व पूर्व भागांत बीटची लागवड ही १९३७ पर्यंत पुरी करावयाची आहे.

(३) १९३७ मध्यें धंद्यांचें एकंदर उत्पन्न ४३.३ वरून ९२.७ मिलियर्ड रूबल वाढणार आहे. महत्त्वाच्या धंद्यांची १९३७ मधील वाढ खालीलप्रमाणें:—ट्रॅक्टर—१६७.० मिलियर्ड रूबल व लोकोमोटिव्ह—२८०० ,, ,,

| | | |
|---|---|---|
| वीज—३८ | मिलियर्ड | किलोवॅट तास |
| कोळसा—१५२.५ | | मिलियन टन |
| पोलाद—१७ | | ,, |
| कापूस—५१००० | ,, | स्के. मिटर |

(४) यांत्रिक रचना:—मोटारी व लॉरी यांची ८ पट वाढ १९३७ मध्यें होईल व ट्रक्सची ५ पट शेतकी यंत्रें (कंबाईन्स, ट्रॅक्टर इ.) तिपटीनें वाढवावयाचीं. रेल्वे रस्त्यावर १५८००००००० रूबल खर्च होतील. जहाजांची २.५ पट जास्त वाढ होईल. पोस्ट, टेलिग्राफ, टेलिफोन व रेडियो यांवर ८००,०००,००० रूबल्स् खर्च होतील. एकंदर यांत्रिक रचनेवर १९१० मिलियन रूबल खर्च होतील.

(५) वीज:—१९३७ पर्यंत २७ मिलियर्ड किलोवॅट तास इतका वीजप्रवाह वाढावयाचा आहे. १८ मिलियर्ड कि. वॅट तास (वार्षिक) इतकी वीज उत्पन्न करतील अशीं २८ स्टेशनें बांधावयाचीं आहेत.

(६) फ्युएल:—१९३७ पर्यंत १९५,०००,००० टन इतकी जळणाचे सामानाची पैदास करावयाची आहे. १७८ कोळशाच्या खाणी खोदावयाच्या आहेत व खनिज तेलाचीं नवीन केन्द्रें उघडावयाचीं आहेत.

(७) खनीज धातूंच्या धंद्यांत दुप्पट वाढ करावयाची आहे. १९३७ पर्यंत तांबें १५५,००० टन, शिसें—१२०,००० टन, झिंक—१००,०००, अल्युमिनिअम—८०,००० मँगॅनीज्—२७००,००० टन इतकी पैदास होईल.

(८) रासायनिक धंद्यांत ५ वर्षांमध्यें एकंदर तिपटीनें वाढ होईल. १९३७ मध्यें रबर टायर्स ३०००,०००, रबर सोल ३०००० टन व पादत्राण-जोड १२०,०००,००० इतकीं तयार होतील.

(९) महत्त्वाचें इमारती सामान—

सिमेंट-७५,०००,००टन विटा-८००,०००,००० ॲस्बेस्टॉस्——२००,००० इतकी तयार होईल. इमारती लाकडांत शेंकडा ७८ वाढ होईल.

(१०) लाईट इंडस्ट्रीजमध्यें १६,१००,०००,००० रूबल खर्च होतील. १९३७ मध्यें १५ कापसाच्या गिरण्या, १३ लोकरीच्या, व २१ पादत्राणांचे कारखाने उभारले जातील.

(११) वहातुकीच्या मार्गाच्या वाढीकरितां २६,५००,०००,०००रुबल खर्च होतील. इंजिनें २४६०० व डबे ८००,००० व नवीन रेल्वे रस्ता १०००० आणि जलमार्ग १०१००० किलोमीटर लांब तयार होईल. रस्ते २१०,००० किलोमीटरनें वाढतील व हवाई वहातुकीकरितां ८५००० किलोमिटर मार्ग तयार होईल.

(१२) शेतकीचे उत्पन्नांत वार्षिक शें. १५ नें वाढ होईल व १९३७ पर्यंत २६.५ मिलियर्ड रूबल इतकें उत्पन्न वाढेल. एकंदर ट्रॅक्टर ८२००००० इतक्या अश्वशक्तीचे होतील. कलेक्टिव्ह व स्टेट फार्मवर २१,९००,०००,०००रूबल खर्च होतील.

(१३) कामकऱ्यांचे औद्योगिक शिक्षणाची व्यवस्था—५०००,००० कामकऱ्यांना तज्ज्ञ करणें, १ कोटी कामगारांना शिक्षण देणें. ३४०,००० तज्ज्ञांना ग्रॅज्युएट करणें. ४५०,००० इतक्यांना धंदेशिक्षणाचे कॉलेजचा कोर्स शिकविणें.

(१४) कामकऱ्यांची राहणीः——१९३७ मध्यें मजुरीफंड १९ मिलियर्ड रूबल इतका वाढेल व मजुरींतही दुप्पट वाढ होईल. स्त्रियांना आर्थिक स्वातंत्र्य देणें हा सोव्हिएटचा एक हेतु आहे. स्त्री-पुरुषांना विवक्षित कामासाठीं मजुरी सारखीच राहील. सार्वजनिक भोजनगृहें व किंडर गार्टन शाळा उघडून विवाहित स्त्रियांना सुद्धां काम करण्यास उत्तेजन देण्यांत येणार आहे. कामकऱ्यांच्या आरोग्याप्रीत्यर्थ १९·६ मिलियर्ड रूबल खर्च होतील. इस्पितळांत रोग्यांची सोय शहरांत शें. ४४ व खेड्यांत शें. ९८ वाढणार आहे. हवेचीं ठिकाणें वाढण्याकरितां २७५,०००,००० रूबल व सार्वजनिक स्नानगृहाकरितां २६०,०००,००० रूबल खर्च होतील.

यु. एस्. एस्. आर. ची लोकसंख्या १ जानेवारी १९३३ ला १,६५,७०,००००होती, ती १जानेवारी १९३८ ला १८०, ७००,००० इतकी होईल असा अंदाज आहे.

(१५) शिक्षण——पहिल्या पंचवार्षिक योजनेनें देशांतील निरक्षरता पार नाहींशी केली. या दुसऱ्या योजनेंत खेड्यांतून व मागासलेल्या भागांतून शिक्षणप्रसार करण्याकरितां कार्यक्रम आखला आहे. १९३७ मध्यें एकंदर शिकणाऱ्यांची संख्या ३६०००,००० होईल. फिरती वाचनालयें २५००० होतील. सार्वत्रिक शिक्षणावर २२,४००,०००,००० रूबल, तज्ज्ञांचे शिक्षणासाठीं २४,००,०००,००० रूबल, शास्त्रीय शिक्षसाठीं ४०,२०,०००,०००, रूबल व ललितकलाकरितां ८९०,०००,००० रूबल खर्च होतील.

(१६) पहिली पंचवार्षिक योजना एवढी अवाढव्य असूनही सवाचार वर्षांतच पूर्ण झाली. तेव्हां वर दिलेल्या दुसऱ्या योजनेचे यशाबद्दल खात्री बाळगण्यास हरकत नाहीं. १९३४ मध्यें पहिले सहामाहींत एकंदर मोठ्या धंद्यांत १९३३ पेक्षां शें. २८ नें वाढ झाली व कामगारांची संख्या १०·२ नें वाढली. साबण, लोखंड, पोलाद, सोनें यांची पैदाससुद्धां खूपच वाढली. हीच प्रगति लाईट इंडस्ट्रीजमध्येंही झाली. शेतकीबाबत फारच महत्त्वाचे प्रयोग चालू आहेत. विशेषतः टर्कमेनियामधील कृत्रीम पाऊस पाडण्याकरितां स्थापन झालेल्या संस्थेनें महत्त्वाचे प्रयोग केले, व विमानांच्या साहचानें ढगावर निरनिराळ्या रासायनिक द्रव्यांचा वर्षाव करून ढगांतून पाऊस पाडला तसेंच या संस्थेनें मे महिन्यांतील स्वच्छ उन्हांत दाट धुकें उत्पन्न करून दाखविलें. ढगाच्या आकाराचें धुकें निर्माण करून पाऊस पाडण्याचे प्रयत्न चालू आहेत.

(१७) रशियाला लढाईला तोंड देण्याचा प्रसंग न आल्यास ही दुसरी पंचवार्षिक योजना खात्रीनें सफळ होईल व त्यामळें आर्थिक दृष्टचा रशिया इतर राष्ट्रांपासून स्वतंत्र होईल. आणखी-हि पंचवार्षिक योजना पुढें आखण्यांत येतीलच व अशा रीतीनें आर्थिक उन्नति झपाटचानें होत गेल्यामुळें गिऱ्हाईक या नात्यानें रशियानें आपली पत निःसंशय वाढविली आहे. आतांच व पुढेंहि रशिया इतर राष्ट्रांस असें बजावूं शकेल कीं, आम्हांस अमूकच तऱ्हेचीं यंत्रें व अमूकच माल पाहिजे. व वाजवी किंमतींत तो विकीत नसाल तर आमचें त्यावांचून अडलें नाहीं. आम्ही तो माल देशांतच तयार करण्यास समर्थ आहों. जगाच्या पेठेंत गिऱ्हाइक म्हणून रशियाची पत फारच वाढली आहे. परराष्ट्रीय व्यापार स्टेटचे ताब्यांत असल्यामुळें रशियाला आयात निर्यातीवर नियंत्रण घालतां येतें. अंथरूण पाहून पाय पसरण्याचें धोरण रशिया अमलांत आणीत असल्यामुळें व त्या राष्ट्राचे मागें अफाट संपत्ति व जगाच्या एकषष्ठांश भूमिभागाची खनिज संपत्ति असल्यामुळें रशिया आपली व्यापारी पत नेहमीं कायम ठेवूं शकेल.

---

## २ रशियांतील मतांची चलबिचल ?

बोल्शेव्हिक लोकांचें तत्त्वज्ञान नेमकें कोणचें याविषयीं नानाप्रकारचे प्रवाद कानीं येतात. या मतपंथाचे जे मुख्य आचार्य त्यांचीं तात्त्विक मतें सुनिश्चितच आहेत व तीं ग्रंथगतच आहेत. या मतांची मांडणी व्यवहारांत करणें हें प्रचंड काम रशियानें हातीं घेतलें व आज १७–१८ वर्षें ही मांडणी करण्याचें काम तेथें आग्रहानें व जोरानें चालू आहे. मतांना धरून ज्यांनीं रशियांतील राज्यक्रांति होण्याचे आधीं कित्येक वर्षें-पर्यंत कारागृहवास, हद्दपारी व वनवास भोगिले तेच लोक रशियांतील सत्ताधारी बनून हीं मतें व्यवहारांत मांडू लागले व आजही जे सत्ताधारी आहेत ते अशा लोकांपैकींच आहेत. व्यवहार सुरू झाल्यावर ताबडतोब नव्या मतासारखा नवा बनाव एकदम बनवितां येणार नाहीं हें बोल्शेव्हिक मतांतील अग्रेसर जो लेनिन त्याच्याही ध्यानांत येऊं लागलें. यांतही कांहीं नवे नव्हते. असें होणारच व आपल्या तत्त्वज्ञानाचे एकेक-वैचारिक स्तबक आपल्याला प्रस्थापित करीत पुढें जावें लागणार हें त्याला कळलेलेंच होतें. व म्हणून अशीं हीं अनुक्रमवार स्तबकें प्रस्थापित होण्यासाठीं थोडें थांबणें, जुनेंच राहूं देणें किंवा त्याची गय करणें या गोष्टी करावयास त्यानें मागें पुढें पाहिलें नाहीं. पण व्यवहारांत प्राप्त म्हणून जरी हें सर्व त्यानें केलें तरी तत्त्वविचारांचा मत-स्फुल्लिंग व त्याच्या बारीक बारीक शलाका या मात्र मूळ तत्त्वज्ञानराशींत जशा होत्या तशाच त्यानें ठेविल्या होत्या. तथापि उत्तरोत्तर मनुष्याच्या मनाच्या वृत्ति–पिंडच बदलवून टाकण्याचा हा अभिनव प्रयोग चालू असतां, तो करून पाहाणारास नवेनवे अनुभव येऊं लागले व "अमुकच घडवून आणीन" आणि "याचें अमुकच होईल" हा आग्रह ढिला पडून "जुनें हें साफ चूक होतें हें खरेंच आहे व म्हणून तें आम्ही बुडविणारच पण नवीन कोणचें, याचे सतत प्रयोग चालू ठेवूं.त्या प्रयोगांतून जे निष्पन्न होईल तें होईल, तेंच पत्करावयास आपण सिद्ध असलें पाहिजे" अशी ही प्रयोग करणारांची व विद्यार्थ्यांची भूमिका रशियांतील क्रांतिकारकांनीं घेतली आहे. पण याचा अर्थ त्यांनीं आपलें मूळचें तत्त्वज्ञान बदललें आहे असा मुळींच नाहीं. प्रयोगांतून पुढें काय निष्पन्न होईल तें पत्करावयास सिद्ध असणें हें परिस्थितिप्राप्तच आहे व तशा तऱ्हेनें रशियन क्रांतिकारक सिद्ध राहातीलही. तथापि त्यांच्या मूळ तत्त्वज्ञानाच्या कल्पनांतच कांहीं बदल झाला आहे व जें त्यांच्या तत्त्वज्ञानाला मुळांत उमगलें नव्हतें तें आतां उमगूं लागल्यामुळें तेथील क्रांतिकारकांनीं आपलीं चळवळीचीं धोरणें बदललीं असें जें कोणी कोणी म्हणतात तें मात्र बरोबर नाहीं. एखाद्या सांप्रदायाचीं शुद्ध तत्त्वें त्या सांप्रदायाच्या मूळ तत्त्वज्ञानराशींतच पाहावयास हवींत. इतरांनीं तीं कशीं समजवून

घेतलीं असतील किंवा फैलावन दिलीं असतील त्यावरून या तत्त्वांचा बोध करून घेतां कामा नये. तर त्या तत्त्वांचे जे कोणी जनक झाले त्यांच्याच लिखाणावरून करून घेतला पाहिजे.

पुष्कळ लेखक व मुत्सद्दी, कीं जे रशियांतील घडामोडींच्या संबंधानें फारशी सहानुभूति बाळगीत नाहींत, ते असें सांगूं लागले आहेत कीं "रशियानें आपलें धोरण बदललें आहे. माणसामाणसांत समता उत्पन्न करणें, त्यांच्यांतील उच्च नीच भाव नष्ट करणें, कोणी कसेही श्रम करणारे असोत सर्वांना सारखेंच वेतन मिळावयाचें, तसेंच कुणालाही खाजगी मिळकत करण्याचा हक्क उरणार नाहीं, अशी जी रशियाची क्रान्तीच्या ऐन अमदानींत घोषणा होती ती साफ फसली आहे व रशियांत हळूहळू विषमता सुरूं झाली आहे व म्हणून वैषम्यही माजूं लागलें आहे, माणसांच्या मिळकती त्यांच्या कामाच्या मगदुराप्रमाणें कमी अधिक झाल्या आहेत व त्यांना खाजगी मिळकत करतां येते. अर्थात् हें होत आहे हें चांगलेंच आहे व मनुष्यस्वभावाचें निरीक्षण करतां रशियानें असेंच करावयास हवें होतें.' आपल्या या म्हणण्याच्या समर्थनार्थ ते अनेक उदाहरणें देत असतात. आतां, ते जीं उदाहरणें देतात तीं खरींच आहेत. रशियांत विषमता आहे, पगार सारखे नाहींत व खाजगी मिळकत करण्याचा हक्क सर्वांना आहे. पण हें सर्व असूनसुद्धां रशियांतील क्रांतिकारकांवर आक्षेप घेणारांचें बोलणें मात्र खरें नाहीं. कारण मूळ बोल्शेव्हिक तत्त्वज्ञान काय आहे यासंबंधीं त्यांची आगाऊ होऊन बसलेली कल्पनाच चूक आहे. बोल्शेव्हिकांचे आचार्य जे मार्क्स, एन्जल्स आणि लेनिन त्यांनीं असें कधींही म्हटलें नाहीं कीं, आम्ही माणसामाणसांत फरक मानीत नाहीं, कोणी कोणच्याही दर्जाचें काम करोत त्या सर्वांना आम्ही वेतन सारखेंच देऊं किंवा माणसाला त्याची स्वतःची म्हणून कांहीं मत्ता उरूं देणार नाहीं.

वर ज्या टीकाकारांचा उल्लेख केला आहे त्यांचें लिहिणें सुरूं झाल्यावर रशियन शासनसंस्थेचा मुख्य जो स्टॅलिन त्यानें एक विस्तृत भाषण करून या तत्त्वज्ञानविषयक रहस्याचा खुलासा केलेला आहे. तो वाचून पहातां असेंच म्हणावें लागतें कीं रशियन तत्त्वज्ञान कांहींच बदललेलें नाहीं. पण या तत्त्वज्ञानाचा ज्यांनीं क्रांतीच्या ऐन अमदानींत फैलाव केला किंवा ज्यांनीं हें तत्त्वज्ञान केवळ कर्णोपकर्णीं ऐकिलें व आपल्या कल्पनांचा गंज त्यावर चढूं दिला त्यांनीं फार मोठ्या चुका केल्या. पुष्कळदां असें होतें कीं मूळ प्रवक्त्याच्या सहवासांत वागणाऱ्या माणसांना सुद्धां त्याचें सर्व ज्ञान जसेंच्या तसें कळलेलें नसतें; त्याचें जें त्रोटक बोलणें असेल, संभाषण असेल किंवा भावनेच्या आवेशांत तो जे कांहीं अगदीं खरडून बोलला असेल तेंच त्याचें तत्त्वज्ञान असें ते समजतात व स्वतःचा अत्युत्साह या बोलण्याच्या भरीस घालून ते हें मानीव तत्त्वज्ञान मुख्य प्रवक्त्याचेंच म्हणून फैलावून देतात. वरील बाबींसंबंधानें स्टॅलीनचें म्हणणें लक्षांत घेतां बोल्शेव्हिक मताच्या बाबतींत असेंच झालेलें आहे. असो. तर आतां रशियांत विषमता' वैषम्य व मत्ता यांची काय हकीकत आहे व त्यासंबंधानें स्टॅलीनचें काय म्हणणें आहे हें पुढील परिच्छेदावरून ध्यानांत येईल.

अशी जर कोणाची कल्पना असेल कीं, रशिया येवढा समत्वाचा भोक्ता तर तेथील आगगाड्यांत फर्स्ट क्लास, सेकंड क्लास, थर्ड क्लास असे प्रकार नसतील. तरही त्यांची समजूत चुकीची आहे. इंटर नॅशनल कार म्हणून जी असते त्यांत सर्व तऱ्हेच्या सुखसोयी असतात. बसावयास व निजावयास मोठमोठालीं कोचें, पलंग, सामानसुमान ठेवावयास प्रशस्त जागा, कपडे अडकवून ठेवावयास खुंटाळीं, लिहावयास टेबलें, त्याच्यावर दिवे, स्नानगृहें इ. सर्व तऱ्हेचा थाटमाट तिथें असतो. याच्या खालोखाल जो वर्ग असतो त्याला "मृदु वर्ग" म्हणतात. यांतील सुखसोयी मध्यम प्रतीच्या असतात. याच्या खालीं "भरड वर्ग" येतो. आपणा सर्वांच्या ओळखीचा जो तो हाच वर्ग. आपल्या इकडल्या तिसऱ्या वर्गांत जशी कोठें कोठें शिडी केलेली असते तशीच तेथेंही असते. आपल्याच घरचें चिरगूट पांघरूण आणावें, तेंच पांघरून बसावें, आपलीच पथारी

सोडावी, फार झालें तर अंगांतला कबजा काढून ठेवून पैरणीसकटच बांकावर लवंडावें हा जो आपला प्रकार तोच तेथें गरीब लोक करितात. अर्थात् असे तीन वर्ग असल्यामुळें तीन प्रकारचे लोक तेथें आहेत हें स्पष्टच होतें. इतरांस स्पष्ट होईल यांत कांहींच आश्चर्य नाहीं पण खुद्द रशियांतील जनतेस सुद्धां हें कळून चुकलें आहे कीं, समता समता म्हणतात, पण आपल्या येथें ही इतकी विषमता आहे व यामुळें त्यांना श्रीमंतांबद्दल वैषम्य वाटतें. रशियांतील ग्रंथकर्ते व वर्तमानपत्रकर्ते हे तर इतका पैका मिळवितात व भोग भोगतात कीं, मोठाल्या श्रीमंतांनासुद्धां त्यांचा हेवा वाटावा. मग त्यांच्या संबंधीं रशियन कामकऱ्यांची काय वृत्ति असेल हें सांगावयास नको. रशियांत सांधिक शेती चालू आहे हें प्रसिद्धच आहे. अशा प्रकारच्या शेतकीस जे शेतकरी येऊन मिळतात त्यांना सरकारांतून बऱ्याच सवलती मिळतात. जे येऊन मिळत नाहींत त्यांना या सवलती मिळत नाहींत व म्हणून त्यांची मोठीच कुरकुर चालू असते. आतां हा संघ शेतकरी संघांत न येणाऱ्यांपेक्षां स्वतःला धन्य मानतो हें खरें, पण त्याची नजर ज्या वेळीं कामकऱ्याकडे जाते त्या वेळीं त्याला फार वाईट वाटतें. कारण रशियन सरकाराचा कामकरी हा विशेष लाडका असतो. बरें, सगळे कामकरी सारखे आहेत असें म्हणावें तर तसेंही नाहीं. उदार निक् या नांवानें संबोधले जाणारे जे विशेष पटाईत कामगार असतात त्यांच्या पोळीवर थोडें जास्त तूप घालतात. यामुळें साध्या साध्या कामगारांना वैषम्याची बाधा होतेच होते. पण हा उदार निक् सुद्धां आपल्या ठिकाणीं थोडा सर्दच असतो. कारण रशियांतील जे हातकसबी लोक किंवा तज्ञ लोक ते या उदार निक् पेक्षांसुद्धां अधिक उपयोगाचे असतात व म्हणून त्यांची संभावना सरकाराकडून अधिक चांगली होते. तथापि या तज्ज्ञाला सुद्धां बसल्या ठिकाणीं कसेंसेंच वाटत असतें. कारण वरचा खुद्द इंजिनियरसाहेब मोठाच मासिक गल्ला मिळवतो. बरें हा इंजिनीयर तरी सुखी आहे काय ? मुळींच नाहीं. कारण रशियांतील उद्योगधंदे चालू ठेवण्यासाठीं जे मोठमोठाले परदेशी तज्ञ आणिलेले आहेत ते ओझ्यावारी पगार घेतात हें त्याला दिसत असतें. तसेंच जे कोणी विज्ञानविशारद असतात तेही अशी भलतीच कमाई करीत असतात. बरें, हे विज्ञानविशारद तरी संतुष्ट आहेत काय ? तसेंही म्हणवत नाहीं. कारण नवीन शोध लावणारे, कॅबिनेटचे मेंबर्स व कित्येक लेखक लोक हे राजासारखे ऐषाराम भोगत आहेत व आपल्याला ते मिळत नाहींत हें त्यांना प्रत्यहीं दिसत असतें. हें सारें विषमतेचें वर्णन आहे. अर्थात् वरच्या माणसाबद्दल खालच्याला जें वैषम्य वाटावयाचें तें येथेंही सर्वांस वाटतें. आणि मनुष्यामनुष्यांत जो सृष्टीनेंच फरक ठेविला आहे तो त्याच्या त्याच्या कामांत प्रतिबिंबित होत असल्यामुळें त्याचें त्याचें वेतनही निराळें असतें.

ही स्थिति पाहिल्यावर परदेशच्या लोकांना फार आश्चर्य वाटूं लागतें व आपण जो समतावाद रशियांत अवतरला आहे असें ऐकत होतों तो येथें मुळींच नाहीं व कदाचित् प्रयोग करितां करितां येथील क्रांतिकारकांना मनुष्य स्वभावाचें नवें नवें ज्ञान झालें असेल व त्यास अनुसरून त्यांनीं आपली पहिलीं मतें पालटलीं असतील असें त्यांस वाटतें. या त्यांच्या वाटण्यांतही कांहीं थोडा सत्याचा अंश आहे. कारण माहीतगारांच्या मतें, सर्रास रशियन जनतेंत हें वैषम्य हळूहळू धुमसत असलेलें दिसतें. ज्या वेळीं क्रांति सुरू झाली त्यावेळीं "समता" "उच्चनीच भावाची हकालपट्टी" अशासारख्या संकेत शब्दांची खैरात सर्व रशियांत चाललेली होती. अर्थात् हे संकेत शब्द ज्या वेळेस हवेंतून सर्वत्र उडत जातात त्या वेळेस त्यांचें तत्वज्ञानाचें शेपूट त्यांच्या बरोबर उडत जात नाहीं; नुसते संकेत शब्दच जातात. आणि त्यांच्या तोंड ओळखीनें लोकांना जो कांहीं अर्थ कळतो तो ते घेतात. रशियांतील सामान्य जनतेस समता याचा अर्थ "समता" असाच कळला होता. "एवंगुण विशिष्ट समता" असा कळलेला नव्हता. अर्थात् आपली फसगत

झाली असें हजारों लोकांना वाटत आहे. सामान्य जनतेंतील हजारोंना असें वाटत आहे यांत कांहींच नवल नाहीं. खुद्द बोल्शेव्हिक लोकांची जी शासन-दंड धारण केलेली पार्टी आहे तिच्यांतही कित्येक सभासदांना असेंच वाटत आहे हें विशेष होय! वास्तविक पाहातां ज्यांनीं कांहीं नवें करून दाखविलें व तें संभाळून धरण्याची प्रतिज्ञा भोगिली त्यांच्या कल्पना तरी सारख्या असावयास हव्या. पण तसें येथें नाहीं आणि म्हणून स्टॅलिनचें चुकत आहे अशी त्यांची सारखी चुळबुळ चाललेली असते. या विषमतेच्या बाबीसारख्याच आणखी एक दोन गोष्टी उल्लेखनीय आहेत. क्रांतीच्या सुरुवातीस, "आपण सर्व कामकरी लोक जगांतील इतर कामकऱ्यांचे मित्र आहोंत व ते आपले मित्र असावे, देश देश म्हणून जें म्हणतात तें उगाच कांहीं तरी आहे; देशाभिमान हें एक भांडवलवाल्या लोकांनीं उभें केलेलें थोतांड आहे, वास्तविक पृथ्वीवरील सर्व मनुष्यजात ही बंधुत्वाच्या नात्यानें एकच आहे" अशा सारखी घोषणा सुरू होती. अर्थात् हीच वृत्ति रशियांत सार्वत्रिक झाली असेल अशा भावनेनें जे तेथें जातात किंवा त्यांचें वाङमय वाचतात त्यांना मधून मधून कांहीं निराळेंच दिसतें. "आमचा हा रशिया देश," "आमची ही सामुदायिक सत्तावादी लोकांची मातृभूमि" अशासारखे शब्दप्रयोग त्यांना पुष्कळ ठिकाणीं आढळतात. तसेंच पृथ्वीवरील इतर सर्व देशांना "भांडवलवाले" "भांडवलवाले" अशा हेटाळणीच्या शब्दांनीं सरसकट संबोधण्याच्या ऐवजीं रशियन सरकार आतां त्यांच्याशीं मैत्री संपादूं पाहात आहे, "रशियाचीं हिताहितें" कांहीं स्वतंत्र असल्याचें बोलत आहे, जे धादान्त साम्राज्यवादी आहेत त्यांच्याशीं गुप्त खलबतें करीत आहे असें दिसूं लागलें आहे. व त्यावरून लोकांना असें वाटूं लागलें आहे कीं रशियन मताचा तो पूर्वीचा भगभगीत तिखटपणा खचित सौम्य झाला असावा. आणखी एक बाब म्हणजे रशियांतील शाळांची स्थिति ही होय. स्वातंत्र्य, स्वातंत्र्य म्हणतात तें इतकें बोकाळलें कीं वर्गांतील मुलें मास्तरच्या डोक्यांवर बसूं लागलीं कारण जुन्या शिक्षणाच्या पद्धती भांडवलशाहींतून निघालेल्या व म्हणून त्या सर्वथा टाकाऊ ठरलेल्या होत्या. दरम्यान नव्या पद्धती बनावयाच्याच होत्या. यामुळें शाळा म्हणजे पोरामास्तरांचे गोंधळखाने होऊन बसले. नित्य नवीन प्रयोग सुरू होते व पोरें खर्ची पडून पंतोजी नव्या कल्पना शिकत होते. मार्क आणि परीक्षा या कल्पना बुरुजवाई म्हणून त्यांनीं टाकून दिल्या. पण हळूंहळूं हें सारें गाडें सध्यां बदललेलें दिसत आहे. मार्क परत आले; परीक्षा परत आल्या; सगळ्या घोळक्याला एकदम शिकवणही लागूं पडत नाहीं असें ध्यानांत आलें आहे. हे फरक पाहिले व रशियांतील दंडधारी पार्टीच्या कित्येक सभासदांच्या आपल्या तत्त्वज्ञानाविषयीं काय कल्पना आहेत व सामान्य जनतेंत कोणची धुसफस आहे हें पाहिलें म्हणजे रशियांत सामुदायिक मताची कांहीं डळमळ चालू आहे कीं काय असें तिऱ्हाइतास वाटणें अगदीं स्वाभाविक आहे.

भरांत भर म्हणून रशियांतील "कॉम्यून्स" बनविणारांची मनस्थितीही लक्षांत घेतली पाहिजे. जेव्हां क्रान्तीला सुरुवात झाली तेव्हां दर खेडेगावीं बोल्शेव्हिक मतांच्या आग्रही प्रतिपादकांनीं असाच दंडक घालण्याची खटपट चालू केली कीं प्रत्येक गांवीं सगळ्यांचा एक संघ असावा. प्रत्येकानें आपलें दिवसाचें किंवा महिन्याचें वेतन एका मुख्य ठिकाणीं आणावें, सर्वांचा पैसा एकच करावा व महिन्याच्या शेवटीं तो सर्वांनीं सारखा वाटून घ्यावा, मग कोणाच्या कामाची जात कोणतीही असो व कोणाची किफायत कितीही असो. ही जी एकदां "कॉम्यून्स" बनवावें अशा विचाराची प्रथा पडली ती अजून सुद्धां मूळ धरून राहिली आहे. या विचाराचे प्रतिपादक हे अर्थात् बोल्शेव्हिकच आहेत व त्यांचा आग्रह असा आहे कीं आमचें मत हेंच खरें बोल्शेव्हिक मत. स्टॅलिन वगैरे जे सध्यां बोलत आहेत तें मूळचें शुद्ध बोल्शेव्हिक मत नाहीं. या त्यांच्या आग्रहामुळें दंडधारी शासकांना मधून

मधून फारच जिकीर होते. बोल्शेव्हिक मताचा एरवींचा सगळा भगभगीतपणा इतरांसारखाच यांच्याही ठिकाणीं आहे. यामुळें त्यांना दुसरें कसलेंच नांव ठेवण्याजोगें नसतें. पण "हे मूर्ख, अडाणी आणी डोक्याचे मठ्ठ आहेत." येवढेंच नांव सत्ताधारी बोल्शेव्हिक त्यांना देतात व केव्हां ना केव्हां तरी त्यांना खरें बोल्शेव्हिक तत्त्वज्ञान कळूं लागेल अशी अपेक्षा मनांत ठेवून ते आपल्या कामास लागतात. या सर्व कारणास्तव शुद्ध बोल्शेव्हिक तत्त्वज्ञानासंबंधानें जे चमत्कारिक प्रश्न उपस्थित होतात त्यांचा निकाल लावण्यास एकच खरें साधन उपलब्ध आहे व तें म्हणजे या तत्त्वज्ञानाचे जे मुख्य प्रवर्तक त्यांचीं ग्रंथगत मतें कोणचीं तें पाहाणें हें होय.

रशियाचा सध्यांचा मुख्य शास्ता जो स्टॅलिन त्यानें थोड्या महिन्यांखालीं आपली पंचवार्षिक योजना कशी यशस्वी झाली आहे, आपल्या पुढच्या योजना कोणच्या आहेत, आपल्या मताच्या पुढारी लोकांनीं काय ध्यानांत ठेवावयास हवें, आपल्याच सांप्रदायांत वागत असूनसुद्धां कोणी कांहीं असांप्रदायिक अशा भलत्याच कल्पना उराशीं बाळगून राहिले आहेत कीं काय इत्यादि प्रश्नांविषयीं मोठें विस्तृत, प्रसादयुक्त, व चोखट असें विवेचन केलें. त्यांत वरील परिच्छेदांत सांगितलेल्या कल्पनांचा यथाशास्त्र निरास केलेला आहे. त्याचा सारांश असा.

"या लोकांना असें वाटतें कीं सोशॅलिझम म्हणजे समता प्रस्थापित करणें होय. त्यांस वाटतें कीं समाजांतील सर्व माणसांच्या ज्या वैयक्तिक गरजा असतील व प्रत्येकाचें जें खाजगी जिणें तें सर्व येथून तेथून एकाच पाणसळींत आलें पाहिजे. ही कल्पना मार्क्स व लेनिन यांनीं प्रतिपादिलेल्या सोशालिझमच्या कक्षेंत अगदीं येत नाहींत. मार्क्स यानें 'समता' 'समता' म्हणून जी म्हटली आहे ती म्हणजे माणसांच्या वैयक्तिक गरजा सरसकट सारख्या करणें किंवा सर्वांच्या जीविताची तबा एकाच पाणसळींत आणून ठेवणें ही नव्हे. तिचा अर्थ असा आहे कीं समाजांतील प्रतवारी नष्ट करणें; भांडवलवाले उलथून पाडले व त्यांची मालमत्ता सरकारच्या हातीं आली म्हणजे नफेबाजांच्या हातून सर्व कष्ट करणाऱ्या लोकांची सारखीच सुटका करणें, धनोत्पादनाचीं जीं साधनें असतील तीं सर्व समाजाच्या मालकीचीं झाल्यावर त्या साधनांवर कोणाचा कसलाही खाजगी हक्क उरूं न देणें म्हणजेच सर्वांचा असला हक्क सारखाच बुडविणें, आपापल्या वकुबाप्रमाणें प्रत्येकानें कांहीं तरी काम करणें हें तत्त्व प्रत्येकाला सारखेंच लागूं करणें व जे कोणी कष्ट करतील त्या सर्वांना आपापल्या कामाच्या प्रतीच्या मानानें वेतन मिळविण्याचा सर्वांना सारखा हक्क असणें (सोशालिस्ट समाज), व आपापल्या मगदुरा प्रमाणें सर्वांनीं काम केलें पाहिजे हें सर्वांचें कर्तव्य समजणें व त्याच्या गरजे प्रमाणें, (कामाच्या प्रतीप्रमाणें नव्हे) त्या त्या कष्ट करणाराला वेतन मिळण्याचा सर्वांस सारखा असा हक्क असणें (कॉम्यूनिस्ट समाज) हा मार्क्सच्या समतेचा अर्थ आहे. मार्क्स असेंही म्हणतो कीं, सर्व लोकांच्या रुची म्हणजें आवडीनावडी व सर्वांच्या गरजा ह्या गुणतः किंवा परिमाणतः सारख्या असणें शक्य नाहीं. मग तो समाज सोशॅलिस्ट तत्त्वकक्षेंत अजून असो किंवा कम्यूनिझमच्या तत्त्वांगणांत प्रविष्ट झालेला असो. मार्क्सचें हें असें खडखडीत मत आहे. व तें त्यानें स्पष्ट शब्दांत सांगितलें आहे. पण यांतूनच सर्वांच्या गरजा एकाच पातळींत आणणें, सर्वांचें जिणें सारख्याच तोलाचें करणें, सर्वांच्या आवडीनिवडी सारख्याच बनविणें, सर्वांनीं एकाच तऱ्हेचे व तितकेच कपडे घालणें व सर्वांनीं एकाच तऱ्हेची व एकाच वजनाची भाकर खाणें म्हणजे समता असा अर्थ जे काढतात ते केवळ अशास्त्रीय असें भाबडें बोलणें बोलतात आणि मार्क्सच्या तत्त्वज्ञानाची विटंबना करितात. हें सर्वांस कळावयास हवें कीं—अजूनही कळालें नसावें ना!—मार्क्सचें तत्त्वज्ञान सर्वांना एका दावणींत बांधण्याच्या विरुद्ध आहे. कॉम्युनिस्ट पंथाचा जो आद्यप्रबंध त्यांतही मार्क्स व एंजल्स यांनीं सोशॅलिझमच्या वरच्या सारख्या केवळ कविकल्पनांचा चांगलाच

समाचार घेतला आहे. आणि या कल्पना म्हणजे समाजाला पश्चागतिक करणाऱ्या आहेत असें स्वच्छ म्हटलें आहे. कारण या पतकरिल्या तर समाजांत सार्वत्रिक संन्यासवृत्ति आणली पाहिजे व समाज मूळच्या दिगंबर वृत्तीकडे हांकीत नेला पाहिजे (कारण हीच वृत्ति म्हणजे बरी असें एक-जण जरी म्हणाला तरी सरसकट समता प्रस्थापित करावयाची म्हणजे सर्वांनीं त्याच्या दर्जास जाऊन बसावयास हवें)"

"या बाबतींत लेनिननेंही हाच अभिप्राय व्यक्त केला आहे. समाजांतील प्रती नष्ट करण्याच्या पलीकडे आमच्या समता-प्रस्थापनाच्या कल्पनेची धाव आहे असें जे कोणी म्हणतात ते मठ्ठ डोक्याचे व पूर्वग्रहदूषित आहेत असेंच म्हटलें पाहिजे. आम्ही सर्व माणसांना एकाच पाणसळींत आणून बसविणार आहोंत अशी कंडी पिकवली म्हणजें आम्ही आपोआपच मूर्ख ठरूं. अशा हेतूनें हा समतेचा मुद्दा भांडवलशाहींतील प्रोफेसरांनीं मुद्दामच उठविला आहे. वास्तविक पाहतां आमच्या पदरांत जें मूर्खपण हे बांधू पाहातात तें त्यांनीं स्वतःच उपस्थित केलेलें आहे, तें आमच्या तत्त्वज्ञानांत नाहीं. आधुनिक शास्त्रीय पद्धतीचा जो सोशालिझम् आहे व ज्याचे प्रणेते मार्क्स व एन्जल्स् हे आहेत त्यांत काय सांगितलें आहे हें या अडाण्यांना माहीत नाहीं. मार्क्स व एन्जल्स हे स्पष्ट म्हणाले आहेत कीं समाजांतील प्रती किंवा वर्ग नष्ट करणें येवढीच जर समता शब्दाच्या अर्थाची व्याप्ति असेल तरच ती आम्हांस हवी. नाहीं तर त्या शब्दाला कसलाही अर्थ नाहीं."

"आमच्याच पक्षांत वागणाऱ्या कित्येक लोकांच्या डोक्यांत हें भाबडें समतेचें स्वरूप अजूनही कायम आहे. यांनींच मागें चमत्कारिक तऱ्हेचे कॉम्यून्स स्थापन केले आणि ज्या कारखान्यांत कसबी आणि गैरकसबी असे कामगार होते तेथेंही या आपल्या समतेचा अम्मल करावयाचें ठरविलें व सर्वांचे पैसे एकत्र करून त्यांनीं ते सर्वांस सारखे करून दिले. पण या त्यांच्या विचित्र कल्पनेमुळें आमच्या उद्योगधंद्यांचें आरंभीं कसें नुकसान झालें हें सर्वांस माहीतच आहे. खरोखर, हीं असलीं मतें जर कां आपल्या पंथांत प्रबळ झालीं तर आपल्या पंथाचें "मार्क्सचा पंथ" हें नांव काढून टाकावें लागेल आणि सांघिक शेतकीची कल्पना अगदीं विसकटून जाईल."

स्टॅलिन याच्या भाषणांतून वर जे उतारे दिले आहेत त्यांवरून दिसून येईल कीं बोल्शेव्हिक लोकांच्या तत्त्वज्ञानाविषयीं फारच विपरित कल्पना सर्वभर पसरल्या आहेत. असल्या चमत्कारिक कल्पना प्रस्थापित केल्यामुळें आपण होईल तितकें काम करीत राहावें ही काम करणाराची बुद्धी नष्ट होईल व लोक चुकारपणा करूं लागतील असेंच त्यांचें मत आहे. इतकेंच काय पण खाजगी मत्ता कोणापाशीं असली तरीही त्याचा त्यांस विरोध नाहीं. त्यांचें म्हणणें इतकेंच आहे कीं या मत्तेच्या बळावर कोणी ऐदी राहातां उपयोगी नाहीं, व दुसऱ्याला काम करावयास लावून त्याच्या श्रमावर नफा उपटतां कामा नये.

यावरून दिसून येईल कीं, रशियांतील मुख्य तत्त्वज्ञानविचारांत कसलीही डळमळ नाहीं. या तत्त्वज्ञानाच्या विरुद्ध आपलें मत असेल तर स्वमतसमर्थन व परमतखंडन या पद्धतीनें आपलें मत सांगावें पण परमताचें रूप विकृत मात्र होऊं देतां कामा नये.

---

## ३ "रशियांतील हिटलरशाही"

थोड्या महिन्यांपूर्वीं जर्मनींत एक मोठा आणीबाणीचा प्रसंग प्राप्त झाला. हिटलरनें एक मोठीच राज्यक्रांति घडवून आणली आणि एका नवीन विचाराच्या पंथाची स्थापना करून त्यानें बहुमताच्या जोरावर जर्मनीचें धुरीणत्व आपल्या हातीं घेतलें व सर्व युरोपखंडांत जर्मनीला जी अवमानाची स्थिति व्हर्साइलच्या शरणागतीनें प्राप्त झाली होती तिच्यांतून स्वदेशाला मुक्त करण्याच्या उद्योगास तो लागला. पण हें काम सुरूं होत आहे तोंच त्याच्या मतप्रणालींत वाढलेल्या कांहीं लोकांनीं त्याच्यावरच कुरघोडी करण्याचे यत्न आरंभिले. आंतून आंतून त्यांनीं

वरीच कारवाई केली व आणखी कांहीं दिवस गेले असते तर जर्मनींत पुन्हां बजबज माजली असती. पण हिटलरला ही बातमी लागतांच त्यानें मोठ्या जलदीनें या भावी बंडखोरांवर इतकी अचानक झडप घातली कीं त्यांचे हात-पायच अगदीं गळाल्यासारखे झाले. हाताखालच्या सरदारांवर हें बंड मोडण्याचें काम न सोंपवितां तो स्वतःच विमानांतून बंडाच्या ठिकाणीं गेला आणि जर्मनीला पुन्हां गर्तेत फेकावयास तयार झालेल्या या लोकांचे त्यानें फडाफड बळी घेतले. त्यांतले कित्येक त्याचे जवळचे मित्र होते पण त्यानें ते मानिले नाहींत. त्यांना ठार केल्यावर त्यांच्या साथीदारांच्याही त्यानें मुसक्या बांधिल्या व दोनअडीचशें लोकांना त्यानें गोळ्या घाल-विल्या. याप्रमाणें बंडाचा सुगावा लागल्यापासून दोन तीन दिवसांच्या आंत त्यानें त्यांचा नायनाट करून टाकला व आपला देश अवमानाच्या गर्तें-तून बाहेर काढणें हा जो आपला उद्योग त्याच्या मागें तो लागला. पण बंडाचा बींमोड हें जें अत्यंत भीषण कृत्य त्यानें केलें त्यामुळें, स्वदेशांचे इति-हास विसरलेले देशोदेशींचे नामधारी उदार लोक त्याला दूषणें देऊं लागले. व अशा प्रकारच्या ह्या नव्या काळांत हा शुद्ध हैवान आहे, असली सात्त्विक निषेधाची भाषा बोलूं लागले. पण या सर्वांत गम्मत ही कीं रक्ताच्या नद्यांतून पुढें जाऊन ज्या बोल्शेव्हिक लोकांनीं आपली सत्ता प्रस्थापित केली त्यांचे अभिमानी लोकसुद्धां हिटलरला 'दुष्ट राक्षस' असें म्हणूं लागले व त्यानें केव्हां किती लोक मारले याच्या याद्या प्रसिद्ध करून आपला जो त्याच्या वरचा वैचारिक आकस तो उगवूं लागले. वास्तविक पाहातां जें कोणी प्रबल लोक कांहीं करावयास किंवा स्थापावयास निघ-तात त्यांनीं आपल्या आड येणारांची अशीच दुर्दशा केलेली असते. हिटलरनें अमूक माणसें मारलीं असें जगापुढें पुन्हां पुन्हां मांडण्यांत कांहींच मतलब नाहीं. ज्या जर्मन राष्ट्रानें महायुद्धाच्या काळीं अर्ध कोट लोक रणांगणावर बळी दिले त्याला या असल्या भलत्याच दुखण्याच्या वेळीं शेंदोनशें लोक गमवावे लागले तर कांहींच वाटण्यासारखें नाहीं. पण मनांतून त्याचें तत्त्व-ज्ञान ज्यांना नापसंत किंवा त्याचें प्रचंड यश हें ज्यांच्या डोळ्यांत सलतें त्यांना मानवी प्राण्याच्या संबंधींची भलतीच उर्मी आली. अशांच्या माहिती-साठीं सुमारें याच वेळेस रशियांत काय चाललें होतें हें वाचावयास सापडलें तर तें वाचकांस निदान मनोरंजक वाटेल.

गेल्या वर्षाच्या शेवटीं शेवटीं म्हणजे डिसें-बरच्या पहिल्या तारखेस एम्. एम्. किरोव् या एका कम्युनिस्ट पुढाऱ्याचा खून झाला. हा गृहस्थ स्टॅलिनचा अगदीं जवळचा मित्र असून लेनिनग्राड शहरच्या कॉम्युनिस्ट पार्टीचा अध्यक्ष होता. याच्या आधीं जवळ जवळ सोळा वर्षें कोणाही ठळक कम्युनिस्ट पुढाऱ्याचा अशा रीतीनें खून झाला नव्हता व म्हणून आपल्या अंमलाचा बस आतां चांगला बसला आहे असें कम्युनिस्ट पुढाऱ्यांस समजून चालावयास कांहींच हरकत नव्हती. पण खून होतांच आपल्या सांप्रदायावर उठण्याची कोणी तरी जंगी तयारी करीत आहे असें सोव्हि-एट सरकारनें ठरविलें व क्रान्तीच्या प्रसंगीं ज्या तडकाफडकी न्यायाच्या पद्धती असतात त्या त्यांनीं प्रस्थापित केल्या व ताबडतोब ७१ लोकांस पकडून लष्करी अधिकाऱ्यांपुढें त्यांचे खटले चाल-विले व पांच तारखेच्या आंत त्यांतील ६६ लोकांना फांसांवरही चढविलें ! आपण प्रस्थापित केलेली वस्तू कोणी उध्वस्त करील कीं काय ही चिंता सर्वच जागरूक लोक नेहमीं बाळगितात. किरोव्चा खून तरी झाला होता. पण याच्या आधीं सुमारें एक महिना फिनलँडच्या हद्दीवरील कित्येक हजार लोकांना "तुम्ही आमच्या अंमलावर सदा नाखूष असतां" या सबबीवर सायबेरियांत हद्दपार केलें होतें. त्या या आधींच्या महिन्यांत एका परगण्यातील सहा लोकांना असल्याच कांहीं तरी कुरापतीवरून फांशीं दिलें होतें. नोव्हेंबर महिन्यांत तर ही फांसावर जाणारांची संख्या २२ वर येऊन ठेपली होती. याच्या पुढें डिसें-बरांत किरोवचा खून झाला तो होतांच आतां बंड खासच होणार अशा समजुतीनें वरील ६६

जणांना फांसावर धाडण्यांत आलें. डिसेंबर ७ ला आणखी १२ जणांना पकडिलें व त्यांतील ९ लोकांना शिक्षा दिली. डिसेंबर दहा तारखेस आणखी ३७ लोकांना पकडण्यांत आलें आणि तेथून एक आठवड्याच्या आंत त्यांच्यापैकीं २८ जणांना गोळ्या घालून ठार करण्यांत आलें. म्हणजे किरोव्च्या एका खुनामुळें तीन आठवड्यांच्या आंत १०३ लोकांना प्राणास मुकावें लागलें. किरोव्चा खून करणारा असामी जो निकोलीव त्यानें आपण एक मोठा कट करीत होतो व स्टॅलिनचा खून करण्याच्या इराद्यानें जमवाजमव चालली होती असा कबुली जबाब दिल्याचें लवकरच जाहीर झालें. अर्थात् कम्युनिस्ट पंथांतच ट्राट्स्की याचा जो एक पंथ आहे त्याचा हा हस्तक असावा व स्टॅलिनला मारून ट्राट्स्कीनें रशियाचें पुढारीपण बळकवावें अशी ही सर्व योजना होती, असा या खुनाचा अर्थ ठरला. आणि म्हणून डिसेंबर महिना संपण्याचे आंत निकोलीव् व त्याचे साथीदार म्हणून आणखी १३ जण अशा १४ जणांना तावडतोब फांशीं देण्यांत आलें. म्हणजे किरोव्च्या खुनानंतर एकंदर ११७ लोक प्राणास मुकले !

हें काय आहे याचा जर विचार केला तर इतकेंच ध्यानांत येतें कीं कम्युनिस्ट पंथापैकीं रशियाचा सध्यांचा अधिकारी जो स्टॅलिन त्याची जी मतश्रेणी आहे तीच कायम राहावी यासाठीं आपल्याच सांप्रदायांतील पण एका उपपंथाच्या लोकांना गोळ्या घालून ठार मारावयास तेथील सरकारनें मागें पुढें पाहिलें नाहीं. हीच शिक्षांची परंपरा रशियांत सतत चालू आहे. जानेवारी महिन्यांत याच पंथांतील मोठमोठ्या अधिकाऱ्यांना प्राणांस मुकावें लागलें. ग्रेगरी झिनोवीव् कीं जो एकदां थर्ड इंटरनॅशनलचा अध्यक्ष होता, लेव कामेनेव्, कीं जो सोव्हिएट संघाचा पूर्वी दुय्यम प्रधान होता व त्यांचे आणखी १७ मित्र यांच्यावर अशीच घोरपड आली. "तुम्ही प्रतिक्रांतिकारक आहांत" असे आरोप त्यांच्यावर ठेवून झिनोवीव् याला दहा वर्षें, कामेनेव् याला पांच वर्षें व बाकीच्या लोकांना अशाच मोठमोठाल्या शिक्षा ठोठावण्यांत आल्या. याच सुमारास याच पंथाच्या पोटांतील ७८ लोक हद्दपार करण्यांत आले. पण हें झडतीचें प्रकरण येथेंच थांबलें नाहीं. जे कोणी खरोखरच आपले आहेत असें वाटत होतें पण जे खरोखर तसे नाहींत असा वहीम आला त्यांची तर याप्रमाणें दाणादाण उडविलीच पण जे कोणी आपले कांहींसे मिळमिळीत अनुयायी आहेत असें सरकारला वाटलें त्यांच्यावरही धाड येऊन पडली व विशेषत: ट्राटस्कीशीं ज्यांचा विशेष ऋणानुबंध पूर्वीं होता किंवा आतां आहे असा सूक्ष्म वहीम आला त्यांचीही अशीच वाट लाविली. याच पद्धतीनें पुढें जाऊन उझबेकिस्तान् या परगण्यांतील आपल्या पक्षाच्या ४५००० सभासदांपैकीं १३००० ना पार्टीच्या कक्षेंतून हांकून दिलें आणि युक्रेन् प्रांतांत तर सरकारी युनिव्हर्सिटींतील ७ प्रोफेसर्स व १ व्हाइस चॅन्सेलर इतक्यांना बडतर्फ केलें. आणि याचें कारण तरी इतकेंच कीं यांनीं आपल्या विद्यार्थ्यांच्यापुढें रशियाचीं जीं अगदीं तंतोतंत मतें आहेत त्यांच्याहून कांहीं थोडीं निराळीं मतें मांडलीं असा अधिकाऱ्यांना वहीम आला !

वरील हकीगतीवरून दिसून येईल कीं, रशियांत सुद्धां प्रतिपक्षांस अथवा आपल्याच पक्षांतील शुद्ध मताचे द्रोही असतील त्यांना ठार मारण्याची रशियन पद्धति सरकारनें सारखी चालू ठेविली आहे. आस्ट्रियांत हेंच चालू आहे; मुसोलिनीची या बाबतींतील दांडगाई सर्व जगाला माहीत आहे. आतां हे जे निरनिराळे सत्ताधारी लोक आहेत यांना सैतान, हैवान, राक्षस, खाटीक असलीं नांवें देणें अगदीं गैर आहे. मागें राजसत्ता नष्ट होऊन प्रजासत्ताक राज्यें प्रस्थापित होण्याचें युग सुरू झालें तेव्हांही सर्व युरोपखंडभर अशीच मारामारी चालू होती. आतां 'डिमॉक्रसी' वरील विश्वास उडाला आहे; व 'कम्यूनिझम्' नांवाचें जें एक नवें तत्त्वज्ञान नुकतेंच निघालें आहे त्याच्यावरही कित्येक राष्ट्रांची श्रद्धा बसत नाहीं. यामुळें नवें काय करावें याची विवंचना सर्वत्र चालू

असून आपापल्या देशाची सर्व परिस्थिति लक्षांत घेतां आपलें, "प्रस्तुत" कोणचें याचा विचार प्रत्येक देशांतील विचारी व सामर्थ्यवान् माणसें करीत आहेत व त्या प्रस्तुतास उपयोगी अशी जी कोणची राज्यघटना त्यांना योग्य वाटते ती अंमलांत आणण्याचा ते शिकस्तीचा प्रयत्न करीत आहेत. हे प्रयत्न करीत असतां व ते यशस्वी होत आहेत असें दिसत असतांनासुद्धां जर कोणी आड येत आहेत असें त्यांस आढळलें तर त्यांच्यावर छापा घालून त्यांना नष्ट करण्याचें अप्रिय कामही ते करीत आहेत. त्या त्या सामर्थ्यवान् लोकचींत वज्ञानें व त्यांनीं आपल्या देशाचें ठरविलेलें प्रस्तुत याविषयीं कोणास कांहीं प्रतिकूल बोलतां येण्यासा खें असेल; पण तेवढ्यानें ते लोक दैत्य, राक्षस, हैवान या नांवांना योग्य ठरतात असें वा त नाहीं.

## ४ स्टॅलिनचा विजयघोष

रशियाचा सध्यांचा शास्ता स्टॅलिन यानें सतराव्या कॉंग्रेसच्या वेळीं केलेल्या भाषणांत आपल्या पक्षानें विजय मिळवून शत्रुपक्षाची जी दाणादाण केली तिचें मोठें रसभरित वर्णन केलें. तो म्हणाला, "लेनिनच्या तत्त्वज्ञानाचा पूर्ण विजय झाला असून त्या विजयसूचक ध्वजेखालींच आपण जमलों आहों; पण दुसरीहि एक ध्वजा आपल्या डोक्यावर फडफडत आहे ती म्हणजे लेनिनच्या विरुद्ध असलेल्या सर्व उरल्या सुरल्या पक्षांच्या अपयशाची होय. लेनिनचा प्रतिस्पर्धी जो ट्रॉटस्की पक्ष त्याचा पराभव झाला आहे इतकेंच नव्हे तर त्याची केवळ दाणादाण उडाली आहे हा पक्ष उभा करणारे लोक भांडवलवाल्या पक्षाच्या परड्यांत कोठें कोठें लपून छपून वागत आहेत. लेनिनच्या तत्त्वज्ञानापासून चळलेली टोळीहि अशीच उध्वस्त झाली आहे. ती उभी करणारांनीं आपलीं नवीं मतें केव्हांच झाडून टाकलीं आहेत आणि या लेनिनच्या पंथाविरुद्ध आपण ज्या आगळिकी केल्या त्यांच्या क्षालनासाठीं त्यांचा जीव आतां वर खालीं होत आहे. लेनिनच्या तत्त्वज्ञानापासून चळून जे राष्ट्रप्रेमाकडे झुकले होते त्यांचीहि अशीच दाणादाण झाली आहे. त्यांतील लोकांनीं पुष्कळ दिवसांपूर्वीच इंटरनॅशनिस्टन् एकिम्री लोकांत दडी दिली आहे किंवा तें न झाल्यास भोगलेल्या प्रतिज्ञा परत घेतल्या आहेत. क्रांतीच्या विरुद्ध असलेलीं जीं अनेक टोळकीं होतीं त्यांतील बहुतेक लोकांना आतां नाक मुठींत धरून कबूल करवें लागलें आहे कीं आमच्या या पक्षानें जें धोरण आखलें तेंच बरोबर होतें; हे लोक आतां आपल्या पक्षाला केवळ शरण आले आहेत. आपल्या पक्षाच्या पंधराव्या कॉंग्रेसमध्यें सुद्धां अजून हेंच सिद्ध करावें लागत होतें कीं, आपलें धोरण बरोबर आहे आणि लेनिनच्या विरुद्ध असलेल्या टोळक्यांशीं सारखा झगडा ठेवावयास हवा; सोळाव्या कॉंग्रेसच्या वेळीं प्रगति झाली व येवढेंच काम करावें लागलें कीं, या टोळक्यांचे जें उरले सुरले अभिमानी होते त्यांचा नायनाट करावयाचा; आतां या सतराव्या कॉंग्रेसच्या वेळीं सिद्ध करावयाचें असें कांहींच उरलें नाहीं. व ज्यास गाडून टाकावयास हवें आहे असाही कोणी प्रतिस्पर्धी उरला नाहीं. आतां प्रत्येकाच्या हें ध्यानांत येऊन चुकलें आहे कीं आमच्या पक्षानें आंखलेलें धोरण शेर ठरलें आहे. अवघा देश उद्योगधंद्यांत गुंतवावा हें आमचें धोरण यशस्वी ठरलें आहे; या धोरणाची फलश्रुति सर्वांना स्पष्ट दिसत आहे. जें धडधडीत डोळ्यांना दिसत आहे त्याच्या उलट कोणाला काय वल्गना करतां येणार? पूर्वीची शेतीची 'कुलक' पद्धति आम्ही साफ बुडविली आहे. आणि आमची सांघिक शेतकी जिकडे तिकडे मान्य झाली आहे. या धोरणाची फलश्रुति सर्वांना स्पष्ट दिसत आहे. जें धडधडीत डोळ्यांना दिसत आहे त्याच्या उलट कोणाला काय वल्गना करतां येणार? आमच्या देशाच्या अनुभवावरून हें दिसून येत आहे कीं, एकट्या सुट्या देशामध्यें सोशॅलिस्ट पद्धतीची शासन संस्था निर्माण करणें हें अगदीं शक्य आहे. ती आम्ही येथें धडधडीत उत्पन्न केली असतां

नुसतें वायफळ बोलणें आतां काय उपयोगाचें? आम्हाला हें मिळालेलें यश आणि मुख्यतः आमच्या पंचवार्षिक योजनेचें आमच्या पदरीं पडलेलें फळ यामुळें लेनिन पंथाच्या विरुद्ध असलेलीं सर्वच्या सर्व टोळकीं आपल्या ठिकाणीं अगदीं सर्द होऊन गेलीं आहेत व त्यांचे राई राई येवढे तुकडे होऊन गेले आहेत. आतां आमच्या प्रतिस्पर्ध्यांनीं हेंही गळीं उतरवून घेतलेंच पाहिजे कीं, आमचा पक्ष जसा आजवर सुसंघटित असा झाला आहे व तसाच तो आजही आहे."

---

## ५ हिटलरची उसळी व आत्मसमर्थन

गेल्या मे महिन्याच्या २१ व्या तारखेस जर्मन राष्ट्राचा कुलमुखत्यार ॲडॉल्फ हिटलर यानें जर्मनीनें पुन्हां शस्त्रधारण कां केलें या विषयावर मोठें वक्तृत्वपूर्ण भाषण केलें. त्यांतील कांहीं महत्त्वाचा भाग पुढें दिला आहे.

"उपस्थित झालेल्या ज्या प्रश्नावर आमचें भवितव्य अवलंबून आहे त्यासंबंधानें अगदीं उघड उघडपणें आणि कसलाही किंतू मनांत न बाळगतां बोलणें हें मी माझें कर्तव्य समजतों. मी हें बोलावें अशी मागणी मला करण्याचा जर्मन राष्ट्राचा हक्कच आहे व ही राष्ट्राची मागणी पुरी करण्याचा मी निश्चय केला आहे."

"ॲंग्लो सॅक्सन देशांतील लोक फार हळहळत आहेत कीं, त्यांना अत्यंत पवित्र वाटणारीं लोकसत्ताक राज्य पद्धतीचीं जीं तत्त्वें तीं जर्मन राष्ट्रानें टाकून दिलीं! पण हें त्यांचें हळहळणें वृथा आहे. जर्मन देशांतही लोकसत्ताक पद्धतीचीच राज्यघटना आहे. सध्यांचें नॅशनल सोशॅलिस्ट स्टेटचें जर्मन सरकार आहे तेंसुद्धां लोकांनींच अस्तित्वांत आणिलें आहे आणि त्या सरकारलांही लोकांच्या संबंधांतील आपल्या उत्तरदायित्वाची पुरेपूर जाणीव आहे. कांहीं देश असे आहेत कीं जेथें प्रत्येक लोकप्रतिनिधीला वीस हजार मतें मिळणें जरूर आहे असें मानतात. दुसऱ्या कांहीं देशांत प्रत्येकाला दहा ते पांच हजार मतें मिळालीं म्हणजे चालतें; इतर कोठें कोठें साठ हजार किंवा जास्त मतें जरूर असतात; आमच्या जर्मन लोकांनीं मात्र आपलीं ३ कोटी ८० लक्ष मतें एकाच माणसाला देऊन त्याला आपला प्रतिनिधि मानिलें आहे! जर्मन देश व इतर देश यांच्यांत जे अनेक मुख्य मुख्य फरक आहेत त्यांतील हा एक होय. पण याचा अर्थ असा आहे कीं, एकाद्या पार्लमेंटला आपल्या जबाबदारीची जितकी जाणीव असते तितकीच जर्मन लोकांच्या बाबतींत मला स्वतःलाहि आहे. जर्मन राष्ट्रानें मजवर जो विश्वास टाकला आहे त्याच्या बळावर व त्या राष्ट्राच्या तर्फे माझें सर्व करणें आहे."

"जर्मनीला शांततेची आवश्यकताच आहे आणि म्हणून आम्हांला ती हवी आहे. एक इंग्रज मुत्सद्दी नुकताच म्हणाला कीं, "अशा प्रकारच्या खातरजमांना कसलाहि अर्थ नाहीं; आपण खरोखरीच प्रामाणिक आहों असें सिद्ध करावयाचें असेल तर सामुदायिक तहनाम्यावर प्रत्यक्ष सही करणें हेंच जरूर आहे." मि. एडन यांना मला इतकेंच सांगावयाचें आहे कीं, ती तरी एक खातरजमेचीच तऱ्हा आहे! पुष्कळदां असें होतें कीं, शेलक्या प्रसंगीं आपल्या मनांत जरूर तो फरक बेलाशक करावयास आपल्याला पूर्ण अखत्यार आहे असें आपल्या मनाशीं ठरवून ठेवावयाचें व तहनाम्यावर बेलाशक सही करावयाची असा सोपा इलाज लोक करतात; पण यापेक्षां, युद्ध ज्या मुद्यावर उद्भवावयाचें तोच मुद्दा आपण होऊन सोडून देऊन शांतता प्रस्थापित करण्यास आम्ही तयार आहों असें आपलें धोरण प्रसिद्धपणें आणि सबंध राष्ट्रासमोर उघडउघड जाहीर करणें हें जास्त अवघड आहे. मी हें अवघड धोरण पतकरिलें आहे. सार परगण्याची मतमोजणी व्हावयाच्या प्रसंगीं मी फरान्सला जें जाहीर अभिवचन दिलें त्यास जितकी किंमत आहे तितकी किंमत दहा पांच तहनाम्यांना सुद्धां नसेल. जर्मन लोकांचा पुढारी व प्रतिनिधि म्हणून सर्व जगतापुढें आणि जर्मन लोकांपुढें मी जेव्हां अभिवचन दिलें कीं, आतां ज्या अर्थीं सार परगण्याचा प्रश्न सुटला आहे त्या अर्थीं फरान्स देशांतील मुलखावर अतःपर आम्ही कसलाहि हक्क सांगणार नाहीं, तेव्हां त्या माझ्या कृत्यामुळें शांतता टिकून

राहाण्यास जितकी मदत झाली आहे तितकी वाटेल तितक्या तहनाम्यांवर वाटेल तितक्या सह्या जरी मी केल्या असत्या तरी त्यांनीं झाली नसती."

"अलीकडे अलीकडे सामुदायिक सहकार्य, सामुदायिक सुरक्षितता, सामुदायिक जबाबदाऱ्या, अशासारखे शब्दप्रयोग लोकांचे फार आवडते बनले आहेत. ही सामुदायिक सहकार्याची कल्पना मुळांत अमेरिकेचे तेव्हांचे अध्यक्ष विलसन यांनीं काढिली. युद्धापूर्वी राष्ट्राराष्ट्रांत ज्यांचे हितसंबंध सारखे सारखे असतील त्यांनीं आपापले गट बनवावयाचे ही पद्धति होती. पण यामुळेंच युद्ध जागतिक स्वरूपाचें झालें असें शेवटीं दिसून आलें. म्हणून त्या वेळीं मुत्सद्यांत अशी कल्पना निघाली कीं, आतां जो तह व्हावयाचा तो एकपक्षीय होतां उपयोगाचा नाहीं. सर्व राष्ट्रें समान दर्जाचीं समजावीं व सर्वच त्या तहनाम्यांत यावीं. परस्परांनें मनोमीलन व्हावें, सर्वांनीं निशःस्त्रीकरण करावें, व अशा रीतीनें सर्वांनाच सुरक्षितपणा वाटावा, अशी ही कल्पना होती. पण जेव्हां १९१९ सालीं व्हर्साईलचा तह झाला तेव्हांच या सामुदायिक सहकार्याच्या कल्पनेला मूठमाती देण्यांत आली. सर्व राष्ट्रें सारखीं आहेत ही कल्पना जाऊन तेथें जित व जेते असे वर्ग पाडण्यांत आले; सर्वांना सारखे हक्क ठेवावयाचे असें म्हणतां म्हणतां कांहीं राष्ट्रांना हक्क देण्यांत आले व कांहींचे हिसकावून घेण्यांत आले; मनोमीलन व्हावें असें एकीकडे बोलत असतां जित राष्ट्राला कडक शासन करण्यांत आलें; सर्वांचेंच निःशस्त्रीकरण व्हावयाचें ठरलें असतां जितांचींच शस्त्रें मात्र नष्ट करण्यांत आलीं; आणि सर्व सुरक्षित रहावयाचें असें ठरलें असतां सुरक्षितपणा जेत्यांच्या वाट्याला मात्र आला. व्हर्साईलच्या तहनाम्यांत—कीं जो आमच्यावर लादलेलाच होता—असें स्पष्ट लिहिलें होतें कीं, जर्मनीचें आज जें निःशस्त्रीकरण करावयाचें तें इतर राष्ट्रांचें निःशस्त्रीकरण उत्तरोत्तर शक्य होत जावें यासाठीं होय. आतां जर्मनीनें आपलें निःशस्त्रीकरण कसें केलें तें पाहा.

### सैन्यांतील युद्धोपयोगी वस्तूंचा नाश

| | |
|---|---|
| ५९८९७ | तोफा व तत्सम वस्तु |
| १३०५५८ | कडाबिनी बंदुका |
| ३१४७० | खंदक-तोफा |
| ६००७००० | बंदुका व तत्सम वस्तू |
| २४३९३८ | कडाबिनी बंदुकांच्या नळ्या |
| २८००१ | तोफांचे गाडे |
| ४३९० | कडाबिनींचे गाडे |
| ३८७५०००० | तोफांचे गोळे |
| १६५६०००० | हात गोळे |
| ६०४००४०० | ज्वलनवाती |
| ४९१०००००० | लहान हत्यारांचा दारुगोळा |
| ३३५००० | टन तोफगोळ्यांच्या पेट्या |
| २३५१५ | टन, काडतुसांच्या पेट्या |
| ३७६०० | टन, बंदुकीची दारू |
| ७९५०० | दारूगोळ्याचीं मेजें |
| २१२००० | टेलिफोन्स् (दूरश्रावक) |
| १०७२ | ज्वालाक्षेपक |
| ३१ | चिलखती आगगाड्या |
| ५९ | चिलखती मोटारी (टँक्स) |
| १७६२ | टेहळणीच्या गाड्या |
| ८९८२ | बिनतारी तारायंत्राचीं मकाणें |
| १२४० | रणांगणावरील भाकरखाने |
| २१९९ | तरांडीं |
| ९८१७ | टन, शिपायांचें सामानसुमान |
| ८२३०३५० | थैल्या, शिपायांचें समानसुमान |
| ७३०० | पिस्तुलें |
| १८० | कडाबिन घसरगाड्या |
| २१ | फिरते घडकाम कारखाने |
| १२ | विमानविध्वंसक बंदुकांच्या वाघणी |
| ११ | डुचकी तोफखान्याच्या मैदानी गाड्या |
| ६ ००० | पोलादी शिरस्त्राणें |
| १७०००० | वसन-कवचें |
| २५०० | युद्धसाहित्याचीं यंत्रें |
| ८००० | बंदुका या नळ्या |

विमाननाश

१५७१४ बाँब टाकणारीं लढाऊ विमानें
२७७५७ विमान वहातुकीच्या मोटारी

नौकादलाचा नाश

२६ प्रबल नौका
४ किनाऱ्यावरील चिलखती नौका
४ चिलखती क्रूझर्स
१९ छोटी क्रूझर्स
२१ विशेष प्रकारचें शिक्षण देणारीं जहाजें
८३ पाण–तीर–क्षेपिका
३१५ पाणबुड्या

"या वस्तूंचा नाश करून म्हणजेच व्यवहारतः जर्मनीनें आत्मयज्ञ करून अमेरिका प्रेसिडेंटची सामुदायिक सहकार्याची जी कल्पना होती तिच्या यशाला लागणारी सर्व परिस्थिति उत्पन्न करून ठेविली. पण तहनाम्यांत खरें काय ठरलें होतें तें विसरावें अशी फार लोकांची इच्छा असते ! तहनाम्याप्रमाणें निशःस्त्रीकरणास सर्वांनीं बांधून घेतलें होतें; केवळ जर्मनीनें नव्हे, तर सर्वांनींच स्वतःस बांधून घेतलें होतें; आणि जर्मनीनें आपलीं हत्यारें नष्ट करून टाकिलीं म्हणजे इतरांनीं सुरुवात करावयाची असें ठरलें होतें. तहनाम्याचा हा असा अर्थ आम्हीच करतों असें कोणी समजूं नये. निशःस्त्रीकरण परिषदेचा इंग्रज प्रतिनिधि लॉर्ड सेसिल हा म्हणतो, " व्हर्साईलच्या तहनाम्यांतील ज्या लष्करविषयक अटी आहेत त्यांच्या सुरुवातीसच असें स्पष्ट म्हटलें आहे कीं सर्व राष्ट्रांचें सरसकट निःशस्त्रीकरण सुरू होणें शक्य व्हावें म्हणून जर्मनी पुढील अटी कडक रीतीनें पाळण्याचें पतकरीत आहे. हा सरनामा म्हणजे करारनामा आहे. ज्यांनीं ज्यांनीं म्हणून तहनाम्यावर सह्या केल्या आहेत त्या त्या देशांच्या सरकारांनीं लोकांना दिलेलें हें एक गंभीर अभिवचन आहे. हें जर अमलांत आलें नाहीं तर या तहनाम्यानें उभी केलेली घटना चिरस्थायी व्हावयाची नाहीं आणि थोडें बहुत निःशस्त्रीकरणसुद्धां यत्किंचितही टिकून रहावयाचें नाहीं." फरेंच प्रतिनिधि पॉल बाँकूर १९२७ त म्हणाला. 'जर्मनीला निःशस्त्र व्हावयास लावणें ही एक अट आहे, ती झाली म्हणजे मागोमाग सर्व लोकांचें निःशस्त्रीकरण व्हावयाचें असेंच तहाच्या सरनाम्यांत ठरलेलें आहे.' हेंडरसन १९३१ मध्यें म्हणतो, 'लीग ऑफ नेशन्सचे सर्व सभासद निःशस्त्रीकरणास बांधलेले आहेत कारण त्यांनीं तशीं वचनेंच दिलीं आहेत.' एम्. ब्रायंड, एम्. व्हॉंडर व्हेल हे सर्व लोक आजवर असेंच म्हणत आले आहेत. पण प्रत्यक्ष काय घडून आलें आहे ? जर्मनीनें मात्र अतिशय इमानानें तहनाम्याच्या सर्व अटी पाळिल्या. पण जेत्या राष्ट्रांनीं मात्र या अटी मुळींच पाळल्या नाहींत. त्यांनीं निःशस्त्रीकरण तर केलें नाहींच उलट आपल्या शस्त्रागारांत भरती मात्र केली आणि आपलीं हत्यारें सुधारून ठेविलीं! गॅस–वेपनस्, सब्मरीन्स्, तोफखाना, टँक्स्, लढाऊ विमानें हीं सर्व प्रत्येक देशानें अनेक पटींनीं वाढवून ठेविलीं आहेत आणि दुसरीकडे निःशस्त्रीकरणाच्या बाता मात्र चालविले या आहेत."

"फरान्स देशाच्या लोकांशीं आमची खरीखुरी मैत्री व्हावी अशी आमची इच्छा आहे अणि सध्यांचें जें पोलिश राष्ट्र आहे तें फार मोठ्या आणि देशाभिमानी लोकांचें एक स्वतंत्र राष्ट्र आहे असेंच आम्ही मानतों."

"रशियाविषयीं आमचें धोरण थोडें निराळें आहे. बोलशेव्हिझम् हा जोंपर्यंत रशियाच्या पोटांतच आहे तोंपर्यंत आम्हांस त्याच्याशीं कांहीं एक कर्तव्य नाहीं. ज्याला ज्या पद्धतीनें सुख उत्पन्न होईल ती पद्धति त्यानें पतकरावी, पण जर कां बोल्शेव्हिझम हातपाय पसरून जर्मनीला आपल्या कबजांत घेऊं म्हणेल, तर मात्र आमच्या सारख्या कडव्या आणि जाज्वल्य शत्रूशीं त्याची गांठ पडेल. बोल्शेव्हिक लोक पृथ्वीवरील सर्व देशांत आपलीं तत्त्वें पसरविण्याच्या नादांत आहेत म्हणून हें बोलणें भाग आहे. हा त्यांचा धंदा सारखा सुरू आहे हें त्यांच्याच लेखकांच्या व मुत्सद्यांच्या जबानीवरून सिद्ध करून देतां येण्यासारखें आहे. त्यांनींच लिहिलेल्या हकीगतीवरून गेल्या १५ वर्षांत त्यांनीं काय धुमाकूळ घातला आहे तो पाहा.

**गेल्या १५ वर्षांत यूरोपांत व इतरत्र झालेले क्रांतीचे उत्पात:-**

१९१८ नोव्हेंबर-ऑस्ट्रिया व जर्मनी यांत क्रांति
१९१९ मार्च-हंगेरींत हातपोटवाल्यांचे बंड; कोरियांत बंड
१९१९ एप्रिल-बव्हेरियांत सोव्हिएट क्रांति
१९२० सप्टेंबर-इटलींतील मजूर कारखाने कवजांत घेतात
१९२१ मार्च-जर्मनीतील हातपोटवाल्यांच्या बिनीचें बंड
१९२३ पावसाळा-जर्मनींत क्रांतीची धडपड
१९२४ डिसेंबर-एस्थोनियांत बंड
१९२५ एप्रिल-मोरोकोंत बंड
१९२५ जुलई-व्हिएन्नांत बंड
१९२५ एप्रिल-सोफियाच्या देवळांत स्फोट
१९२५ पासून पुढें चिनांत क्रांतीची चळवळ
१९२६ डिसेंबर-जाव्हा इ. बेटांत कॉम्युनिस्टांचें बंड थोडक्यांत चुकलें.
१९२७ चिनांत क्रांतीची वाढ
युनायटेड स्टेटसमध्यें नीग्रोंची कॉम्युनिस्ट चळवळ. बाल्टिक संस्थानांत कॉ. प्रसारकांची उचल
१९२८ स्पेन, पोर्तुगाल, हंगेरी, बोलिव्हिया, लॅटव्हिया, इटली, फिनलंड, एस्थोनिया, लिथुआनिया, जपान या देशांत कॉ., मंडळांची उचल. चिनांत कॉ. चे बखेडे मॅसिडोनियांत कॉ. ची खळबळ, अर्जेंटिना देशांत कॉ. चे बॉम्ब.
१९२९ मे-बर्लिन शहरांत रस्तेबंदीची कुंपणें. ऑगस्ट-साम्राज्यशाहीविरुद्ध कॉ. चा जागतिकदिन. कोलंबियांत बंड, सप्टेंबर-जर्मनींत बॉंबचे स्फोट
आक्टोबर-रशियन बोलशेविकांचा मँचूरियांत रिघाव
१९३० फे.-जर्मनींत कॉ.भडाग्नि घोष,मार्च-बेकारांचा कॉ. जागतिक दिन, मे-चीनांत कॉ. चें सशस्त्र बंड , जून जुलै-फिनलंडांतील कॉ. बंडाचा उपशम, जुलै-चिनांत कॉ. ची यादवी.
१९३१ जाने.चिनांत कॉ. टोळ्यांशीं झुंझी, यु. स्टेट्समध्यें कॉ. संबंधींचा सरकारी गुप्त स्फोट. मे-स्पेनमध्यें क्रांति.
जून जुलै-चिनांत कॉ. विरुद्ध लढत, ऑ.-अर्जेंटानियांत लढत. कॉ. चें व्यापारी मंडळ दक्षिण अमेरिकेस पाठविण्याचे ठरतें व रपकड. ही यादी अनंत आहे.

या त्यांच्या धोरणाची बाधा जर्मनीस व्हावी अशी त्यांची इच्छा असणारच. पण आम्ही ती होऊं देणार नाहीं.

युरोपांत पुन्हां युद्ध सुरू झाल्यानें आमचा कसलाहि फायदा नाहीं. आम्ही स्वतंत्र राहिलों म्हणजे आम्हास पुरे; आणि म्हणून आमच्या सर्व शेजाऱ्यांशीं अनतिक्रमणाचे करारमदार करावयास आम्ही अगदीं तयार आहों. लिथुआनियांशीं करणार नाहीं. कारण मेमेल शहरीं आमचे जे दीड लक्ष जर्मनस् आहेत त्यांचा अनन्वित छळ तेथें चालू आहे. फ्रान्स व रशिया यांनीं जो आपापसांत लष्करी तह केला आहे तो महायुद्धाच्या पूर्वींच्या थाटाचाच आहे व त्यामुळें राष्ट्रांच्या सामुदायिक बोलण्यांत एक तऱ्हेचा अनिश्चितपणा उत्पन्न होत आहे. प्रेग, पॅरिस व इतर कित्येक ठिकाणीं जर्मनीच्या विरुद्ध प्रचाराचा आखाडाच पडलेला आहे आणि जर्मनींत सारखीं कुलंगडीं उत्पन्न करावीं असे यत्न ते करीत असतात. यामुळें आमचें मनस्वास्थ्य नाहींसें होतें. ऑस्ट्रियाच्या अंतर्गत प्रकरणांत हात घालण्याची आम्हांस मुळींच इच्छा नाहीं. तसेंच तो देश आमच्या देशास जोडून टाकावा किंवा आमच्या देशांत मुरवून टाकावा अशीहि आमची इच्छा नाहीं. पण आमची अशी मात्र इच्छा राहाणारच कीं, तेथील जर्मन लोकांना स्वयंनिर्णयाचा हक्क इतरांसारखाच असला पाहिजे (आणि ऑस्ट्रियांत किती तरी जर्मनस् आहेत). जें राज्य लोकांच्या मनांत रुजलेलें नाहीं, लोकांच्या मनांतून उत्पन्न झालेलें नाहीं आणि लोकांना हवेंसें वाटत नाहीं तें फार दिवस टिकाव धरतें असें मला वाटत नाहीं. ऑस्ट्रियाच्या या कटकटीमुळें इटलीशीं

असलेल्या आमच्या सख्यांत विनाकारण बिघाड उत्पन्न होतो. हें एक प्रकरण सोडून आमचें इटलीशीं कसलेंहि वांधें नाहीं.

---

## ६ आजचा जर्मनी

(१) नाझी पक्षाचा विजयः—दोन वर्षांपूर्वी प्रेसिडेंट हिंडेनबुर्ग यांनीं हिटलर यांस जर्मनीचीं राज्यसूत्रें हातीं घेण्यासाठीं पाचारण केलें. त्या वेळीं जर्मनी आर्थिक दृष्टचा अतिशय खालावलेला होता. हिटलरपुढें फारच गुंतागुंतीचे प्रश्न आ वासून बसले होते व राष्ट्राचा उद्धार करण्यास मोठाच धैर्याचा व निधडचा छातीचा पुढारी हवा होता. जर्मनींत अंतःकलह वाढत्या प्रमाणांत होत . बोल्शेव्हिकांच्या विजयाचीं चिन्हें दिसत होतीं. नॅशनल सोशॅलिझमचें तत्त्व लोकांचे मनांत चांगलेंसें रुजलें नव्हतें. गेल्या २५ वर्षांपासून या दोन मतांच्या चालू असलेल्या चुरशीच्या लढचांत शेवटीं बोल्शेव्हिकांचा पराभव झाला.

(२) नाझी पक्षाचें ध्येयः—आज जर्मन राष्ट्रापुढें नाझी पक्षानें जें ध्येय ठेविलें आहे त्यांत व कम्युनिझममध्यें उत्तर, दक्षिण ध्रुवांइतकें अंतर आहे. नाझी पक्षाची जर्मनी-पुरतीच चळवळ आहे तर रशियाची जागतिक चळवळ आहे. प्रत्येक राष्ट्रानें आपल्या गरजेप्रमाणें व जीवनक्रमास धरून अध्यात्मिक जीवन कंठावें असें नाझी पक्षास वाटतें. उलट बोल्शेव्हिक पंथ प्रत्येक राष्ट्रावर त्याची घटना, स्वरूप व रूढी यांचा विचार न करितां आपलीं तत्त्वें लादीत आहे. नाझी पक्षास आपल्या राष्ट्रांतीलच सामाजिक प्रश्न सोडवावयाचे आहेत पण ते अशा रीतीनें कीं जर्मनीच्या धार्मिक, सांस्कृतिक व आर्थिक मतांना व पूर्वापार चालींना धक्का बसू नये. बोल्शेव्हिकांना सर्व मानवजात एक करावयाची आहे व ती जागतिक क्रांतीनें. नाझी पक्ष यूरोपियन संस्कृतीचा अभिमानी आहे. बोल्शेव्हिकांना मार्क्सच्या तत्त्वज्ञानांतच, सर्व संस्कृति साठविली आहे असें वाटतें. नाझी पक्षाला अधार्मिकता खपणार नाहीं. उलट बोल्शेव्हिकांना निरीश्वरवाद मान्य आहे. खाजगी मालमत्ता ही मानवांच्या आर्थिक उन्नतीमध्यें एक वरची पायरी आहे हें नाझींचें मत तर बोल्शेव्हिकाला खाजगी मालमत्ता नको इतकेंच नव्हे तर वैयक्तिक पुढाकार व जबाबदारीचें तत्त्वही मान्य नाहीं. याप्रमाणें या दोन पक्षांमध्यें दुर्लंघ्य असा फरक आहे. जातींतील अंतःकलह नाहींसा करण्याचे दृष्टीनें नाझी पक्षानें आपल्या पक्षाचे अनुयायी वाढवून कम्युनिस्टांचा पाडाव केला व नॅशनल सोशॅलिझमचे ध्येयप्रमाणें वागण्याचा त्याचा निश्चय आहे.

(३) आर्थिक हलाखींतून जर्मनीस मुक्त करण्याचा प्रयत्नः— महायुद्धानंतर व्हर्साइलच्या तहान्वयें रेपरिशनच्या नांवाखालीं जर्मनीवर लादलेली नुकसानभरपाईची अट पुरी करतां करतां जर्मनी भरडून निघाला व त्याचे उद्योगधंदे थंडावले. शेतकीचा नाश झाला. मध्यम वर्ग खालावला. व्यापार बसला. राष्ट्राच्या गळचांत कर्जाची मोठी धोंड पडली व साडेसत्तर लक्ष कामगार बेकार झाले. ही खालावलेली आर्थिक परिस्थिति सुधारण्याकरितां नाझी पक्षाला खालील कडक उपाय योजावे लागले.

क्रयविक्रय शक्तीवर ताबा ठेवणें, मजुरी व किंमती यांमधील चढउतार थांबवून त्या ठरवून टाकणें, हा चढउतार करणाऱ्या संघांचा नायनाट करणें, मजूर व भांडवलवाले यांचे संघ नाहींसे करण्याकरितां त्यांनीं मान्य केलेल्या राज्ययंत्राचा नायनाट करणें व याकरितां नवीन राजकीय घटना व पुनर्घटना करणें हें घडवून आणण्याकरितां राष्ट्राला सांधिक —जीवन-विचार करण्यास शिकविणें, जर्मनी पूर्णपणें उन्नतस्थितीस येण्यास बराच कालावधी लागेल. पण गेल्या दोन वर्षांत नाझी पक्षाला जें यश मिळालें आहे तें नाझी पक्षाची घटना व उत्साह व राष्ट्राचा उद्धार करण्याची तळमळ यामधेंच होय.

(४) जर्मनीनें पोलंडबरोबर सुद्धां बिन चढाईचा (Non-aggression) तह केला आहे. शस्त्रसंन्यास व बिनचढाईचे तह करून

युरोपमध्यें स्वस्थता, शांतता प्रस्थापित करण्यास जर्मनी तयार आहे. पण युद्धाचे वेळीं मदत करण्याचे तह (Pacts of Assistance) फरान्सनें रशियाशीं केलेल्या तहासारखे करून त्याप्रीत्यर्थ जर्मन लोकांस लढावयास लावण्याचे, व इतर राष्ट्रांच्या फायद्यासाठीं जर्मनांना हत्याकांडांत ओढण्याचें धोरण जर्मनीस मान्य नाहीं. जोंपर्यंत (Non–intervention) चा अर्थ निश्चित झाला नाहीं तोंपर्यंत Pact of non–intervention वर सही करण्यास जर्मनी तयार नाहीं.

(५) हल्लींच्या प्रश्नावर जर्मन सरकारचें खालील धोरण हिटलरनें आपल्या भाषणांत जाहीर केलें आहे.

(१) एप्रिल १७ ला जिनिवाला जो ठराव झाला तो जर्मन सरकारला पसंत नाहीं. समतेचें धोरण राष्ट्रसंघानें जोंपर्यंत ठेवलें नाहीं तोंपर्यंत जर्मनी राष्ट्रसंघांत पुन्हा सामील होणार नाहीं. (२) इतर राष्ट्रांनीं शस्त्रसंन्यासाच्या अटी जोंपर्यंत पुऱ्या केल्या नाहींत तोंपर्यंत जर्मनीसही त्या पाळतां येणें शक्य नाहीं. (३) लोकार्नो पॅक्टला पुस्ती जोडण्याकरितां विमान परिषद भरवावी असें जर्मनीचें मत आहे. (४) जर्मनीनें स्वसंरक्षणासाठीं सक्तीच्या लष्करी शिक्षणाची व सैन्य, आरमार, विमानें वाढविण्याची जी योजना जाहीर केली आहे त्यापासून कोणत्याही राष्ट्रास धोका नाहीं. पण इतर राष्ट्रें जर शस्त्र-निर्बंध पाळण्यास तयार असतील तर जर्मनी त्यांत समभागी होईल. हल्लींच्या परिस्थितींत शस्त्र-संन्यास पायरीपायरीनेंच होणें इष्ट आहे असें जर्मनीचें मत आहे व त्याकरितां प्रथम गॅस व स्फोटक बॉम्ब यांचा युद्धक्षेत्राचे बाहेर उपयोग करण्यावर निर्बंध घालावा असें जर्मनी सुचवीत आहे.

---

## ७ जर्मनी ख्रिस्ती धर्मांतून उठून जाणार काय ?

सध्यां जर्मनींत ज्या अनेक चळवळी चालू आहेत त्यांत ख्रिस्ती धर्माचा उच्छेद ही एक मोठीच चळवळ आहे. या चळवळीची बाधा अजून बाहेर कोणास झालेली नसल्यामुळें तिच्या संबंधानें जितका गाजावाजा व्हावयास हवा तितका झालेला नाहीं. पण, ख्रिस्ती धर्माचे विचार करणारे, त्याचा अभिमान बाळगणारे व आधुनिक सुधारणेला ख्रिस्ती धर्माचाच खरोखर उपयोग झाला आहे हें मत बाळगणारे जे कोणी आहेत त्यांना ही चळवळ म्हणजे केवळ प्राणसंकटच वाटत आहे. बोल्शेव्हिक लोक हे धर्म–विध्वंसक म्हणजे धर्म कल्पनेचेच विध्वंसक आहेत; पण हे नाझी लोक धर्मकल्पना मानणारे असून सुद्धां आपल्या ख्रिस्ती धर्माचे विध्वंसक होऊं पाहात आहेत याचें दुःख वरील लोकांना फार आहे. सगळाच धर्म येथून तिथून खोटा असें कोणी म्हटलें तर सर्व धर्म असल्याच कोटींत सांपडतात म्हणून धर्म-विध्वंसक हा अगदींच पाखंडी आहे या जाणिवेनें धर्म हवा म्हणणारे लोक त्यांच्यासंबंधानें उदासीन बनतात. पण या नाझी लोकांच्या चळवळीचा रोख ख्रिस्ती धर्माविरुद्ध असल्यामुळें त्यांना दुःखाच्या जोडीला अवमान सुद्धां वाटतो. अशा या नवीन मताची ओळख पुढील थोड्याशा परिच्छेदांवरून होईल.

जर्मन राष्ट्रांत वंश कल्पनेची जाणीव जोरानें उत्पन्न झाली आहे आणि तिची छाप सर्व लोकांच्या मनांवर इतक्या जलदीनें बसत चालली आहे कीं जर्मन जीवनांत जें जें कांहीं असेल तें तें या वंश कल्पनेशीं जर जमत नसेल तर तें टाकावयास हवें असे हे नाझी नवमतवादी सांगत आहेत. ख्रिस्ती होण्याच्या आधीं आपण जर्मन होतोंच आणि वंशकल्पनेच्या बळावर तेव्हां आपण अत्यंत बलिष्ठ होतों; जे कोणी जर्मन नव्हते त्यांच्यापासून आपल्या पूर्वजांनीं धर्मकल्पना काय म्हणून घेतल्या ? त्या घेतल्या व मूळचा वांशिक पीळ सुटूं दिला म्हणून आपली अवनति झाली असें त्यांचें मत आहे. आजवर सर्व इतिहासकारांनीं ख्रिस्ती धर्म व त्यानें युरोपियन जीवितावर केलेले संस्कार यांचा महिमा मनमोकळेपणानें गाइला आहे पण, जें आपलें बळ म्हणून हे इतिहासकार सांगतात तेंच आमचें खरें वैगुण्य, असें या नवमत-

दाद्यांचें म्हणणें आहे. येशू ख्रिस्त हा एक ज्यू होता आणि त्यानें दया, माया, समत्व, बंधुभाव, परोपकार, अहंकारलोप असले नेभळेपणाचे सर्व गुण लोकांना शिकविले व त्यामुळें आपले जे सामर्थ्यपंज होते त्यांचा विसर समर्थ लोकांना सुद्धां पडला व हीं बंधुभावाचीं व समत्वाचीं नसतीं खेकटीं गळयांत घेतल्यामुळें खऱ्या बुद्धिमान, शूर व बलिष्ठ माणसांना केवळ निर्बल अशा लक्षावधि जमातींना व राष्ट्रांना विनाकारण आपल्या बरोबरीचें मानावें लागलें आहे; सगळे लोक सारखे आहेत किंवा त्यांस तसें आपण मानावयास पाहिजे हाच काय तो माणुसकीचा परम उच्च सिद्धांत म्हणून या नेभळ्या धर्मानें खऱ्या समर्थ लोकांपुढें प्रतिपादिलें; आणि त्यामुळें समर्थ व निर्बल, शहाणे व मूर्ख, उत्कर्षासाठीं झगडणारे व केवळ मेंगे लोक यांची सरमिसळ होऊन एकानें सर्व सामर्थ्यें वेंचावीं व दुसऱ्यानें उगाच समत्वाच्या नांवाखालीं बरोबरीच्या नात्यानें भोग भोगावे असला वेडाचार आजपर्यंत चालला आहे, असें त्यांचें म्हणणें आहे. जर्मन मानव-वंश हा अत्यंत बुद्धिमान, साहसी व उत्कर्षासाठीं सारखा यत्न करणारा असा आहे; पण, त्या त्याच्या गुणांची जोपासना होण्यास हा माजलेला समत्वाचा कर्दम प्रतिबंध करूं लागला व त्यामुळें आपली अवनति झाली, अशी अगदीं निसुखपणाची घोषणा जर्मन नवमतवादी करीत आहेत. रक्तशुद्धि ही जीविताचें आद्य तत्त्व होय असें ते मानतात व तिची जपणूक हरतऱ्हेनें केली तर जर्मन राष्ट्र मनबुद्धीच्या सामर्थ्यानें व शारीरिक शक्तीनें सर्व जगाच्या आघाडीला राहील. हें मत धर्मतत्त्वाच्या गौरवानें त्यांच्या मनांत बळ करून राहिलें आहे हें जर खरें तर मग याला विघातक असें जें जें कांहीं आधीं झालें असेल किंवा सध्यां होत असेल तें तें नाहींसें करणें हें क्रमानेंच येतें व त्यास अनुसरून त्यांनीं आपला कार्यक्रम आंखलेला आहे. ज्यू लोकांची जर्मन जीवितांतून हकालपट्टी हा त्यांतलाच एक भाग आहे.

हें मत नित्शे यानें सांगितलेंच होतें; परंतु तें अतिशय प्रगल्भ रीतीनें मांडून त्याचा जोराचा पुरस्कार करणें हें काम नाझी लोकांच्या अमदानींत सुरूं झालें आहे. या मताचा मुख्य आचार्य म्हणजे हेर रोझेनबर्ग हा होय. "विसाव्या शतकांतील थाप" या नांवाचा सातशें पानांचा एक प्रचंड ग्रंथ त्यानें लिहिला आहे. येशू ख्रिस्त या मूळ व्यक्तीविषयीं तो कांहीं थोडेंसें बरें बोलतो. पण, याचें म्हणणें असें आहे कीं माथूसारखे ज्यू धर्मवेडे, पॉलसारखे जडवादी उपाध्ये, टर्टूलिअन सारखे आफ्रिकी न्यायकोविद, आणि ऑगस्टाइन सारखे कोणाला कोणापासून तरी झालेले लेकावळे यांनीं त्या मूळ ख्रिस्ताचें अगदीं धिरडें बनवून टाकलें आहे व त्याचा तो तसला धर्म आज इतकीं शतकें आमच्या जीविताचा सत्यानाश करून टाकीत आहे. आम्ही मूळचे नॉर्डिक लोक असून पूर्वींच्या काळीं आमचीं ध्येयें फार उदात्त होतीं व आमच्या धर्मकल्पना जडवस्तूवर आधारलेल्या होत्या. रक्तशुद्धि व वंशकल्पना याच त्या जडवस्तू होत; वोटन आणि सिजफरीड यांनीं पूर्वीं आम्हाला जो धर्म दिला होता, तोच खरा धर्म होय; येशू ख्रिस्ताची गॅलिली, ऑगस्टाइनचें रोम, लूथरचें विटेनबर्ग, येथून मिळालेले धर्म हे सर्वथा त्याज्य आहेत; आमची पूर्वींची सूर्योपासना व तिचें प्रतीक जें स्वस्तिक तोच आमचा खरा धर्मध्वज होय. आम्ही अलिकडे पतकरलेला हा ख्रिस्ताचा ओंगळ शूळ फेकूनच द्यावयास हवा; रक्तशुद्धि आणि वंशसातत्य यांच्या बळावर वैभवें प्राप्त करून घ्यावीं; हें टाकून देऊन आम्ही वाटेल तसल्या माणसांना समत्व अर्पण करून त्यांतून सुख निघतें काय असें पाहूं लागलों व त्यामुळें आमचा व सर्व जगताचा ऱ्हास झाला आहे. एकादा अवतारासारखा महान प्रचंड मनुष्य आपल्या वंशांत उत्पन्न व्हावा व त्याचें शहाणपण आपण धर्म म्हणून पतकरावें याच्या ऐवजीं, नेभळ्या आणि नादान असल्या लोकांनीं सांगितलेल्या धर्मालाच आम्ही कवटाळून बसलों. जर्मन वंशांत प्राप्त झालेला जो मानधनीपणा आणि जी स्वातंत्र्याची आवड ती टाकून देऊन ख्रिस्ताचा कनवाळूपणा आणि सहिष्णुतेचें

औदार्य असले दानत बिघडविणारे गुण आम्ही पतकरून बसलों म्हणून हें सर्व आतां टाकलें पाहिजे असें हा रोझेनबर्ग जोरजोरानें प्रतिपादीत आहे; व लक्षावधि जर्मन तरुण लोक त्याच्या पुस्तकाचीं पारायणें करीत आहेत. मानवी सुधारणा ही मध्य आशियांत उत्पन्न झाली व तेथून ती चोहों-कडे पसरली हें युरोपांत असलेलें रूढ मत रोझेन-बर्गनें फेंकून दिलें आहे. त्याच्या मतें उत्तर ध्रुवाच्या आसपासच्या प्रदेशांतून जर्मन वंशाच्या, कीं आतां ज्यांना नाझी लोकांनीं आर्य हें नांव दिलें आहे, त्या लोकांच्या झुंडीच्या झुंडी कांहीं कालाच्या अंतरानें खालीं उतरल्या व त्यांचेच पुत्रपौत्र, आज पृथ्वीवर जें कांहीं प्रबलपणाचें, बुद्धिचाप-ल्याचें निदर्शक आहे त्याचे उत्पादक झाले. पृथ्वीवरील इतिहासाचा शोध करतां, रोझेनबर्गच्या मतें असें दिसेल कीं हे नॉर्डिक म्हणजे जर्मन म्हणजे आर्य लोक जेथें जेथें गेले तेथें तेथें त्यांनीं मोठाल्या संस्कृती उभ्या केल्या व त्यामुळेंच जगत सुखी झालें. हिंदुस्थान, आर्याण म्हणजे इराण, ग्रीस, आणि आधुनिक युरोपियन राष्ट्रें येथील सर्व देव या वंशातील लोकांनींच उत्पन्न केले. व त्या पीठिकेंतूनच राज्यस्थापना, वाङ्मय आणि सामाजिक नियमनें हीं उत्पन्न झालीं. येशू ख्रिस्तानें येऊन युरोपच्या नाशाला मात्र सुरुवात केली. खरा धर्म हा राष्ट्रीय असतो. त्या राष्ट्राच्या जीवि-ताला संवर्धक व सुखकर असें जें कांहीं असेल तोच त्या राष्ट्राचा धर्म होय व म्हणून प्रत्येक राष्ट्राचा स्वतंत्र धर्म असूं शकेल. सर्व जगताचा मिळून एक धर्म ही कल्पना केवळ उपहास्य आहे. ऐहिक जीवित व पारमार्थिक कल्याण यांची जो धर्म फारकत करतो तो या जर्मन म्हणजे आर्य राष्ट्राच्या जीवावर उठतो असें म्हणावयास हवें. “ख्रिस्ती धर्मांतील डोंगरीवरचें प्रवचन, मनुष्य जातीचा प्रपितामह हा आरंभालाच एकदां प्रमादशील बनला व पातकी बनला, तसेंच परमेश्वरत्वाचें मुख्य लक्षण म्हणजे पातक्याचे अपराध पोटांत घालणें हें होय.” असल्या ख्रिस्ती धर्मांतील गोष्टी टाकणें आतां प्राप्तच आहे. या टाकून देऊन ख्रिस्तीधर्म पतकरण्याच्या पुष्कळ आधीं आमच्या जीविताला भरती आणणारीं तीं आमचीं पूर्वींचीं नॉर्डिक पुराणें, ध्रुव–प्रदेशीय ऐतिहासिक प्रबंध आणि अप्सरांच्या सुंदर कथा हींच आम्हांस पुन्हां पतकरावयास हवींत. ओडीन, सीज, फरीड, विडुकीन, थिओडोरिक, वॅग्नर, फ्रेडरिक दि ग्रेट, बिस्मार्क आणि हिटलर हे आमचे प्रवर होत; आणि यांचीच पूजा आम्हीं केली पाहिजे!” असें हें अगदीं चमत्कारिक मत जर्मनींत प्रबळ होत चाललें आहे. हिटलर स्वतः याच मताचा पुर-स्कर्ता आहे. पण, देशाचें प्रभुत्व त्याच्याकडे असल्यामुळें आज तो या मताचा स्वतंत्र प्रति-पादक म्हणून लोकांपुढें उभा राहात नाहीं. पण रोझेनबर्ग हा त्याचाच भिडू आहे हें सर्व लोक ओळखतात. हें मत फैलावत जाऊन जर जर्मन राष्ट्रानें ख्रिस्तीधर्म झुगारून दिला तर युरोपांतच काय पण अवघ्या पृथ्वीवर अगदीं अव्वल महत्त्वाचा असा एक प्रश्न उपस्थित होणार याची जाणीव दूरान्देशी लोकांना आतांच आलेली आहे.

---

## ८ इटलीची वसाहत-कारवाई

सध्यां इटली व अबिसिनिया यांचा झगडा सुरूं होण्याचा संभव दिसतो. तो नीट समजण्यास इटलीची आफ्रिका खंडांत वसाहती मिळविण्या-ची कारवाई आजवर कसकशी चालूं राहिली आहे याचा इतिहास मनोरंजक वाटेल.

सुएझचा कालवा तयार होऊन त्यांतून युरो-पियन जहाजांची ये जा सुरूं झाल्यावर तांबड्या समुद्रांत आपलें एकादें तरी ठाणें असावें असें युरोपांतील सर्वच राष्ट्रांना वाटूं लागलें. हें ठाणें लष्करी दृष्टीचें असावें अशी कांहीं प्रत्येकाची इच्छा नव्हती. आपल्या जहाजांची ये जा चालू असतां वाटेंत कोळसा घेण्यास वगैरे आपल्या मालकीचें एकादें ठिकाण असावें एवढीच पहिली कल्पना होती. व त्याप्रमाणें १८६९ सालीं बाबेल मांडेब या सामुद्रधुनीवर असाब नांवाचें एक लहानसें ठाणें इटलीनें खरेदी केलें. या असाबच्या भोंवतीं

एकादी वसाहत करतां येईल किंवा त्याच्याकडे आफ्रिकेचा व्यापार ओढून घेतां येईल अशी कांहींच कल्पना इटॅलियन मुत्सद्यांना नव्हती. पुढें दक्षिण आफ्रिकेंत मुलूख संपादनाची जी इंग्रज लोकांची जारीनें खटपट चालू झाली तिनें युरोपांतील सर्वच देशांना वसाहतीची भूक उत्पन्न झाली व १८८० पासून पुढें, आजवर निकामी पडलेल्या या विस्तृत भूप्रदेशाचा कब्जा कोणास किती घेतां येतो या कामीं सर्व यूरोपियन राष्ट्रांची चढाओढ चालू झाली. १८८५ सालीं तांबड्या समुद्रांतील ईजिप्तच्या किनाऱ्यावर मासोवा या बंदराचा कब्जा इटालीनें घेतला. हें बंदर ईजिप्त-च्या उपेक्षेनें रिकामें पडत चाललें होतें आणि इंग्लंडच्या मनांत तर असें होतें कीं इटलीसारख्या सामान्य राष्ट्राच्या हातीं तें गेलें तर बरेंच होईल. शिवाय खार्टूमकडे महादीची जी प्रचंड गडबड चालू होती तिला थोडाबहुत पायबंद त्यांच्या द्वारां मासोवाकडून बसवितां येईल अशी ही त्यांची अटकळ होती. वास्तविक पाहतां इटलीला जर वसाहत स्थापावयाची तर भूमध्य समुद्र ओलांडून थेट दक्षिणेला आफ्रिका खंडांत उतरून त्रिपोली हस्तगत करणें व तेथें वसाहत करणें हेंच योग्य होतें. पण कांहीं कामानिमित्त एक इटा-लियन लोकांची अबिसिनीयांत गेलेली तुकडी परत येत असतांना तिचा तेथील लोकांनीं अगदीं निःपात करून टाकला. म्हणून इटलींत ताबडतोब सूडाची आरोळी उठली. अबिसिनियास थोडा तरी चाट बसावा हें जरूर होतें, व तो चाट त्रिपोली घेतल्यानें बसण्यासारखा नव्हता. म्हणून मासोवा बंदरच तुम्ही ताब्यांत घ्या असा इंग्रजांनीं आग्रह केला व इटॅलियन लोकांना तो पटला. या ठिकाणीं एकदां पाय कायम केल्यानंतर पूर्वेकडे तोंड करून हे नव्या दमाचे वसाहतेच्छू लोक अबिसिनीयाच्या पठाराचें हळूहळू आक्रमण करूं लागले; व अबि-सीनीयाच्या राजाशीं त्यांच्या कटकटी चालू झाल्या. १८८८ तच २०००० इटॅलियन फौज या मुलुखांत दाखल झाली. ही इटॅलियन वसा-हत तेथें होऊं लागल्यामुळें अबिसिनीयाचा पूर्वे-कडून कोंडमारा होऊन त्याला समुद्राकडे तोंडच उरलें नाहीं. थोडी शाब्दिक घासाघीस होऊन दोनही पक्ष रणांगणावरून गुरगुरत परत गेले. पण हीच कुरबुर वाढत जाऊन मारामारीस सुरुवात झाली. पहिल्या लहान तुकड्यांची दाणादाण झालेली पाहून सेनापति बॅराटीरी यांच्या हाता-खालीं १३ हजार फौज देऊन इटलींतून त्यांस रवाना करण्यांत आलें. पण या चिमुकल्या फौजेला हबसाणाच्या राजाच्या ९० हजार लोकांनीं एका आडवळणांत गांठलें आणि त्याची शुद्ध लांडगेतोड केली. या सुधारलेल्या इटॅलियन लोकांच्या प्रेतांचीसुद्धां त्या हबशी शिपायांनीं रणांगणावर विटंबना केली. साडेसहा हजार लोक ठार झाले आणि चार हजार कैद झाले. खुद्द बॅराटीरी हे तर जीव घेऊन पळाले. हा जो इटॅलियन लोकांचा भयंकर अपमान झाला त्याचा दंश त्यांच्या मनांत अजून कायम आहे. तह झाला त्याप्रमाणें स्थापन झालेली इटालीची वसाहत कीं जिला इरिट्रिया असें नांव मिळालें आहे, ती त्यांजकडे कायम राहिली. पण अबिसिनियाच्या राजाला ५० लक्ष रुपयांचा खजिना इटॅलियन लोकांना दंड म्हणून भरावा लागला व हबसाणांचें स्वातंत्र्य मान्य करावें लागलें. अशा रीतीनें एक मोठा पराभव गिळून इटलीला तांबड्या समुद्राच्या किनाऱ्यावर ही इरिट्रिया वसाहत कायम करतां आली. त्यांची दुसरी वसाहत म्हणजे आफ्रिकेचें जें एक नाक अरबस्थानाच्या रोखानें हिंदी महासागरांत जोरानें गेल्यासारखें दिसतें तेथें झालेली आहे. तिचें नांव सोमाली लँड असें आहे. ओबिआ आणि मिजूर टाइम येथचे जे लहान लहान सुलतान होते त्यांच्यावर इटालियन्सनीं आपला पगडा चटकन बसविला; व १९०५ पासून तेथील सर्व राज्यकारभार इटालींतूनच चालू झाला. या वसाहतीचा इटॅलियन लोक उत्तम उपयोग करून घेत आहेत. थोड्या वर्षांपूर्वी जो केवळ वैराण मुलूख होता तेथें आतां कपाशीचें पीक उत्तम निघूं लागलें आहे; साखर होऊं लागली आहे; व केळी, नारळीच्या विस्तीर्ण

बागा झालेल्या आहेत. हरतऱ्हेची नवीन यंत्र-सामग्री तेथें उभी करण्यांत आली आहे. खुद्द इटॅलियन प्रजा तेथें राहावयास न्यावी म्हणून जे प्रयोग झाले ते मात्र सर्व फसले. आतां वसाहत याचा अर्थ इतकाच आहे कीं तद्देशीय लोकांना मजूर म्हणून हाताशीं घ्यावें, उद्योगधंद्याच्या व शास्त्रीय साधनांच्या उत्तम कल्पना असलेले आपले उमदे गोरे लोक तिकडे धाडावे, व सोमाली लँडमधून जीं धनें उत्पन्न करतां येतील त्यांवर आपला देश गबर करावा. फॅसिस्ट लोकांचा मनू इटलींत सुरू झाल्यावर तर या प्रदेशांत जिकडे तिकडे नवीन रस्ते तयार झाले असून वाहातुकीं-च्या साधनांचेंही वैपुल्य झालें आहे. हबशी लोक इटॅलियन लोकांचे जरी कितीहि वैरी असले तरी वर समुद्रापर्यंत मालाची ने आण करण्यास त्यांना या रस्त्यांचाच उपयोग करावा लागणार आहे.

पण इटालीचा खरा डोळा त्रिपोलीवरच होता. कारण समुद्र ओलांडतांच तेथें जातां येण्यासारखं होतें. आफ्रिका खंड जवळ जवळ बिनवारशी असल्या सारखेंच होतें. उघडेनागडे हिंडणारे, वाटसरांना मारून त्यांच्या चीजवस्तूंवर गुजारा करणारे, शेजारच्या जमातींचीं बायकापोरें पक-डून आणून गुलामांच्या बाजारांत विकणारे व हातीं असलेल्या सोन्याच्या तुकड्याचें म्हणजे आपल्या भूमीचें ज्यांना कसलेंही ज्ञान नाहीं असेच लोक सर्व खंडभर पण अगदीं लहान लहान टापूंत राहिलेले होते. तिकडे युरोप खंडांत लोकसंख्येची वाढ झपाट्यानें चालू झाली होती व बाहेर कोठें तरी आणखी कांहीं जागा हस्तगत करून ठेवल्याशिवाय आपल्या मुलालेंकरांचें भागावयाचें नाहीं हें सर्वांना कळून चुकलें होतें, म्हणून जो तो आपल्या कुवतीप्रमाणें वसाहतींच्या मागें लागला होता. इंग्लंड वगैरे देशांना आपल्या जहाजांच्या बळावर पृथ्वीवर वाटेल त्या दूर पण समृद्ध जागा हस्तगत करणें साध्य होतें; इटलीची स्थिति तशी नव्हती. म्हणून जवळचे जवळ आफ्रिकेच्या किनाऱ्यावर कांहीं साधलें तर तें त्यांना हवें होतें. फरान्स व इंग्लंड यांच्याशीं इटलीची आंतून आंतून कित्येक वर्षें रदबदली चालली होती. शेवटीं १९०९ सालीं त्रिपोली व सायरेनिका हीं ठाणीं हस्तगत कर-ण्यास त्यांनीं इटलीला परवानगी दिली. वास्त-विक पाहतां या प्रदेशावर लेचेपेचे कां होईना पण तुर्कांचें स्वामित्व होतें. कांहीं तरी खुसपट काढून इटॅलियन लोकांनीं तुर्कांनीं युद्ध सुरू केलें व वरील ठिकाणें कब्जांत घेतलीं. तुर्कांनीं पुष्कळ धडपड केली पण तिकडे युरोपांत बाल्कन राष्ट्रांनीं तुर्कांशीं युद्ध सुरू केल्यामुळें त्यांचा आफ्रिकेंतील हात ढिला पडून त्रिपोली, टॅनिया व सायरेनिका अशा दोन वसाहती इटॅलियन लोकांनीं आपल्या म्हणून जाहीर केल्या व त्या दोहींना मिळून जुनें रोमन साम्राज्यांतलें लिबिया हें नांव दिलें. हें झाल्यावरही तुर्कांची जिकीर चालूच असे; तद्देशीय लोक अतिशय उपद्रव देत. पूर्वेकडे धूम ठोकून ईजिप्तमध्यें पळून जात . या व इतर अनेक पद्धतींनीं त्यांनीं अगदीं सतावून सोडल्यामुळें या वसाहतीचें काय करावें असें इटॅलियन लोकांना होऊन गेलें. शेवटीं मुसोलिनी जेव्हां सर्वाधिकारी झाला तेव्हां त्यानें आपल्याच वसाहती पुन्हां जिंकण्याचें काम चालू केलें; व इतक्या धडाक्यानें काम चालू केलें कीं सात आठ वर्षांच्या आंत एवढ्या मोठ्या प्रदेशांत जिकडे तिकडे सामसूम होऊन गेलें. विशेषतः सायरेनिका वसाहतींतील कांहीं कांहीं जमाती फारच खटचाळ आणि उडाणटप्पू अशा असत. त्यांना एके ठिकाणीं डांबून टाकावें म्हणून दोनदोनशें मैल लांबीचीं कांटेरी तारांचीं कुंपणें त्यानें त्यांच्या भोंवतीं घातलीं यामुळें या लोकांना कोठें बाहेरही जातां येईना आणि बाहेरची मदत आंत घेतां येईना. इतका उद्योग केल्यावर या लिबियांतून काय निघतें हें इटॅलियन्स पाहूं लागले. त्यांची अगदीं पहिली कल्पना अशी होती कीं २५ वर्षांच्या अव-धींत तीन लक्ष इटॅलियन लोक येथेंच रहिवाशी म्हणून राहातील अर्थात् या योजनेला नुकता आरंभच झाला आहे व म्हणून एकंदर साडेसात लक्ष लोकसंख्येपैकीं केवळ ५०००० च इटॅलियन

आहेत. पण एवढ्या बळावरच, ठिकठिकाणीं विहिरी खांदून एक लक्ष तीस हजार एकर जमीन त्यांनीं पाटाखालीं आणिली आहे; व तेथें झाडांची समृद्धी केलेली आहे. १९३३ पर्यंत तेथें सतरा लक्ष चवेचाळीस हजार ऑलिव्ह झाडें, सोळा लक्ष सात हजार बदामाचीं झाडें, एक कोटी सत्तर लक्ष द्राक्षाचे वेल अशीं फळझाडें तयार झालेलीं असून एकंदर मुलुखांत उद्भिज्य वाढावें म्हणून २० लक्ष इतर प्रकारचीं झाडें लावण्यांत आलेलीं आहेत.

वर जी इरिट्रिया नांवाची वसाहत सांगितली तिचेंही वैभव वाढविण्याचे असेच प्रयत्न चालू आहेत. खुद्द इटॅलियन प्रजा तेथें आणून वसविण्याचें जमत नाहीं. पण कांहीं खनिज पदार्थ काढणें, कॉफी पिकविणें, कपाशी करणें इत्यादि उद्योग चालूच आहेत पण या वसाहतीचा इटॅलियन लोकांना खरा फायदा आहे तो हा कीं उत्तर हबसाणांतील बहुतेक सर्व व्यापार याच वसाहतींतून करणें हबशी लोकांना भाग पडणार आहे. अशा प्रकारें इरिट्रिया, सोमाली लँड व लिबिया या तीन इटॅलियन वसाहतींची हकीगत आहे.

मुसोलिनी याचा असा जोराचा यत्न चालू आहे कीं इटलींतील लहान मुलांचीं मनेंसुद्धां वसाहतींत जाण्याच्या विचारानें भरून जावीं. वसाहती स्थापणें एक वेळ दंडुकेशाहीनें शक्य होईल पण त्या चालविणें फार कठिण असतें. म्हणून त्या कामाला योग्य अशीं माणसें बनविण्याचें धोरण मुसोलिनीनें शिक्षणक्रमांतच गोंवून दिलें आहे. वसाहतींचा इतिहास, त्यांची आर्थिक स्थिति तेथील राज्यकारभार, तेथील भाषा, इत्यादिकांचें शिक्षण देणाऱ्या स्वतंत्र संस्था निर्माण केल्या आहेत. उच्च शिक्षणाच्या अभ्यासक्रमांत सुद्धां "वासाहतिक अभ्यासक्रम" म्हणून एक ऐच्छिक विषय घातलेला असतो. वसाहतींचा उपयोग शेतकीच्या कामाला व तेथील वनस्पतींचा उपयोग औषधांच्या कामाला कसा करतां येईल या संबंधीचे धडे अभ्यासांत घातले आहेत. इटलीच्या ९३ प्रांतांपैकीं प्रत्येकांत एक 'कलोनियल इन्स्टिट्यूट' म्हणून संस्था असतेच; व तेथें वसाहत विचाराचा प्रचार करण्यांत येतो. अनेक नियतकालिकें केवळ याच प्रश्नासंबंधानें लेख लिहीत असतात; आणि व्याख्यानमाला, परिषदा, चित्रपट आणि प्रत्यक्ष दौरे या साधनांनीं लोकांत वसाहतींची गोडी उत्पन्न करण्याची खटपट चालू असते; व असे यत्न जे जे कोणी करतील त्या सर्वांना सरकारांतून मदत मिळते.

पण याच धोरणांतून अबिसिनियाशीं सुरू झालेलें भांडण निघालें आहे. या हबसाणाच्या डोक्यावर इरिट्रिया ही इटलीची वसाहत आहे. पूर्वेच्या अंगाला व दक्षिणेस फ्रेंच सोमाली लँड, ब्रिटिश सोमाली लँड, इटॅलियन सोमाली लँड व इंग्रजांची केन्या कॉलनी अशा आहेत; व पूर्वेस अँग्लो ईजिप्त मालकीचा सूडान देश आहे. याप्रमाणें सर्व बाजूंनीं हा हबसाणाचा राजा अगदीं घेरून गेला आहे. पण त्यांतल्या त्यांत इटॅलियन मुलखाशीं त्याचा संबंध जास्त येतो. कारण त्याला तांबड्या समुद्राकडे किंवा हिंदी महासागराकडे कोठेंतरी तोंड हवें आहे व उलट इटॅलियन लोकांची अशी इच्छा आहे कीं, या हबसाणांत आपला प्रवेश व्हावा व तेथील खनिज पदार्थ व इतर धनें हीं हस्तगत करतां यावींत. याच्या जोडीला अगदीं आरंभीं वर्णन केलेला सेनापती बॅराटिरी याच्या फौजेची हबशी लोकांनीं उडवलेली जी दुर्दशा तिचा खुनसही त्यांच्या मनांत रुतून बसलेला आहे. अपहाराची इच्छा आणि खुनस हीं असलीं म्हणजे मग खुसपटें पुष्कळच सांपडतात. शिवाय हबसाणांतील लोकांनाही शहाणपण, शिस्त व दूरदर्शीपणा हीं अगदीं कमी असल्यामुळें तेही आगळीकी करीत असतात. यांतूनच आतां युद्ध उत्पन्न होण्याचा संभव आहे. परवां एडन हे मुसोलिनीशीं रदबदली करण्यास गेले असतां त्यानें चक्क सांगितलें कीं अबिसिनीयांत शाळा, दवाखाने इत्यादि सुरू करण्यास व एकंदरीनें या हबसाणांची सुधारणा करण्यास आम्हांस हक्क असला पाहिजे. मागासलेल्या देशांची सुधारणा करण्याचा हक्क म्हणजे काय हें एडन याला मुसो-

लिनीनें उलगडून सांगावयास नकोच होतें. कारण इंग्रज लोक हे हाच परकीयांना सुधारण्याचा हक्क बजावतां बजावतां सर्व जगाचे स्वामी झाले, हें त्यास माहीतच आहे. पण खरें अरिष्ट पुढें आहे. अबिसिनीया हें गांवढें राज्य खरें. पण त्याला राष्ट्रसंघांत एक जागा मिळालेली आहे. अर्थात् आतां हा राष्ट्रसंघ आपल्याच एका मेंबराला दगा देतो कां तारून नेतो याचा निकाल जगापुढें लवकरच लागेल.

---

## ९ डगले व राजकारण

५० वर्षांचा राजकीय घडामोडींचा इतिहास जर बघितला तर कांहीं नवीन पक्ष निरनिराळ्या देशांत स्थापन झालेले दिसतील. इतर पक्षांपेक्षां ह्यांचें वैशिष्टय म्हणजे ह्या पक्षांतील लोकांचा एक प्रकारचा पोषाख. सगळ्या पोषाखांत डगला हा महत्त्वाचा गणला जातो. याचें प्रत्यंतर म्हणजे रशियांतील व क्रांतिकारक पक्षाचे तांबडे डगले, फॅसिस्ट पक्षाचे काळे डगले व नाझी पक्षाचे खाकी डगले हें होय.

ह्या डगल्यांच्या कल्पनेचें जनकत्व मुसोलिनीकडे वरवर पाहिलें असतां जाईल; परंतु ह्या कल्पनेचा खरा जनक गॅरिबाल्डी आहे. नेपोलियननें १८५९ मध्यें इटली हें फ्रान्सचें दोस्तराष्ट्र असतांना नाईस शहर फ्रान्सला देऊन जो लांडा कारभार केला त्यामुळें गॅरिबाल्डीनें चिडून एक हजार स्वयंसेवकांचें सैन्य तयार केलें व इटलीला एका राजाच्या छत्राखालीं येण्याचा मार्ग दाखविला. त्याच्या सैन्याचा विशेष म्हणजे तांबडा डगला हा होय. यावरून आपल्याला असें म्हणतां यावयाचें नाहीं कीं पुढें ६० वर्षांनीं मुसोलिनीनें किंवा बोल्शेव्हिकांनीं गॅरिबाल्डीचेंच अनुकरण केलें परंतु एक गोष्ट खरी कीं जे म्हणून नवीन पक्ष निर्माण झाले आहेत ते आपले वैशिष्टय निरनिराळ्या रंगाच्या डगल्यांनीं दाखवितात.

तांबडे डगले:—तांबडें निशाण ही खूण आंतरराष्ट्रीय समाजसत्तावाद्यांची आहे व त्यावरून बोल्शेव्हिकांनीं तांबडा हा रंग आपल्या डगल्यासाठीं घेतला.

फॅसिझमचा उगमः—मुसोलिनीनें ही चळवळ बोल्शेव्हिझमला टक्कर देण्यासाठीं १९१९ सालीं सुरू केली फॅशिस्ति हें नांव एका 'फडके' या अर्थाच्या इटॅलियन शब्दावरून पडलें. ह्या पार्टीला इतकें लोकबळ मिळालें कीं इटली, या पक्षाकडे देशाचा उद्धार करणारा पक्ष, या दृष्टीनें पाहूं लागला. या पक्षाचें वैशिष्टच म्हणजे त्याची चोख व सुंदर व्यवस्था. प्रत्येक सभासद हत्यारबंद असे. लवकरच काळा डगला म्हणजे सत्ता व सुव्यवस्था अशी विचारसरणी लोकांच्या मनांत पक्की बिंबली.

जगामध्यें आतां या नव्या पक्षाच्या विचारांची लाट उसळली. निरनिराळ्या देशांत फॅसिस्ट पक्षासारखे पुष्कळ पक्ष निघाले. त्यांच्या जरी खुणा इ. निराळ्या असल्या तरी मूलभूत तत्त्व एकच आहे. तें म्हणजे इतर राजकीय पक्षांच्या पेक्षां झपाट्यानें काम करणें व काम करण्याचा उत्साह प्रकट करणें. परंतु ह्या सगळ्यांपेक्षां एक गोष्ट प्रामुख्यानें दिसते ती ही कीं हे पक्ष देशांतील तरुण व उत्साही लोकांस लोहचुंबकाप्रमाणें आकर्षून घेते.

सर ओस्वाल्ड मोस्लेनें मुसोलिनीची बरोबर नक्कल इंग्लंडामध्यें सुरू केली. मोस्लेच्या पक्षाचें चिन्ह काळा डगला हेंच आहे. ह्या पक्षाचें वैशिष्टच म्हणजे ह्या पक्षाचें इंग्लंडमध्यें अस्तित्वांत असणाऱ्या पक्षांबरोबर मुळींच साम्य नाहीं.

खाकी डगले ही हल्लीं जगांत प्रसिद्धीस आलेल्या हिटलरच्या तुफान सेनेची खूण आहे. हिटलर १९१९ सालीं जर्मन वर्किंग पार्टीला मिळाला व लवकरच तो त्या पक्षाचा नेता झाला त्याच्या पक्षानें १९२० मध्यें आपलें नांव बदलून 'नॅशनल सोशॅलिस्ट जर्मन वर्कर्स पार्टी' हें नांव घेतलें ह्या पक्षाचें चिन्ह म्हणजे तांबड्या निशाणावर पांढऱ्या वर्तुळांत काळें स्वस्तिक हें होय. त्याचें ध्येय म्हणजे क्रांतिकारकांचा नाश करणें हें होय. हिटलर जेव्हां जेव्हां भाषणें करीत असे तेव्हां तेव्हां त्याचें संरक्षण करण्यासाठीं एक लहा-

नसें पथक असे. १९२२ सालीं ह्या पथकाचें मोठ्या तुकडींत रूपांतर झालें व त्यानें आपल्या नेत्यासाठीं फारच जोमानें चढाई केली व त्यामुळें त्या तुकडीला तुफानसेना हें योग्य नांव मिळालें. १९३४ मध्यें हिटलरचा ह्या सेनेच्या कांहीं पथकांना रजा देण्याचा विचार होता परंतु जेव्हां हीच सेना त्याच्यावर उलटण्याच्या प्रयत्नास लागली तेव्हां त्यानें आपला विचार बदलला व ब्लॅक गार्डसची संख्या वाढविण्यास सुरवात केली तोंपर्यंत ब्लॅक गार्डस हा तुफान सेनेचाच भाग होता.

हिरवे डगले:—हा पक्ष प्रिन्स स्टार्हेमबर्ग यानें आस्ट्रियामध्यें उभारला. त्याचें ध्येय म्हणजे नाझींचा ऑस्ट्रियामधून नायनाट करणें हें होय. हा पक्ष म्हणजे दुसरा फॅसिस्ट पक्ष होय. हा पक्ष हिरव्या डगल्यापेक्षां 'हेमव्हेर' या नावानें प्रसिद्ध आहे

निळे डगले:—ह्याचा नेता जनरल ओडफी हा होय. हा पक्ष म्हणजे आयरिश फ्री स्टेट मधील एक बडें प्रस्थ आहे. त्याचे मुख्य काम म्हणजे डी. व्हॅलेराच्या राज्यकारभारास अडथळा उत्पन्न करणे हें होय.

एकंदरींत बघतां हें जागतिक राजकारणांत डगल्यांचें प्राबल्य वाढत असून तें पुढें असेंच वाढत जाणार असा रंग दिसतो.

---

## १० अमेरिकेंतील शेतजमीन वाऱ्यावर चालली !

कोणच्या देशांत कोणचे प्रश्न उपस्थित होत असतील आणि देशांतील कर्त्या लोकांची बुद्धी त्यांत कशी गुंतून पडत असेल याचें उत्कृष्ट उदाहरण म्हणजे सध्यां अमेरिकेंत शेतजमीन वाऱ्यावर कशी उडत चालली आहे हें होय. पश्चिमेकडील पर्वतांच्या प्रचंड रांगांवरून जे पूर्वाभिमुख वारे येतात त्यांच्यायोगानें शेत जमिनीवरची मोकळी माती भराभर आभाळांत उडून जाते व ती इतकी कीं, मैलोमैल शेतजमिनीच्या हाडें-बरगड्या अगदीं उघड्या पडतात व वाऱ्यावर स्वार झालेली ही माती हजारो मैलांवरील लोकवस्त्यांना उपद्रव देत देत शेवटीं पूर्वेकडील अटलांटिक महासागराच्या तीरावर येऊन खालीं कोसळते. या उडून चाललेल्या मातीचें माप कित्येक कोटी खंडींनीं करावें लागेल अशी स्थिति आहे. ज्या जमिनींतून लक्षावधि रुपयांचा गल्ला शेतकरी आजवर गोळा करीत आले होते त्या जमिनी, वरची सर्व माती उडून जाऊन अगदीं डोळ्यांदेखत आपल्या हातून चालल्या आहेत हें शेतकऱ्यांना प्रत्यहीं दिसत आहे; व ज्या प्रदेशावरून हे धुळीचे लोट पुढें झेपावत चाललेले असतात तेथें कित्येक दिवसपर्यंत सूर्यदर्शनही होत नाहीं, मोटारगाड्या व आगगाड्या या मधेंच बंद पडतात, शाळांतून धूळ शिरूं लागल्यामुळें मास्तर लोक मुलांना घरीं पाठवून देऊन शाळांना कुलुपें ठोकतात, शेतावरचीं गुरेंढोरें फुप्फुसांत माती दाटल्यामुळें मरून पडतात, आणि अगदीं दूरदूरच्या म्हणजे पूर्वेकडील परगण्यांत सुद्धां गांवांवर बारीक पिवळ्या धुळीचें छत झाल्यासारखें दिसतें, आणि खालीं सामान सुमानावर तिचा सारखा थर बसत चाललेला दिसतो. या संकटाचें निवारण कसें करावें याची शहानिशा अमेरिकन सरकार आज कित्येक दिवस करीत आहे म्हणून हा प्रश्न कसा उद्‌भवला व तो नाहींसा करण्याचे सरकार कोणते यत्न करते आहे हें पाहाणें पुष्कळच मनोरंजक होईल.

मूळ युरोपांतून गेलेले जे पिल्ग्रिम फादर्स त्यांनीं आपली वसाहत अतिच अमेरिकेच्या पूर्व किनाऱ्यावरच केली. ते मूळचे समुद्रकांठीं राहाणारेच व संख्येनेंही थोडे म्हणून समुद्र, व ज्या नद्यांतून जहाजांची पुष्कळ ये जा होण्यासारखी होती त्या नद्या, यांच्या आश्रयानेंच ते राहिले. यांची प्रजा हळूहळू वाढूं लागली व युरोपांतूनही उपऱ्या लोकांची आवक फारच झपाट्यानें सुरू झाली. लोक जसे जसे वाढूं लागले तसतसे पश्चिमेकडे पसरूं लागले. तेव्हां त्यांना दोन शत्रू भेटले. एक रेडइंडियन्स् व दुसरा म्हणजे गवा किंवा रान म्हैस. हे नवीन आलेले युरोपिअन लोक अधिक

चांगले लढवय्ये आणि गोळी घालण्यांत पटाईत. त्यामुळें रेडइंडियन्स् व म्हैशासुर हळूंहळूं पश्चिमेकडे हटूं लागले व हस्तगत झालेल्या प्रदेशांत कांहीं ठिकाणीं शेतजमिनी झाल्या व उरलेल्या सर्व जमिनींतील हिरवळीवर यांचीं गुरें चरूं लागलीं. नव्या लोकांची झुंड आली कीं त्यांनीं आणखी पलीकडे जाऊन रेड इंडियन्स् व म्हशी यांचा संहार करावा व नव्या वसाहती कराव्या असा प्रकार कित्येक वर्षें चालूं होता. होतां होतां रेडइंडियन्स् बहुतेक सर्व मरून गेले. म्हैशासुरांचा वंशही बुडाला आणि अगदीं पश्चिमेकडील पर्वतांच्या पायथ्यापर्यंत वसाहतींचें लोण पोहोंचलें. वास्तविक पाहातां या वसाहतवाल्यांच्या संख्येच्या मानानें अमेरिकेंतील जमीन कित्येक हजारपट जास्त असेल पण इतर देशांना धान्य पुरविणें हाहि एक तेथील लोकांचा धंदाच होऊन बसला व त्यामुळें अमेरिकन लोकांच्या निर्वाहास जेवढी जमीन लागावयाची त्याच्या हजारों पट जमीन ते लोक लागवडीस आणूं लागले. दरम्यान वाफेचे नांगर निघाले व अगदीं थोडें माणूसबळ पदरीं असलें तरी तेवढ्या बळावर हजारों एकर जमीन नांगरण्याची उमेद एकेक शेतकरी बाळगूं लागला. पेरणी, कापणी, झोडपणी, मळणी हींहि सर्व कामें यंत्रानेंच होऊं लागलीं यामुळें थोड्या श्रमानें परदेशीं पाठवावयास मोठाच गल्ला काढतां येऊं लागला. सरकारनेंही जमिनी फुकटावारी लाविल्या. ऑस्ट्रेलियांत जसें घोडें तशा अमेरिकेंत जमिनी मिळूं लागल्या. रानांत जावें आणि आपल्याला बरें वाटेल तें तट्टू धरावें म्हणजे तें आपल्याच मालकीचें होतें हा न्याय जसा आस्ट्रेलियांत आजही लागू आहे तसा, पश्चिमेकडे जावें, आपला मगदूर बघून अमुक एका जमिनीभोंवतीं खुंटचा ठोकाव्या, ही जमीन माझी झाली असें म्हणावें व सरकारनें त्याला खुषीनें संमती द्यावी असा प्रकार अमेरिकेंत चालूं होता. महायुद्धाच्या वेळीं तर हा प्रकार बेसुमार वाढला. युरोपांतील सर्व राष्ट्रें युद्धांत गुंतल्यामुळें त्यांना धान्य पुरविण्याचें काम जणूं कांहीं अमेरिकेकडे आलें व त्या राष्ट्रानेंही सोसासोसानें हें सर्व काम अंगावर घेतलें. पण हा पूर्वींपासून चालत आलेला व महायुद्धाच्या वेळीं बेफाम वाढलेला उद्योग आपल्याला अंतीं मारक होणार आहे याची कल्पनाच कोणाला आली नाहीं. बाहेर देशांत जर धान्य पाठवावयास हवें; व भारंभार सोनें मिळवावयास हवें, तर धान्य पिकवावयास हवें व तें जर पिकवावयास हवें तर जमिनी लागवडीस आणावयास हव्या; व जमिनी जर लागवडीस आणावयास हव्या, तर त्यावरची झाडी, रानें, काटेरी किंबहुना शतकानुशतक मूळ धरून राहिलेलें जनावरांनीं चरावयाचें गवत हेंही काढावयास हवें! आणि आश्चर्य हें कीं कसलाही विचार न करितां झाडीपासून गवतापर्यंत सर्व वस्तूंचा उच्छेद करण्याचें काम या उत्साही लोकांनीं कित्येक वर्षदशकें चालू ठेविलें. हे लोक गबर झाले हें खरें पण याच त्यांच्या उद्योगांतून देशावर मोठीच आपत्ति ओढविली.

झाडी तोडण्याचा सपाटा सुरूं झाल्यावर जमिनी अगदीं बोडक्या होऊन गेल्या आणि त्यांच्या मुळांनीं आवळून धरलेल्या जमिनी मोकळ्या होऊन गेल्या. कांटेऱ्याचाही उपयोग असतोच. जमिनी आवळून धरावयास, व जे कित्येक पशुपक्षी देशांतील लोक खात असतात त्यांना घरें करून राहावयास याचा मोठाच उपयोग असतो. पण तें तुटल्यामुळें जमिनी ढिल्या झाल्या आणि खाद्य पशुपक्षी नाहींसे झाले. शिवाय पारधीची हौस बाळगणाऱ्या लोकांना मनुष्यवस्तीच्या आसपास शिकारीला कोठें जागाच उरेनाशी झाली. पूर्वीं रानम्हशी चरत असत; त्या गेल्या व तेथें शेतकऱ्यांचीं गुरें चरूं लागलीं पण गवताच्या मुळ्या कायमच असल्यामुळें जमीन बांधलेलीच राहिलेली होती. या जमिनीची शेतजमीन बनविण्याचा धडाखा सुरूं झाल्यावर वरील सर्व बंधनांचा संहार झाला. आणि उन, पाऊस व वारा यांचे विपरीत संस्कार जमिनीवर होऊं लागले. पिकें निघाल्यावर जमीन उन्हानें तापावी व आणखी ढिली व्हावी. पावसाचे झोतच्या झोत कोसळल्यामुळें नव्या भेगा व नव्या घळी पडाव्या

आणि अशा रीतीनें सैल झालेल्या जमिनीवर एकदां पश्चिमेकडील पठारावरचे जोराचे वारे वाहूं लागले म्हणजे कोटयवधि खंडी सुपीक माती वाऱ्यावर उडून जावी असा प्रकार चालूं झाला. हें संकट कसें निवारावें याचा विचार सध्यां अमेरिकेंत जोरानें चालूं आहे!

एक झाड लावावें आणि मूळचीं चार कापावीं या प्रमाणानें जंगलतोड सुरूं झाली व मग एक अब्ज पन्नास कोटी टन इतकी सुपीक जमीन पाण्याबरोबर प्रतिवर्षीं समुद्रांत वाहून जाऊं लागली. इमारतीचें लाकूड बाहेर देशीं चांगलें खपतें हें पाहून जंगलतोड अधिकच जोरानें सुरूं झाली आणि मग या जमिनीवर पडणारें मुसळधार पाणी शेतजमिनींत घुसावें व ही आणि ती दोन्हीही वाहून जाव्या असा प्रकार सुरूं झाला. टेनेसी खोऱ्यांतील निम्मी शेतजमीन वाहून गेली आहे आणि हिशेबानें असें दिसून आलें आहे कीं, वरचे वरचे थर वाहून गेल्यामुळें ( वा उडून गेल्यामुळें ) लागवडीखालीं असलेल्या जमिनीपैकीं तीन चतुर्थांश जमिनीचा बराचसा मगदूर नाहींसा झाला आहे. मिसिसिपीच्या पूर्व भागांत तर असंख्यात जमिनी, कीं ज्या पूर्वी फार सुपीक, त्या आतां अगदीं उजाड पडल्या आहेत व तीन कोटी पन्नास लक्ष एकर जमीन शेतकीला नालायक बनली आहे. पेनसिल्व्हानिया, मॅसॅच्युसेट्स् आणि केनॅक्टीकट् या परगण्यांतून बारा कोटी पन्नास लक्ष जमिनीवरची सुपीक माती निघून गेली आहे आणि दहा कोटी एकर जमीन अशी लवकरच रोडावत जाणार अशी भीति वाटत आहे. अगदीं परवां परवांपर्यंत दर वर्षीं पंचेचाळीस लक्ष एकर जमीनीवरचें रान किंवा गवत तुटत होतें. अर्थात् या दरानें प्रतिवर्षीं ढिली होत जाणारी जमीन वर दिलेल्या अवस्थेला जाऊन पोहोंचत आहे. बरें, येवढी सगळी जमीन पिकवावी म्हटलें व अशा रीतीनें तिला मुळ्यांचें बंधन कांहीं दिवस तरी उत्पन्न करावें असें म्हटलें तर तेंही शक्य नाहीं कारण पूर्वींइतकें आतां धान्याला गिऱ्हाइक नाहीं. युद्ध संपून गेल्यानंतर जिकडे तिकडे स्थिरस्थावर झाली आणि जो तो देश आपल्या जमिनी पिकवूं लागला. यामुळें एकदां लागवडीस आणलेल्या जमिनीसुद्धां बारमहा उवडया टाकाव्या लागत आहेत. यापुढें ऊन, पाऊस व वारा यांच्या तडाख्यांत सांपडून त्यांची धूळधाण उडत आहे. हजारो शेतकरी लोक "आम्हाला पट्टी देणे परवडत नाहीं. असें म्हणून जमिनी पाडून बसत आहेत. कारण धान्य पिकवावें तर त्याला गिऱ्हाइक नाहीं. जो सरकारी सारा भरत नाहीं त्याची जमीन गट्ट व्हावयाची असते व म्हणून तोही तडाखा सुरूं आहे. एकटया मिसिसिपी परगण्यांत १९३२ च्या पहिल्या नऊ महिन्यांत साठ हजार शेतें सरकारजमा झालीं आहेत. मिचिगन परगण्यांत तीस लक्ष एकर जमीन याच कारणास्तव पडून आहे. फ्लोरिडा परगण्यांत वीस लक्ष एकरची हीच वासलात लागली आहे. अमेरिकेंतील बहुतेक प्रत्येक संस्थानांत हा प्रकार सारखा चालू असून या सरकारजमा झालेल्या जमिनीचें काय करावें हा प्रश्न सरकारपुढें दत्त म्हणून उभा राहिला आहे.

अर्थात् अमेरिका हा प्रयत्नवादी, शूर आणि सज्ञान लोकांचा देश आहे. हें जमिनीचें नुकसान ज्या कारणास्तव झालें तीं कारणें आतां बंद करून तिचें पूर्वीचें वैभव तिला पुन्हां प्राप्त करून दिलें म्हणजे या संकटाचें निवारण होईल असें त्यांच्या मनानें पक्कें घेतलें आहे. आपल्या देशाच्या उदरनिर्वाहांत व थोडीबहुत व्यापारटापाराला जेवढी धान्य जमीन लागेल तेवढी शिल्लक ठेवून बाकीची सर्व तिच्या मूळ स्वरूपाप्रत नेऊन पोहोंचविण्याचें काम आपण सुरूं केलें पाहिजे असा आग्रह तेथील मुत्सद्दी लोक एकमेकांस करीत आहेत. हा प्रश्न इतका महत्त्वाचा झाला आहे कीं नव्या निवडणुकी आल्या म्हणजे प्रत्येक पक्षाचा प्रत्येक वक्ता सभेपुढें गर्जून सांगतो कीं "आपल्या शेतकीची दैना उडाली आहे, आपल्या जमिनी वाहून चालल्या आहेत, आपल्या जमिनी उडून चालल्या आहेत. त्या धरून ठेवण्यासाठीं जे जे इलाज सरकारांतून करावयास हवे ते ते मी निवडून आलों तर करीन असें आश्वासन मी तुम्हाला देतों व म्हणून,

मतदार लोकहो ! आपण मलाच निवडून द्या." ही गर्जना अगदीं म्युनिसिपालिटीच्या निवडणुकीपासून तों तहत प्रेसिडेंटच्या निवडणुकीपर्यंत सर्व उमेदवार देत असतात व सध्यांचे अमेरिकेचे अध्यक्ष जे रूझवेल्टसाहेब त्यांनीं तर आपल्या निवडणुकीच्या धुमाकुळींत या विषयावर खूपच जोर दिला होता. जमिनींना धगळी न पडूं देणें, नद्यांचे पूर थोपवून धरून त्यांचीं पांगापांग करणें, नवीं रानें लावणें, शिकारीस योग्य असे प्रदेश-खंड मुद्दामच हद्दगर्यांत काढणें, मोठमोठालीं प्रचंड उपवनें तयार करणें व चांगल्या चांगल्या झाडांची मैलोमैल लावणी करणें हा कार्यक्रम आतां अमेरिकन सरकार आपल्या डोळ्यापुढें ठेवीत आहे. वाटल्यास सरकारनें जमिनी विकत घेऊन सुद्धां तेथें झाडी लावावी असा उपक्रम सुरूं झाला आहे. न्यू जर्सी, पेनसिल्व्हानिया, मिचिगन व दुसरीं कित्येक संस्थानें यांत वृक्षारोपणाचे सुविस्तीर्ण प्रयोग चालूं झाले आहेत व चार कोट रुपये या कामीं १९३२ पासून मातींत घालावयास सुरुवातही झाली आहे. असो.

याप्रमाणें जमीन संभाळून धरण्याचे प्रचंड उद्योग सुरूं झाले असून पूर्वी केलेल्या चुका पूर्णपणें दुरुस्त केल्याशिवाय अमेरिकन लोक आतां गप्प बसणार नाहींत. चुका करण्यांत जो उत्साह त्यांनीं तेव्हां दाखविला तोच त्यांच्या दुरुस्तीच्या कामीं ते दाखवूं लागल्यामुळें ही वाऱ्यावर उडत चाललेली जमीन पुन्हां स्थिर होईल याबद्दल कोणासही शंका वाटत नाहीं.

---

## ११ निग्रो लोकांचा सवता संसार

आब्राहम लिंकन यानें अमेरिकेंतील निग्रो लोकांची गुलामगिरींतून सुटका केली. या त्याच्या महत् कृत्याचा गौरव पुष्कळच झाला. तथापि आतां या निग्रोंच्या प्रश्नाला निराळेंच रूप प्राप्त होत चाललें आहे. त्यांची गुलामगिरींतून सुटका झाली हें खरें; पण गुलामगिरींत एक गोष्ट कायम होती ती ही कीं त्यांना काम हटकून मिळत होतें. गुलामगिरींतून त्यांना सोडवितांना यांच्या भावी आर्थिक जीवनाची काय व्यवस्था लागेल ही कल्पना त्यांच्या उपकारकर्त्यांना आली नाहीं. देशाच्या सांपत्तिक जुळणींत त्यांची कांहीं एक व्यवस्था लावण्याची पद्धति जर आरंभापासूनच अंमलांत आली असती तर चांगलें झालें असतें. थॅडियस स्टीव्हन्स याच्या ध्यानांत हा प्रश्न आला होता व त्याचें म्हणणें असें होतें कीं या सर्वांना शेतकरी बनवावें. हें धोरण जर अमेरिकेनें तेव्हां पतकरिलें असतें तर पांच कोट एकर जमीन मिळवून ती यांना वाटून द्यावयास हवी होती. पण, इतका खर्च त्यांच्या बंध-विमोचकांस झेपेना व दक्षिणेकडील संस्थानें तर या योजनेला केवळ भामटेगिरी असेंच नांव देऊं लागलीं. पुढें बुकर टी वॉशिंग्टन हा आला. त्याच्या मनानें असें घेतलें कीं आपल्या या सर्व निग्रो बांधवांना गोऱ्यांच्या उद्योगधंद्यांत सामील करून टाकावें. त्यांना धंदेशिक्षण द्यावें व अशा रीतीनें ते चांगले कसबी बनल्यानंतर गोऱ्या लोकांच्या उद्योगधंद्यांत तर ते प्रविष्ट होतीलच; पण, हळूहळू खुद्द त्यांच्यांतूनच लहान लहान भांडवलवालेसुद्धां उत्पन्न होतील. पण ही त्याची योजना अंमलांत येऊं लागल्यावर कांहीं वर्षांनीं त्याचें त्यालाच दिसूं लागलें कीं हें जमण्यासारखें नाहीं. धंदेवाला हा कोठेंही लाथ मारील तेथें पाणी काढील अशी त्याची कल्पना होती, जमीनही स्वस्त होती व उद्योगधंद्याचीं साधनेंही लहान लहान भांडवलवाल्यांच्या हातीं असून त्यांच्या चढाओढींत निग्रो भांडवलवाल्यांना शिरतां येण्यासारखें होतें पण हळू हळू हें सर्व मावळलें. उद्योगधंदे आपलें स्फुट स्वरूप टाकून एकत्र होऊं लागले, जमिनी मोठमोठाल्या मक्त्यानें जाऊं लागल्या आणि घर बसल्या माहीत असलेला धंदा करून पोट भरीन म्हटलें तर नवीन निघालेल्या यंत्रसामुग्रीमुळें हस्तकौशल्याचा महिमा अगदींच मागें पडला. खुद्द गोऱ्या कामगारवर्गाची सुद्धां अगदीं हबेलंडी उडाली. तेथें निग्रो कामगारांना कोण विचारणार!

दरम्यान गुलामगिरी सुटली तरी वांशिक

प्रश्न शिल्लकच राहिला होता व आहे. गुलामगिरी कायद्यानें तोडतां आली पण आपण गोरे लोक आहों व हे शुद्ध काळे आहेत व म्हणून आपण परस्परांचे कोणी नव्हों ही गोऱ्या लोकांच्या मनांतील जाणीव कोणच्याही कायद्याला घालवितां येण्यासारखी नव्हती. तिचा प्रभाव हळू हळू चालू झाला. सरकारनें यांना सोडविलें असेल पण म्हणून आम्हीं यांना आमच्यांतीलच म्हणावें हा न्याय कोठला? असें गोरे लोक आपआपसांत म्हणूं लागले. हा देश आमचा आहे, आम्ही येथले सर्व कष्ट केले आहेत, तर येथील सर्व वैभवें आमचींच असावयास हवींत, असे गोरे लोक मानूं लागले. यांना आम्ही मजूरदार म्हणून आफ्रिकेंतून घेऊन आलों; त्यांच्या मनांत तसें राहावयाचें नाहीं, तर ते आमचे आतां कोण लागतात? अशी विचारसरणी गोऱ्यांनीं पतकरली व या शिद्दी लोकांचा सर्व अमेरिकेभर दुस्वास चालू झाला. कांहीं थोडे विचारी अमेरिकन ही विचारसरणी पतकरावयास अर्थातच नाकबूल आहेत. पण वरचे वरचे थोडेसे लोक सोडले तर सरसकट सर्व अमेरिकन लोक या शिद्यांचा द्वेषच करूं लागले.

ओहिहो, पेनसिल्व्हॅनिया आणि न्यूयॉर्क या टापूंतील गोरे मजूर या शिद्दी मजुरांना जिवें मारीत; किंवा दूर पिटाळून देत. अमेरिकन मजूर चळवळीचें मुख्य ठिकाण जें न्यूयॉर्क तेथें गोरे मजूर या काळ्या मजुरांना कंदिलांच्या खांबांना बांधून फांशीं देत. हें पाऊणशें शंभर वर्षांपूर्वीचें झालें. पण आतांसुद्धां शिद्दी मजुरांची स्थिति कांहीं विशेष चांगली आहे असें नाहीं. गोरा मजूर या शिद्याला बऱ्या प्रकारचें घर मिळूं देत नाहीं, संघ संघ म्हणून जे असतात त्यांच्या कडून या काळ्या मजुरांचें कसलेंही संरक्षण होत नाहीं. इतकेंच काय, आपल्याच संघांत जे काळे मजूर सभासद असतील त्यांना ते आपल्या जागेंत बसूं सुद्धां देत नाहींत. हे गोरे मजूर शिद्दी मजुरांचा अगदीं द्वेष करतात पण, तो ते घाणेरडे आहेत म्हणून नव्हे तर ते काळे आहेत म्हणून. त्यांच्यापैकीं तीन चतुर्थांश लोकांचा मतदानाचा हक्क हिरावून घेतला आहे. पण कोणाही लोकसत्तावाद्यानें या संबंधानें आरडाओरड केली नाहीं. खुद्द सोशॅलिस्ट लोकसुद्धां त्यांना पुढें येऊं देत नाहींत. निग्रो मुलांना शिक्षणाचे संस्कार न होऊं देण्याविषयीं अगदीं पद्धतशीर रीतीनें यत्न चालू असतात. आणि मोठमोठाल्या शिक्षण संस्था सुद्धां स्थानिक अधिकाऱ्यांच्या द्वारां हें पक्षपाताचें धोरण उघड चालू ठेवतात. महिन्यांतून एक दोनदां तरी, ज्यांच्यावर कोणच्याही आरोपाची शाबिती झाली नाहीं अशा निग्रोंना अंगाला पेंड्या बांधून भर चव्हाटयावर जाळण्यांत येतें आणि अधिकारी लोक तिकडे काणाडोळा करतात. एकाद्या माणसाचा पणजोबा शिद्दी होता असें जर कळलें तर त्याच्या अंगीं सर्व तऱ्हेची पात्रता असतांना सुद्धां त्याला मिळावयास हवी ती जागा मिळत नाहीं आणि असें झालें तरी कोणी टीकेचें अवाक्षर सुद्धां काढीत नाहीं. निग्रो लोकांचे धंदे म्हणजे अगदीं हलक्या तऱ्हेचे असतात. वेतन अगदीं थोडें व धंद्याला कसलीच रया नाहीं असलेंच जिणें निग्रोंना जगावें लागतें. दक्षिणेकडील संस्थानांतील शिद्दी लोकांच्या खेडेगांवच्या सर्व शाळा केव्हांच बंद पडल्या आहेत. आणि शहरच्या शाळांतून त्यांच्या मुलांची गर्दी होत आहे. कांहीं थोडें कोठें काम असलें तर तें गोऱ्या मजुराला देण्याची प्रवृत्ति सरसहा आहे. शिद्दी कितीही वाकबगार असो त्याला रेल्वेसंघाचे सभासद होतां येत नाहीं. एंजिनीयर, फायरमन, कंडक्टर, स्विचमन, ब्रेकमन, यार्डमन, यांपैकीं कोणचीही जागा त्याला मिळत नाहीं. बरें, त्यांनीं निराळे संघ काढावे, तर त्यांना इतर संघवाले चोपून काढतात. रेल्वे, रस्ते, टेलिफोन, टेलिग्राफ, रेडिओ इत्यादि धंद्यांतसुद्धां कितीही वाकबगार शिद्दी असला तरी त्याला चुकून एकादे वेळीं प्रवेश मिळतो. अशी सध्यां निग्रो लोकांची स्थिति आहे. त्यांचे जुन्या वळणाचे जे पुढारी आहेत ते म्हणतात कीं हें असें आणखी कांहीं काळपर्यंत चालावयाचेंच. आपण अशीच तुरमुंडी देत राहिलें पाहिजे. हळूहळूं या सामान्य गोऱ्या लोकांना हें समजूं लागेल कीं असें करणें हा वेडेपणा आहे व मग ते आपो-

आप वळणावर येतील. पण, वर दिलेल्या आर्थिक व सामाजिक बहिष्कारामुळें निग्रो लोकांत एक नवीन विचार बळावत चाललेला आहे. तो असा:—

या नव्या विचाराचे शिद्दी प्रतिपादक म्हणतात कीं, आपली ही जी हीन स्थिति आहे तीच आपल्याला उपकारक बनविली पाहिजे. आज अमेरिकेंत चार कोट लोकांना मतदानाचा हक्क आहे. त्यांपैकीं निदान वीस लक्ष मतदार शिद्दी आहेत आणि हळूहळू ही त्यांची संख्या वाढतच जाणार आहे. उत्तरेकडील शहरच्या वस्तींत गोऱ्या लोकांच्या पक्षोपपक्षांच्या भांडणांत आपल्या ह्या मतदार संख्येचा आपल्याला पुष्कळच फायदा होण्यासारखा आहे, म्हणजे असें कीं जो आपला कांहीं लाभ करून देईल त्या पक्षाला आपलीं मतें द्यावयाचीं. २८ लक्ष निग्रो कुटुंबें आहेत व यांना १६ कोटी ६० लक्ष डॉलर्सचें सामानसुमान दरमहा लागतें. हें सामानसुमान आपलें आपणच पुरवावयाचें किंवा आपल्याला वाटेल त्याच्याकडूनच घ्यावयाचें. अशा सारखा एखादा बौद्धिक दंडक आपण उत्पन्न केला तर गोऱ्या लोकांनीं चांगलाच पेच बसेल. आपली मजूरसंख्याही मेक्सिको किंवा युगोस्लॅव्हिया येथील मजुरांच्या इतकीच दांडगी आहे. आपल्यांत इटली किंवा स्पेन येथील प्रजांपेक्षां साक्षरतेचें प्रमाण जास्त आहे व आपलें दर माणशीं उत्पन्न जपानांतील दरमाणशीं उत्पन्नाच्या बरोबरीचें आहे. हें जें आपलें सामर्थ्य आहे याचाच आपण उपयोग करून घेतला पाहिजे. याच्या जोडीला, भल्या अमेरिकन लोकांच्या देशाभिमान बुद्धीला व भूतदयेला आवाहन करून जें काय पदरांत पाडून घेतां येईल तें घ्यावेंच. एवढी तयारी ज्या एका प्रचंड लोकसमूहाची आहे त्यानें केवळ हातपाय पांघरून बसावें आणि आपला गोरा दादा आपलें भलें केव्हां करील तेव्हां करील अशी वाट पहात राहावें हें शुद्ध बैलोबासारखें आहे. या जुन्या पुढाऱ्यांना वाटतें कीं या वंशकल्पनेकडे आपण पाहूंच नये. ती गोऱ्यांच्या मनांत असली तरी आपण तिकडे ढुंकून पाहूं नये म्हणजे त्यांच्या मनांतून ती हळूहळू जाईल. दुसराही एक विचार त्यांच्या मनांत आहे त्यांना वाटतें कीं, या एक कोटी वीस लक्ष शिद्यांपैकीं जे कोणी चांगले शिक्षित होत राहातील, संपत्तिमान होतील, व सुसंस्कृत होतील ते सगळे. या शिद्दी सवंशीयांतून बाहेर पडून सरसकट अमेरिकन लोकांच्या जीवितांत कायमचे प्रविष्ट होतील व जे कोणी शिद्दी ही सामाजिक उत्कर्षाची कष्टाची चढण चढत राहण्याचें नाकारतील ते सध्यांच्याच खातेऱ्यांत राहातील व कांहीं दिवसांनीं मरून जातील.

हे जे वर सरकणारे शिद्दी आहेत त्यांच्या संबंधानें मागें रेंगाळत राहिलेला जो त्यांचा बहुसंख्य वर्ग त्याला मोठीच असूया वाटते. पण, जे वर चालले आहेत त्यांना वाटतें कीं, जर आपण मागें राहिलेल्यांसाठीं मागली ओढ खाऊं व त्यांच्या उद्धाराची खटपट सुरू करूं तर आपण पुन्हां त्यांच्यांतच मिसळून जाऊं. पण ही फुटीरपणाची कल्पना नव्या पुढाऱ्यांना मान्य नाहीं. त्यांना वाटतें हे लोक भोळे आहेत. हे गोऱ्या लोकांत केव्हांही कायम व्हावयाचे नाहींत आणि त्या मृगजळाच्या नादीं लागून आपल्या बहुसंख्य बांधवांना मात्र हे कायमचे खितपत ठेवतील. त्यांचें म्हणणें असें आहे कीं, आपणा सर्व शिद्दी लोकांचें आपण एक पोट राष्ट्र बनवूं. शिद्दी शेतकऱ्यांनीं शिद्दी कारूनारूंनाच कामें द्यावीं. शिद्दी धंदेवाल्यांनीं शिद्यांना घरगुती धंदे चालते करून द्यावेत. शिद्दी विचारवंतांनीं हें शिद्दी सहकार्याचें वैचारिक वळण त्यांच्यांत कायम करावें. शिद्दी नाटककारांनीं याच विषयावर नाटकें लिहावींत व त्यांतील वस्तुगत सौंदर्य खुलवून दाखवून शिद्दी लोकांचें जीवित रमणीय करावें. आपण असें स्वखुषीनेंच बाजूला राहिलों तर आधीं असलेला आर्थिक व सामाजिक बहिष्कार अधिकच दुणावेल; असा कोणी आक्षेप घेतला तर हे नवमतवादी म्हणतात कीं, 'होय, तसा बहिष्कार पतकरलाच पाहिजे; व पतकरला तरच आपल्याला आपली उन्नति करून घेतां येईल आपलें शिक्षण आपणच संभाळलें पाहिजे, तरच आपल्या मुलांना काय शिकवावें हें आपल्याला

ठरवितां येईल व म्हणून आपल्यासाठीं कोणीं सवत्या शाळा घातल्या व आपल्या मुलांना गोऱ्या शाळेंत येऊं दिलें नाहीं तर तें बरेंच आहे असें मानिलें पाहिजे. या आपल्या धोरणाचा प्रथम प्रथम थोडा बोभाटा होईल पण तो तसा झाला तरी चालेल. तसेंच गोरे लोक सांगतील कीं हें नवें धोरण तुम्ही आखा; पण तुमच्यांतील कांहीं चार दोन माणसें सोडलीं तर हें धोरण व्यवहारांत उतरविण्यास जो वकूब लागतो तो तुम्हांपाशीं नाहीं. आमच्या या गोऱ्या राष्ट्राच्या पोटांत हें काळे-राष्ट्र उभें करावयाचें म्हणजे जळांत राहून माशाशीं वैर करण्यासारखें आहे; याला पुढारी धूर्त असवयास हवेत, संघटना फार युक्तीनें केली पाहिजे व सर्वांच्याही वर म्हणजे तुमच्या अंगीं संयम फार मोठा असला पाहिजे. आमची खात्री आहे कीं, यापैकीं एकही गुण तुम्हां लोकांच्या अंगीं नाहीं यावर नवमतवादी इतकेंच सांगतात कीं, हे गुण आम्ही स्वतंत्र ख्रिस्तीधर्मपीठ संघटित करून सर्व जगाला दाखविले आहेत. आमच्या स्वतंत्र शाळा हजारोंनीं चालविल्या आहेत. आणि किरकोळीनें व्यापार करण्याची प्रथा आम्ही मोठीच पाडिली आहे. या कामांत आम्हाला प्रचंड यश मिळालें आहे. तर [illegible]रील कामें याच गुणांच्या बळावर आम्हाला यशस्वी करून दाखवितां येतील. अजून अडचण आहे ती ही कीं निग्रो लोकांतील खरे बुद्धिमान व विचारी लोक संघटित होत नाहींत. ते झाले म्हणजे या अमेरिकन लोकांच्या गोऱ्या राष्ट्राच्या पोटांत आमचें काळ्या लोकांचें एक स्वतंत्र पोट राष्ट्र आम्ही बनवून दाखवूं व दाखविलें तरच आम्हा शिद्दी लोकांना इहलोकीं जगतां येईल; नाहीं तर मरण वाढून ठेवलेलेंच आहे.

---

## १२ मेक्सिकोंतील धर्म मरावयास टेपला

सोशॅलिझमची लाट सर्व पृथ्वीवर पसरणार हें स्पष्ट दिसतें. त्याच्या मूळ तत्त्वांची अम्मलबजावणी जशीच्या तशी सर्वत्र होणार आहे असा याचा अर्थ नाहीं. पण दास्यांतून मुक्त होण्याला जें एक नवें वारें उत्पन्न व्हावयास लागतें व ज्याचा उपयोग त्या त्या देशाचे लोक आपल्या पचनीं पडेल त्या पद्धतीनें करून घेतात, तें वारें सर्वत्र सुटलें आहे हें खरें. मेक्सिको देशांत या तत्त्वास अनुसरून मोठी राज्यक्रांति झाली व कांहीं एक नव्या तऱ्हेचा बनाव तेथें बनून राहिला या बनावां-तच रशियांतल्याप्रमाणें धर्म बुडविणें ही एक कल्पना आहे. या देशांत रोमन कॅथॉलिक पंथाची मोठीच चलती आहे. अर्थात् तेथील सध्यांची शासनसंस्था या धर्मावर हत्यार धरून उठली आहे. अगदीं अलेक्झांडरच्या वेळेपासून सगळ्या धूर्त व कर्त्या माणसांना हें कळून चुकलें आहे कीं एकादी गोष्ट जर लोकांत कायम करावयाची असेल तर तिची शिकवण लहान मुलांनाच सुरूं करावी. अर्थात् हा आपला हेतु कोणी उघडपणें बोलून दाखवितात व कोणी दाखवीत नाहींत. गत वर्षीच्या शेवटीं शेवटीं मेक्सिकन कॉंग्रेसनें ठराव केला कीं आपल्या राज्यांतील राज्यघटना ही कायमची सोशॅलिस्ट पंथाची व्हावी म्हणन शाळेंतील शिक्षणांतच या तत्त्वज्ञानाची शिकवण अंतर्भूत करावी. तिनें पुढें असेंही ठरविलें कीं शिक्षण हें सर्वस्वी सरकारच्या ताब्यांत असावें; कोणी एकाद्या खाजगी संस्थेनें हा शिक्षणाचा उद्योग हातीं घेतला तर सरकारची परवानगी तिनें मिळविली पाहिजे. सर्व मुलांना प्राथमिक शिक्षण हें सक्तीचें व मोफत देण्यांत येईल व हें काम सरकारच करील; अभ्यासक्रम ठरविण्याचें काम सरकारच्या हुकमतीखालींच चालेल; धर्मोपदेशकांनीं किंवा धार्मिक संस्थांनीं या शिक्षणाच्या कामीं प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्ष अशी कसलीही ढवळाढवळ करतां कामा नये व हें शिक्षण सोशॅलिस्ट मतपंथाचें असावें आणि त्याच्याशीं धार्मिक तत्त्वांचा कसलाही संबंध असतां कामा नये.

या ठरावामुळें देशांत मोठीच खळबळ उडाली. खुद्द कॉंग्रेसच्या सभासदांतच एकमत होईना. शिक्षण सोशॅलिस्ट पंथाचें असावें याबद्दल अर्थातच मतभेद नव्हता. पण हें शिक्षण अगदीं लहानपणापासून द्यावें कीं विद्यार्थ्यास थोडें कळूं लागल्या

वर द्यावें याविषयीं मात्र मतभेद होता. पण कॉंग्रेस सोडली तर बाहेर मात्र हा मतभेद अगदीं निराळ्या मुद्यावर आणि सर्व देशभर माजून राहिला. सरकारच्या ह्या नव्या उपक्रमाला विरोध करण्याचें काम देशांतील सर्व कॅथोलिक पंथीय संस्थांनीं व विद्यार्थीमंडळांनीं सुरू केलें. तसेंच "देशांतील मातापितरांचा संघ" या नांवाची जी एक संस्था नुकतीच निघाली तिनेंही हें विरोधाचें काम जोरानें चालू केलें. या सर्वांचें म्हणणें असें कीं सरकारच्या या उपक्रमानें आमच्या नैतिक कल्पनांना व आमच्या मुलांच्या कोंवळ्या मनांना अगदीं प्राणान्तक आघात होणार आहे. तसेंच यामुळें आमच्या कुटुंबसंस्थेवरही घाला पडणार आहे व आमचा खाजगी मिळकत करण्याचा हक्कही यामुळें धुळीस मिळणार आहे. याचा अर्थ स्पष्ट असा कीं, या आक्षेपकांना सोशॅलिस्ट तत्त्वज्ञानच सर्वथा अमान्य आहे. त्यांनीं आपला आक्षेप केवळ कागदोपत्रीं नमूद करून ठेवला असें नव्हे तर ज्याला ज्याला म्हणून कांहीं थोडें विवेकबळ उरलें आहे त्यानें त्यानें आपल्या मुलांची बौद्धिक, नैतिक व सामाजिक वाढ संपूर्ण व्हावी म्हणून प्राण खर्चीं घालूनसुद्धां झगडत राहावें असें त्यांनीं आपल्या अनुयायांना सांगितलें. विरोधकांची ही उचल पाहूनसुद्धां सरकारनें जाहीर केलें कीं या धर्मविरुद्ध शिक्षणाची अंमलबजावणी सर्व दुय्यम प्रकारच्या शिक्षणसंस्थांतून लवकरच सुरू होईल. सरकारची ही घोषणा होतांच विरोधकांच्या चळवळीला जास्त स्पष्ट रूप येऊं लागलें. प्युब्ला येथें सरकारनें एक कॅथोलिक शाळा जप्त केल्याबरोबर शाळेचे विद्यार्थी व कित्येक हजार कॅथोलिक लोक यांची पोलिसांशीं दोन दिवसपर्यंत मारामारी झाली. मॉंटेरी परगण्यांतील युनिव्हर्सिटी अधिकाऱ्यांनीं बंद केल्याबरोबर अशाच मारामाऱ्या झाल्या. पुढाऱ्यांना देशांतून हद्दपार करण्यांत आलें. झॅकॅटेकास युनिव्हर्सिटीच्या विद्यार्थ्यांनीं सरकारी वर्तमानपत्राच्या कचेरीवर दगडफेक केली. खुद्द मेक्सिको शहरीं असलेल्या शिक्षणाला विरोध करणारांच्या शहरांतून मिरवणुकी निघाल्या तेव्हां पोलिसांनीं "फुस-बॉंब" त्यांच्यावर फेकले आणि आगी विझविण्याच्या नळांतून त्यांचे अंगावर पाणी सोडलें व अशा रीतीनें त्यांची दाणादाण केली. लोकांची ही प्रवृत्ति पाहतांच प्रेसिडेंट रॉड्रीग्ज यानें फर्मान काढलें कीं, अतःपर दंगे करणारांस कडक शासन होईल. लवकरच चेंबर ऑफ डेप्युटीजनें अध्यक्षाला विनंति करून अधिकार दिला कीं, मेक्सिकोंतील सर्व बिशप्स् आणि आर्चबिशप्स् यांना देशांतून घालवून द्यावें. याप्रमाणें अंमलबजावणीलाही सुरुवात झाली. कोलिमांतील दोन देवळें बंद करण्यांत आलीं. गुरेरो येथील सर्व कॅथोलिक उपाध्यायांना तीन दिवसांचे आंत परगणा सोडून जाण्याची ताकीद मिळाली, चिबाबा शहरांत उपाध्यायांची अशीच स्थिति झाली झॅकॅटेकास परगण्यांतील शहरें, रस्ते व इतर ठाणीं यांना पूर्वीं मिळालेलीं कॅथोलिक संतांचीं नांवें रद्द करून दुसरीं ठेवण्यांत आलीं. चिबाबा परगण्यांतील अधिकाऱ्यांनीं कॅथॉलिक उपाध्यायांना उपाध्येपणाचें काम करण्याची बंदी करून टाकिली. याप्रमाणें कॅथोलिक पंथाच्या लोकांवर सरकारनें जिकडून तिकडून गहजब सुरू केला. पण खरें लोकमत आपल्याच अंगाला आहे हें दर्शविण्यासाठीं मेक्सिको शहरांत चालू धोरणास अनुकूल असलेल्या अशा दोन लक्ष स्त्री-पुरुषांची सरकारच्या उठावणीनें मिरवणूक काढण्यांत आली. हे सर्व लोक "कॅथॉलिक मरोत", "सोशॅलिस्ट शिक्षण म्हणजे कॅथॉलिकांच्या तावडींतून मुक्तता होय" अशा सारख्या आरोळ्या ठोकीत चालले होते. सरकारनें लवकरच कायदा केला कीं, ज्या खाजगी इमारतींतसुद्धां धार्मिक समारंभ होतील त्या इमारती सरकारजमा होतील. इकडे प्रेसिडेंट साहेबांनीं कागदपत्रांची जमवाजमव करून असें सिद्ध करण्याचा घाट घातला, कीं सरकारच्या या नव्या धोरणाविरुद्ध धडधडीत बंड करण्याचा धर्मोपदेशकांचा इरादा आहे व याप्रमाणें सरकारी वकिलानें पोपचा मेक्सिको देशांतील जो अधि-

कारी त्याच्यावर आरोप ठेविला. या अधिकाऱ्यानें असें स्वच्छ जहीर केलें होतें कीं, जो कोणचा कायदा आमच्या धार्मिक हक्कांच्या आड येतो, आमच्या मुलांचें शिक्षण नासवितो व आमच्या खाजगी मिळकतीही हिरावून नेतो तो कायदा अन्यायाचा आहे आणि त्याला कसलेंही प्रामाण्य नहीं. धार्मिक पुढाऱ्यांचीं या बाबतींतील धोरणें स्पष्टच आहेत. ते म्हणतात कीं तुम्हाला सोशॅलिझम शिकवावयाचा तर तो शाळेंतच कां शिकवितां ? त्यांना असें वाटतें कीं आजच्या या धर्मविरोधी सोशॅलिझममधून अगदीं धादांत नास्तिक्य पुढें उपस्थित होणार आहे. आणि असें त्यांना वाटूं लागावयास सरकारचीं कृत्येंच कारणीभूत झालीं आहेत. सर्व देवस्थानचीं उत्पन्नें सरकारनें घेतलीं आहेत. कोणच्या परगण्यांत किती उपाध्ये असावे हें ठरविण्याचा हक्क आपणाकडे घेऊन अशा रीतीनें त्यांनीं उपाध्यायांची संख्या हटवीत नेली. कोठें कोठें तर एक लक्ष लोकांना एकच उपाध्याय अशी स्थिति करून सोडली. अर्थात् यावरून आपला धर्म नष्ट करण्याचेंच सरकारचें धोरण आहे हें त्यांना उत्तम कळून चुकलें आहे व म्हणून हे आकाशपाताळ एक केल्याशिवाय सोडणार नाहींत असें दिसतें.

मेक्सिको हा स्वतंत्र देश असेल पण कॅथॉलिक धर्म हा कांहीं मेक्सिकोपुरताच नाहीं. सर्व जगभर त्याचा प्रसार आहे आणि मेक्सिकोची बडी शेजारीण जी अमेरिका तिच्या घरींही या धर्माची बरीच चलती आहे. व रोम येथें या पंथाचें मुख्य आचार्यपीठ आहे. आपल्या धर्मबांधवांचा मेक्सिकोंत चाललेला हा छळ पाहून तेही मधून मधून चवताळून उठत आहेत आणि त्यांच्या गरकावणीला थोडातरी मान दिलाच पाहिजे असें खुद्द मेक्सिकोंतील अधिकाऱ्यांसही वाटत आहे. पण मेक्सिकोंतील राजकारणांत इतक्या उलथापालथी चालूं आहेत व इतके पक्षोपपक्ष निघाले आहेत कीं, राजकारणाचीं जीं धोरणें आज निश्चित करावीं तीं उद्याला टिकून राहतीलच असें मुळींच नाहीं. रशियांत सोशॅलिझम प्रबळ झाल्याबरोबर त्याचें लोण मेक्सिकोपर्यंत पोहोंचलें व त्या मताच्या माणसांनीं तेथें मोठीच क्रांति घडवून आणिली. इकडे युरोपांत सोशॅलिझमच्या मागोमाग फॅसिझम व नाझीझम् हे प्रबळ पंथ निघाले तेव्हां त्यांच्याही लाटा मेक्सिकोपर्यंत जाऊन पोहोंचल्याच. सोशॅलिझमच्या झोतापुढें जे लोक हातपाय गाळून बसले होते त्यांनीं हीं नवीन तत्त्वज्ञानें येऊन पोहोंचतांच नवें बळ धरलें आणि आतां अशी स्थिति उत्पन्न झाली आहे कीं, मेक्सिकोंत आणखी एकादी क्रांति होणार कीं काय? हे जे फॅसिस्टस् किंवा नाझी लोक त्यांना रोमन कॅथोलिक पंथाचें मुळींच वावडें नाहीं. किंबहुना इटली व जर्मनी येथील हे सर्व राजकीय मतपंथवाले रोमन कॅथोलिकच आहेत. अर्थात्ज्या रोमन कॅथोलिक लोकांवर मेक्सिकोंत येवढा महजब चालू झाला त्यांना, फॅसिझम व नाझीझम् असे राजकीय पंथ तेथें उत्पन्न होतांच नवा उत्साह प्राप्त झाला आहे आणि स्वधर्मरक्षणासाठीं सरकाराशीं सारखें झगडत राहण्याची नवी उमेद त्यांनीं धरिली आहे.

---

## १३ बोलिव्हिया व पॅरॅग्वे यांची झोंबी

दोन वर्षें झालीं; हीं दक्षिण अमेरिकेंतील छोटीं राष्ट्रें अगदीं प्राणान्तक युद्धांत गुंतलीं आहेत. वास्तविक पाहतां यांचीं सैन्यबलें लहानच आहेत पण पुन्हां पुन्हां नव्या फौजा उभारून तीं एकमेकांवर जाऊन पडत आहेत. या दोन देशांच्या मध्यें 'ग्रॅनचॅको' नांवाचा सुमारें एक लक्ष चौदा हजार चौरस मैल विस्ताराचा एक प्रदेश आहे. म्हणजे सरासरी मानानें तो आपल्याइकडील संयुक्त प्रांताएवढा आहे. या प्रदेशांत तुरळक तुरळक वस्ती आहे. पण इमारतींच्या लाकडांचीं अरण्यें व इतर वन्य पदार्थ यांची सुबत्ता असून शिवाय पेट्रोलिअम् पुष्कळच सांपडतें. अर्थात् या दोन्ही देशांना त्यांचा लोभ आहे. दुसरेंही एक कारण आहे. बोलिव्हिय देशाला समुद्रावर तोंड

कोठेंच नाहीं. पूर्वी पॅसिफिकच्या किनाऱ्यापर्यंत त्याची व्याप्ती होती व म्हणून सर्व व्यापार तिकडून सुयंत्र चालत असे. पण चिली देशाचें व याचें पन्नास वर्षांपूर्वी जें एक युद्ध झालें त्यांत याचा पराभव झाला व चिलीनें याचा पॅसिफिकवरील मुलूख जिंकून घेतला. तेव्हांपासून बोलिव्हियन व्यापाराची थोडी कुचंबणा चाललेली आहे. बोलिव्हिया देशाला आग्नेयीच्या अंगास पॅरॅग्वे हा शेजारी आहे. या पॅरॅग्वेंतून पॅरॅग्वे ही विशाल पात्राची नदी वाहते. तीच पुढें अर्जेन्टिना देशांत शिरून 'डोंगरमाथ्यावरील नदी" या नांवानें प्रसिद्ध असलेल्या पाणखोऱ्यांत उतरते व या खोऱ्यांत जमा होणारें अनेक नद्यांचें पाणी शेवटीं दक्षिण अटलांटिक महासागरास जाऊन मिळतें. पॅसिफिककडून व्यापार चालत नाहीं तर अॅटलांटिकमधून चालावा अशी बोलिव्हियाची इच्छा आहे. तेथें पोंचावयाचें तर यावरील नद्यांतून खालीं उतरतां आलें पाहिजे व त्यांतील मुख्य नदी जी पॅरॅग्वे ती तर पॅरॅग्वेंतूनच मुख्यतः वहाते.

म्हणून या नदीचा आपणाला उपयोग व्हावा अशासाठीं बोलिव्हियानें ही कुरापत काढली आहे. बोलिव्हियानें कुरापत काढली खरी पण युद्धाला तोंड लागल्यानंतर त्याला कळून आलें कीं आपला शेजारी आपल्याहून लहान खरा. पण मोठा मर्द आहे. त्याची फौज अगदीं जय्यत राखलेली, आणि आधुनिक शस्त्रास्त्रांनीं सुसज्ज अशी आहे. वर्षभर या दोघांनीं खूपच मारामारी केली. इतर देशांतून दारूगोळा,शस्त्रास्त्रें यांचीही भरती होऊं लागली. राष्ट्रसंघानें चवकशीमंडळ नेमलें व राष्ट्रसंघाचे सभासद असून जे कोणी या भांडखोरांना हत्यारें पुरवितात त्यांना ठपका दिला. थोडे दिवस हा पुरवठा बंद पडला पण येवढें गिऱ्हाइक लाभलें असतां त्याला माल देऊं नये असें म्हणण्यांत काय मतलब ! असा विचार करून शेजारच्या राष्ट्रांनीं हत्यारें पुरविण्याचें काम चालू केलें. पुन्हां युद्धाला जोरानें तोंड लागलें. शेवटीं बोलिव्हिया हैराण झाला. समेट करून द्यावयास राष्ट्रसंघ तयार झाला. पण पदरीं पडत असलेलें यश हें आतां आपल्यापासून हिरावून घेतील असें पाहून पॅरॅग्वेनें त्याचें म्हणणें धुडकावून लावलें व संघांतून आमचें नांव कमी करा असें कळविलें. उभय देशांतील तरुणलोक हजारोंनीं मरूं लागले व म्हणून हा अनर्थ थांबविण्यासाठीं पेरु, चिली, युराग्वे, ब्राझिल, व अर्जेटिना या देशांनीं मध्यस्थी करावी अशी विनंति राष्ट्रसंघानें त्यांना केली पण हे दोघे आमचें ऐकत नाहींत असें त्यांनीं कळविलें. दरम्यान युद्धाचा रंग थोडा पालटला. बोलिव्हिया जो अगदीं हैराण झाला होता तो सावरला व पॅरॅग्वेचे पराभव होऊं लागले. यामुळें तहाची भाषा पतकरण्यास बोलिव्हिया तयार होईना. होतां होतां परवां अशी स्थिति झाली कीं दोघेही अगदीं दमले. अजूनही एकमेकांचा पुरता घात करावयाचें त्यांच्या मनांत आहे. पण कोणाच्याच दंडांत बळ नाहीं असें झालें आहे. यामुळें दोघेही गुरगुरत आपआपल्या ठिकाणीं पडून आहेत. आतां कोणी तरी मध्यस्थी केली तर ती यशस्वी होण्यासारखी आहे. सध्यां तरी भोंवतालच्या राष्ट्रांनीं उभयतांकडून "युद्धतहकुबी" ला कबूली घेतली आहे. जर कां दोघांपैकीं एकाला पुन्हां रग वाटूं लागली तर हा झगडा आणखी चालू होणार यांत शंकाच नाहीं.

## १४ फिलिपाइन बेटांतील मोरो लोकांचें दुखणें

फिलिपाइन बेटांतील लोकांना स्वातंत्र्य द्यावयाची अमेरिकन सरकाराची इच्छा प्रसिद्धच आहे. पण ही इच्छा फलद्रूप होण्याच्या मार्गांत एक चमत्कारिक प्रश्न अगदीं अजगरासारखा आडवा पसरलेला आहे. आजवर निरनिराळे वंश किंवा वंशखंड निरनिराळ्या कारणास्तव जगतावर फिरत राहिलेले आहेत; व तेथें त्यांनीं वस्त्याही केल्या आहेत. एकाच देशाला चिकटून राहण्याच्या ऐवजीं श्रमसाहस करून पोटाला मिळविण्याचा हा उद्योग त्यांनीं केला, याबद्दल त्यांचें आजवर सर्वांनीं कौतुकच केलेलें आहे पण आतां या लोकसत्तावादाच्या काळांत तें पूर्वींचें

कौतुक त्यांच्या वाट्याला येईल असें दिसत नाहीं. निरनिराळ्या वंशखंडांच्या या भ्रमंतीमुळें व वस्तीमुळें एकाच लहानग्या देशांतसुद्धां नानाप्रकारचे लोक शेजारीं शेजारीं आलेले दिसतात. आतां लोकसत्ता स्थापित होण्याचा मोसम सर्वत्र असल्यामुळें त्यांतल्या त्यांत लोकसंख्येनें जे जास्त असतील ते इतरांवर राज्य करणार त्यांच्यांत व इतरांत मूळचेंच हाडवैर असलें तर या नवीन राज्यपद्धतीच्या साहचानें हे आतां इतरांवर चांगलाच सूड उगवतील अशी अल्पसंख्याकांना भीति उत्पन्न झाली आहे. कोणी अल्पसंख्यांक लोक केवळ आपला जास्त फायदा व्हावा म्हणून या भयाचा मुद्दामच कांगावा करीत असतील पण कांहीं ठिकाणीं हें भय खरेंही असण्याचा संभव असतो. फिलिपाइन बेटांतील अल्पसंख्य लोक जे मोरो त्यांचें भय कदाचित खरें असावें. त्यांच्या या राजकीय दुखण्याचीं लक्षणें पुढें दिल्याप्रमाणें आहेत. हे मोरो लोक हिंदुस्थानांतील जे हिंदुमुसलमान यांचे पूर्वीच्या काळीं समुद्रावर इतस्ततः भटकत होते त्यांचेच वंशज असावेत असा लोकांचा तर्क आहे. स्पॅनिश लोकांनीं हे मूरवंशीय असावेत या कल्पनेनें त्यांना 'मोरो', 'मोरो' म्हणण्यास सुरुवात केली; व आतां त्यांचें तेंच नांव कायम झालें आहे. हे मोरो लोक आतां मुसलमानी धर्माचे असून स्वभावानें चांगले कडवे आहेत. फिलिपाइन बेटावर जेव्हां यांनीं वस्ती केली तेव्हां तेथील जे अगदीं मूळचे उघडे नागडे लोक होते त्यांच्यामागें हे अगदीं लांडग्यासारखे लागले. झोडपीत नेऊन कोठें तरी डोंगरकठडीला त्यांनीं त्यांना नेऊन घातलें. व खालच्या चांगल्या प्रदेशाचा आपण कबजा घेतला व तेथें राहून त्यांनीं आपला चांचेपणाचा धंदा चांगलाच सुरू केला. पाळत राखून जमेल तेव्हां ही समुद्रचोरी करावी व एरवीच्या वेळीं स्वस्थ चैनींत दिवस काढावे हाच त्यांचा धंदा झाला. कांहीं थोडें विणकाम करणें, धातुकाम करणें, लांकडावर नक्षी काढणें व समुद्रांतून मोत्याचे शिंपले बाहेर काढणें असेही कांहीं धंदे हे करीत. याप्रमाणें बरीच दिवसगत झाल्यावर स्पॅनिश लोकांची वरदळ त्यांच्या बेटांत सुरू झाली. पण या स्पॅनिश लोकांना त्यांनीं दाद दिली नाहीं. याच बेटांत जे इतर अनेक लोक होते त्यांच्यांत ख्रिस्ती धर्माचा प्रसार झपाट्यानें चालू झाला व ते ख्रिस्ती म्हणून इतर युरोपियन राष्ट्रें त्यांच्याकडे थोडीं ममत्व बुद्धीनें पाहूं लागलीं. आधुनिक सुधारणेचीं जीं वरवरचीं कां होईनात, पण अंगें आहेत, तीं त्यांना प्राप्त झालीं आणि दूरचाच पण थोरांचा आश्रय असल्यामुळें जगतांत काय चाललें आहे याची त्यांना ओळख झाली. त्यांचेच देशबांधव वर सांगितलेले जे मोरो लोक ते मात्र या सुधारणांपासून बिचकून दूर उभे राहिले व म्हणून ते तसे दूरच आहेत. हे जे ख्रिस्ती फिलिपिनो लोक ते बहुसंख्य आहेत. शिक्षण, संस्कृति, धर्म, राज्यकारभार, इत्यादींच्या कल्पना ते आज ३०० वर्षें शिकत असल्यामुळें या मोरोंचें व त्यांचें सारखेपण असें कशांतच नाहीं. १८९८ सालीं अमेरिकन सरकारचा या फिलिपाइनच्या प्रकरणांत प्रथम संबंध आला. तेथें त्यांचें अधिराज्य स्थापन झालें पण तेव्हांपासूनच घरच्या स्वातंत्र्याच्या कल्पनेला अनुसरून आपलें तेथील अधिराज्य लवकरच केव्हां तरी आटपून टाकण्याच्या व तत्रस्थ लोकांना स्वराज्याचे हक्क देऊन टाकण्याच्या गोष्टी त्यांनीं चालू केल्या. अर्थात् ख्रिस्ती फिलिपिनो लोकांना ही एक नवीनच महत्त्वाकांक्षा उत्पन्न झाली व आपल्यावर राज्य करणाऱ्या लोकांशीं सनदशीरपणानें भांडून त्यांजकडून स्वराज्याचे हक्क संपादन करणें हा जो एक लोकसत्ताकालाच्या राजकारणांतील वळसा आहे तो घेण्यास त्यांनीं सुरुवात केली. त्याचे कष्ट ते अनुभवीत आहेत व अमेरिकन सरकार त्यांना हळूहळू हक्कदान करीत आहे. पण हे जे मोरो लोक ते दूर बसूनच या पडत चाललेल्या फरकाकडे पाहात आहेत. ते म्हणतात आम्हांला ही तुमची सुधारणा नको; हें तुमचें तोंडांतल्या तोंडांत बोलावयाचें इंग्रजी आम्हांला नको आहे आणि आमच्या जंगली शाळांत ते तसले इंग्रजी शिकवणारे हे किरिस्तांव फिलिपिनो मास्तरही आम्हांस

नकोत. हे तुमचे विजेचे दिवे, तुमचीं तीं छापलेलीं कागदें, ही तुमची रोजची सडकांची धोतीपोती आणि हे तुमचे पोलिस शिपाई हें आम्हाला कांहीं नको. पण ते असें म्हणत असले तरी फिलिपाइन बेटांत या गोष्टी सर्वत्र झाल्या आहेत. अमेरिकन सरकारनें त्यांचा हा तुसडेपणा नाहींसा करण्यासाठीं आजवर पुष्कळ खटपट केली. पण, अजून कांहीं गुण आलेला नाहीं. याचा थोडासा दोष खटपट करणाराकडेच आहे. समाजाची सुधारणा दंडुक्यानें करतां येईल व कायद्यानेंही करतां येईल असा समज असलेले अमेरिकेचे लष्करी अंमलदार त्यांच्या मागें लागले. हे त्यांना 'देशाभिमान', 'देशाभिमान', म्हणून चुचकारूं लागले पण त्यांना या नवीन तऱ्हेचा अभिमान कशाशीं खावा हें मुळींच उमगेना. इकडे ख्रिस्ती फिलिपिनो लोक मात्र खरोखरीच देशाभिमानी होत चालले. ते जों जों देशाभिमानाच्या गोष्टी बोलूं लागले, सर्व देशाचें राज्य आम्हाकडे हवें असें म्हणूं लागले तों तों या मोरो लोकांच्या पोटांत धस्स होऊं लागलें. ते अडाणी खरे. पण सुरूं असलेल्या एकंदर प्रकारावरून त्यांच्या ध्यानांत आलें कीं ह्या देशाचे हे अमेरिकन धनी केव्हां तरी आपला गाशा गुंडाळणार आणि आपणाला या किरिस्तावांच्या हवालीं करणार. हें त्यांचें भय कमी व्हावें म्हणून अमेरिकन सरकारानें त्यांची पुष्कळ मनधरणी केली. त्यांचा पुढारी, सुलु गांवचा सुलतान, या नांवाचा एक ऐदी माणूस असे. त्याला त्यांनीं वर्षाचें कांहीं वेतन चालू करून आपलासा केलें व अशा रीतीनें मोरो लोक वश होतील असें त्यांना वाटलें. पण तेंही कांहीं जमलें नाहीं. अशानें ते बधत नाहींत हें पाहून अमेरिकन सरकारनें त्यांना सक्तीनें सुधारण्याचा घाट घातला. त्यांच्या जुन्या चालीरीती त्यांनीं एकदम टाकल्या पाहिजेत, बहुपतित्वाची चाल बंद केली पाहिजे; आणि अंगावर हत्यार बाळगणें सोडून दिलें पाहिजे अशीं अनेक फर्मानें त्यांनीं काढली. पण मोरो लोक या फर्मानांना मुळींच जुमानीनात. त्यांची जूट अधिक अधिक होऊं लागली, व बायकापोरांसकट गांवेंच्या गावें डोंगराच्या आश्रयाला जाऊं लागलीं. यांच्याशीं लढाई करावयाची तर बायकापोरांना गोळ्या घालणें हें ओघानेंच येत होतें. सेनापती पर्शिंग यानें स्वच्छ सांगितलें कीं, या निरपराधी बायकापोरांवर गोळी चालविणें हें माझ्या हातून व्हावयाचें नाहीं. बरें त्यांना शासन करूं नये, तर त्यांची बंडखोरी वाढतच जाणार असा प्रकार कित्येक दिवस चालू राहिला. शेवटीं मोरो लोकांचा असा बळकट समज झाला की, आपल्याला डोंगरांत गांठून कायमचे नाहींसे करावे व हा देश आपल्या लाडक्या ख्रिस्ती फिलिपिनोंना राहावयास मोकळा करून द्यावा असा या अमेरिकन लोकांचा बेत दिसतो. म्हणून त्यांनीं डोंगरांच्या आडवळणांत तोफा व बंदुका तयार करण्याचें काम चालू केलें. हें पाहतांच सरकारचा हुकूम निघाला कीं जो कोणी मोरो माणूस असलें हत्यार जवळ बाळगील, इतकेंच काय पण भाला, बरची, जंबिया, सुरा हीं हत्यारेंही जवळ बाळगील त्याला हद्दपारीची शिक्षा होईल हा हुकूम सुटतांच हत्यारें खालीं ठेवणें त्यांना भागच झालें. पुढें १९१३ सालीं हॅरिसन नांवाच्या गव्हर्नर जनरलनें असें मनांत आणलें कीं या मोरो लोकांना फिलिपिनोच बनवून टाकावें. आणि म्हणून या देशांतील सर्व लोकांना एकाच तऱ्हेनें वागविण्यांत येईल असें त्यांनीं जाहीर केलें, जे कोणी अमेरिकन नोकरदार होते ते सर्व त्यांनीं काढून टाकले व तेथें फिलिपिनो लोक आणून भरले. शिक्षक, शिपाई, न्यायाधीश, वकील, चटसारे अधिकारी लोक व प्रतिष्ठित लोक तद्देशियांतूनच त्यानें भरले. इतकेंच काय मोरो ज्या परगण्यांत राहात असत तेथें फिलिपिनोंच्या झुंडीच्या झुंडी येऊन राहूं लागल्या. हेतु असा कीं त्यांचे व आपले लग्नसंबंध व्हावेत व अशा रीतीनें देशांतील सर्व लोक एक होऊन जावेत. स्वराज्यास आतुर झालेल्या ख्रिस्ती फिलिपिनोंची ही चळवळ व तुमचा कारभार तुम्हीच पाहावा या हेतूनें अमेरिकन सरकारानें सुरूं केलेला राज्यकारभारांतील सर्व बदल त्यांच्या त्यांच्या मनानें जरी कितीही चांगला असला तरी मोरो लोकांना

वाटूं लागलें कीं आपल्याला नाहींसे करण्याच्याच या सर्व युक्त्या आहेत; व ते या फिलिपिनो अधिकाऱ्यांच्या विरुद्ध तक्रारी करूं लागले. ते आम्हांला एरवीच्या सर्व तऱ्हांनीं छळतातच पण, त्यांचे मुनसब लोक आम्हा मुसलमानांचा अपमान व्हावा म्हणून कोर्टांत मुद्दाम डुकरें आणून बांधतात; आमच्या घरावर, विहिरीवर, स्मशानावर आणि आमचीं पोरें जेथें नदीकांठीं खेळतात त्यांच्यावर सुद्धां हे कर बसवितात; आमचीं मुसलमानांचीं लग्नें हे बेकायदेशीर आहेत असें म्हणतात; आमच्या बायकांना हे रखेल्या ठरवितात; आणि आमच्या मुलांना वारसाचा हक्क देत नाहींत; ते आम्हांला व्यापारांत बुडवितात; आम्हांला काडयाच्या पेटया, मीठ व सुया देतात आणि त्याच्या दसपट किंमतीचें खोबरें, कॉफी आणि काथ्या ते आमचेकडून घेतात; आपल्या फिलिपिनो निशाणाला आम्ही सलाम करावा म्हणून ते आम्हाला बंदुकीच्या दस्त्यानें ढोंसतात; आणि कसलीही चौकशी न करतां आम्हाला तुरुंगांत डांबून ठेवतात अशा तक्रारी ते करूं लागले. ही तक्रारींची यादी दिवसेंदिवस फुगतच चालली आहे; व मोरो लोकांचा अमेरिकनांना आग्रह असा आहे कीं तुम्ही येथून जाऊं नका. जर गेलात तर हे फिलिपिनो लोक आम्हावर जुलूम करूं लागतील आणि आमच्या चालीरीतींत हात घालतील.

अशी ही मोरो लोकांची कहाणी असतांनासुद्धां स्वराज्य पदरांत पडावें म्हणून चळवळ करणारे जे फिलिपिनो लोक आहेत ते अमेरिकन सरकारास सांगतात कीं, या मोरो लोकांच्या तक्रारी उगाच आहेत. आम्ही त्यांना छळत नाहीं व छळणारही नाहीं; त्यांचा व आमचा कसलाही वाद नाहीं; इतकेंच काय पण ते व आम्ही एकाच हाडामासाचे आहोंत. या देशभक्त लोकांच्या पुढें त्यांच्या हाडवैराचीं उदाहरणें जर आणून मांडलीं व याचा अर्थ काय म्हणून विचारला तर ते नुसते म्हणतात कीं, "यांत कसलेंही सत्य नाहीं" अर्थात् मोरो लोकांच्या पुढाऱ्यांची व या देशभक्तांची जबानी इतकी परस्परांच्या विरुद्ध आहे कीं, स्वराज्यदानाच्या प्रसंगीं ही एक मोठी अडचणीची बाब होऊन बसत आहे, असें अमेरिकन सरकारास वाटतें. मोरो लोकांची मुख्य तक्रार ही आहे कीं, तुम्ही आमचीं हत्यारें काढून घेतलींत; आत्मसंरक्षणास आम्हास असमर्थ बनवून ठेवलेंत; व आमच्या वैऱ्यांच्या हातीं सर्व सत्ता दिलीत; संरक्षणाचें जें वचन आम्हांस तुम्हीं दिलें होतें त्याचा भंग करून येथून तुम्ही जात आहां. या तक्रारीस उत्तर देणें सरकारास फारच अडचणीचें होत आहे व त्यांनीं जर यांतून मार्ग काढिला नाहीं तर मोरो लोक त्यांना चक्क वजावून सांगत आहेत कीं, राज्यदान करून तुम्ही येथून गेलात म्हणजे या भूमींत जोराचा रक्तपात होईल हें ध्यानांत ठेवा.

---

## १५ बृहज्जपान

### जपान हबसाणापर्यंत येऊन पोहोंचला !

जपान देशांत लोकसंख्या बेसुमार वाढत आहे व या वाढत असलेल्या लोकसंख्येची दुसरीकडे कांहीं तरी व्यवस्था लावावयास हवी म्हणून ज्या हिकमती कराव्या लागतात व जी जबरदस्ती करावी लागते ती करण्यास जपान सदैव तत्पर असतो. रशिया आपल्या क्रांतीच्या व्यवधानांत गुंतला आहे हें पाहून आणि राष्ट्रसंघ हा बोलण्याच्या पलिकडे फारसा जाणार नाहीं हें ओळखून त्यानें निर्बल झालेल्या चीन देशाच्या मागें आपला ससेमिरा लावला व थोडयाच दिवसांत मॉंच्युकीओ या नांवाचें स्वतंत्र राज्य निर्माण करून अज्ञातवासांत असलेला चीन देशाचा पूर्वीचा राजा येथील सिंहासनावर त्यानें बसविला. अर्थात् देशांतील कुल-मुखत्यारी जपानी लोकांकडेच असली पाहिजे हें स्पष्ट आहे. मांच्युकिओ घशांत टाकून आणि लीग ऑफ् नेशन्स्च्या दरडावणीला कसलीही भीक न घालतां त्यानें चीन देशावर नवें आक्रमण केलें. आणि प्रत्येक वेळीं नव्या नव्या मागण्या करून दुर्बळ चिनी सरकाराकडून त्या मान्यही करून घेतल्या आणि आतां तर असें वाटूं लागलें आहे कीं खुद्द पेकिंग अथवा पेपिन शहर तरी चीनच्या

हातीं कितपत राहील याविषयीं शंकाच आहे. चिनी राजकारणही हस्तगत करण्याचा जपानचा मोठाच उद्योग चालू आहे. इकडे हें काम चालू ठेवून जपानी सरकारनें सयामशीं पुष्कळच नातें लाविलें आहे. राष्ट्रसंघांत जपानचा निषेध झाला त्या वेळीं सयामचा वकील गप्प बसला. त्या वेळींच पुष्कळांना अशी शंका आली कीं, जपान व सयाम हे आंतून मथले असावे. सयामची सहानुभूति जपानच्या अंगाला असावी हें अगदीं स्वाभाविक आहे. पण सयामच्या आजूबाजूला फरेंच, डच व इंग्रज यांचीं साम्राज्यें पसरलेलीं असल्यामुळें त्याला या लोकांचा थोडा वचक वाटतो. पण इतकें असूनही सिंगापूरच्या आरमारी तहाचा महिमा नाहीसा करण्यासाठीं इका येथें नवी सामुद्रधुनी तयार करावी असा जपान व सयाम यांनीं डाव आरंभिला आहे अशी वार्ता मागें उठलीच होती. आतां तर अशा बातम्या आहेत कीं, सयामनें अनेक लढाऊ गलबतें तयार करण्याचा मक्ता जपानांतील गोद्यांना दिला आहे व सयामच्या किनाऱ्याचें संरक्षण कसें करावें याबद्दलही त्यांच्या वाटाघाटी चालू आहेत. सयामांत सध्यां लोकशाही स्थापन झाली आहे व पृथ्वीवरील इतर राष्ट्रांशीं बरोबरीच्या नात्यानें वागण्याची ईर्षाही तेथें उत्पन्न झाली आहे. म्हणून या प्रबळ शेजाऱ्यांना न भितां सयाम हा जपानशीं अधिक अधिक स्नेहसंबंध ठेवण्यास भिणार नाहीं. हें जपानलाही हिताचेंच आहे. कारण मागासलेल्या राष्ट्राला मदत करतांना आपल्या अनेक अडचणींचा परिहार संपन्न राष्ट्रांना करून घेतां येतो असें इतिहासावरून दिसतें. याप्रमाणें म्यांच्युकिओ, चीन व सयाम यांच्याशीं कोठें मालकी, कोठें जबरदस्ती, कोठें स्नेहसंबंध असें करून जपाननें आपले हातपाय पसरले आहेत. पण त्याची ही प्रसरणशील बुद्धि येथेंच थांबली नाहीं. अफगाणिस्थानांत नवी उभारणी चालू आहे. तिचा फायदा घेण्याचें ठरवून आपल्या तज्ञ लोकांना किफायतीच्या नव्या जागा मिळविणें व त्या राष्ट्राशीं सख्यसंबंध जोडणें हेंहि काम जपाननें चालू केलें आहे. रेल्वे बांधणें, खाणी खणणें, विजेचा पुरवठा करणें अशांसारखीं अनेक मोठमोठालीं कामें अफगाणिस्थानांत सध्यां सुरूं झालीं आहेत. हीं करावयास अफगाणांना बाहेरचे तज्ञ आणणें भागच आहे हें ओळखून जो तो तेथें प्रवेश करूं पाहात आहे. पण यापैकीं, जर्मनी व जपान या दोघांना बरेंच यश आलें आहे. येथून पुढें जपाननें आणखी एक ढांग टाकिली आहे. ज्या अबिसीनिआ देशाविषयीं आतां इतका गाजावाजा चालू आहे, त्या देशांत जपाननें केव्हांच प्रवेश करून घेतला आहे. जेथें ज्या मुद्यावर पाऊल टाकितां येईल तेथें तो मुद्दा पुढें करावयाचा असें त्यानें चालविलें आहे. अफगाणिस्थानांत तज्ञांची पेरणी करणें व अशा रीतीनें तो देश आपलासा करून घेणें हें जसें त्यानीं चालविलें आहे तसेंच हबसाणांत आपल्या मालाची पेरणी करून तो देश आपल्या मुठींत आणण्याची त्याची खटपट चालू आहे. हबसाणांत लोकांना पुष्कळच गोष्टी हव्या असतात व त्यांतल्या कोणत्याच तेथें तयार होत नाहींत. यामुळें युरोपांतील अनेक राष्ट्रांनीं आपापलीं दुकानें तेथें मांडिलीं होतीं, पण जपाननें या चढाओढींत सर्वांना मागें टाकिलें आहे व आतां अशी स्थिति आहे कीं बाजारपेठेंत जिकडे तिकडे जपानी माल भरलेला दिसतो. प्रस्तुत इटली व अबिसीनिआ यांचें खडाष्टक जुंपण्याचा जो संभव दिसतो त्याच्या बुडाशीं इटलीची ही पोटदुखी सुद्धां आहेच. या प्रमाणें आपल्या घराच्या उंबरठ्यापासून तों आफ्रिका खंडाच्या पूर्व किनाऱ्यापर्यंत जपाननें आपलें कोणत्या ना कोणत्या तरी तऱ्हेचें वर्चस्व स्थापन करण्यांत यश मिळविलें आहे व असाच क्रम थोडे दिवस चालू राहिला तर आफ्रिका खंडांतील सर्व बाजार पेठा जपानी माल घेऊं लागतील असा धाक आजच युरोपिअन राष्ट्रांना पडला आहे.

पण या सर्वांत खरी भीति डच लोकांना उत्पन्न झाली आहे. शालोपयोगी इतिहास वाचणाराना सुद्धां हें माहित आहे कीं, केप ऑफ

गुडहोप कडून हिंदुस्थानचा मार्ग सांपडल्यानंतर अनेक दर्यावर्दी राष्ट्रांत शर्यत सुरू झाली व आशिया खंडांतील माणसें ख्रिस्ती करणें, तेथील धनें लुबाडणें आणि जमल्यास ऐन जिनसा ते प्रदेशच काबीज करणें हीं कामें सर्वांनीं चालू केलीं. या कामांत डच लोकही होते. वास्तविक पाहतां हॉलंड हा अगदीं चिमुकला देश आहे व तेथें माणसेंही थोडीं आहेत पण ज्ञान आणि अज्ञान यांची झुंज एकदां चालू झाली ह्मणजे ज्ञान अज्ञानाला सहज चेपतें. आणि कोट्यवधि लोकांवर मूठभर लोक सुद्धां सहज सत्ता गाजवितात. डच लोकांनीं जावा, सुमात्रा, बोर्निओ हीं मोठमोठालीं बेटें हस्तगत केलीं. या कामांत त्यांच्या व इतर युरोपियन राष्ट्रांच्या पुष्कळच कटकटी झाल्या. पण हीं बेटें व त्यांच्या आसपासच्या समुद्रांतील बारीक बारीक अशीं शेंकडों बेटें यांवर त्यांचा अम्मल चालूं झाला. हीं बेटें कच्च्या मालाला फार उपयोगाचीं आहेत. कच्यांचें पक्कें कसें करावें हें युरोपियन लोकांना समजतें व कच्चें पिकविण्यासाठीं कसे श्रम करावे लागतात हें आपल्या इकडील नेटिव्हांना समजतें. हा व्यवहार आज शतकानुशतक चालू आहे. पण महायुद्धापासून पृथ्वीवरील सर्वच प्रजांना नवें वारें प्याल्यासारखें झालें आहे. या सर्व बेटांतील लोकांना मिळून युरोपियन राष्ट्रांनीं इन्डोनेशियन्स असें नांव दिलें आहे. हे इन्डोनेशियन लोक आतां शहाणे झाले आहेत. आपल्याला कोण लुबाडतो हें त्यांच्या ध्यानीं आलें आहे. त्यांची लोकसंख्या जवळ जवळ आठ कोटी आहे व त्यांच्यांत ख्रिस्ती, मुसलमानी व बौद्ध धर्मांचे लोक लक्षावधी असून ते एकमेकांच्या शेजारींच राहात आहेत. आपला देश स्वतंत्र व्हावा व आपलीं धनें आपणच भोगावींत हा विचार तेथें प्रबळ होत चालला आहे. इकडे वर वर्णिलेलें जपानचें आक्रमणशील धोरण याही बेटावर चालू झालें आहे. जपानी लोकांनीं या बेटांतील बाजारपेठा हस्तगत करण्याचें काम सारखें चालविलें आहे व त्याचा पेच डच लोकांना इतका पडला आहे कीं, इकडील आपला व्यापार ठार मरतो असें डच लोकांना आतां कळून चुकलें आहे. या बेटांवर १९१३ सालीं त्यांचा व्यापार जिथें शें. ३१ होता तेथें तो १९२६ सालापर्यंत शें. १७ पर्यंत उतरला होता व जपानचा जो शें. १ होता तो शें. ९ पर्यंत चढला. तेथपासून पुढेंही ही अंगलट येणारी चढाओढच चालू राहिल्यामुळें डच लोकांना अगदीं चैन पडेनासें झालें आहे. चिनी मातीचीं भांडीं, व काचेचें सामान या बाबतींत तर जपाननें डच व्यापार समूळ मारला आहे. कापडाचीही गोष्ट अशीच आहे. १९३१ सालीं जेवढें कापड डच लोकांनीं येथें आणून भरलें त्याच्या केवळ एक चतुर्थांशाइतकेंच १९३३ सालीं त्यांना भरतां आलें. या सर्वांचा परिणाम असा झाला आहे कीं या सर्व मालांचे पदासी जे हॉलंडमधील कारखानदार त्यांना हात आंखडून बसावें लागत आहे. पण येवढ्यानेंच झालें नाहीं. डच लोक माल तयार करून पाठवीतच पण बाजारांत त्यांचा उठाव करण्याचें कामही ते करीत असत. पण हाही त्यांचा उद्योग जपान हिसकावून घेत आहे. तसेंच जों जों जपानी माल या बेटांत जास्त जास्त येत आहे तों तों डच माल येण्याचें बंद होत आहे व तो येण्याचें बंद झाल्यामुळें डच जहाजांचा वाहतुकीचा धंदाही बसत चालला आहे. याप्रमाणें माल उत्पन्न करणें, तो नेऊन पोहोंचविणें व त्याचा उठाव करणें या तीनही कामांत डच लोक झपाट्यानें मागें पडत आहेत. वास्तविक पाहतां हें त्यांचेंच साम्राज्य आहे व म्हणून इतर लोकांच्या मालावर जबर कर बसवावे व आपला व्यापार तरता ठेवावा अशा योजना डच सरकार अंमलांत आणूं पाहतें. पण व्यापारविषयक निरनिराळीं तत्त्वें, साम्राज्याचीं धोरणें व इतर राष्ट्रांशीं त्यांचे असलेले संबंध या सर्वांची बेरीज करतां हें काम त्यांना झेपत नाहीं. बरें, असें कांहीं करावें तर जपानी लोक या इन्डोनेशियन् लोकांना सांगतात कीं, "आम्ही जो माल तुम्हांला चार आण्यांस देतों तोच आठ आण्यांस घ्यावयास तुमचे राज्यकर्ते

तुम्हांला भाग पाडणार हें बरोबर आहे काय? " अर्थात् प्रजा असंतुष्ट होतील हेंही भय डच सरकाराला आहेच. पण हें भय आतां व्यापारापुरतेंच उरलेलें नाहीं. डच सरकारला कळून चुकलें आहे कीं हे कोटयवधी लोक आतां आपल्या ताब्यांत राहात नाहींत. मोठमोठालीं घराणीं आपलीं मुलें उच्च शिक्षणासाठीं जपानांत पाठवितात. तीं तेथें देशाभिनाच्या कल्पना शिकतात; इन्डोनेशियन राष्ट्रीय पुढारी आंतून जपानशीं खलबतें करितात. तेथील वर्तमानपत्रकर्ते मुद्दाम जपानला जातात व तेथें त्यांचें चांगलें आदरातिथ्य होतें. हें सर्व डच सरकारला उघड्या डोळयांनीं बघावें लागत आहे. व्यापार कमी झाला म्हणून राज्यकारभारास पैसा उणा पडतो यासाठीं शिक्षण इत्यादि खात्यावरील खर्च कमी करण्याचें धोरण डच सरकारनें चालू करून पाहिलें पण सरकारी शिक्षण जों जों जास्त कमी व्हावें तों तों इकडील लोक अधिक अधिकच जपानांत जाऊं लागतात असें दिसूं लागलें. याप्रमाणें डच सरकारचा अगदीं कोंडमारा सुरूं आहे.

या सर्व परिस्थितीचा फायदा घेऊन जपानी लोक तेथील राष्ट्रीय चळवळीला गुप्तांतून प्रोत्साहन देत असतात व ही चळवळ जर यशस्वी झाली तर या सर्व बेटांचें राष्ट्रीय पुढारीपण आपणांकडेच पुढें कित्येक वर्षेपर्यन्त राहील अशी त्यांची अपेक्षा आहे. ही अपेक्षा जपानी लोकांच्या मनांत इतकी मुरून गेली आहे कीं पूर्वेकडील समुद्रांतील सर्व मोठमोठालीं बेटें चीन, सयाम या सर्वांवर आपलेंच अधिराज्य यापुढें व्हावयाचें आहे ही कल्पना जपानांतील सामान्य लोकांच्या मनांत सुद्धां कायम झालेली आहे. याचें निदर्शक म्हणून एक मोठी गमतीची गोष्ट डच वर्तमानपत्रांनीं स्वदेशांत प्रसिद्ध केली होती. ती अशीः—एकदां एक मोठें जपानी जहाज यांपैकीं एका बेटाच्या किनाऱ्यावर आलें. मंडळी बंदरांत उतरल्यावर कोणी कोणीकडे, कोणी कोणीकडे असे निघून गेले व एक उमदा गृहस्थ सहज फिरत फिरत एका शाळेंत शिरला. तडक आंत जाऊन तो फळयापुढें जाऊन उभा राहिला व खडूनें. त्यानें पूर्व–आशियाचा नकाशा काढला नकाशावर जपान, मॉन्चुकिओ, चीन, हे देश व सयाम, बोर्निओ, इत्यादि मोठमोठालीं बेटें यांच्या भोंवतालीं त्यानें एक वर्तुल काढलें व त्यावर " बृहज्जपान " अशीं अक्षरें लिहिलीं व तो झटकन शाळेंतून निघून गेला ! या गोष्टीनें डच लोकांचे डोळे खाडकन उघडले व आतां अ पलें राज्य चाललें असें त्यांस वाटूं लागलें ! साम्राज्याच्या संरक्षणासाठीं हॉलंडमधून फार थोडे लोक आणतां येण्यासारखे असतात म्हणून तद्देशीय लोकांचीं पलटणें उभारावीं असेंही सरकारांस पुष्कळ वेळां वाटतें. पण आपल्या हातानें हीं पलटणें उभीं करावीं आणि त्यांनींच एके दिवशीं आपल्यावर मोर्चा वळवावा असें खास होणार हेंही भय त्यांना वाटतें. जपानी आरमार फार प्रबल आहे. त्यांच्याशीं गांठ घालावयाची म्हणजे महाकर्म कठिण आहे व बेटांचा किनारा तर तका विस्तृत आहे कीं चिमुकल्या डच आरमाराच्या बळावर या साम्राज्याचें संरक्षण करतां येईल हें शक्य नाहीं !

अशा पेंचांत सांपडल्यामुळें डच सरकारनें आपलें आजवरचें त्रयस्थपणाचें धोरण अगदीं टाकून दिलें आहे. तिकडील प्रदेशांत प्रबल असलेलीं जीं दोन राष्ट्रें म्हणजे फरान्स व इंग्लंड त्यांच्याशीं सख्यसंबंध जोडण्याचें काम त्यांनीं चालविलें आहे. डच आरमारी अधिकारी सिंगापूरला येत आहेत, त्यांचीं आंतून खलबतें चालूं आहेत. पॅलेस्टाईन जिंकणारा इंग्रज महारथी जो लॉर्ड अलेन्बी त्यासही एकदां जावा बेटांत निमंत्रून नेलें होतें. सरकारी रीत्या इंग्रज व डच यांचा मिलाफ चालू आहे असें कोणी कबूल करीत नाहीं पण वर सांगितलेली जी अधिकाऱ्यांची जा ये ती बघून या दोन राष्ट्रांनीं परस्परांच्या संरक्षणासाठीं इकडील समुद्रांत समायिक संरक्षणाची जबाबदारी उचलली असावी असा

सर्वांचा तर्क आहे. इंग्रजांचा सिंगापूर येथें जो प्रचंड आरमारी तळ तयार होत आहे, तो आस्ट्रेलियापासून हिंदुस्थानापर्यंत जपानच्या हालचालीवर नजर ठेवण्यासाठींच आहे व याच कामांत डच लोकांना मदत करणें हेंही एक काम निःसंशय आहे. याप्रमाणें जपानी लोकांनीं हा सर्व द्विपसमूह जपानी मालानें व राष्ट्रकल्पनेच्या प्रोत्साहनानें जपानमय करून टाकण्याचा उद्योग अखंड चालविला आहे व हीच गोष्ट सोबत दिलेल्या नकाशाच्या गोष्टीवरून उत्तम निदर्शनास येते.

## १६ सयामचा राजा सिंहासन सोडून देतो

राजा प्रजाधपक हा सयामच्या गादीवर १९२६ सालीं बसला. सयाम हा देश आपणा हिंदूंना सध्यां जितका परका वाटतो तितका तो आपल्या इतिहासाला परका नाहीं. ब्रह्मदेश, सयाम, कांबोज, जाव्हा, बोर्निओ, सुमात्रा व यांचे आसपासचीं लहानसान बेटें यांवर पूर्वीं हिंदूंचेंच साम्राज्य होतें. हजार आठशें वर्षें या ठिकाणीं हें साम्राज्य टिकून राहिलें होतें व हिंदु संस्कृतीचे अवशेष अजून सुद्धां तेथें सर्वत्र पसरलेले आहेत. बुद्ध धर्म, मुसलमानी धर्म, व शेवटीं ख्रिस्ती धर्म यांचें या सर्व प्रदेशावर धार्मिक आक्रमण झालेलें आहे व होत आहे व त्यांच्या दडपणाखालीं जुनी हिंदु संस्कृति गुदमरून गेलेली आहे. वर राजाचें जें नांव दिलें आहे तें प्रजाधिपक असें आहे; त्याच्या मुलाचें नांव आनंद असें आहे; राजावर ज्यानें राज्यत्यागाचा प्रसंग आणिला त्याचें नांव बहुल असें आहे. दुसऱ्या एका मुत्सद्याचें नाव यमराज असें आहे व रावण, भीम आणि अनुवतन हीं नांवें, त्यांच्या संबंधींच्या हकीकतींत अनेकदां येतात. हीं नांवें वाचलीं म्हणजे या राजघराण्यासंबंधीं आपल्याला चटकन आपलेपण वाटूं लागतें व जुनें नातेंगोतें आणि जुन्या ओळखी हुडकून काढून नवे स्नेहसंबंध जोडण्याची जी इच्छा सध्यां सर्वत्र दिसत आहे तिच्या आविष्काराला सयाम हें चांगलें ठिकाण आहे असें वाटतें. असो.

प्रजाधिपक गादीवर बसून सहा वर्षें होतात न होतात तोंच म्हणजे १९३२ सालीं सयाममध्यें मोठीच राज्यक्रांति झाली. एकतंत्री राजसत्तेच्या ऐवजीं नियंत्रित राजसत्ता असावी असें लोकांना वाटत होतें व याच कल्पनेचा उदय होतां होतां एकदम क्रांतीही घडून आली पण क्रांति झाली तरी लोकांनीं राजाला हात लाविला नाहीं. कारण प्रजाधिपक हा लोकांचा मोठा आवडता राजा आहे. लोकांनीं जसा त्याच्या अंगाला हात लाविला नाहीं तसाच त्यानेंहि क्रांतीला कसलाहि विरोध केला नाहीं; इतकेंच काय पण होत आहे हें बरेंच होत आहे असें त्यानें आपल्या वर्तणुकीनें दाखविलें. एक तर या नवीन युगमानांत प्रजांची इच्छा काय आहे हें पाहिलेंच पाहिजे, हें तत्त्व त्याला स्वतःला सम्मत होतें व त्यास अनुसरून आपले अधिकार कमी करून घ्यावयास तो तत्पर होता. व दुसरें म्हणजे राजघराण्यांतील त्याचे जे घरबसे पण विनाकारण कटकटी उत्पन्न करणारे नातेवाईक जहागिरदार होते ते या नवीन लोक-नियंत्रणांत सांपडले तर त्याला हवेंच होतें. येथपर्यंत सर्व ठीक झालें. पण नवीन तऱ्हेचा राज्यकारभार सुरूं झाल्यावर निराळेंच संकट उद्भवलें. प्रजांचे प्रतिनिधि हे प्रजांचीं हितें नेहमींच पाहातात व त्या दृष्टीनें आपलीं धोरणें आंखतात असें प्रजाधिपकास दिसून येईना. या प्रतिनिधींस राजाची सत्ता मर्यादित व्हावयास हवी होती. पण प्रजांच्या इच्छेला मान देणें हें प्रसंगविशेषीं त्यांच्या जिवावर येई. प्रजाधिपकास हें खपेनासें झालें. जर राजानें प्रजांच्या इच्छेला मान द्यावयाचा तर प्रतिनिधींनीं जास्तच द्यावयास हवा असें त्याचें म्हणणें असे. यांतून प्रतिनिधींची व त्याची घासाघीस सुरू झाली. कांहीं दिवसांपूर्वीं राष्ट्रीय कायदेमंडळांत एक बिल आलें. एकाद्या माणसाला जर फांशीची शिक्षा झाली तर त्या शिक्षेच्या दिवसापासून त्या गुन्हेगाराला दोन महिन्यांची मुदत द्यावी. या मुदतींत त्यानें राजाला क्षमेची याचना करावी. राजास योग्य वाटलें तर त्यानें क्षमापत्र द्यावें. पण या क्षमापत्रावर प्रधानानें सही करावी. अशा अर्थाचें हें बिल होतें. यांत वाईट कांहीं नव्हतें. पण राजा व मुख्य प्रधान यांच्यांत जर मतभेद झाला तर, किंवा कदाचित् अन्य कारणास्तव प्रकरण निकालांत निघण्यास विलंब लागला तर दोन महिन्यांची मुदत भरली येवढ्याच मुद्यावर त्याला फांशी देण्यांत येईल व अशा रीतीनें क्षमा करण्याचा जो राजाचा सनातन हक्क त्याला बाध येईल अशी राजाची तक्रार सुरू झाली. बरें; अशी तक्रार करण्यासारखी परिस्थिति सध्यां सयामी राजकारणांत आहेही. तेथें इतर देशांतल्याप्रमाणें पक्षोपपक्ष माजले आहेत व जो पक्ष अधिकारारूढ असेल तो इतरांस पाण्यांत पहात आहे. अर्थात् त्यांतला कोणी जर विशेष खावडाव

करूं लागेल तर त्याला नेस्तनाबूद करण्यासाठीं अधिकारारूढ पक्ष त्याच्या प्रमुखांना गिरफदार करून फांशीची शिक्षा ठोठावील व तेथून पुढें राजानें माफी दिली तरी दोन महिनेपर्यंत कांहीं तरी कुलंगडीं उत्पन्न करून प्रधान सही करणार नाहीं व दोन महिने भरले म्हणून त्यास फांशीही देऊन टाकील! अशी स्थिति असल्यामुळें असेंब्लीपुढें आलेल्या बिलांत योग्य ती दुरुस्ती करावी व क्षमा करण्याचा राजाचा हक्क बजावण्यास कोणच्याही तऱ्हेची अडचण उत्पन्न होणार नाहीं असें करावें अशी मागणी राजानें केली व ही जर मान्य होणार नसेल तर आपण राज्यत्याग करूं असें त्यानें प्रधानांना कळविलें. राजानें ही भीति घालतांच अधिकारारूढ पक्षांत चुळबुळ चालू झाली व डोळचावर शस्त्रक्रिया करून घेण्यासाठीं राजा इंग्लंडला गेला असतां त्याचीं आर्जवें करण्यासाठीं एक मंडळ तिकडे गेलें. पण त्या मंडळानें जरी आर्जवें केलीं तरी सध्यां सयामांत लष्कराच्या बळावर आपल्याच हातीं सत्ता बळकावून ठेवण्याचा ज्या 'बहुल' नांवाच्या अधिकाऱ्याचा हेतु आहे, तो राजाच्या दुरुस्त्या बिलांत घालावयास मात्र तयार होईना. राजानें स्वच्छ सांगितलें कीं मी गादीवर असल्याचा देखावा मात्र दिसावा व माझ्या प्रजेचें जीवित मात्र लोकसत्तेच्या ढोंगानें आपल्या हातीं सर्व सत्ता ठेवणाऱ्यांच्या हवालीं करावें हें मला कधींही संमत होणार नाहीं. यापेक्षां मी राज्यत्याग करीन! मंडळ राजाच्या या मागण्या पतकरीना व राजा आपलें म्हणणें सोडीना. शेवटीं निरुपाय होऊन प्रजाधिपकानें आपण सिंहासनावरून उतरल्याचें जाहीर केलें.

प्रजाधिपकाचा मुलगा राजकुमार आनंद हा स्वित्झरलंडमध्यें शिकत आहे. या अकरा वर्षांच्या मुलाला राजपद पतकरण्याविषयीं मंडळानें आग्रह केला व तें त्यानें पतकरलें! मार्च महिन्यांत असेंब्लीची सभा भरून आनंदाचें राजेपण व प्रजाधिपकाचा राज्यत्याग पसंत झाला. सध्यां आनंद लहान आहे म्हणून एक रीजन्सी नेमली आहे. तींत प्रजाधिपकाचा पूर्वींचा खाजगी चिटणीस राजा आदित्य, राजा अनुवतन व राजा यमराज असे तिघे आहेत. बहुल याचेकडे जी सत्ता आहे ती तशीच रहाते कीं प्रजानुरंजनासाठीं या रीजन्सीकडे सर्वाधिकार देण्यांत येतात हें अजून स्पष्ट झालें नाहीं. पण प्रजाधिपकाचा राज्यत्याग मात्र कायम झाला हें खरें.

## १७ हिंदुस्थानच्या प्राप्तव्यांत डोमिनिअन् स्टेटस् नाहीं

जून १९३५ च्या अखेरीस इंग्लंडमधील लॉर्डांच्या सभेंत इंडिया बिलावर चर्चा चालली असतां लेबर पक्षाचे लॉर्ड स्नेल यांनीं हिंदुस्थानांतील सुधारणामुळें पुढें हिंदुस्थानला डोमिनिअन्स् स्टेटस् हेंच प्राप्त व्हावें अशी दुरुस्ती सदर बिलाच्या प्रस्तावनेंत सुचविली. इंडिया बिलावर कमिटी नेमण्यांत आल्यावर ही दुरुस्ती करण्यांत यावी असा निकाल लॉर्ड ऑनस्लो (चेअरमन) यांनीं दिला. पुढें इंडिया बिलाचीं कांहीं कलमें मंजूर झाल्यावर लॉर्ड स्नेल ह्यानीं पुनः बिलाच्या पांचव्या कलमाचे शेवटीं "ब्रिटिश हिंदुस्थानांत जबाबदारीच्या राज्यपद्धतीचा अवलंब होऊन त्यामुळें हिंदी सुधारणांच्या प्रगतीनें हिंदुस्थानास डोमिनियन्स् स्टेटस् प्राप्त व्हावें" असें जादा वाक्य घालावें अशी दुरुस्ती सभेपुढें मांडली. लॉर्ड स्नेल यांनीं हिंदुस्थानला अखेर डोमिनिअन् स्टेटस मिळणार अशी हिंदी लोकांची खात्री करून देणें अवश्य आहे असें सांगितलें,व त्यांची दुरुस्ती सभेस मान्य झाल्यास सर्व हिंदी लोकांना समाधान वाटून अतिशय महत्त्वाच्या अशा सामाजिक सुधारणांस त्यांस सर्वस्वी वाहून घेतां येईल असें सांगितलें.ह्यावर भारतमंत्री लॉर्ड झेटलंड म्हणाले, "लॉर्ड स्नेल ह्यांची दुरुस्ती योग्य तऱ्हेनें मांडली असली तरी ती बिलाच्या सरनाम्यांत घालावयास हवी, पोटकलमांत घालतां येत नाहीं; ह्याशिवाय सदर दुरुस्तीस आणखी एका कारणाकरितां माझा विरोध आहे आणि तें म्हणजे "डोमिनिअन स्टेटस्" ची कायदेशीर व्याख्या करणें दुरापास्त असल्यामुळें मला ही दुरुस्ती मान्य करतां येत नाहीं." लॉर्ड झेटलंड पुढें असेंही म्हणाले कीं, अशा दुरुस्तीमुळें हिंदुस्थानच्या भवितव्यासंबंधीं आपणांत (लॉर्डांच्या सभेंत) एकमत नाहीं असें भासण्याचा संभव असल्यानें लॉर्ड स्नेल यांनीं, ह्या दृष्टीनें अशी सूचना मांडावयास नको होती. कारण आपणांत ह्या बाबतींत एकमत नाहीं ही गोष्ट सर्वस्वी खोटी आहे.

पुढें लॉर्ड ट्रॅबोल्गी (मजूरपक्ष) यांनीं वर उल्लेखिलेल्या पांचव्या कलमांतील "पार्लमेंटनें हिंदुस्थानचें फेडरेशन जाहीर करावें" वगैरे मजकूर गाळावा अशी सूचना मांडली पण

मतें न घेतांच सभेनें ती नाकारली. लॉर्ड स्ट्रॅबोलगी यांचा उद्देश सदर प्रसिद्धी करणाला मंजुरी देणें वगैरे गोष्टींना फार काल लागेल व त्यामुळें हिंदुस्थानांत विनाकारण असंतोष माजेल, असा होता. लॉर्ड झेटलंड यांनीं वरील दुरुस्ती नाकारतांना असे उद्‌गार काढले कीं, सिलेक्ट कमिटीचें काम सुरूं होण्यापासूनच, फेडरेशन जाहीर करणें हें पार्लमेंटच्या सर्वस्वी हातीं आहे हें अगोदर ठरविलेलें आहे. कॉंझरव्हेटिव्ह पक्षाचे लॉर्ड मॅन्सफील्ड यांनीं लॉर्ड स्ट्रॅबोलगी यांच्या सूचनेमुळें पार्लमेंटला ह्या बाबतींत वगळण्याचा हेतू आहे ह्या मुद्यावर विरोध केला. लॉर्ड स्ट्रॅबोलगी यांनीं यावर "शे. ५१ प्रमाणांत संस्थानें फेडरेशनमध्यें येत असल्याशिवाय" वगैरे कलम गाळावें असें सुचविलें. लॉर्ड झेटलंड यांनीं यावर असें उत्तर दिलें कीं, ब्रि. सरकारनें असें ठरविलें आहे कीं, फेडरेशन हें सर्व हिंदुस्थानचें होणार असल्यानें, निम्म्याहून जास्त संस्थानें तरी आल्याशिवाय फेडरेशन होणें शक्य नाहीं. मतें घेतां लॉर्ड स्ट्रॅबोलगी यांची सूचना नामंजूर झाली.

भारतमंत्री आणखी असेंही म्हणाले कीं, १९१७ च्या सुधारणांच्या जाहीरनाम्यापासून व १९१९ च्या सुधारणांचा कायदा पास झाल्यापासून, ह्या सुधारणामुळें हिंदुस्थानची भावी राज्यघटना अखेर ब्रि. साम्राज्यांतील इतर डोमीनीअन्सच्या तोडीची– स्वरूपाची नव्हे! – व्हावी असाच सरकारचा हेतू आहे. लॉर्ड सॅलिसबरी आपल्या भाषणांत म्हणाले कीं, भावी कालांत हिंदुस्थानास डोमीनिअन् स्टेटस् मिळेल पण तो काल किती दीर्घ असूं शकेल हें आजच सांगतां येणार नाहीं. लॉर्ड पोन्सान्बीनीं आपल्या भाषणांत भारतमंत्र्यांच्या वरील भाषणाबद्दल असमाधान दर्शवून असें म्हटलें कीं, डोमिनिअन् स्टेटस् हे शब्द बिलांत मुद्दाम वगळल्यानें हिंदुस्थानांत आपल्या हेतूबद्दल शंका उत्पन्न होईल व इंग्रज पुढारी स्पष्टपणें ज्या गोष्टी देऊं म्हणतात त्या देण्याची सरकारची इच्छा नाहीं असें त्यांस वाटेल. लॉर्ड स्नेल यांची दुरुस्ती ८५ विरुद्ध ७ मतांनीं नामंजूर झाली.

## १८ सिंधमध्यें चोरांची भरती

पोलिसखात्याच्या सिंध विभागाच्या गेल्या वर्षीच्या अहवालावरून असें दिसतें कीं सिंधच्या उत्तर भागांतील कित्येक जिल्ह्यांत ब्रिटिश बलुचिस्थान, खिलात व सिंधची वायव्येची सरहद्द या प्रांतांतून दरोडेखोरांच्या टोळ्यांनीं मागील वर्षाप्रमाणेंच यंदांही चोऱ्या, लुटालूट केली व त्यामुळें तेथील रहिवाशांचें जीवित सुरक्षित रहात नाहीं. दरोडेखोर सशस्त्र असून, आगाऊ ठरवून व्यवस्थितपणें दरोडे घालतात. त्यामुळें उत्तर सिंधमधील खेड्यांतील हिंदु लोक भीतीनें इतर भागांत सुरक्षित ठिकाणीं स्थलांतर करीत आहेत. ह्या बाबतींत पोलिस खात्यानें व सरकारनें लोकांची भीति नाहींशी व्हावी व दरोडेखोरांना दहशत बसावी म्हणून शहादादकोट येथें गे या ऑगस्ट मध्यें दोन दरोडेखोरांना चव्हाटयावर फांशी दिलें; तसेंच गुन्हेगार जातीसंबंधींच्या कायद्याची अंमलबजावणी कडकपणें सुरूं केली. तसेंच दरोड्याचे वेळीं पोलिसांनीं जादा कडक उपाय योजले त्यामुळें अशा कृत्यांस आळा बसेल असें वाटतें. खेड्यापाड्यांतून पोलीस गस्त आकस्मिकपणें पाठविण्यांत येतात; त्यामुळें दरोडेखोरांना आकस्मितपणें गांठतां येतें. तसेंच दरोड्याचे वेळीं खेड्यांतील लोकांनीं कसें वागावें हें शिकविण्यांत येतें यामुळें दरोडेखोरांनाही सहज व निर्वेधपणें दरोडे घालतां येत नाहींत व पोलिसचें कामही सुलभ होतें. हे सर्व प्रकार आर्थिक मंदीमुळें होतात असें वाटतें. लोकांत विश्वास उत्पन्न होत असून गुन्ह्यांच्या तक्रारी लोक पोलिसकडे जास्त घेऊन येतात; त्यामुळें नोंदलेल्या गुन्ह्यांची वाढ यंदा विशेष दिसून येते.

पूर्वीं सिंधमध्यें गुन्ह्यांचा कमीजास्तपणा पावसावर म्हणजे वार्षिक पिकावर अवलंबून असे. पण हल्लीं सक्कर धरणामुळें पावसावर फारसें अवलंबून रहावें लागत नसलें तरी सक्कर भागांत शेतजमिनीवर पंजाबांतून बेकार व कित्येक वेळां चोरदरोडेखोरही मजुराच्या मिषानें येतात. सिंधमधील पोलिसांना त्यांची फारशीं माहिती नसते व सिंधमध्यें पोलिससंख्याही पुरेशी नसल्यामुळें ह्या बाबतींत फार अडचण भासते. ह्याकरितां पंजाब पोलिसखात्याकडून मदत मिळते म्हणून चोरांवर कांहीं तरी दाब आहे.

## १९ लाहोर येथील गुरुद्वारची हकीकत

लाहोर येथील शाहीद गंज गुरुद्वारास शीख लोक अत्यंत पवित्र मानतात. शीखांच्या भाई तरूसिंह व मणिसिंह यांच्यासारख्या धर्मनेत्यांचें तें स्मारकच समजलें जातें. मुसलमानांनीं ज्या मशिदीबाबत सध्यां वाद काढला आहे ती मशीद या गुरुद्वाराच्या आवारांत असून मुसलमान काजी कज्जे घेण्यासाठीं तिचा उपयोग करीत असत. अठराव्या शतकाच्या मध्याचे सुमारास मिर मानू हा या मशिदीचा उपयोग विशेषतः शीख लोकांचे कज्जे तोडण्याकरितां करीत असे. याच मशिदीमध्यें कांहीं शीख लोकांना कोंडून ठेवून त्यांना अत्यंत क्रूरपणानें वागविलें होतें व शीख स्त्रिया व त्यांचीं मुलें यांची मुसलमानी धर्म न पतकरल्याबद्दल कत्तल करण्यांत आली होती. शीख या मशिदीस पवित्र मानतात त्याचें हेंहि कारण आहे.

इतिहासावरून असें दिसतें कीं इ. स. १७६४ पासून हें गुरुद्वार शीखांच्या ताब्यांत आलें असावें. असेंही सांगतात कीं खुद्द मिर मानूनें मुलतानचे स्वारींत मदत केल्याबद्दल हें गुरुद्वार शीखांना देऊन टाकिलें. कसेंही असलें तरी यावरून येवढें स्पष्ट होतें कीं आज सुमारें १७० वर्षें या गुरुद्वारवर शीखांचा ताबा आहे. मुसलमानांनींही गुरुद्वारच्या आवारांतील मशिदीचा ताबा मिळविण्याची आजवर दोनतीनदां खटपट केली आहे. इ. १८८३ मध्यें मुसलमानांनीं पंजाबच्या ले. गव्हर्नरांकडे अपील केलें होतें परंतु त्याचा निकाल शिखांच्याच बाजूचा झाला. यानंतर अगदीं अलीकडे म्हणजे १९३० मध्यें गुरुद्वार ट्रिब्यूनलनेंही गुरुद्वारावर शीखांचाच ताबा सांगितला व त्यानंतरही १९३४ मध्यें हायकोर्टानें ट्रिब्यूनलप्रमाणेंच निकाल दिला आहे.

यावरून असें स्पष्ट होतें कीं आरंभापासून या गुरुद्वारांतील मशिदीबाबत प्रत्येक वेळीं मुसलमानांवर उलटी बाजू आलेली आहे. तसेंच गेल्या १७० वर्षांत या ठिकाणीं मुसलमानांची वहिवाट नाहीं. तेव्हां ओघानेंच गुरुद्वारावर शीखांची पूर्ण मालकी शाबीत झालेली असून तिला वेळोवेळीं कायद्याचा आधार मिळालेला आहे. अर्थातच आपल्या मालकीच्या जागेची डागडुजी अगर तिच्यांत फेरबदल करण्याचा पूर्ण अधिकार शीखांना पोचतो.

## २० बलुचिस्तानांतील भूकंप

शुक्रवार ता. ३१ मे १९३५ रोजीं पहाटे तीन वाजतां तीन मिनिटेंपर्यंत चालू राहिलेल्या एका भयंकर भूकंपाच्या धक्क्यानें बोलनखिंडीच्या पायथ्याशीं असलेल्या हिंदुस्थानांतील ब्रिटिश लष्करी व वैमानिक महत्त्वाच्या ठिकाणाची व हिंदुस्थानी, मुसलमान हिंदु, महाराष्ट्रीय व गुजराथी, पारशी, युरोपियन व ख्रिस्ती मिळून अदमासें तीस हजार लोकांची घरादारांसुद्धां जी नासाडी केली तिचें वर्णन-दृश्य ताजेंच आहे. असल्या भयंकर संकटांतून सुटलेल्यांनीं सांगितलेल्या हकीकती वाचून त्या दैवी प्रकोपाचें चित्र आपल्यापुढें उभें राहतें. भूकंपाचे धक्के शुक्रवार पहाटे तीन वाजेपासून शनिवारीं दुपारीं दोन वाजेपर्यंत मधून मधून लहानमोठ्या प्रमाणांत सारखे बसत होते. सदर धक्के उत्तर सिंधमध्यें लारखाना, शिकारपूर, सक्कर, राटोदरो येथेंही शुक्रवारीं पहांटे ३ ते ४ च्या दरम्यान बसले पण तेथें कांहीं नुकसान झाल्याचें कळलें नाहीं. घरांची पडझड, रॉयल एअर फोर्स (वैमानिक दळ) च्या इमारती व बराकी व विमानें यांची नासधूस व रेल्वे स्टेशन व लष्करी ठाणें यांचें नुकसान क्वेटा येथें कल्पनातीत झालें. क्वेटा शहरांतील अतिशय दाट वस्तीचे उत्तर हिंदुस्थानांतील मुसलमान, हिंदू शीख लोकांचे मोहल्ले व बाजार यांत प्राणहानि फार झाली. प्राणहानीचें मुख्य कारण म्हणजे धक्के फार जोराचे असून पहांटेची वेळ असल्यानें लोक स्वस्थ झोंपेंत होते व ह्या आकस्मिक पडझडीनीं शें. ७० लोकांना घराबाहेर पडण्यास मुळींच अवसर मिळाला नाहीं. घरेंदारें, दुकानें व त्यांतील माल, वगैरेंचें नुकसान कित्येक लाखांचें झालें. युरोपियन लोकांचेंही बरेंच नुकसान झालें. पण भूकंपानंतर लगेच दुसऱ्या दिवसापासून क्वेटा शहर वगैरे भागांत लष्करी कायदा पुकारण्यांत आल्यानें हिंदी लोकांना स्वतःचे आप्तेष्ट सोडविण्यास जी मदत तावडतोब करतां आली असती ती करतां आली नाहीं. युरोपियन लोकांत, बरेचसे वैमानिक दळांत व लष्करांतील अधिकारी वगैरे असतात; जिवंत राहिलेल्या युरोपिअन कुटुंबीयांची तांतडीनें जाणाऱ्या बोटीनें सरकारनें विलायतेस रवानगी केली व अजूनही चालू आहे.

व्हाईसरॉय व त्यांची पत्नी यांनीं पांच हजार रुपयांची देणगी देऊन रिलीफ फंडास सुरुवात केली. ह्याशिवाय उत्तर हिंदुस्थानांतून स्वयंसेवक,

डॉक्टर, व नर्सेस, पोलिस, औषधें, अन्नवस्त्र वगैरेंचा पुरवठा सारखा चालू आहे. २ जून पासून रेल्वेंतून लाहोर, कराची, अमृतसर वगैरे ठिकाणीं क्वेट्याहून लोक सारखे रवाना होत आहेत; प्रमुख स्टेशनांवर डॉक्टर प्रथमोपचारांचीं उपकरणें घेऊन हजर असतात.

क्वेट्यास हिंदू व मुसलमान वस्तीचें प्रमाण ८:११ असे. ह्यांतील पंजाब व सिंधमधून हिंदू, व पंजाब, वायव्य सरहद्दप्रांत व सिंध यांतून आलेल्या मुसलमानांचा भरणा असे. महाराष्ट्रीय मंडळींतील बहुतेक मिलिटरी अकौंटस् वगैरे सरकारी खात्यांतून नोकर व अधिकारी असत.शीख, हिंदु व मुसलमान व्यापारी, दुकानदार, मजूर वगैरे पेशांतील असत. सुमारें २००–२५० पारशी लोकांपैकीं फक्त २५च जिवंत आहेत. भूकंपानंतर रात्रीं जळत राहिलेल्या दिव्यामुळें व पेट्रोलनें पेट घेतल्यानें कांहीं भागांत आगी लागल्या; भूकंपानें पडलेल्या कित्येक ठिकाणीं तसेंच भेगांतून एकदम पाणी उसळलें व जलप्रलय झाला. जून महिन्यांतही मधून मधून सारखे पुनः धक्के बसत होते. क्वेट्यापासून दूर अंतरावर एक पर्वत दुभंग झाल्याची बातमी आहे. जूनचे शेवटीं पुनः धक्के बसून बरेंच नुकसान झालें. सरकारतर्फे बिहार–भूकंप व बादशहांची ज्युबिली वगैरे फंड १९३४–३५ मध्यें गोळा करण्यांत आले आहेत. ज्युबिली फंडाचा विनियोग कांहीं अंशीं क्वेट्यांतील जनतेच्या सहायादाखल व्हावा असें लोकमत आहे. परंतु ज्युबिली फंडाची रक्कम रेडक्रॉस सोसायटी, लेडी डफरीन फंड वगैरेंना शे. ३० प्रमाणांत देण्यांत येऊन बाकीची प्रांतोप्रांतीं लोकोपयोगी कार्यार्थ वाटण्यांत येणार असल्याचें हिंदुस्थान सरकारनें जाहीर केलें आहे. ठिकठिकाणाहून आपद्ग्रस्तांना मदत होत आहे.

---

## २१ केमाल पाशाचा झपाटा

केमालपाशा हा तुर्कस्थानचा शास्ता झाल्यापासून आपला देश युरोपिअन देशांच्या तोडीचा करण्यासाठीं त्याचे अव्याहत प्रयत्न चालू आहेत. त्यानें तुर्कस्थानांत प्रजासत्ताक राज्य स्थापिलें खरें पण अशा तऱ्हेची राज्यसत्ता चालविण्यास लोकांच्या अंगीं निरनिराळ्या तऱ्हेचा वकूब असावा लागतो. तो तुर्कस्थानांत नाहीं म्हणून तो उत्पन्नकरण्याचें त्याचें काम चालू आहे. केवळ राजकारणांतच कांहीं नवेपण आणिलें म्हणजे प्रजासत्ताक पद्धति तुर्कस्थानांत कायमचें मूळ धरील असें त्यास वाटत नाहीं. सर्व तऱ्हांनीं लोक प्रगतिपर झाल्यावांचून हा नवीन कल्पनांचा बोजा त्यांना उचलणार नाहीं व मुद्दामच तो त्यांच्या डोक्यावर दिला तर तो त्यांना तोलतां यावयाचा नाहीं असें त्याचें ठाम मत असल्यामुळें धार्मिक, सामाजिक बाबतींतही त्यानें पुष्कळच उलथापालथ चालविली आहे. जुन्या संस्था, जुन्या समजुती, जितक्या उध्वस्त करतां येतील तितक्या करण्याचा त्यानें झपाटा चालविला आहे. आमच्याइकडले मुसलमान इकडे खिलाफत टिकावी म्हणून खूप आरडाओरडा करीत होते. पण तिकडे त्यानें ती नाहींशी करून टाकिली, तुर्की टोपी फेकून देऊन तेथें त्यानें युरोपियन टोपी आणून ठेविली, स्त्रियांचा बुरखा आणि पडदा हे कायमचे गुंडाळून ठेवून दिले, अरबी भाषेत लिहिलेलें कुराण आणि केवळ कुराणांत दिलेला कायदा यांचीही वासलात लाविली, जुनी लिपी रद्द केली,तुर्की संगीत बंद केलें अशा एक ना दोन कित्येक सुधारणा त्यानें भराभर करून टाकिल्या. नवी सुधारणा म्हणजे त्यानें स्त्रियांना मतदानाचा हक्क दिला व सरकारी खात्यांतही अधिकाराच्या जागीं स्त्रियांच्या नेमणुका व्हावयास हरकत नसल्याचें त्यानें ठरविलें आहे. १९३० सालापासून म्युनिसिपालिटयांतील कामकाजांत स्त्रियांची योजना करून त्यांचें काम कसें काय चालतें हें तो पाहात होता. स्त्रिया हीं कामें चांगलीं करीत आहेत हें पाहातांच त्यानें त्यांना मताधिकाराचाही हक्क देऊन टाकिला. २० लक्ष स्त्रियांना हा हक्क मिळून त्याचा त्यांनीं उपयोगही केला. आणि ८ फेब्रुवारी रोजीं तुर्की पार्लमेंटांत सतरा स्त्रिया निवडूनही आल्या. या पैकीं सोळा चांगल्या नागर असून सुशिक्षित आहेत. यापैकीं दहा शिक्षक आहेत. चार म्युनिसिपालिटीच्या सभासद आहेत. एक डॉक्टर आहे व दोन शेतकरी आहेत. फ्रान्स देशांत लोकसत्ता स्थापन होऊन आज दीडशें वर्षें लोटलीं. पण तेथेंही स्त्रियांच्या बाबतींतील जे औदार्य प्रकट झालें नाहीं तें केमाल पाशाच्या या कोवळ्या प्रजासत्ताक देशांत झालें. याचें सर्वांस नवल वाटत आहे. आपली कृतज्ञता व्यक्त करण्यासाठीं लक्षावधि स्त्रियांनीं आपल्या सह्या घालून केमाल पाशाला नुकतेंच मानपत्र अर्पण केलें.

मुस्ताफानें आणखी एक मोठा गमतीचा प्रयोग करून पाहिला. एप्रिल महिन्याच्या २२ पासून २७ तारखेपर्यंत तुर्कस्थानांतील सर्व मुख्य मुख्य गावांचा कारभार त्यानें दहा ते १५ वर्षांच्या मुलामुलींच्या

हवाली केला! अट मात्र ही कीं जे हुकूम ही मंडळी देतील ते जर यथायोग्य असले तरच तावडतोब अमलांत यावयाचे. अर्थात् या मुला-मुलींना ग्रामव्यवस्थेचें पुस्तकी शिक्षण देण्याच्या ऐवजीं प्रत्यक्ष प्रयोगानें व वहिवाटीनेंच त्यांना काय करतां येतें हें त्यास पहावयाचें होतें. पुस्तकांतून मिळणाऱ्या शिक्षणापेक्षां या सात दिवसांच्या प्रात्यक्षिकानें मिळालेलें शिक्षण त्यांना फारच उपयोगी पडेल यांत कांहींच शंका नाहीं.

तुर्की लोकांत नांवाचा घोंटाळा फार होतो कारण आपल्या इकडल्या सारखीं आडनांवें तुर्की लोकांना नाहींत. लोक एकमेकांना साध्या नांवानेंच संबोधितात. हें एरव्हीं फारसें नडत नाहीं. पण पोलीस खातें, फौज व गुन्हे करणारांच्या वगैरे याद्या यांत सारख्या सारख्या नांवामुळें फारच घोटाळे होतात. अल्ली, अहमद, महमद, मुस्ताफा हीं नांवें इतकीं येतात कीं हा अहमद कोणचा आणि तो मुस्ताफा कोणचा याचा निकाल लावणें फार कठिण पडतें. प्रत्येक कुटुंबाला त्याचें त्याचें स्वतंत्र नांव असावें असें केमालपाशाला फार दिवस वाटत होतें. म्हणून १९३४ सालीं त्यानें कायदा केला कीं प्रत्येक तुर्की कुटुंबानें आपल्याला कांहीं तरी आडनांव घ्यावें. १९३५ च्या जानेवारीपर्यंत प्रत्येकानें आपल्या पसंतीचें नांव ठरवावयाचें होतें; पण हें जमत नाहीं असें पाहातांच त्यानें सक्तीला सुरवात केली व देशांत जिकडे तिकडे लोक आपापल्यालाच नांवें ठेवून घ्यावयास लागले!

या साध्या दिसणाऱ्या पण खरोखरी अवघड असलेल्या सुधारणाच करून केमालपाशा बाहेरील देशांच्या लोकांची करमणूक करीत आहे असें कोणी समजूं नये. इतर देशांतील लोकांना जे प्रश्न अवघड बनून राहतात त्यांची सोडवणूक कशी करावी याचें हें अतिशय उत्तम उदाहरण त्यानें घालून दिलें आहे. सर्वांस माहीतच आहे कीं, तुर्कस्थानांत ग्रीक लोकांची व ग्रीस देशांत तुर्कीयांची मोठीच वस्ती आहे. महायुद्धानंतर जेव्हां ग्रीस व तुर्कस्थान या देशांचा मोठा झगडा सुरू झाला तेव्हां या लोकांची अगदीं दैना उडाली व पुढें ग्रीसचा पराभव होऊन तुर्की प्रजासत्ताक राज्य प्रस्थापित झालें तरी या लोकांच्या वस्तीमुळें पुन्हां परस्परांच्या कटकटी उत्पन्न होतीलच हें भय ग्रीस व टर्की या दोघांच्याही पोटांत कायमच होतें. म्हणून लॉरूनच्या तहाप्रमाणें कमिशन बसलें व तुर्कस्थानांतील सात लक्ष ग्रीक लोक ग्रीसमध्यें कसे पाठवावे व ग्रीसमध्यें रहाणारे तीन लक्ष पन्नास हजार तुर्क लोक तुर्कस्थानांत कसें पाठवावें याची विवंचना करूं लागले. नुसते हे दशलक्ष लोक इकडून तिकडे हलवावयाचे तर वाहातुकीची व्यवस्था कशी करावयाची हा प्रश्नच अवघड होऊन बसला. पण त्यानंतर त्यांच्या मालमत्तेची किंमत काय करावयाची हा प्रश्न जेव्हां उत्पन्न झाला तेव्हां मात्र मोठेंच वान्धे उत्पन्न झाले. पण ग्रीस व तुर्कस्थान यांनी जुनीं वैरें विसरून समंजसपणा धारण केला व उभयतांच्या मालमत्तेच्या किंमती ठरवून टाकल्या व जितकी फिटास फीट करतां आली तितकी करून ग्रीसनें तुर्कांला वर चाळीसपन्नास लक्ष रुपये दिले व याप्रमाणें प्रत्यक्ष लोकांची तर ऐन जिनसी देवघेव झालीच पण त्यांच्या मालमत्तेचाही सलोख्यानें निकाल लागला. आतां फक्त इस्तंबूल व थ्रेस येथें परस्परांचे कांहीं लोक आहेत व परस्परांच्या संमतीनें त्यांस तेथें राहूं द्यावें असें ठरलें आहे. याप्रमाणें आपापल्या देशांतील अल्पसंख्याकांचा प्रश्न ग्रीस व केमालपाशा यांनीं फार सुखासमाधानानें सोडविला.

---

## २२ अरबस्तानचा वाहाबी राजा

(लेख वाचतांना अरबस्थानचा नकाशा पाहावा)

इब्न सय्यद याचें नांव आतां सर्वांच्या तोंडीं झालें आहे. हा सर्व अरबस्तानचा राजा असून आंतरराष्ट्रीय राजकारणांत त्याला आतां कांहीं दर्जा प्राप्त झाला आहे. फ्रान्स, जर्मनी, बेल्जम, स्वित्झर्लंड आणि लक्झेमबर्ग इत्यादि मिळून जेवढा प्रदेश होईल त्यापेक्षां अधिक मोठ्या प्रदेशावर तो सध्यां राज्य करीत आहे. एका माणसानें आपल्या अंगांतील सामर्थ्याच्या व हुन्नराच्या बळावर एवढें अफाट राज्य कमावणें हें मोठें विस्मय उत्पन्न करणारें आहे.

मुसलमानी धर्मांत काय रटमट चालूं आहे याची आपल्याला कल्पना नाहीं. अठराव्या शतकांत महमद इब्न अबदुल वाहाब यानें वाहाबी नांवाचा एक नवा पंथ चालूं केला. मुसलमानी धर्म हा मुळांत कितीही कडकडीत असला तरी कित्येक शतकें या लोकांनीं राजवैभवें भोगल्यामुळें व आधुनिक सुधारणांच्या विलासप्रियतेमुळें मुसलमानधर्मी लोकांच्या आचरणावर धर्महीनतेचा बुऱ्हा चढूं लागला. सदर महमद इब्न अबदुल वाहाब याला हें मुळींच पाहवेना व म्हणून

त्यानें चालू धर्मकल्पनांविरुद्ध बंड पुकारलें. मूळ कुराणांत सांगितलेल्या शुद्ध कल्पना व घालून दिलेले शुद्ध आचार आपण संभाळले पाहिजेत हा त्याचा मुख्य कटाक्ष होता. मक्का व मदिना या क्षेत्रांच्याच यात्रा मुसलमानांनीं कराव्या पण, संतमहंतांच्या समाधींची पूजा करणें हें काफर पद्धतीचें आहे म्हणून टाकून द्यावें; मुसलमानांनीं तमाखू ओढूं नये व शराब पिऊं नये; त्यांनीं अंगावर जडजवाहीर घालूं नये; उंची वस्त्रें लेवूं नयेत; जुगार खेळूं नये; चोराचा हात कापूनच टाकला पाहिजे; आणि व्यभिचारी माणसाला देहांत शासन झालें पाहिजे. या कल्पना त्यानें आपलें तत्त्वज्ञान म्हणून कायम केल्या. आधुनिक जीविताची परिणति लक्षांत घेतां नागर मुसलमानांस यांतील कित्येक कल्पना अगदीं चुकीच्या वाटतात पण, वाहाबी लोकांशीं या बाबतींत जर चर्चा करावी तर आपल्या म्हणण्याला आधार म्हणून ते कुराणांतील ऋचा भराभर काढून दाखवितात. यामुळें मुसलमानांची मोठी कुचंबणा होते. असो. मुसलमानी धर्मांतील हा प्युरिटन पंथच होय.

वाहाब याचा अतिशय छळ होऊं लागला म्हणून अरबी वाळवंटाच्या उत्तरेकडे राज्य करीत असलेल्या अमीर महमद इब्न सय्यद या नांवाच्या एका छोटया राजाच्या आश्रयाला तो गेला. सय्यद यानें वाहाब यास आश्रय दिला इतकेंच नव्हे तर त्यानें त्याचा पंथही पतकरला आणि आजूबाजूच्या जमातीला तो घ्यावयास लाविला. १७६५ सालीं अमीर सय्यद मरण पावला. त्याचा मुलगा अबदुल अझीझ यानें तेंच काम पुढें चालूं ठेवून सर्व मध्य अरबस्थान काबीज केलें. अरबस्थानावर सय्यदांचा अंमल कायम झाल्यामुळें तुर्कस्थानच्या सुलतानाला चैन पडेना; कारण अरबस्थानची मालकी पूर्वीच्या कल्पनेप्रमाणें त्याच्याकडे होती. त्याच्या मनांत सय्यदाला हुसकून लावावयाचें होतें. म्हणून त्यानें इजिप्तचा व्हाइसरॉय अहमद अल्ली यास हें वाहाबीचें बंड मोडावयास पाठविलें. दरम्यान अबदुल अझीझ मरण पावून त्याचा मुलगा अबदुल्ला गादीवर आला होता. महमद अल्लीनें याला अगदीं हैराण केलें; तो शरण आला व कैदी म्हणून अहमदअल्लीनें त्यास कॉन्स्टँटिनोपल येथें धाडून दिलें. तेथील सुलतानानें त्याचा शिरच्छेद केला. सय्यदाच्या घराण्यांतील माणसांची अगदीं पांगापांग होऊन गेली व तें घराणें व वाहाबी पंथ हीं दोनही नामशेष झाल्यासारखीं झाली. पुढें कांहीं दिवस शमार प्रांतांतील रशिद वंशानें कांहीं थोडी बहुत हालचाल केली. पण एकंदरींत अरबस्थानांत सगळीकडे सामसूमच झालें. अशा या परिस्थितींत अरबस्थानचा सध्यांचा राजा अबदुल अझिझ याचा जन्म झाला.

याचा बाप लांब कोठें तरी इराणी आखाताच्या कांठीं जीव संभाळून राहिलेला होता. अशा या कानकोंडया अवस्थेंत यानें पहिलीं वीस वर्षें घालविलीं. त्याच्या मनांत सय्यदांची पूर्वीची सत्ता पुन्हां प्रस्थापित करावी असें होतें पण पहिली अडचण म्हणजे वर सांगितलेलें जें रशिद घराणें त्याची होती. ही अडचण त्यानें शुद्ध पुंडगिरी करून नाहींशी केली (१९०१). बरोबर दहा पंधरा असामी घेऊन तो या रशिदी गव्हर्नरच्या राहात्या घरांत शिरला. रात्रभर तेथें गुपचिप राहून झुंजुक होतांच त्यानें त्या गव्हर्नरवर छापा घातला, व सर्वांचा निःपात करून सकाळ होतांच त्यानें आपल्या नांवाची द्वाही फिरविली. तुर्की दरबारनें रशिदांना मदत चालू केली. पण हे दुर्दैवी रशिद एकमेकांतच भांडूं लागले. त्याचा अबदुलनें पुरा फायदा घेतला. दरम्यान त्यानें या वाळवंटांत घोडेफेक करून प्रपंच चालविणारे जे बेदुइन लोक त्यांची मैत्री संपादिली व थोडयाच दिवसांत तो नेज्द प्रांताचा धनी झाला (१९०६). सय्यद घराणें पुन्हां प्रस्थापित झालें आहे असें पाहातांच पूर्वी पांगापांग झालेले सय्यदांचे नातू, पणतू पुन्हां तेथें जमूं लागले व जणू कांहीं पूर्वीच्या वतनाचे वाटेकरी या नात्यानें कांहीं हक्क सांगूं लागले. अबदुलनें जलदी करून त्यांचें बळ साफ मोडून टाकलें. अबदुलच्या हळूहळू ध्यानांत येऊं लागलें कीं या बेदुइन लोकांची आपल्यावर कितीही भक्ति असली, वाहाबी तत्त्वें कितीहीं चांगलीं असलीं, आणि शत्रूंच्या संपत्तीचा लोभ त्यांना आपण कितीही दाखविला तरी जोंपर्यंत बेदुइन लोक जीवितांतील भुरटेपणा टाकीत नाहींत तोंपर्यंत त्यांच्या बळावर उभारलेलें आपलें राज्य अस्थिरच राहणार. यासाठीं त्यानें त्यांच्या जीविताची निराळीच घडी बसविण्याचा उपक्रम चालूं केला. त्यानें त्यांच्यांत इखवान नांवाची चळवळ चालूं केली. इखवान म्हणजे भाऊ. या चळवळींत जे सामील होतील त्यांनीं एकमेकांशीं भावासारखेंच वागलें पाहिजे; त्यांनीं भुरटेपणा सोडून दिला पाहिजे; पाल ठोकूं तेथें वस्ती हा दंडक टाकून देऊन त्यांनीं घरेंदारें केलीं पाहिजेत; खजुरीच्या बागा लाविल्या पाहिजेत; आणि शेतें

पिकविलीं पाहिजेत. जे कोणी हें पतकरतील त्यांना सरकारांतून मुबलक मदत मिळेल. त्यांना मशीद बांधावयास सरकारांतून पैसा मिळेल. या बंधुभावांत जे कोणी सामील होतील त्यांना सरकारांतून हत्यारें व दारूगोळा मिळेल. मा त्यांनीं राजासाठीं इमानानें लढलें पाहिजे. अबदुलनें सुरू केलेली ही बेदुइन लोकांच्या वसाहतींची चळवळ झपाटयानें पसरत जाऊन, आज त्यांच्या सत्तर वसाहती झाल्या असून एक लक्ष लोक त्यांतून राहात आहेत. या एक लाखांत जेवढे शिपाईगडी असतील तेवढयांचेंच बळ अबदुलला पुरेसें ठरलें.

इतकी जमवाजमव होत आहे तों महायुद्ध सुरू झालें. तुर्की राष्ट्र जर्मनांना मिळालें. इंग्रज, फ्रेंच वगैरे, नवे नवे दोस्त संपादण्याच्या कामीं, सर्व पृथ्वीभर घिरटया घालीत होते. अबदुलनें ओळखलें कीं पुढें पाऊल टाकावयास आतां चांगली संधि आहे. रशिद घराणें जर्मनीच्या अंगानें खटपटी करूं लागलें. अर्थात् अबदुलनें आपला कल इंग्रजांच्या बाजूचा आहे असें दाखविलें. इंग्रजांनीं हा दोस्त झटकन हस्तगत केला. तहनामा होऊन इतकेंच ठरलें कीं अबदुलनें इंग्रजांच्या शत्रूला मिळूं नये व इंग्रजांनीं त्याला दरसाल ६० हजार पौंड द्यावे. अबदुलनें हा सौदा चांगलाच पटविला व स्वस्थ बसून आतां पुढें काय करावें हें तो पाहूं लागला. अरबस्थानांतील एक शूर माणूस हस्तगत केला याचें इंग्रजांना मोठेंच कौतुक वाटलें. हीच पद्धति चालू ठेवून तुर्की साम्राज्यांतील आणखी कांहीं पोटराजे फोडावे हा डाव त्यांनीं चालू केला. तांबडया समुद्राच्या कांठीं हेजाज नांवाचा एक अगदीं निरुंद पण लांबलचक प्रांत आहे. तेथें हुसेन नांवाचा अमीर राज्य करीत होता. अबदुलला ६० हजार पौंड मिळतात हें पाहून त्याच्या तोंडास पाणी सुटलें. इंग्रजांनींही तें ओळखलें व नुकताच निवर्तलेला जो कर्नल लॉरेन्स त्याच्या हस्तें त्यांनीं त्याला मोठीच लालूच दाखविली. आपण स्वतंत्र राजा व्हावें ही इच्छा धरून इंग्रजाच्या मदतीनें त्यानें तुर्कांविरुद्ध प्रचंड बंड उभें केलें व आपण स्वतंत्र आहों असें जाहीर केलें. इंग्रजांनीं त्याचें स्वतंत्रपण ताबडतोब मान्य केलें व शिवाय या त्याच्या उपकाराबद्दल ६० लक्ष पौंड त्याला बक्षिस दिले. महायुद्ध संपल्यावर अबदुल इब्न सय्यद याची स्थिति मोठी चमत्कारिक झाली. हुसेन हा स्वतंत्र राजा झाला इतकेंच नव्हे तर त्याचा मुलगा अबदुल्ला याला १९२१ सालीं जॉर्डन नदीवरचें राज्य इंग्रजांनीं दिलें; व दुसरा मुलगा जो फिझल त्याला इराक नांवाचें स्वतं राज्य करून तेथील र जा बनविलें. म्हणजे इब्न सय्यदच्या पश्चिमेस, उत्तरेस व पूर्वेस ही हुसेनशाही स्थापन झाली. पण एवढयावरच हे विले नाहीं. त्याचे कायमचे शत्रू जे रशिद त्यांनीं शमार येथें आपलें स्वतंत्र राज्य जाहीर केलें आणि इंग्रजांनींही इब्न सय्यद आणि इराक येथील आपला राजा यांच्यामध्यें एक राज्य असावें म्हणून या नव्या राज्याला मान्यता दिली. हें पाहून इब्न सय्यद अगदीं खवळून गेला. युद्धाचा चाप संपून गेल्यामुळें या अरबस्थानांतील इंग्रजांच्या कारवाया संपून गे ल्या व त्यांनीं देऊं केलेली संरक्षणें ढिलीं पडलीं. इतक्यांत हुसेन व इब्न सय्यद यांच्यांत खुर्मा येथें कांहीं सरहद्दीचें भांडण निघालें. सय्यद नको नको म्हणत असतां हुसेननें आपले लोक धाडून सरहद्दीचा तो भाग ताब्यांत घेतला. कारण त्याला इंग्रजांची फूस होती. पण सय्यदनें रातोरात हुसेनच्या लोकांवर छापा घातला आणि त्याचे एकूणएक लोक ठार मारून टाकले. हा त्याचा तडाखा पाहून इंग्रज गप्प बसले. याप्रमाणें हुसेनला वंगवून सय्यद हा रशिदच्या मागें लागला त्यांच्यांतील एका गृहकलहाचा फायदा घेऊन अबदुल हा आपल्या फौजेनिशीं त्यांच्या राजधानींत शिरला व सगळया राजघराण्यांचें निर्संतान करून त्यानें हा रशिदी काटा कायमचा उपटून टाकला. रशिदनाही इंग्रजांचा आश्रय होताच तरीही त्यांनीं पुन्हा धड खाल्ली. दरम्यान हुसेननें आपलें मरण ओढवून घेतलें. मक्का हें क्षेत्र त्याच्याच मुलुखांत होतें. तेथें जाणारे जे लक्षावधी यात्रेकरू त्यांच्या सुखसोयींकडे तो अगदींच पाहिना! इतकेंच नव्हे पण तो त्यांना अतिशय छळूं लागला व त्यांचें वित्त हरण करूं लागला; या यात्रेकरूंचा पक्ष घेऊन इब्न सय्यदानें मोठया शिताफीनें लोकमत आपल्या अंगाला वळवून घेतलें. दरम्यान आणखी एक चूक हुसेननें केली. तिकडे केमालपाशा हा प्रबळ होतांच, तुर्की लोकसत्ताक राज्य व खिलाफत यांचा कसलाही संबंध नाहीं असें त्यानें ठरविलें. अर्थात् खलिफाची गादी रिकामी पडली. आतां कोणी खलिफा व्हावयाचें याची शहानिशा चालू आहे तोंच हुसेननें जाहीर केलें कीं मीच खलिफा होणार. ही त्याची घोषणा ऐकून सर्व देशांतील मुसलमान अगदीं चवताळून गेले आणि इब्न सय्यदाचे वाहाबी लोक तर रागानें बेफाम झाले व हुसेनला शासन करण्याचें त्यांनीं ठरविलें. आपल्या

हिंदुस्थानी मुसलमानांनींही त्याच्या धोरणाला पाठिंबा दिला. मोठ्या फौजेनिशीं तो हुसेनच्या मुलुखांत शिरला. हुसेन अगदीं घाबरला. मुलाच्या नांवें गादी करून त्यानें पळ काढला. दरम्यान सय्यदाचा झपाटा चालूच होता. हुसेनचा मुलगा व इतर सर्व लोक जीव घेऊन वाट फुटेल तिकडे पळून गेले व इब्न सय्यद हेजाज प्रांताचाही धनी झाला. इतकें झालें तरी पुढें काय करावयाचें हें कोणाचेंच ठरलें नव्हतें. तथापि सय्यद फार धोरणानें वागला. वाहाबी लोक संतमहंताच्या समाधी फोडून टाकीत आहेत व अत्याचार करीत आहेत अशा वर्तमानपत्री कथा ऐकून इराण, हिंदुस्थान इकडून मोठमोठाली शिष्टमंडळी तिकडे गेली होती. त्यांच्याशीं इब्न सय्यद फार सौम्यपणानें वागला; धर्मक्षेत्रांची कसलीही काळजी करूं नका असें म्हणाला व ही लढाईची गडबड एकदां संपली म्हणजे सगळ्या जगांतले मुसलमान एकत्र बोलवून आणून त्यांच्या सल्ल्यानेंच या पवित्र तीर्थांची कांहीं कायमची व्यवस्था करूं असेंही वचन त्यानें त्यांना दिलें व त्यांची घरोघरीं पाठवणी करून दिली. हें होतांच त्यानें जाहीर केलें कीं हेजाज प्रांताची गादी रिकामी पडली आहे तेथील राजा मीच होणार. पुढें एक वर्षाच्या आंत नेज्दचा सुलतान हें आपलें नांव टाकून नेज्दचा राजा हें नांव त्यानें धारण केलें व लवकरच आपल्या हातीं आलेलीं हीं सर्व अरबी राज्यें एकत्र करून त्या सर्वांना अरबस्थानचें सय्यदी राज्य असें नांव त्यानें कायम केलें.

पुढें, ठरल्याप्रमाणें मुसलमानांची परिषद भरली. पण तोंपर्यंत इब्न सय्यद हा एक लहानसा कोपरा सोडून सर्व अरबस्थानचा राजा होऊन बसला होता व त्याच्या विरुद्ध ब्र काढण्याची कोणाची प्राज्ञा उरली नव्हती. परिषदेंत खिलाफतीचा प्रश्न निघाला तेव्हां असें ठरविण्यांत आलें कीं कायरो येथें आणखी एक परिषद भरवावी व तेथें याचा निकाल करवावा व तीर्थक्षेत्रांचे व्यवस्थेविषयीं विचार निघाला तेव्हां त्यानें सांगितलें कीं या सर्व क्षेत्रस्थ लोकांना मी प्रांतिक स्वराज्याचे हक्क दिलेले आहेत व ते त्यांत खूषही आहेत. परिषदवाल्यांनीं क्षेत्रस्थांस विचारलें "आपण खूष आहां काय?" तेव्हां सर्वांनी माना हलवून सांगितलें कीं "आमचा नवा धनी आम्हास फारच आवडतो"! याप्रमाणें इब्न सय्यदनें आपली सत्ता भक्कम करून टाकली. कोपऱ्यांतल्या येमेनच्या राजानें थोडी टुरटुर सुरूं करतांच सय्यदनें त्यालाही एक धक्का दिला व सर्वस्वी आपल्या मुठींत आणून ठेविलें.

याप्रमाणें इब्न सय्यद हा आज सर्व अरबस्थानचा एकच एक राजा होऊन बसला आहे. आधुनिक राजकारणास अनुसरून त्यानें नवीं धोरणें घातलीं आहेत व शेजाऱ्यापाजाऱ्याशीं सख्य जोडिलें आहे. युरोपांतील सर्व देशांनीं त्याचें राजेपण मान्य केलें आहे व निरनिराळ्या प्रांतांतील जमातींचें वैमनस्य मोडून टाकून त्यानें देशांत शांतता प्रस्थापित केली आहे व याप्रमाणें १९०१ सालीं म्हणजे वयाच्या एकविसाव्या वर्षीं सुरूं केलेली राज्यसंपादनाची कामगिरी त्यानें १९३४ सालीं परिपूर्ण केलेली आहे व भुरटा, अनाश्रित व आईबाप परागंदा झालेला असा पण समर्थ व हुन्नरबाज एकादा मनुष्य परिस्थितीचा वेळोवेळीं फायदा घेऊन आपल्या जीविताचें कसें सोनें करतो हें त्यानें जगासमोर सिद्ध केलें आहे.

---

## २३ हबसाणाचें राज्य

या राज्याचा एकंदर विस्तार कसकसा आहे याची पाहणी अजून झालेली नाहीं. हें पठार ६ ते ८ हजार फूट उंच असून येथें नेहमींच उन्हाळ्याची हवा असते. पाऊस रगड पडतो व अमुक सालीं पाऊस पडला नाहीं असें कधींच होत नाहीं. जमीन तर इतकी सुपीक आहे कीं, थोड्याशा श्रमानें वर्षाचीं तीन सुबलक पिकें काढतां येतात. लोकसंख्या सुमारें १ कोट असून पैकीं $\frac{१}{३}$ लोक वरिष्ठ वर्णाचे गणले जातात. उरलेले ६०–७० लक्ष लोक केवळ हिणकस असे आहेत. यांनीं फक्त या वरिष्ठांची सेवा करावी येवढाच त्यांचा धर्म. यांच्या इतक्या निरनिराळ्या पोट जाती आहेत व त्यांच्या भाषाही इतक्या भिन्न भिन्न आहेत कीं राजेसरकारचीं फर्मानें निरनिराळ्या सत्तर भाषांतून प्रसिद्ध व्हावीं लागतात. राजधानी म्हणजे पत्र्यांच्या खोपटांचें आणि वेड्यावांकड्या रस्त्यांचें एक चित्रविचित्र मकाण आहे. गांवची घाण रात्रींच्या वेळीं कोल्हीकुत्रीच नाहींशी करितात. तहनाम्याप्रमाणें गुलामांचा व्यापार या राज्यांत बंद असावयास हवा, पण तहनामा कागदावर राहिला आहे आणि माणसें विकण्याचा धूमधडाका येथें चालला आहे. हा मानवी गल्ला अरबस्थानांत रवाना होत असतांना, माणसें विकणाऱ्या चोरट्या व्यापारावर नजर ठेवण्यासाठीं अरबी समुद्रांत ज्या इंग्रज सरकारच्या

बोटी असतात त्यांच्या हें ध्यानांत येत नाहीं असें नाहीं. काय असेल तें असो पण हा माणसें विकण्याचा धडाका सारखा चालूंच आहे. येथील राज्यकर्ते लोक मोठे अभिमानी, लढाऊ बाण्याचे आणि चांगले बुद्धिमान आहेत. आपल्या भोंवतीं युरोपियन राष्ट्रांची रांग कशी लागली आहे व आज ना उद्यां ते लोक आपणाला कसें गिळणार आहेत याची जाणीव या लोकांना उत्पन्न झाली आहे. गुलामांचा व्यापार बंद व्हावा असें यांच्यांतील शहाण्यांचें मत आहे. पण शतकानुशतकें हाडीं मासीं खिळलेली चाल एकदम नाहींशी होण्याजोगी नाहीं. कसलेंही वेतन न देतां गलाम लोकांकडनच जमीन कसण्याचें काम चालू असतें. येथें अतिशय अवनत अशा प्रकारची ख्रिस्ती धर्माची एक तऱ्हा चालू आहे. तिच्यांतील जे उपाध्ये, गोसावी, धर्माधिकारी ते या गुलामगिरीला अनुकूलच असतात. काडतुसें आणि मिठाचे ढेंपसे कित्येक ठिकाणीं चलनी नाणें म्हणून वापरतात. हजारो उघडे नागडे हिंडणारे असंस्कृत लोक आणि नेहमींच वरदळीवर येणारे मुसलमान लोक याच गोंधळांत आपलेंही जिणें चालवीत असतात.

पण अशा या देशाचा राजा फार हुषार माणूस आहे. यानें बरेंच पर्यटन केलेलें असून पृथ्वीवरचा वारा कोणत्या दिशेनें वाहात आहे हें याला चांगलें कळून चुकलें आहे. इतर राष्ट्रांशीं आपला प्रसंग नेहमीं येणार हें ओळखून यानें आपल्या पदरीं युरोपांतील निरनिराळ्या देशचे चांगले हुषार लोक बाळगले आहेत. त्यानें आपली फौज बेल्जिअन शिक्षकांच्या हाताखालीं देऊन चांगली बलिष्ठ बनवून ठेविली आहे. तोफखाने, टॅंक्स, कडाबिनी, विमानें इत्यादि आधुनिक शस्त्रास्त्रांचे सर्व प्रकार त्यानें जवळ बाळगिले आहेत. आपल्या देशांत शिक्षणाचा प्रसार करण्याचीही बादशहाला मोठी इच्छा आहे. पण रशियाचा "पीटर दी ग्रेट" याचे या बाबतींतील प्रयत्न जसे पूर्वी अगदीं वायां गेले तसेच याही राजाचे जात आहेत. जिकडेतिकडे रस्ते बांधावेत, स्वच्छता ठेवावी अशी याला भारीच इच्छा आहे व तो आपल्याकडून थोडीबहुत याची अंमलबजावणीही करतो. इस्पितळें, तारायंत्रें, टेलिफोन, मोटारगाड्या, वायरलेस, विमानें हे सर्व प्रकार या राजानें जमविलेले आहेत. पण भोंवतालची सगळी असंस्कृत स्थिति पाहिली म्हणजे भलत्या गोष्टी भलत्याच ठिकाणीं आणून ठेविल्या आहेत असें पाहाणारांस वाटतें. देशी भाषेंत व फरेंच भाषेंत छापलेलीं अशीं वर्तमानपत्रेंही त्यानें ठेविलीं आहेत; अर्थात् राजाला हवें आहे तेंच त्यांत छापून येतें हें सांगावयास नको. राजा कितीही चांगला असो आणि त्याची तळमळ कितीही मोठी असो या देशांतील अरवूज जनता पाहिली म्हणजे कोणालाही असेंच वाटेल कीं आज ना उद्यां हें राष्ट्र कोणांतरी बलिष्ठाच्या हातीं खास जाणार आहे व बहुतेक सर्व लोकांची अशी खात्री आहे कीं हा बलिष्ठ म्हणजे इटली होय. साम्राज्यविस्ताराची वखवख फरेंचांना व इंग्रजांना आतां इतकीशी राहिली नाहीं. पण इटलीला मात्र ती अगदीं दुर्निवार आहे. हा देश सुधारण्यास म्हणजे हा देश गिळंकृत करण्यास आम्हास संधि मिळाली पाहिजे असा मुसोलिनीचा आग्रह आहे. आणि प्रस्तुत चालू असलेल्या राजकारणावरून असें स्पष्ट दिसतें कीं तो या बाबतींत कोणाचें ऐकणारही नाहीं. इटली व ॲबिसिनिया यांचें युद्ध जुंपलें तर जागतिक महत्त्वाचे असे अनेक प्रश्न उपस्थित होतील व युरोपांत शांतता कायम ठेवण्यासाठीं निरनिराळ्या देशांचे जे यत्न चालू आहेत ते विफल होतील हें उघड दिसत असल्यामुळें इग्लंडनें ॲबिसीनियाला आपल्या स्वतःच्या वसाहतींतून समुद्राकडे पोहोंचावयास त्याच्या मालकीची वाट करून द्यावयाचेंसुद्धां पत्करिलें. पण इंग्रजांनीं ही देऊं केलेली देणगी मुसोलिनीला मुळींच पसंत पडेना. त्यानें स्वच्छच सांगितलें कीं भांडण मिटविण्याचा हा तुमचा इलाज आम्हां इटालियन लोकांनाच मारक होणार आहे. सध्यां ॲबिसिनिया युद्धसामुग्री सांठवीत आहे. पण ती त्याला चोरून मारून आणावी लागत आहे. एकदां इंग्रजांनीं आपल्या सोमालीलॅंड या वसाहतींतून ॲबिसिनियाला त्याच्या स्वतःच्या मालकीची समुद्रापर्यंतची वाट आपण होऊन करून दिली म्हणजे ॲबिसिनियाच्या बंदरास रोज रणसामुग्रीचीं जहाजेंच्या जहाजें येऊन दाखल होतील व आमचें संकट दुणावत जाईल. मुसोलिनीच्या या उत्तराला समाधानकारक उत्तर करण्यास इंग्रज मुत्सद्यांना जड जाणार आहे. पण इंग्रजांच्या या देऊं केलेल्या देणगीनें एक नवेंच कुलंगडें जगताच्या ध्यानांत आलें आहे. इतके दिवस लोकांचा असा समज होऊन राहिला होता कीं इटली हा केवळ साम्राज्याच्या लालसेनें ॲबिसिनीयाच्या मागें विनाकारण भुणभुण लावीत असावा. पण इंग्रजांच्या या अतिउदारत्वामुळें ॲबिसिनियाकडे कांहीं दोष

असावा असें आतां ध्यानांत येऊं लागलें आहे. आपल्याला तांबड्या समुद्रावर किंवा हिंदी महासागरावर तोंड मिळालें पाहिजे हा ॲबिसिनियाचा आग्रह सर्वांस माहीत आहे.ही वाट इरिट्रीया किंवा इटालियन सोमालिलँड यांतून मिळविण्याचा कांहीं गुंडगिरीचा लपून छपून यत्न चालू असावा व म्हणून इटली त्याच्यावर चवताळून उठत असावा असें आतां स्पष्ट दिसत आहे. समुद्रावरील या तोंडाकरितां ॲबिसीनियानें इटलीशीं वर्दळीवर येऊं नये व जगांत युद्धाचा नवा भडका उठूं नये म्हणून इंग्रजांनीं हें स्वतःचें नुकसान करून घेण्याचें औदार्य दाखविण्याचें काम चालू केलें आहे हें स्पष्ट आहे. अर्थात् वर सांगितलेल्या कारणास्तव इटलीला तें मानवत नाहीं व म्हणून इटली व ॲबिसिनिया आपापलीं शस्त्रास्त्रें सज्ज करीत आहेत.

---

# हैदराबाद संस्थानाची ओळख

## कांहीं मोठीं घराणीं

### १ पायगा इलाख्याचें अमीर घराणें

हैदराबाद संस्थानांतील खुद्द राजघराणें सोडल्यास अत्यंत महत्त्वाचें सरदार घराणें म्हणजे पायगा इलाख्याच्या नवाबांचें होय. त्या घराण्यांतील मुली निजामांचे घराण्यांत व निजाम घराण्यांतील मुली पायगा नबाबाचे घरीं देण्यांत आल्या आहेत. ह्या विवाहसंबंधांमुळेंही ह्या घराण्यास अतिशय महत्त्व प्राप्त झालें आहे. शिवाय ह्या पायगा जहागिरीचें क्षेत्रफळ ४१३४ चौ. मैल आहे. त्यांत एकंदर १२७३ खेडीं असून त्यांचे २३ तालुके करण्यांत आले आहेत. वार्षिक उत्पन्न जवळजवळ ५० लाखांपर्यंत आहे. ह्या दृष्टीनें पाहिल्यास हिंदुस्थानांतील कित्येक देशी संस्थानांपेक्षां पायगा जहागिरीचें जास्त महत्त्व आहे असें म्हणतां येईल.

ह्या घराण्याचे मूळ पुरुष नबाब अबदुल फत्तेहखान तेगजंग बहादुर हे होत. हे मुसलमानांचे दुसरे खलिफा हजरत उमर ह्यांच्या वंशजापैकीं होते असें म्हणतात. नबाब तेगजंग ह्यांचे आजे महंमद बहाउद्दीनखान हे औरंगजेबाचे कारकीर्दीत आग्रा येथें मुख्य खजिनदार होते. त्यांचा मुलगा म्हणजे नबाब तेगजंग ह्यांचे वडील अबुल खैरखान हे पहिले निजाउल-मुलक आसफजाह ह्यांजबरोबर प्रथम दक्षिणेंत आले. प्रथम माळवा येथें त्यांची नायब सुभेदार म्हणून नेमणूक करण्यांत आली होती, परंतु कांहीं दिवसांनीं ते हैदराबादेसच स्थायिक झाले. ह्या सुमारास बाबू नाईक हा मराठा सरदार हैदराबाद प्रांतांत चौथाई वसूल करूं लागला, तेव्हां १७४३ सालीं त्याविरुद्ध लढण्याकरितां अबुल खैरखां ह्यास पाठविण्यांत आलें. ह्या मोहिमेंत यशस्वी झाल्यामुळें त्यास खानदेशचा नायब सुभेदार नेमण्यांत आलें. अबुल खैर खां हा १७४९ सालीं मरण पावला.

पायगा घराण्याचा मुख्य संस्थापक अबुल फत्तेहखान हा अबुल खैर खां ह्याचा मुलगा होय. ह्यांस तेगजंग हा किताब नबाब निजाम अल्लीखा ह्याजकडून मिळाला, व त्यानंतर लौकरच "शम्सुल उमरा" हा बहुमानाचा किताबही देण्यांत आला. नबाब तेगजंग हा लढवय्या पुरुष होता व त्यानें १० हजार घोडेस्वारांची एक पलटण स्वतःजवळ बाळगली होती. नबाब तेगजंग ह्यास जहागिरीची पहिली जी सनद देण्यांत आली तींत कुटुंबपोषणाबरोबरच सैन्याच्या खर्चाकरितांही जहागीर देण्यांत येत आहे असा उल्लेख होता व ह्या सनदेप्रमाणें लढाऊ सैन्य जय्यत ठेवणें पायगा इलाख्याचे नबाबास आवश्यक होतें. परंतु पुढें ही सैन्याची अट काढून घेण्यांत आली व आतां आपल्या इतमामास आवश्यक इतकेच शिपाई व घोडेस्वार बाळगण्यांत येतात. हुजूर निजाम अल्लीखां बहादुर यांनीं नबाब तेगजंग ह्यांस मुख्य दिवाणाची जागाही देऊं केली होती परंतु "मी शिपाईगडी आहें व मरेपर्यंत शिपाईच राहावें अशी माझी इच्छा आहे" असें नबाबांनीं उत्तर दिलें. नबाब तेगजंग पंजाबांत प्रवास करीत असतां इ. स. १७८६ सालीं मरण पावला.

तेगजंग ह्याचा एकुलता एक मुलगा महमदा फख्रुद्दीन खां हा आपल्या वडिलांच्या मृत्यूच्या वेळीं फक्त दहा वर्षांचा होता तरी हुजूर निजाम अलीखां बहाद्दर यांनीं त्याचें योग्य रीतीनें पालनपोषण करून त्यास "शम्सुल उमरा" हा किताब देऊन पायगा जहागिरी त्याच्या स्वाधिन केली आणि आपली मुलगी बशीरुनिसा बेगम हिच्याशीं त्याचा विवाह करून दिला. १७९७ सालीं दहा हजारांची मनसब देऊन दहा हजार घोडेस्वारांच्या पथकांचे त्यांस सेनापति नेमण्यांत आले. नबाब निजाम अलीखां बहाद्दर ह्यांच्यानंतर नबाब सिकंदरजाह बहाद्दर आणि नबाब नसिरुद्दौला बहाद्दर ह्यांच्या कारकीर्दींतही फख्रुद्दीन खान ह्यास अत्यंत सन्मानानें वागविण्यांत येई. नबाब नासीरुद्दौला बहाद्दर ह्यांनीं त्यांस "अमीरे-कबीर" ही पदवी देऊन मुख्य दिवाण नेमलें, परंतु हें काम त्यानें फक्त सहा महिनेच केलें. इ. स. १८३४ सालीं नबाब नासीरुद्दौला ह्यांनीं पायगा जहागिरीची नवीन सनद करून देऊन सैन्याविषयींची अट काढून टाकली. १८५७ च्या बंडांत नबाब फख्रुद्दीन खान ह्यानें ब्रिटिश सरकारांस विशेष साहाय्य केलें. बंडाचा उपशम झाल्यानंतर ह्या गोष्टीची आठवण ठेवून गव्हर्नर जनरल ह्यांजकडून तीस हजार रुपये किंमतीचा मौल्यवान् नजराणा नबाब साहेबांस देण्यांत आला. नबाब फख्रुद्दीन खां हा तर स्वतः विद्येचा

पोशिंदा व विद्वानांचा परामर्ष घेणारा होता. त्यानें अनेक अरबी व इंग्रजी ग्रंथांचीं भाषांतरें उर्दू व फारसी भाषेंत करविलीं. त्यानें स्वतः बरीच ग्रंथरचना केली. त्यानें स्वखर्चानें एक मोठी वेधशाळा तयार करवून त्यांत आजतागायतचीं उपकरणें युरोपांतून आणून ठेविलीं होतीं. हा वयाच्या ८५ वे वर्षी इ. स. १८६२ सालीं मरण पावला. ह्याचे पश्चात् त्याचा चौथा मुलगा रफीउद्दीनखां "अमीरे कबीर" हा इस्टेटीचा मालक झाला.

नबाब रफीउद्दीन खान हा नबाब निजाम अल्लीखां बहाद्दर ह्याचा नातू असल्यामुळें राजघराण्यांतील सर्वच मंडळी त्यावर प्रेम करीत. नबाब अफजलुद्दौला ह्यांचे कारकीर्दींत पहिला सालरजंग हा दिवाणगिरीचें काम पाहात असे. त्याला काढून त्याचे जागीं नबाब रफीउद्दीन खान ह्यास नेमावें अशी खुद्द अफजलुद्दौला ह्याची इच्छा होती परंतु ह्या सूचनेस रफीउद्दीन खान ह्यानें विरोध केला. अफजलुद्दौला वारल्यानंतर त्याचा मुलगा नबाब महबूब अलीखान् बहाद्दर हा फक्त तीन वर्षांचा होता त्यामुळें राज्यकारभाराकरितां नबाब सालारजंग बहाद्दर व नबाब रफीउद्दीन खान ह्यांस 'रीजंट" नेमण्यांत आलें. नबाब रफीउद्दीन खान इ. स. १८७७ सालीं मरण पावल्यामुळें त्यांचे जागीं त्याचा धाकटा भाऊ नबाब रशीदुद्दीन खान ह्यांस "रीजंट" नेमण्यांत आलें. त्यासही "शमसुल–उमरा व "अमीरे कबीर" ह्या पदव्या देण्यांत आल्या. "रीजंट" ह्या नात्यानें त्यानें बरेच दिवस काम केल्यानंतर तो सन १८८१ सालीं मरण पावला. त्यास दोन मुलगे, एक सर खुरशीदशहा बहाद्दर व दुसरा सर विकारुल उमरा हे होत.

नबाब रफीउद्दीन खान ह्यास स्वतःस संतति नसल्यामुळें त्यानें आपला धाकटा भाऊ नबाब सुलतानुद्दीन खान ह्यांचे दोन मुलगे आपत्यवत् वाढविले. हे मुलगे म्हणजे नबाब बजीउद्दीन खान व मजहरुद्दीन खान होत. नबाब मजहरुद्दीन खान हाच पुढें "सर आस्मानजाह" ह्या नांवानें प्रसिद्धीस आला.

इ. स. १८७५ सालीं नबाब सर सालरजंग हा विलायतेस गेल्यामुळें त्याचे जागीं नबाब सर आस्मानजाह ह्यास "रीजंट" म्हणून नेमण्यांत आलें. महाराणी व्हिक्टोरियाचे सुवर्ण–महोत्सवाचे करितां हैदराबादचा प्रतिनिधि म्हणून इ. स. १८८७ सालीं सर आस्मान जाह ह्यास विलायतेस पाठविण्यांत आलें होतें. विलायतेहून परत आल्यानंतर सर आस्मानजाह ह्यास इ. स. १८८८ सालीं दिवाण नेमण्यांत आले. परंतु १८९३ सालीं त्यानें ह्या जागेचा राजीनामा दिला. सर आस्मानजाह बहाद्दर सन १८९८ सालीं मरण पावला. नबाब मोईनुद्दौला बहाद्दर हा त्याचा मुलगा होय.

सर आस्मानजाह ह्यांनीं इ. स. १८९३ सालीं राजीनामा दिल्यानंतर सर विकारुल उमरा ह्यांची दिवाणाच्या जागीं नेमणूक करण्यांत आली. हे काम त्यानें सन १९०१ पर्यंत केलें व त्यानंतर राजीनामा दिला. त्यानंतर लौकरच म्हणजे १९०२ सालीं सर विकारूल उमरा मरण पावला. नबाब सुलतानुल मुलक आणि नबाब वली–उद्दौला बहाद्दर हे सर विकारुल–उमरा ह्याचे चिरंजीव होत. सर विकारुल उमरा ह्यांचे मृत्यूनंतर सर खुरशीदजाह हाही एक वर्षाचे आंत मरण पावला. सर खुरशीदजाह हा नबाब अफजलुद्दौला ह्याच्या कारकीर्दींत त्याच्या दरबारचा एक आधारस्तंभ समजला जाई. त्यानंतर नेमण्यांत आलेल्या "कौंन्सिल ऑफ रीजन्सी"चा ही तो एक सभासद होता. व ह्या नात्यानें संस्थानें–च्या प्रत्येक बाबीकडे लक्ष पुरवून त्यानें चांगला लौकिक मिळविला. ह्यास दोन मुलगे नबाब फैयाजुद्दीन खान इमामजंग आणि नबाब हाफीजुद्दीन खान जफरजंग हे होत. हल्लींच्या एक्झीक्यूटिव्ह कौन्सिलचे एक सन्माननीय सभासद नबाब लुतफुदौला बहाद्दर हा जफरजंग ह्याचा मुलगा होय.

पायगा जहागिरीच्या तीन मुख्य शाखा असून त्या (१) सर आस्मान जाह, (२) सर खुरशीद जाह, (३) सर विकारुल–उमरा ह्यांच्या नांवानें प्रसिद्ध आहेत. सर अस्मानजाह ह्याच्या शाखेचे प्रतिनिधि त्याचे चिरंजीव नबाब मोहनुदौला बहाद्दर हे होत. ह्यास पोलो, क्रिकेट वगैरे मर्दानी खेळांचा व शिकारीचा अतिशय नाद आहे. नबाब मोइनुद्दौला बहाद्दर ह्यानें तीन वर्षें "बाबे–हुकूमत (एक्झिक्यूटिव्ह कौन्सिल) चा सभासद ह्या नात्यानें काम केलें. हे अंतःकरणानें उदार व स्वभावानें दिलदार असून ह्यांनीं अलीगढ येथील इस्लामिया कॉलेजास दोन लाखांची देणगी दिली आहे. सर खुरशीदजाही पायगाचे हल्लींचें प्रतिनिधि नबाब लुतफुद्दौला–बहाद्दर हे होत. हे अरबी आणि फारशी भाषेंत निष्णात असून सध्यां "बाबे–हुकूमत"चे ज्युडिशियल मेंब-

आहेत. सर विकारुल उमरा ह्यांचे दोन चिरंजीव नबाब सुलतानुल मुलक बहाद्दर व नबाब वली-उद्दौला ह्यांचा उल्लेख वर आलाच आहे. नबाब वलीउदौला बहाद्दर ह्यांचें शिक्षण लंडन येथील "ईटन्-कॉलिजिएट स्कूल" मध्यें झालें होतें. त्यानंतर डेहराडून येथें लष्करी शिक्षणाकरितां त्यास ठेवण्यांत आलें होतें. हैदराबादेस परत आल्यानंतर थोड्याच अवधींत त्यास लष्करी खात्याचा दिवाण नेमण्यांत आलें. ह्या जागीं त्यांनीं पांच वर्षें काम केलें. बाबे हुकूमतची स्थापना झाल्यानंतर त्यास सभासद म्हणून घेण्यांत आलें. आणि सर फरीदून यानें राजीनामा दिल्यानंतर कांहीं दिवस यांनीं मुख्य दिवाण म्हणून काम केलें. सुमारें सहा महिन्यांपूर्वी "हज्" येथील यात्रेस गेले असतां तेथेंच त्यांचा अंत झाला. सर विकारुल उमरा ह्यांचे वडील चिरंजीव नबाब सुलतानुल मलक ह्याचें शिक्षणही विलायतेसच झालें. त्यानें सीलोन, जपान, अमेरिका इत्यादि देशांचा प्रवास केला असून खुद्द लंडन येथें त्याचें बारा वर्षेपर्यंत वास्तव्य होतें. हैदराबादेस परत आल्यानंतर मेंदूच्या विकारामुळें त्यास आपलें आयुष्य एकांतांत कंठावें लागत आहे.

## २ महाराजा सर किसनप्रसाद बहादूर

हैदराबादचे मुख्य दिवाण महाराजा सर किसनप्रसाद बहादूर हे अकबर बादशहाच्या दरबारांतील सुप्रसिद्ध राजा तोडरमल याचे वंशज आहेत. राजा तोडरमल यांच्यानंतर त्याच्या वंशांतील पांचव्या पिढीचे राय मूलचंद हे नबाब आसफजाद निजामउल्लमुलक याजबरोबर प्रथमतः दक्षिणेंत आले. निजाम उल्मुलक यांनीं आपली सत्ता दक्षिणेंत स्थापन केल्यानंतर करोडगिरी (कस्टम्स्) व अबकारी ह्या खात्यांचे प्रमुख अधिकारी म्हणून राय मूलचंद याची नेमणूक झाली. राय मूलचंद याच्या मृत्यूनंतर त्याचा मुलगा राय लक्ष्मीराम याच्याकडेही तोच अधिकार देण्यांत आला. राय लक्ष्मीराम यास दोन चिरंजीव होते एक राय नानकराम व दुसरा राय नारायणदास. बापाच्या मृत्यूनंतर राय नानकराम याच्याकडेही सदरहू खातीं देण्यांत आलीं. राय नारायणदास इ. स. १७७६ या वर्षी मेला तेव्हां त्यास दोन मुलगे होते, एक चंदूलाल बहाद्दर व दुसरा गोविंदबक्ष. या दोन्ही मुलांस राय नानकराम यानें लहानाचे मोठे केले. चंदूलाल याचा जन्म इ. स. १७७६ सालीं झाला व त्याच वर्षी त्याचा बाप राय नारायणदास हा मरण पावला. साधारण शिक्षण झाल्यानंतर आपल्या चुलत्याच्या हाताखालीं त्याची नेमणूक करण्यांत आली आणि चुलता सेवानिवृत्त झाल्यानंतर करोडगिरी खात्याचें त्यास प्रमुख नेमण्यांत आलें. इ. स. १८०४ सालीं मीर आलम हा हैदराबादचा प्रमुख दिवाण झाला तेव्हां त्यानें राजा चंदूलाल यास आपला विश्वासू मदतनीस म्हणून हाताशीं घेतलें, व १८०६ सालीं पेशकार व फायनॅन्स खात्याचे दिवाणाच्या हुद्यावर त्याची नेमणूक करण्यांत आली. मीर आलम ह्याच्या मृत्यूनंतर नबाब मुनिरुल मुलक ह्यास जरी दिवाण नेमण्यांत आलें तरी पेशकार या नात्यानें राज्यकारभाराचीं सर्व सूत्रें राजा चंदूलाल याचेच हातीं राहावीं अशी निश्चित योजना करण्यांत आली होती. अशा रीतीनें इ. स. १८०८ पासून राज्यकारभाराची सर्व सत्ता राजा चंदूलाल याचे हातीं आली आणि नबाब मुनिरुल मुलक यांचे पश्चात् दिवाणगिरीचे पदावर त्याचीच योजना करण्यांत आली. अशा रीतीनें ३५ वर्षें राज्यकारभार केल्यानंतर ६ सप्टेंबर इ. स. १८४३ रोजीं त्यानें आपल्या जागेचा राजीनामा दिला. राजा चंदूलाल हा अत्यंत धर्मनिष्ठ असून दातृत्वाबद्दल त्याची अतिशय ख्याती आहे. चंदूलाल याच्या उदार देणग्यामुळें हैदराबाद संस्थानांतील शेकडों कुटुंबांचें पालनपोषण होत आहे. राजिनामा दिल्यानंतर निजामसरकारनें त्यास एक कोटी रुपयांचें बोनस, कित्येक गांवांची जहागीर, शिवाय तीन हजार रुपये महिना पेनशन् चालू केलें. त्यानंतर लौकरच म्हणजे १५ एप्रिल १८५४ रोजीं त्याचा देहान्त झाला. त्यास दोन मुलगे व एक मुलगी अशीं तीन अपत्यें होतीं. वडील मुलगा राजा बालाप्रसाद ह्यांस प्रथमतः करोडगिरी व अबकारी या खात्याचे प्रमुख अधिकारी नेमण्यांत आलें होतें. परंतु त्यानें ह्या जागेचा लौकरच राजीनामा दिला. त्यांस पेशकारीचीही जागा देऊं करण्यांत आली होती परंतु ह्या जागेचा त्यानें स्वीकार केला नाहीं. निजाम सरकारनें त्यास "राजाधिराजबहाद्दर" हा किताब व त्याबरोबर पांच हजार रुपयांची मनसब देऊन चार हजार घोडेस्वारांचे सरदार नेमिले. राजा. बालाप्रसाद याच्या मृत्यूनंतर त्याचा मुलगा नारायणप्रसाद हा त्याच्या इस्टेटीचा मालक झाला. तो अरबी व फारशी भाषांत निष्णात असून इंग्रजी भाषेचेंही त्यास चांगलेंच ज्ञान होतें

निजाम नासिरुद्दौला बहाद्दर यांनीं तारीख १३ जून सन १८५३ रोजीं राजा नारायणप्रसाद यांची पेशकारीच्या जागेवर नेमणूक केली. त्यास पुत्र नसल्यामुळें त्यांचे पश्चात् त्यांच्या मुलीचे चिरंजीव महाराजा किसनप्रसाद बहादूर हे त्याचे वारस व इस्टेटीचे मालक झाले.

महाराजा किसनप्रसाद यांचा जन्म २८ जानेवारी सन १८६४ रोजीं झाला. ते "मदरसे अलिया" या शाळेचे विद्यार्थी असून इंग्रजी भाषेचा अभ्यास त्यानीं याच शाळेंत केला. फारसी, अरबी इत्यादी भाषांचें शिक्षण त्यांस खाजगी रीतीनें देण्यांत आलें. इ. स. १८९२ सालीं पेशकारीच्या हुद्यावर त्यांची नेमणूक करण्यांत येऊन त्यांस "राजा राजायान महाराजा बहादूर" ही पदवी देण्यांत आली. तारीख २५ ऑगस्ट १९०१ पासून राज्यकारभाराचें सर्व काम त्यांच्याकडे सोपविण्यांत आलें होतें, तथापि मुख्य दिवाण म्हणून तारीख १५ नोव्हेंबर १९०२ रोजीं त्यांची नेमणूक करण्यांत आली. १ जानेवारी १९०३ रोजीं ब्रिटिश सरकारनें त्यास के. सी. आय. ई. हा किताब दिला व पुढें कांहीं महिन्यांनीं बकरीदच्या दरबारप्रसंगीं खुद्द निजाम सरकारनें त्यांस 'समीनुस्सलतनत' हा किताब देऊन त्यांचा गौरव केला. इ. स. १९०७ सालीं बादशहाचे वाढ दिवसानिमित्त होणाऱ्या पदवीदानसमारंभांत महाराजाबहाद्दर यास जी. सी. आय. ई. ही बहुमानाची पदवी देण्यांत आली. ह्याप्रमाणें निजाम सरकार व ब्रिटिश सरकार या उभय सरकारांची मर्जी संपादन करून १९१२ पर्यंत त्यानीं मुख्य दिवाणाचें काम अत्यंत यशस्वी रीतीनें केलें. १९१२ च्या जुलै महिन्यांत त्यांनीं दिवाणगिरीचा राजीनामा दिला व त्यानंतर ते पूर्ववत पेशकारीचें काम करूं लागले.

इ. स. १९२१ सालीं बावेहुकूमतची स्थापना होऊन सदर आजम किंवा मुख्य दिवाण म्हणून सर अली इमाम यांची नेमणूक करण्यांत आली होती. परंतु त्यांनीं लौकरच या जागेचा राजिनामा दिला. यानंतर कांहीं दिवस नबाब सर फरिदुलमुल्क व त्यानंतर नबाब वलिउद्दौला बहाद्दर याच्याकडे कांहीं दिवस ही कामगिरी देण्यांत आली होती परंतु पुन्हा महाराजा सर किसनप्रसाद बहादुर यास मुख्य दिवाण (सदर आजम) नेमण्यांत आलें व ते आज तागायत हें काम यशस्वी रीतीनें करीत आहेत.

महाराजा सर किसनप्रसाद बहाद्दर हे राजा चंदूला यांच्याप्रमाणेंच दानशूर म्हणून प्रसिद्ध आहेत. त्यांचा स्वभाव मनमिळाऊ व भाषण चतुर असल्यामुळें, निजाम सरकारप्रमाणें ब्रिटिश अधिकारी मंडळांत व सरकार पक्षाप्रमाणें लोक पक्षांतही ते प्रिय आहेत. सारांश "नृपति जनपदानां दुर्लभः कार्यकर्ता" या विरल कोटींत त्यांची गणना करण्यास मुळींच हरकत नाहीं. ते उर्दू भाषेंतील पट्टीचा लेखक व नामांकित कवि असून यामुळेंहि उर्दू भाषीयांत ते अत्यंत प्रसिद्ध आहेत.

## ३ कै. राजा शिवराज धर्मवंत बहादुर

कै. राजा शिवराज धर्मवंत बहादुर यांचें घराणें संयुक्त प्रांतांतील शहाजहानाबाद येथील राहणारें. परंतु शहाजहानाबाद येथील घर एकाएकीं कोसळून पडल्यामळें राजा सागरमल ह्या मुलाशिवाय घराण्यांतील एकूणएक माणसें मरण पावलीं. योगायोग असा कीं हा मुलगा निजामुमुल्क आसफउजाह ह्याचे हातीं लागला व त्यानें त्याच्या मुलाप्रमाणें प्रतिपाळ करून त्यास लहानाचें मोठें केलें. राजा सागरमल वयांत आल्यावर त्याची हुषारी पाहून नबाब आसफजाह बहाद्दर ह्यानें "दप्तर दिवाणी" मध्यें मीरमुनशी नेमिलें व लवकरच मुख्य अधिकारी केलें. ह्या दफ्तरांत सातशें कारकून काम करीत असत. ह्या कारकुनांच्या पद्धतीनें सर्व राजकारभाराचें दफ्तरी काम व्यवस्थित ठेवण्याची जबाबदारी राजा सागरमल याजवर होती.

राजा सागरमल ह्याच्या मृत्यूनंतर त्याचा मुलगा भवानीदास हा आपल्या वडिलांचे जागीं "दफ्तरदिवाणी"चें काम पाहूं लागला. राजा भगवानदास ह्याच्या कामावर प्रसन्न होऊन सरकारनें त्यास "धर्मवंत बहादुर" हा किताब दिला. राजा भगवानदासाचे धाकटे बंधु राजा दुर्गादास दयावंत ह्यांसही "पेशकारी" बक्षीउलमल्क" ह्या हुद्यावर नेमण्यांत आलें. हें काम त्यानें इतक्या उत्तम रीतीनें वजाविलें कीं, निजामसरकारनें प्रसन्न होऊन त्यास बहुमोल वस्त्रें देऊन ३००० रु. ची मनसब दिली व २००० घोडेस्वार ठेवण्याची परवानगी दिली.

राजा भवानीदास १२१३ हिजरी मध्यें मरण पावला. त्यानंतर त्याचा मुलगा राजा केवल किसन हा आपल्या बापाचें काम पाहूं लागला. परंतु नबाब सिकंदरजाह ह्याचे कारकीर्दींत राजा केवलकिसन ह्याची प्रकृति नीट राही-

नाशी झाली. त्यामुळें त्याचा चुलतभाऊ म्हणजे राजा दुर्गादास ह्याचा मुलगा राजा खुशालचंद हा दप्तरी काम पाहूं लागला. ह्यानें "दप्तरे दिवाणी"ची व विशेषत: "दप्तरेमाल" ची फार चांगल्या प्रकारें सुधारणा केली. त्यामुळें पुष्कळ वेळां मुख्य दिवाणही प्रसंगीं त्याचा सल्ला घेत असत. तो १२४५ हिजरींत मरण पावल्यावर त्याचा वडील मुलगा उजिगरचंद हा आपल्या बापाचें काम पाहूं लागला.

राजा उजिगरचंद ह्यास 'रायबहादूर' हा किताब मिळाला. शिवाय नवाब सिकंदरजाह यानें प्रसन्न होऊन जहागीर व ७००० ची मनसब व २००० घोडेस्वारांची सरदारकी दिली. माल (रेव्हिन्यू) खात्यांत त्यानें बऱ्याच सुधारणा घडवून आणल्या त्यामुळें संस्थानचें उत्पन्न वाढलें. त्यामुळें बिदर सुभ्याचें "कानूनगोईचें" वतनही ह्या घराण्यास देण्यांत आलें. राजा उजिगरचंद ह्याच्या मृत्यूनंतर त्याचा भाऊ राजा रामप्रसाद लाला बहादूर हा इस्टेटीची व्यवस्था पाहूं लागला व "सरदप्तरेमाल" ह्या परंपरागत हुद्यावरही लवकरच त्याची नेमणूक करण्यांत आली.

राजा रामप्रसाद ह्यानें नवाब नासीरुद्दौला ह्याचा अत्यंत विश्वास संपादन केला होता. त्यामुळें पेशकार राजा नरेंद्र बहादुर व दिवाण सर सालारजंग हे उभयतांही वेळीं प्रसंगीं राजाराम प्रसाद ह्याचा सल्ला घेत असत.

राजा रामप्रसाद ह्याचेनंतर त्याचा पुतण्या व राजा उजिगरचंद ह्याचा मुलगा राजा इंद्रजित बहादूर हा "कानूनगोई" व "सर दपतरेमाल" हीं दोन्हीं कामें पाहूं लागला. राजा इंद्रजित हा बुद्धिमान्, विद्वान व दरबारी चालीरीतींशी परिचित असल्यामुळें फार लवकर लोकप्रिय झाला. तो फारशी व संस्कृत भाषेंत निष्णात व हिशेबी व दप्तरी कामांत पूर्ण तरबेज होता. शिवाय सर सालारजंग ह्याजबरोबर तो इंग्रजीचा अभ्यास करीत असे. हा १२९२ हिजरीत मरण पावला. ह्यास चार मुलगे (१) राजा शिवराज धर्मवंत, (२) राजा रामराजबहादूर, (३) राजा मुर्ली मनोहर, (४) राजा लोचनचंद बहादर हे होत. ह्यांपैकीं राजा शिवराज धर्मवंत हा सर्वांत मोठा असल्यामुळें घराण्याची परंपरा चालविण्याचें काम त्याचेकडे आलें.

राजा शिवराज धर्मवंत बहादूर हा वडिलांप्रमाणेंच फारशी, संस्कृत, इंग्रजी इत्यादि भाषांत निष्णात व मुलकी आणि दिवाणी कामांत प्रवीण होता. त्याच्याबद्दल नबाब सरसालारजंग ह्यांस मनांत अत्यंत आदर वाटत असे. खुद्द निजाम सरकार ह्यास अत्यंत सन्मानानें वागवी. त्यामुळ हुजुरांचे भेटीस जावयाचे म्हणजे इतर जहागिरदार व संस्थानिक राजा शिवराज बहाद्दर ह्यास बरोबर घेऊन जात. संस्थानचे कोणी बडे पाहुणे आले तरी त्यांची स.बराई करविण्याचें काम राजा साहेबांकडेच बहुधा यावयाचें. राजा शिवराज हा दयाळू व उदार म्हणून प्रसिद्ध होता. त्याला शिक्षणाचें महत्त्व पटलें होतें व म्हणून शैक्षणिक कार्यास सढळ हातानें मदत करीत असे. "धर्मवंत स्कूल" ही संस्था त्य.नेंच स्थापन केली आहे. राजा शिवराज हा निपुत्रिक होता. त्याच्या पुतण्यांत इस्टेटीबद्दल झगडे सुरू झाले. त्यामुळें निजाम सरकारनें इस्टेटीच्या व्यवस्थेकरितां एक कमिटी नेमली असून अद्याप त्या कमिटीकडूनच सर्व कारभार चालत असतो.

## ४ राजा राय रायान बहादुर

निजाम सरकारच्या दरबारांतील अमीर उमराव लोकांत महाराजा सर किसनप्रसाद बहादुर ह्याच्यानंतर राजे रायरायान बहादुर ह्याच्या घराण्याचा दर्जा समजण्यांत येतो. हैदराबाद संस्थानांत जी थोडी महाराष्ट्रीय सरदार घराणीं आहेत त्यांत राजा रायरायान बहादुर ह्यांचें घराणें अत्यंत महत्त्वाचें समजलें जातें. ह्या घराण्याचा मूळ पुरुष कृष्णाजीपंत भालेराव हा देवगड (दौलताबाद) येथील वतनदार मुतालिक होता. दैवयोगानें मोंगल बादशहा शहाजहान ह्याची भेट होऊन कांहीं काळानें मोगलाई दरबारांत त्यास मनसबदार नेमण्यांत आलें. कृष्णाजी पंतानें मोंगल सम्राटांचें प्रेम संपादन करून सुमारें १५ वर्षेपर्यंत दरबारची उत्तम प्रकारें सेवा केली आणि ८० वर्षांचें वय असतांना इ. स. १६८८ सालीं तो मरण पावला.

कृष्णाजीपंत ह्याचे दोन मुलगे मोरोपंत व नारोपंत हे दरबारचे देखरेखीखालीं लहानाचे मोठे झाले. नबाब आसफजाह बहाद्दर ह्याची ह्या उभयतां मुलांवर अतिशय मर्जी होती. नवाब आसफजाह बहादुर यानें दक्षिणेंत राज्य स्थापल्यानंतर ह्या उभयतां बंधूंस आपणांबरोबर दक्षिणेंत आणिलें. मोरोपंत व न.रोपंत ह्या उभय बंधूंनीं नवाब आसफजाह ह्याच्या दरबारांत पेशकार म्हणून काम केलें. नारोपंत सन १७५१ मध्यें वारल्यामुळें त्याचे चिरंजीव शंकराजीपंत

ह्यास नबाब सलाबतजंग ह्यांचे दप्तरदार (रेकॉर्ड-कीपर) नेमण्यांत आलें, व त्याच्या नंतर त्याचे दोन मुलगे धोंडोजीपंत व नानाजीपंत ह्यांचीही त्याच जागेवर नेमणूक करण्यांत आली.

धोंडोजीपंत हा शूर व बुद्धिमान असल्यामुळें दरबारांत ह्याची छाप उत्तम प्रकारें पडली व लौकरच त्यास पेशकारीच्या जागेवर नेमण्यांत आलें आणि त्याच्या इतमामास साजेल अशी मनसब देऊन राजा रायरायान बहादूर हा किताब देण्यांत आला. इ. स. १७८१ सालीं यहतेशामजंग ह्यानें निजामचें विरुद्ध बंड पुकारलें त्याचा मोड करण्याकरितां धोंडोजीपंत ह्यास सैन्य देऊन पाठविण्यांत आलें. धोंडोजीपंत ह्या मोहिमेंत यशस्वी होऊन त्यानें इतरही लहानमोठीं अनेक बंडें मोडिलीं. ह्या कामगिरीमुळें त्यास दोन हजार घोडेस्वारांची सरदारकी व "राजा दियानत्वंत" ही पदवी देण्यांत आली.

धोंडोजीपंत सन १७८३ सालीं मरण पावल्यामुळें त्याचा मुलगा राजा उमाकांतराव ह्यास वडिलार्जित मानमरातब देण्यांत आले. परंतु त्याचा उपभोग घेण्यास तो फार दिवस जगला नाहीं. त्याच्यानंतर त्याचा धाकटा भाऊ राजा शामराज हा वारस व अधिकारी झाला. त्यास ५ डिसेंबर इ. स. १७८३ रोजीं राजा रायरायान हा किताब देऊन कित्येक गांवें जहागीर व कित्येक परगण्यांची सरदेशपांडेगिरी व सरदेशमुखी देण्यांत आली. राजा धोंडोजीपंत वारल्यानंतर पेशकारीच्या जागेवर त्यांचे धाकटे बंधु नानाजीपंत हे काम करीत असत, परंतु तेही सन १७८५ मध्यें मरण पावल्यामुळें ह्या जागेवरही राजा शामराज ह्याची नेमणूक करण्यांत आली व त्याजबरोबरच "दियानत्वंत" हा किताब, दोन हजार घोडेस्वारांची सरदारकी व पांच हजारांची मनसब देण्यांत आली. राजा शामराज यानें पेशकारीच्या कामाबरोबरच मुख्य दिवाणाचेंही काम केलें. हे अत्यंत धार्मिक वृत्तीचे होते. यांनीं हिंदुस्थानांतील बहुतेक तीर्थयात्रा करून शेवटीं रामेश्वर येथें जवळजवळ सहा वर्षेपर्यंत वास्तव्य केलें व तेथून परत आल्यावर वयाच्या ५९ व्या वर्षीं इ. स. १८२२ मध्यें देह ठेविला.

राजा शामराज ह्याच्यानंतर त्याचे मुलगे भवानीशंकर व चिमणाराजाराम व तदनंतर त्याच्या नातवंडांपैकीं राजा जयरामराव व राजा नरहरराव हे एकामागून एक गादीवर आले, परंतु त्यांच्या कारकीर्दींत महत्त्वाचें असें कांहीं घडलें नाहीं. राजा नरहरराव ह्याच्यानंतर त्याचा मुलगा राजा शंकरराव हा गादीवर आला. हा निपुत्रिक असल्यामुळें त्यानें आपल्या चुलत भावंडांपैकीं राजा लक्ष्मणराव ह्यास दत्तक घेतलें.

राजा शंकरराव इ. स. १८८६ सालीं मरण पावले. त्या वेळीं राजा लक्ष्मणराव ह्याचें वय अवघें बारा वर्षांचें होतें. त्याच्या इस्टेटीच्या व्यवस्थेसाठीं सरकारनें सन १८८७ सालीं कर्नल मार्शल ह्यांच्या नेतृत्वाखालीं एक कमिटी मुक्रर केली. राजा लक्ष्मणराव ह्याचें शिक्षण "मदरसे-अलिया" ह्या शाळेंत कर्नल हडसन् ह्यांच्या नेतृत्वाखालीं झालें व त्यानें इंग्रजी भाषेंत चांगलीच निपुणता संपादन केली. राजा लक्ष्मणराव हे पटाईत घोडेस्वार म्हणून प्रसिद्ध होते. इ. स. १८९५ सालीं इस्टेटीची व्यवस्था कमिटीकडून काढून घेऊन राजा लक्ष्मणराव ह्याचे हातीं देण्यांत आली. राजेसाहेब हे आपल्या सौजन्यामुळें सरकारदरबारीं व त्याचप्रमाणें सामान्य जनतेंतही अत्यंत लोकप्रिय होते. नवाब मीरमहबूब अलीखां बहादूर ह्यांच्या "रौप्यज्युबिली" च्या प्रसंगीं ब्राह्मणवर्गातर्फे मानपत्र देण्याचें काम राजा लक्ष्मणराव ह्याजकडे देण्यांत आलें होतें. ता. ४ आक्टोबर १८९८ रोजीं दरबारकडून त्यास "राजा रायरायान अमानतवंत" हा किताब देण्यांत आला. राजा लक्ष्मणराव हे इ. स. १९१४ सालीं परलोकवासी झाले.

राजा लक्ष्मणराव ह्यांचे वडील चिरंजीव राजा शामराज बहादूर हा वडिलांच्या मृत्यूचे वेळेस अवघा सोळा वर्षांचे असल्यामुळें इस्टेटीची व्यवस्था "कोर्ट ऑफ वॉर्डस्" कडे देण्यांत आली. राजा शामराज ह्याचे शिक्षण वडिलांप्रमाणें "मदरसे अलिया" ह्या शाळेंत व नंतर निजाम कॉलेजांत झालें. इ. स. १९२७ सालीं राजे रायरायान् ह्यांचें इस्टेटीबद्दल "फर्मान" सादर होऊन सर्व इस्टेट राजा शामराज बहादुर ह्यांच्या ताब्यांत देण्यांत आली. इ. स. १९३० सालीं निजामसरकारच्या वाढदिवसानिमित्त त्यांस "राजवंत" हा किताब देण्यांत आला. जून १९३५ मध्यें राजा शामराज बहादुर ह्यास "बाबे-हुकूमत" चे सभासद व पब्लिक वर्क्स खात्याचे दिवाण नेमण्यांत आलें. राजेसाहेब विद्येचे व कलेचे उपासक असून त्यांच्या जवळील ग्रंथसंग्रह व चित्रसंग्रह त्यांच्या विद्योपासनेची व रसिकतेची उत्तम प्रकारें साक्ष पटवितो. ह्यांचे दोघे धाकटे

बंधू राजा त्रिंबकराज व राजा धुंडिराज हे दोघे सुविद्य असून आपल्या शिक्षणाच्या पूर्ततेकरितां दोघांनींही विलायतेंत बरेच दिवस वास्तव्य केलें. राजा धुंडिराज हे बी. ए. बार-अॅट-लॉ असून हैदराबाद येथें भरविण्यांत आलेल्या महाराष्ट्र साहित्य संमेलनाचे स्वागताध्यक्ष होते. राजा धुंडिराज हे ऑनररी मॅजिस्टेटचें काम बरेच दिवसांपासून करीत असून हल्लीं निजाम सरकारचे द्वितीय चिरंजीव नबाब मोअझम्‌जाह बहादुर ह्यांचे "कंप्यानियन्" म्हणून त्यांची निवड करण्यांत आली आहे.

---

## ५ नबाबखान खानान बहादुर व नबाब फख्रुल मुलकबहाद्दर

हैदराबादच्या पहिल्या वर्गांत मोडणाऱ्या अकरा अमीर घराण्यांपैकीं नबाव खान-खानान बहादुर व नबाब फख्रुल मुलक बहादूर ह्यांच्या घराण्यांचा प्रामुख्यानें समावेश करण्यांत येतो. हे उभयतां नबाब सख्खे बंधू असून नवबखान् खानान हे वडील बंधु होते. ह्यांचें मूळ घराणें इराण देशांतील असून ह्या घराण्यांतील मीर-हुसेन अमानत खान हा हिंदुस्थानांत येणारा पहिला पुरुष होय. हा अकबर बादशहाच्या वेळीं हिंदुस्थानांत आला. हा शूर लढवय्या असून सेनानीच्या अंगीं अवश्य असणारें रणचातुर्यही त्याच्या ठिकाणीं भरपूर होतें. हा अकबराच्या सन्यांत दाखल होऊन राणा संग्राम ह्याच्याविरुद्ध करण्यांत आलेल्या मोहिमेंत अत्यंत शौर्यानें लढला. त्यामुळें बादशहानें प्रसन्न होऊन त्यास सेनापतीची जागा दिली. ह्यानें बरींच वर्षे सेनापतीचें काम केल्यावर दक्षिण देशाचा वजीर म्हणूनही कांहीं दिवस काम केलें. मीरहुसेन अमानतखान ह्याच्यानंतर मीर मोइनुद्दीन खान ह्यानेंही औरंगजेबाच्या कारकीर्दीत लाहोर, मुलतान, काबुल, काश्मीर ह्या प्रांतांत दिवाणीचें काम उत्तम रीतीनें बजाविलें. ह्याप्रमाणें ह्या घराण्यांतील कित्येक पुरुषांनीं मोगलांच्या कारकीर्दीत मोठमोठ्या हुद्यावर कामें केलीं, परंतु हैदराबाद संस्थानांत कामगिरी करणारा पहिला पुरुष म्हणजे मीर अब्दुल रज्जाक शहानवाजखान ऊर्फ समसामुद्दौला हा होय.

नवाब आसफजाह निजाममुल-मुलक हे दक्षिणेचे सुभेदार असतांना औरंगाबाद येथें मीर अब्दुल रज्जाक हा एका लहानशा हुद्यावर काम करीत होता. परंतु त्यांस लौकरच वऱ्हाड प्रांताचे सुभेदार नेमण्यांत आलें. पुढ नबाब नसीरदौलाच्या कारकीर्दीत वऱ्हाडच्या सुभेदारीहून मुख्य दिवाणाच्या जागीं त्याची नेमणूक करण्यांत आली व त्यावरोबर सात हजारांची मनसब आणि सात हजार पायदळ व सात हजार घोडेस्वारांची सरदारकी देण्यांत आली होती. ह्यांस समसामुलक हा किताबही देण्यांत आला होता. हा पंजाबांत प्रवास करीत असतां शत्रूकडून एकाएकीं मारला गेला.

मीर अबदुल हयाखान हा समसामुदौला ह्याचा मुलगा होय. ह्यानें समसामुलक-ही पदवी मिळविली. यानें बरींच वर्षे वऱ्हाडचा सुभेदार म्हणून काम केल्यानंतर दौलताबाद येथील सैन्याचा सेनापति म्हणून त्याची नेमणूक करण्यांत आली. समसामुलक ह्याच्यानंतर ह्या घराण्यांतील पुढें आलेला पुरुष म्हणजे त्याचा नातू अब्बास अल्लीखान ऊर्फ खानखानान् बहादुर हा होय. हा शूर व लष्करी डावपेंचांत चतुर असल्यामुळें टिपु सुलतानाच्या विरुद्ध व इतर अनेक लढायांत ह्यानें नांव कमाविलें व निजाम सरकारची मर्जी संपादन केली. त्याच्या ह्या कामगिरीवर प्रसन्न होऊन त्यास बावीस लाखांची जहागीर देण्यांत आली. तो इ. स. १७९५ सालीं मरण पावला. त्याचा मुलगा गुलाम हुसेनखान ऊर्फ फख्रुल-मुलक बहादुर हा आपल्या बापाप्रमाणेंच शूर असून लष्करी तज्ञ ह्या नात्यानें नबाब सालारजंग हा त्याची वेळोवेळीं सल्लामसलत घेत असे. १८५७ च्या बंडांत हैदराबादचें वातावरण शांत ठेवण्याचे कामीं नबाब गुलमहुसेन खान यानें सरकारास पराकाष्ठेचें साहाय्य केलें. त्या वेळीं संस्थानांत असलेल्या युरोपियन लोकांच्या बचावाची महत्त्वाची कामगिरी त्याच्याकडेच सोंपविण्यांत आली होती. नबाब असद अलीखान निजाम यारजंग खान खानान् बहाद्दर व नबाब मीर सरफराज हुसेनखान फख्रुल मुलक बहाद्दर हे दोघे बंधू नबाब गुलाम हुसेन खान ह्यांचे चिरंजीव होत.

नबाब निजाम यारजंग ह्याच्या शिक्षणाची काळजी खुद्द नबाब सालारजंग बहादुर यानें घेऊन त्याच्या इंग्रजी शिक्षणाचीही उत्तम प्रकारें व्यवस्था केली होती. नबाब सालारजंगबहाद्दर हा जेव्हां प्रथम विलायतेस गेला, तेव्हां त्यांनीं निजाम यारजंग ह्यासही आपल्याबरोबर घेतलें होतें. खानखानान् बहाद्दर यानें पब्लिक वर्क्स

खात्याचे दिवाण व मिलिटरी खात्याचे दिवाण ह्या नात्यानें बरींच वर्षें सरकारची सेवा केली. हा इ. स. १९३३ सालीं मरण पावला. ह्याचा मुलगा नवाब कमालद्दीन खान बहाद्दर ह्यास निजामसरकारनें "कमालयारजंग" हा किताब दिला आहे.

नवाब फख्रुलमुलक बहाद्दर हा आंग्लविद्याविभूषित असल्यामुळें स्वतःच्या खाजगी राहाणींत इंग्रजी पद्धतीचे रीतिरिवाज अमलांत आणणारा म्हणून ह्याची प्रसिद्धी आहे. नबाब मीर महबूब अलीखान बहादुर ह्यांच्या बाळपणीं नेमण्यांत आलेल्या कौन्सिल ऑफ रीजन्सीचा नवाब फख्रुल मुलक हाही एक सभासद होता. ह्यांनीं पोलिस व ज्युडिशियल खात्याचे दिवाण व कॅबिनेट कौन्सिलचे उपाध्यक्ष ह्या नात्यानें सरकारची बरींच वर्षें सेवा केली. नबाब साहेबांनीं आपल्या मुलांना शिक्षणासाठीं विलायतेंत ठेवून इतर नबाबांना एक उत्तम उदाहरण घालून दिलें. त्यांचे तीन चिरंजीव नवाब फखरजंगबहाद्दर नवाब रयीसबहादुर, व नवाब रयीसयारजंग बहाद्दर हे तिघेही सुविद्य असून हैदराबाद संस्थानांत मोठमोठ्या हुद्यावर काम करीत आहेत. नवाब निजाम यारजंग खानखानान् बहाद्दर ह्यांच्या मृत्युनंतर लौकरच म्ह. १९३४ सालीं नवाब फख्रुल मुलक ह्याचें देहावसान झालें.

---

## हैदराबाद संस्थानांतील शिक्षण

हैदराबाद संस्थानांत सरकारी शिक्षणास प्रारंभ इ. स. १८५४ मध्यें झाला असला तरी जवळ जवळ इ. स. १९०० पर्यंत, हिंदुस्थानच्या इतर भागांप्रमाणेंच शिक्षण घेणें ही सर्वस्वीं प्रजेच्याच अधिकारांतली गोष्ट असे. प्रत्येक गांवांतील किंवा शहरांतील लोक आपापल्या गरजेनुरूप पंतोजी पदरीं ठेवून त्याचा चरितार्थ चालवीत व त्याच्या मोबदल्यांत गणित, हिशोब, लिहिणें वाचणें इत्यादि नित्याचें व्यवहारोपयोगी शिक्षण आपल्या मुलांना देत. शहरांतील शिक्षणांत मात्र थोडा फरक असे. स्वतःच्या मातृभाषेखेरीज राजभाषा म्हणून, व सरकारी नोकरींत शिरण्यास अत्यंत आवश्यक म्हणून हिंदू आणि मुसलमान लोक आपल्या मुलांना एकाद्या मौलवींच्याकडे फारशी भाषा शिकण्यास ठेवीत. अशा मौलवींच्या शाळांना शहरांतून पंतोजीच्या शाळांइतकेंच महत्त्व असे.

या मध्ययुगीन परिस्थितींत क्रांति होण्यास इ. स. १८५४ मध्यें प्रारंभ झाला. या वर्षीं हैदराबाद शहरांत दारुल उलूम नांवाची पहिली शाळा सरकारनें स्थापन केली. इ. स. १८५९ मध्यें प्रत्येक जिल्ह्याच्या व तालुक्याच्या ठिकाणीं एक देशी भाषेची व एक फारशी भाषेची अशा दोन शाळा उघडण्याची व्यवस्था झाली. तालुक्याच्या शाळांवर तालुका कमेटीची व जिल्ह्याच्या ठिकाणच्या शाळांवर जिल्हा कमेटीची देखरेख असे. तालुका कमेटींत दोन पाटील, दोन कुलकर्णी असून तिचा अध्यक्ष तालुक्याचा अधिकारी तहसीलदार असे. जिल्हाकमेटींत पाटील, कुलकर्णी, तहसिलदार, पोलिस इन्स्पेक्टर व जिल्हाधिकारी कलेक्टर अशी मंडळी असत. हे जिल्ह्याचे अधिकारीच शाळांचे इन्स्पेक्टर या नात्यानें मुलांची परीक्षा घेत व शाळेची तपासणी करीत. इ. स. १८६८ मध्यें शिक्षणखातें किरकोळ खात्याच्या दुय्यम मंत्र्याकडे देण्यांत आलें. शिक्षक म्हणून काम करूं इच्छिणारांना 'दारुल उलूम' या संस्थेंत शिक्षण घ्यावें लागे. इ. स. १८७१ मध्यें डायरेक्टर ऑफ व्हर्नाक्युलर एज्युकेशन व १८७५ मध्यें पांच डेप्युटी इन्स्पेक्टर्स असे नवीन अधिकारी निर्माण करण्यांत आले. इ. स. १८७८ पासून जिल्ह्यांतील शाळांमधून फी घेण्यास सुरुवात झाली. १८८० मध्यें मद्रास विद्यापीठाशीं संबंध असलेलें सध्यांचें निजाम कॉलेज अस्तित्वांत आलें. या शाळाकॉलेजांतून दिलें जाणारें शिक्षण ब्रिटिश हिंदुस्थानांतील शिक्षण पद्धतीप्रमाणें असे. हळूहळूं संस्थानांतील सरकारी शाळांची संख्या वाढूं लागली व त्याच प्रमाणांत सरकारचा त्या खात्यावरील खर्चही वाढीस लागला. इ. स. १९११–१२ च्या शिक्षणखात्याच्या रिपोर्टीवरून त्या वर्षीं संस्थानांतील एकूण शिक्षणसंस्था १०५२ असून त्यांतून ६५१०२ विद्यार्थी शिक्षणाचा लाभ घेत होते आणि त्या खात्यावर सरकार प्रतिवर्षी ९.९७ लक्ष रु. खर्च करीत होतें असें दिसतें.

मराठवाडा, तेलंगण व कर्नाटक या प्रांतांतून त्या त्या भाषेंत अप्पर प्रायमरी परीक्षेची तयारी करणाऱ्या शाळा असत. विद्यार्थ्याला ही परीक्षा दिल्यावरच पुढील शिक्षणक्रमांत प्रवेश मिळे. जिल्हा, तालुका आणि महत्त्वाच्या गांवीं इंग्रजी मिडल स्कुलें असत. त्यांत विद्यार्थी नंतर जाई. मुसलमान विद्यार्थ्यांकरितां त्याच्या मातृभाषें-

तून–उर्दूतून–शिक्षण देणाऱ्या प्राथमिक शाळा असत. मुसलमान आणि हिंदू विद्यार्थी दुय्यम शिक्षणक्रमांत एकत्र येत व दोघांनाही आपला पुढील अभ्यास इंग्रजीसारख्या परक्या भाषेंतून करावा लागे. इ. स. १९११–१२ पर्यंत सरकारी-कचेऱ्यांतील कामकाज बहुधा प्रांतिक भाषेंतच चालत असल्यामुळें प्रांतिक भाषेंतून अप्पर प्रायमरी-पर्यंत शिक्षण घेतलेल्या विद्यार्थ्यांस नौकरी मिळ-ण्यास किंवा सरकारी व्यवहार समजण्यास सुलभ जात असे. अर्थात् केवळ स्वतःची मातृभाषा जाण-णारा मनुष्य म्हटला कीं तो कुचकामाचा अशी समजूत त्या वर्षापर्यंत नव्हती आणि म्हणूनच मातृभाषेंत अप्पर प्रायमरीपर्यंत शिक्षण घेतलेले विद्यार्थी पुष्कळच असत आणि अशा विद्यार्थ्यांचा पुढील जीवनक्रमही फारसा सुखाचा नसला तरी आजच्या इतका कंटकमय आणि कंटाळवाणा होत नसे. आपला मातृभाषेचा अभ्यास संपवून उर्दू व फारशी भाषांवर प्रभुत्व संपादण्यास हिंदू विद्यार्थ्यांना फारसा त्रास होत नसे आणि म्हणू-नच या व यापूर्वीच्या काळांत राजभाषा व मातृ-भाषा या दोहोंतही निष्णात अशीं हिंदू माणसें शेकड्यांनीं सांपडत असत. शिक्षणक्रम हा असा सुलभ असल्यामुळें १९११ च्या रिपोर्टांत सर-कारी शिक्षणसंस्थांतून हिंदू व मुसलमान विद्या-र्थ्यांचें प्रमाण ५५ व ३८ असें होतें. याच वर्षीच्या शिरगणतीच्या रिपोर्टामध्यें हिंदूंची व मुसल-मानांची लोकसंख्या अनुक्रमें ११६२६३७५ व १३८०९९० दिलेली आहे. अर्थात् संख्येच्या प्रमाणांत हिंदू समाज शिक्षणाचे बाबतींत मुसल-मान समाजापेक्षां ६ पटीनें मागें होता यांत शंका नाहीं.

अशा परिस्थितींत अलीगड विद्यापीठांत शिक्षण घेतलेले हल्लींचे निजाम नवाब मीर उस्मान-अलीखां हे २९ ऑगस्ट १९११ ला गादीवर आले आणि त्यांनीं अलीगड विद्यापीठाचे संस्थापक सर सय्यद अहमद यांचे नातू डॉ. रॉस मसूद यांना आणून त्यांची शिक्षणखात्याचे मुख्याधिकाऱ्याचे जागीं नेमणूक केली. नवीन मनूला प्रारंभ झाला. सरकारी कचेऱ्यांची भाषा उर्दू ठरविण्यांत येऊन त्याप्रमाणें सरकारी शिक्षणक्रमांत आणि धोर-णांत आमूलाग्र पण आस्तेकदम बदल होऊं लागला.

पूर्वी प्रत्येक जिल्ह्याचे व महत्त्वाचे तालुक्याचे ठिकाणीं एक इंग्रजी मिड्ल स्कूल, प्रांताचे ठिकाणीं एक इंग्रजी हायस्कूल व खुद्द हैदराबाद शहरीं एक इंग्रजी कॉलेज होतें. ही व्यवस्था तातपुरती अशीच ठेवून रॉस मसूद साहेबांनीं शिक्षणाच्या विस्ताराचे नांवाखालीं प्रत्येक तालुक्याचे ठिकाणीं एक उर्दू मिड्ल स्कूल व प्रत्येक जिल्ह्याचे ठिकाणीं एक उर्दू हायस्कूल उघडलें. दुय्यम शिक्षणांत मोठ्या कुशलतेनें उर्दूला महत्त्वाचें स्थान अशा रीतीनें दिल्यानंतर त्याच धोरणानें प्राथमिक शाळांतूनही उर्दूचें महत्त्व वाढवून मराठी, कानडी व तेलगू या तत्प्रांतस्थांच्या मातृभाषांना स्थान-भ्रष्ट केलें. प्रांतिक भाषांच्या शिक्षणाच्या सोई हळूहळू कमी होऊं लागल्या; त्या इतक्या कीं, कांहीं विशिष्ट खाजगी शिक्षणसंस्था सोडल्यास संस्थानांत प्राथमिक शाळांतून विद्यार्थ्याला त्याच्या मातृभाषेंतून शिक्षण बिगारी किंवा क्वचित् त्याच्या पुढील म्हणजे पहिल्या इयत्तेपर्यंतच आज मित्तीस मिळूं शकतें. उभ्या संस्थानांत या-पुढील संपूर्ण अभ्यासक्रम मातृभाषेंतून शिक-विणारी एकही सरकारी प्राथमिक शाळा नाहीं ही गोष्ट अतिशयोक्तीची वाटली तरी वस्तु-स्थितीस सोडून नाहीं यांत शंका नाहीं.

अशा रीतीनें उर्दू भाषेला, राजभाषा आणि बोधभाषा असें मानाचें स्थान देऊन प्रोत्साहन दिल्यानंतर डॉ. रॉस मसूद साहेबांनीं, सर अकबर हैदरींच्या सहाय्यानें आपलीं, आपल्या सहकाऱ्यांचीं उर्दूच्या प्रगतीचीं रम्य कल्पनाचित्रें प्रत्यक्ष सृष्टींत उतरविण्याकरतां इ. स. १९१८ मध्यें उस्मानिया विद्यापीठाची स्थापना केली. अर्थातच एवढ्या प्रचंड कार्याची उभारणी करण्या-करितां शिक्षणखात्याला पैसादेखील पाण्यासारखा खर्च करावा लागला हें पुढील आंकड्यांवरून दिसून येईल.

वर्ष १९११–१० लक्ष रु. १९१७–१८; ३१ लक्ष १९२२–२३; ७० लक्ष रु. १९२६–७७ लक्ष रु. व १९३२–१०७ लक्ष रुपये.

संस्थानच्या १९३२ सालच्या ॲडमिनिस्ट्रेशन रिपोर्टावरून पाहतां आजमितीस संस्थानांत एकूण १० कॉलेजें, २३ इंग्रजी हायस्कुलें, २१ उर्दू हायस्कुलें, दोन्ही मिळून (इंग्रजी व उर्दू अभ्यासक्रम शिकविणारीं) ६ हायस्कुलें, १२८ मिडल स्कुलें, ४२६० प्राथमिक शाळा आणि ६२ स्पेशल शाळा आहेत. खाजगी प्रयत्नानें चाललेल्या शाळांची संख्या १०४६ आहे. या सर्व प्रकारच्या शाळांतून अनुक्रमें १४००, ८९१४, ९६१३, ४५००, ३३७९९, २५२१३२ आणि ५१२९ विद्यार्थी शिकत आहेत. यांचें मुलें आणि मुली असें वर्गीकरण केल्यास तें अनुक्रमें १३७९ मुलें

व २१ मुली, ५९०७ मुलें व २३२ मुली, १३०७० विद्यार्थी व ६२४ विद्यार्थिनी, २४०५६७ मुलें व ४८५५८ मुली, आणि ४१२४ विद्यार्थी व १००५ विद्यार्थिनी असें होईल.

एकूण शिक्षणावरील खर्चापैकीं ८८९९०१३ रु. दिवाणी इलाख्यांतील शाळांवर, २०००८३ रु. सर्फे-इ-खास (निजाम साहेबांची खाजगी जहागीर) मधील शाळांवर, ४५१२३७ रु. लोकलफंडानें चालविलेल्या शाळांवर, प्रायोगिक शाळांवर ७१३१ रु., सरकारी ग्रँट मिळविणाऱ्या खाजगी शाळांचा ८०३२८६ रु. आणि सरकारी ग्रँट न घेणाऱ्या खाजगी शाळांचा ३३०३०१ रुपयें आहे.

एकूण खर्चाची वर्गवारी केल्यास प्रत्यक्ष शिक्षणावर ६६५१३८१ रु. खर्च होतात आणि इन्स्पेक्शन, इमारतींची डागडुजी, शाळांना लागणारें फर्निचर, स्कॉलरशिप्स्, बॉयस्काऊट, लायब्रऱ्या, प्रयोगशाळा इत्यादिद्वारें होणारा अप्रत्यक्ष खर्च ४०३९६७० रु. आहे. प्रत्यक्ष खर्चापैकीं १०८५०५८३. कॉलेज शिक्षणावर, १६०७७९४ रु. हायस्कूल शिक्षणावर, मिडलस्कल शिक्षणावर ११६८९५५ रु., प्राथमिक शिक्षणावर २३७४४७५ रु. आणि स्पेशल शिक्षणावर ४१५०९९ रु. खर्च होतात.

उस्मानिया विद्यापीठाचें उस्मानिया कॉलेज आणि त्या विद्यापीठास जोडलेल्या इतर ८ कॉलेजांतून १०९५ विद्यार्थी शिक्षण घेत होते आणि मद्रास विद्यापीठास जोडून असलेल्या हैदराबादच्या एकटच्या निजाम कॉलेजमध्यें ३०५ विद्यार्थी शिक्षण घेत होते. उस्मानिया विद्यापीठाच्या पदवीला ब्रिटिश हिंदुस्थानांत किंमत नसल्यामुळें आणि विद्यापीठानें स्वीकारलेल्या उर्दूविषयक पक्षपाती धोरणामुळें विशेषतः हिंदू विद्यार्थ्यांची संख्या मॅट्रिक (H. S. L. C.) पास होतांच निजाम कॉलेजकडे धांव घेते. पण तेथें प्रवेशाची संख्या मर्यादित असल्यामुळें प्रवेश न मिळणारे विद्यार्थी उस्मानिया कॉलेजांतून प्रवेश करतात. केवळ हिंदू विद्यार्थ्यांचीच उस्मानियाबद्दल ही अनास्था आहे असें नाहीं. हैदराबादेंतील नामांकित नबाब घराण्यांतील आणि मोठमोठ्या सरकारी अधिकाऱ्यांचीं मुलें देखील याच निजाम कॉलेजमध्यें प्रवेश मिळविण्याकरितां धडपडत असतात, कारण एक तर पदवीची संस्थानाबाहेरील निरुपयोगिता आणि उस्मानियाच्या शिक्षणक्रमांतील उर्दूच्या फाजील अभिमानानें इंग्रजीकडे होणारें दुर्लक्ष आणि याला पुरावा प्रत्यक्ष परिस्थिति आणि सरकारी रिपोर्टांतील आंकडे यांचाच देतां येईल. उस्मानियाच्या ९ कॉलेजांतून १०९५ विद्यार्थी तर एकटचा निजाम कॉलेजांत ३०५ विद्यार्थी आहेत ही एकच गोष्ट वरील विधानास पुष्टी देणारी आहे.

उस्मानिया विद्यापीठानें, आर्टस् व सायन्सेस, कायदा, इंग्रजी वैद्यक, शिक्षण, एंजिनियरिंग इ० शिक्षणाची आणि पदव्या देण्याची व्यवस्था केलेली आहे. विद्यापीठाचा संपूर्ण शिक्षणक्रम उर्दूतून चालतो. उर्दूचा इकडे उगमच मुळीं गेल्या एक दोन शतकांतला. हिंदुस्थानांतील संस्कृत तर दूरच राहो पण शुद्ध हिंदी, बंगाली, मराठी इतकीदेखील उर्दू आज मितीस साहित्य किंवा शास्त्रीय विषयावर ग्रंथरचना करण्याइतकी प्रौढ, कर्णमधुर, पदलालित्ययुक्त नाहीं. तेव्हां तिचा शब्दसंभार आणि ग्रंथविस्तार वाढीस लावण्याकरतां, निरनिराळ्या शास्त्रीय विषयांवरील इंग्रजी ग्रंथांचीं भाषांतरें करण्याकरतां विद्यापीठास जोडून ट्रान्सलेशन ब्यूरोची स्थापना विद्यापीठाच्या जन्मापासूनच झालेली आहे. या भाषांतरमंडळानें १९३२ सालीं एकूण ५५ शास्त्रीय कलाविषयक व साहित्यविषयक ग्रंथ भाषांतराकरितां घेतले व त्यांपैकीं १७ चीं भाषांतरें पूर्ण झालीं. या मंडळावरील हजारों रुपयांच्या मोबदल्यांत ५७०० नवीन उर्दू शब्दांची निर्मिती झाली.

याच सालीं विद्यापीठानें कायदा कॉलेजवर २४५९०रु, मेडिकल कॉलेजवर १४००२३ रु, शिक्षण (बी. टी.) कॉलेजवर २३१४२ रु., इंजीनिअरिंग कॉलेजवर १५४३९४ रु. आणि मुस्लिम धर्म शिक्षणावर ६५५५० रु. खर्च केल्याचें रिपोर्टांत दिलें आहे. इस्लामी धर्मशिक्षण विद्यापीठाचा केवळ प्राण आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. कारण लॉ कॉलेजच्या विद्यार्थ्यामागें ३०७।।=.७ रु मेडिकल विद्यार्थ्यामागें १५५३।.१० रु. बी. टी. च्या विद्यार्थ्यामागें १७९३।।=७ रु. इंजिनिअरिंग कडील विद्यार्थ्यामागें ४५६।।=७ रु. खर्च केला असून इस्लामधर्माच्या विद्यार्थ्यामागें (Faculty of Theology) २८५० रु. खर्च केला. असें रिपोर्टांत स्पष्टपणें म्हटलें आहे. उस्मानिया कॉलेजांतून शिक्षण घेणाऱ्या आर्टस् व सायन्सच्या विद्यार्थ्यामागें ६६४ रु. खर्च आला आहे. हायस्कूलांत शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थ्यामागें सरासरी ७० रु. मिडल् स्कूलच्या विद्यार्थ्यामागें रु. ३१।।= आणि प्रायमरीच्या विद्यार्थ्यामागें रु. ९।≤ शिक्षण

खात्यानें खर्च केला आहे. प्राथमिक शिक्षणासारख्या साक्षर करणाऱ्या शाळांवर सरासरीनें पाहतां प्रत्येकीं सरकारनें अवघे ४६ रु. खर्च केले आहेत. विद्यापीठानें इस्लाम शिक्षणावर ( Theology ) प्रत्येक विद्यार्थ्यामागें केलेल्या खर्चांत लॉचे , ९, मेडिकलचे२, इंजिनियरिंगचे ६, आर्टसचे ४, विद्यार्थी शिकूं शकतात. त्याचप्रमाणें तेवढ्याच खर्चांत (एका विद्यार्थ्याच्या Theology च्या ) ४० विद्यार्थ्यांना हायस्कूल शिक्षणाचा, ९० विद्यार्थ्यांना मिडल् स्कूल शिक्षणाचा लाभ घेतां आला असतां किंवा त्याच एका विद्यार्थ्याच्या खर्चांत ६२ गांवीं प्राथमिक शाळा (प्रत्येकीं ४६ रु. प्रमाणें) चालवितां आल्या असत्या.

संस्थानांत एकूण खाजगी शाळा १०४६ असून त्यांपैकीं ९५० प्रायमरी असून बाकीच्या दुय्यम शिक्षणाच्या आहेत. या ९५० प्रायमरी शाळांपैकीं ७४९ ना सरकारी साहच मिळतें. दुय्यम शिक्षण देणाऱ्या संस्थांपैकीं फारच थोड्यांना सरकारकडून द्रव्यसहाय्य मिळतें. १९२३–२४ पर्यंत खाजगी शिक्षणसंस्थांवर कोणतेही विशिष्ट निर्बंध नव्हते. म्हणून तोंपर्यंत संस्थानभर अनेक लहान मोठ्या शिक्षणसंस्था शिक्षण प्रसाराचें कार्य करतांना आढळत. हैदराबादचें विवेकवर्धिनी हायस्कूल, औरंगाबादची सरस्वतीभुवन पाठशाळा, गुलबर्ग्याचें नूतन विद्यालय, रायचूरचें हमदर्द स्कूल, राष्ट्रीयशाळा हिप्परगें इत्यादि संस्था आजही, पूर्वीच्या इतक्या राष्ट्रीय बाण्यानें नसल्या तरी बरेंच कार्य करीत आहेत. यासारख्याच अनेक संस्था १९२३–२४ पर्यंत सार्वजनिक कार्यकर्त्यांनीं जनतेच्या सहाय्यावर चालविल्या होत्या. या शाळांतील शिक्षणक्रम सरकारी शिक्षणक्रमासारखाच असला तरी स्वधर्म आणि स्वभाषा यांबद्दल आदर अशा संस्था विद्यार्थ्यांच्या मनांत जागृत ठेवीत. या शाळांमधील हा शिक्षणक्रम रॉस मसूद साहेबांच्या वर उल्लेखिलेल्या धोरणाशीं थोडासा विसंगत असल्यामुळें किंवा उर्दूच्या वाढत्या बडेजावांत आणि विद्यापीठाच्या धोरणांत या संस्थांमुळें कमीपणा येण्याचा संभव असण्याच्या संशयावरून पण बाह्यतः शिस्तीच्या नांवाखालीं खाजगी शिक्षणसंस्थांचा काळा निर्बंध मसूदसाहेबांनीं आपल्या अधिकारांत काढला. मसूद साहेबांनीं 'सद्धेतूनें' (?) काढलेल्या या काळ्या कायद्यानें खाजगी प्रयत्नानें चाललेल्या २७४८ शाळांचा बळी अवघ्या दोन वर्षांत घेतला. सरकारी रिपोर्टांत इ. स. १९२४ मध्यें खाजगी शिक्षणसंस्थांची संख्या ४०५३ दिली असून १९२७ मध्यें १३०५ दिली आहे. आणि काळा कायदा १९२५ मध्यें अस्तित्वांत आला. अर्थातच या पराक्रमी कायद्यानें वरील संस्थांचा बळी घेतला नाहीं असें कसें म्हणतां येईल ?

बळी घेतलेल्या संस्थांत पुस्तकी शिक्षण देणाऱ्या शाळाच असत्या तर गोष्ट वेगळी. खालच्या अधिकाऱ्यांनीं विशेषतः पोलिस अधिकाऱ्यांनीं त्याची वजावणी फारच कडक रीतीनें केली; ती इतकी कीं कित्येक ठिकाणच्या वेदपाठशाळा आणि संस्कृत पाठशाळाही बंद पडल्या. औरंगाबाद, पैठण व बीदर येथील संस्कृत व वेदपाठशाळा कित्येक वर्षांपासून चालत असलेल्या या काळ्या कायद्यामुळें बंद पडल्या ही गोष्ट पाहिल्यास कायद्याचा जाचकपणा स्पष्ट होईल.

ज्या काळ्या कायद्यानें एवढा अनर्थ केला तो पुढील प्रमाणें:—

" संस्थानांत कोणकोणत्या संस्था कोणकोणत्या पद्धतीनें काम करतात याची माहिती शिक्षणखात्यास व्हावी म्हणून आणि संस्थानांतील शिक्षणसंस्था, शिक्षण आणि आरोग्य यांच्या मूलतत्त्वांना धरून चालतात कीं नाहीं तें पाहण्याकरतां पुढील कायदा केला जात आहे. त्याचे नियम पुढें स्थापन होणाऱ्या व सध्यां चालू असलेल्या सर्व खाजगी शाळांना लागू आहेत.

१. पंधरा किंवा अधिक मुलांना शिक्षण देणारी शाळा, खाजगी शाळा या सदरांत येईल.

२. (अ) यापुढें डिव्हिजनल इन्स्पेक्टरच्या परवानगीशिवाय मुलांची प्राथमिक शाळा स्थापन करतां येणार नाहीं.

(ब) शिक्षणखात्याच्या डायरेक्टरांच्या संमतीखेरीज मिडल् स्कूल किंवा हायस्कूल उघडतां कामा नये.

(क) मुलींच्या शाळेकरतां सुभा इन्स्पेक्टरची सम्मती घेतली पाहिजे.

३. नवीन शाळा उघडूं इच्छिणारानें शाळा उघडण्याचा हेतु, शिक्षणक्रम, शाळेच्या इमारतीची माहिती, शिक्षकांची संख्या आणि त्यांचें शिक्षण याची माहिती भरलेला तक्ता भरून त्या त्या अधिकाऱ्याकडे परवानगी अर्जाबरोबर पाठवावा.

६. खाजगी शाळेंत सर्व धर्मांच्या व जातींच्या

विद्यार्थ्याला प्रवेश मिळाला पाहिजे.

अशा विशिष्ट शाळा सरकारी अधिकाऱ्यांच्या परवानगीनें काढतां येतील.

७. (अ) खाजगी शाळांतील शिक्षणक्रमांत विधर्मीयांची धर्मभावना दुखविणारा किंवा त्यांना ज्यायोगें वाईट वाटेल असा शिक्षणक्रम असूं नये.

(ब) राजघराणें, सरकार किंवा राजा यांविषयीं अप्रीति उत्पन्न करणारें शिक्षण देतां कामा नये.

१०. या नियमाविरुद्ध वागणाऱ्या संस्था बंद केल्या जातील.

१२. नवीन शाळा उघडण्यास परवानगी देणें, न देणें अथवा असलेली शाळा बंद करणें इत्यादि गोष्टी त्या त्या अधिकाऱ्यांना आपल्या मर्जीनुरूप करतां येतील मात्र त्यांनीं तसें करण्याचीं कारणें दाखविलीं पाहिजेत.

१३. नवीन शाळा उघडण्यास किंवा असलेल्या चालविण्यास बंदी करण्याचा या कायद्याचा उद्देश नाहीं. म्हणून अशा संस्थांना त्या जोंपर्यंत शिक्षण, नीति आणि समाज यांना बिघडवीत नाहींत तोंपर्यंत त्या त्या अधिकाऱ्यांनीं साहाय्य द्यावें.

हा कायदा वरवर जरी निरुपद्रवी असला तरी तो अत्यंत जाचक असा आहे. सुशिक्षित पदवीधर शिक्षक, हवाशीर व प्रशस्त खोल्या असलेली इमारत, नवीन धर्तीच्या खुर्च्या आणि बाकें इत्यादि गोष्टी कोणतीही शाळा उघडतांना असल्याच पाहिजेत हा सरकारी हट्ट विलक्षणच आहे, यांत शंका नाहीं. कोणा एका विक्षिप्त राजानें प्राचीन काळीं आपल्या राज्यांतील सर्व माणसांनीं खावयाचें झाल्यास तूपखिचडीच खाल्ली पाहिजे अशी आज्ञा काढल्याचें सांगतात त्यांतलाच प्रकार हा! भूक शमण्यास तूप खिचडीचीच ज्याप्रमाणें आवश्यकता नाहीं ती केवळ कोरड्या भाकरीवर देखील भागूं शकते त्याचप्रमाणें ज्ञानप्रसाराच्या पवित्र कार्यास राजाच्या रंगमहालांतील झुलत्या झोपाळ्यावर बसण्याची आवश्यकता नाहीं; मोठ्या हवाशीर इमारतीची किंवा खुर्च्या, टेबलें आणि बाकांची आवश्यकता नाहीं, पगारी व ट्रेन्ड शिक्षकच मिळविले पाहिजेत असें नाहीं. आजच्या शिक्षणाधिकाऱ्यांना किंवा हा निर्बंध घालणाऱ्या रॉस मसूद साहेबांना याचें ज्ञान नव्हतें असें नाहीं पण त्यांनीं हा निर्बंध तसाच ठेवला ही गोष्ट खरी.

ही परिस्थिति संस्थानांतील हिंदू आणि मुसलमान ज्ञात्यांना असह्य होऊन आपलीं गाऱ्हाणीं सरकारच्या कानावर घालण्याकरितां प्रजाशिक्षण परिषदेचें प्रथम अधिवेशन १९२८ च्या आक्टोबरांत पं. हृदयनाथ कुंझरू यांच्या अध्यक्षतेखालीं हैदराबाद शहरीं भरविलें व काळ्या कायद्याविरुद्ध आणि इतर शिक्षणविषयक गाऱ्हाणीं वेशीवर टांगलीं; पण त्याचा उपयोग झाला नाहीं. दुसरें अधिवेशन पुढील वर्षी डॉ. त्रिपाठी (अलाहाबाद विद्यापीठ) यांचे अध्यक्षतेखालीं भरून ठरावांचा पुनरुच्चार केला, पण रामा शिवा गोविंदा! त्यानंतर तिसरें अधिवेशन भरविण्यास चालकांना अद्यापि सरकारकडून परवानगीच मिळाली नाहीं.

१९३४ सालच्या अखेरीस सरकारनें संस्थानांतील शिक्षणाची पुनर्घटना करण्याकरतां उस्मानिया विद्यापीठाचे प्रो. व्हाईस चॅन्सेलर यांच्या अध्यक्षतेखालीं एक सरकारी अधिकाऱ्यांची कमेटी स्थापन केली आहे. या कमेटींत लोकांतर्फेचा एकही प्रतिनिधी नाहीं हें विशेष ध्यानांत ठेवण्यासारखें आहे. सरकारी धोरणास पाठिंबा देणाऱ्यांच्या साक्षी घेण्याचा फार्स झाला. लोकमताला धिक्कारून कमेटीनें चालविलेल्या या साक्षी घेण्याच्या विरुद्ध सिकंदराबाद येथील बुलेटिन या इंग्रजी दैनिकांत खरपूस लेख आल्यावर अधिकारी वर्ग जागृत झाला आणि त्यानंतर प्रजेपैकीं कोणास साक्ष द्यावयाची असल्यास त्यानें कमेटीस अमुक अमुक वेळीं भेटावें असा खुलासा अधिकाऱ्यांनीं केला. यानंतर बऱ्याचशा सार्वजनिक हिंदू—कार्यकर्त्यांनीं व परिषदेच्या स्टँडिंग कमेटीनें आपली कैफियत कमेटीपुढें सादर केली आहे. असो.

संस्थानांत मुलींच्या सर्व प्रकारच्या शाळा ६९६ असून त्यांतून ४५३०० मुली शिक्षण घेत आहेत. या मुलींच्या शाळांपैकीं ६६५ प्रायमरी, १९ मिडलस्कूल्स्, ६ हायस्कुलें (यांपैकीं ४ खाजगी व २ सरकारी) आणि १ झनाना कॉलेज असून त्यांवर एकूण वार्षिक खर्च ८,८७,८६७ रु. होत आहे.

संस्थानांत हैदराबाद, औरंगाबाद, वरंगल, गुलबर्गा व मेदक या ठिकाणीं पुरुष शिक्षकांकरतां नॉर्मल ट्रेनिंग स्कुलें असून हैदराबाद, सिकंदराबाद, औरंगाबाद व वरंगल या ठिकाणीं स्त्री शिक्षकांकरतां ट्रेनिंग स्कूल्स् आहेत व त्यांवर एकूण खर्च १,७५,९९९ रु. झाला.

खास औद्योगिक शिक्षणास वाहिलेली नाम-

पल्ली औद्योगिक स्कूल ही एकच संस्था सरकारी ग्रँट घेऊन चालत आहे. या शाळेंत सुतारकाम, विणकाम, वेतकाम, लोहारकाम, तांबटकाम इत्यादींचे प्रायोगिक शिक्षण मिळतें. या शाळेंत आजमितीस १०६ विद्यार्थी निरनराळ्या उत्पादक धंद्याचें शिक्षण घेत आहेत. या शिवाय १३ हायस्कूल्स, ३६ मिडल स्कूलस् आणि ५ स्पेशल स्कूल्स् मधूनही वरील कलाखेरीज छापकाम, शेती, सूत काढणें, होजियरी आणि बिद्रीकाम यांची माहिती देण्याची शिक्षण खात्यानें व्यवस्था केलेली आहे.

याखेरीज आणखी एक औद्योगिक शाळा-म्हणजे हैदराबाद येथील मिटमास्तरच्या देखरेखीखालीं असलेली 'उस्मानिया टेक्निकल इन्स्टिटयूट' ही होय. या इन्स्टिटयूटमध्यें १३ वर्ग असून विद्यार्थ्यांची संख्या ३०९ आहे. या संस्थेंत ओतकाम, लोहारकाम, फिटिंग, मशीन-शॉपसंबंधीं माहिती, सुतारकाम, मुलाम्याचें काम, विजेचे पंखे जोडणें इ. इ. कामें शिकविण्याची व्यवस्था आहे. इलेक्ट्रिककडील विद्यार्थ्यांना बॉयलर्ससंबंधीं माहिती, फिटिंग, टेस्टिंग आणि रिपेरिंग इ. कामांची माहिती देतात.

संस्थानांत धर्मशिक्षण देणाऱ्या १३ इस्लामी व ५ हिंदू संस्था आहेत. त्यांपैकीं 'निझामिया' नांवाच्या शाळेंत अरबी शिक्षणाची व्यवस्था केली आहे व तेवढ्याकरतां सरकार त्या शाळेस वार्षिक ३०००० रु. देतें.

अनाथ बालकांना संभाळून त्यांना उद्योग-धंद्याचें शिक्षण देणारी 'व्हिक्टोरिया मेमोरिअल ऑर्फनेज' या नांवाची संस्था येथील रेसिडेंट बहादुर यांच्या अध्यक्षतेखालीं सरुनगर येथें आहे. तींत ९८ मुलें आणि ११२ मुली आहेत. त्यांना विणकाम, वेतकाम, सुतारकाम, शिवणकाम, शिशुसंगोपन आणि पाकविद्या इत्यादींचें शिक्षण दिलें जातें. या संस्थेचा १९३२ चा खर्च २३८३२ रु. होता.

यानंतर विद्यार्थ्यांना उत्तेजन देण्याकरतां आणि त्यांना परदेशीं किंवा परप्रांतांत शिक्षण घेण्याकरतांही पण शिष्यवृत्त्या देण्याची प्रथा शिक्षण-खात्यानें चालू ठेविली आहे. या शिष्यवृत्त्या सर्वसाधारण, स्पेशल युरोपियन वा एशियाटिक आणि रिसायती अशा चार प्रकारच्या असतात. सर्वसाधारण शिष्यवृत्त्या कॉलेजें, हायस्कुलें, मिडल आणि प्रायमरी शाळांतून शिकणाऱ्या विद्यार्थ्यांना मिळतात. स्पेशल शिष्यवृत्त्या ट्रेनिंग कॉलेजांतून, इंजिनिअरिंग, औद्योगिक आणि धार्मिक शाळांतून शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थ्यांना दिल्या जातात. फॉरेन शिष्यवृत्त्या सरकारकडून जे विद्यार्थी परदेशी शिक्षणाकरितां पाठविले जातात त्यांच्या खर्चाकरतां सरकार खर्च करतें. रियायती शिष्यवृत्त्या गरीब आणि अभ्यासू विद्यार्थ्यांना देतात. या सर्व प्रकारच्या शिष्यवृत्त्यांवर सरकारनें १९३२ सालीं ४९०४४० रु. खर्च केले.

त्याचप्रमाणें विद्यार्थ्यांना पुढील शिक्षणक्रम घेण्याकरतां सरकारनें त्या वर्षी २०५७९३ रु. कर्ज दिलें.

या शिष्यवृत्त्या गरीब आणि होतकरु विद्यार्थ्यांकरितां आहेत अशी घोषणा वारंवार होत असली तरी त्यांपैकीं बहुतेक नऊ दशांश भाग मुसलमान विद्यार्थ्यांच्याच वाट्यास जातो. परदेशी शिक्षणास सरकारकडून पाठविलेले सर्वच विद्यार्थी बहुधा मुसलमान असतात. क्वचित् प्रसंगीं हिंदू विद्यार्थ्यास पाठविलें जातें; नाहीं असें नाहीं. शिष्यवृत्त्या घेणाऱ्यात बहुधा मोठमोठे मुसलमान अधिकारी यांचींच मुलें जास्त असतात. कारण ते हुषार असतात असें नसून त्यांच्याकरतां मोठमोठ्यांच्या शिफारशी असतात म्हणून. प्रत्यक्ष हल्लींच्या निजामसाहेबांच्या भावी जावयांचा इंग्लंडमधील शिक्षणखर्चदेखील याच स्टेट स्कॉलरशिपमधून चालत आहे ही एकच गोष्ट आमच्या वरील विधानास पुष्टि देणारी आहे.

आधुनिक शिक्षणक्रमांत पुस्तकालयें आणि वाचनालयें यांस अत्यंत मोठें स्थान आहे हें कोणाही सुशिक्षितास नाकबूल असणार नाहीं. सरकारी वाचनालयें (लोकोपयोगी) पाहूं गेल्यास अवघ्या संस्थानांत हैदराबाद शहरांतील 'आसफिया लायब्ररी' हें एकच आहे. १९३२ मध्यें यावर सरकारनें ८८८१२ रु. खर्च केले. संस्थानांतील शाळा आणि कॉलेजें यांतून असणाऱ्या लायब्ऱ्यांवर ४४३६७ रु. आणि सरकारी खात्यांच्या लायब्ऱ्यांवर २४२१० रु. खर्च केले. या पैशांतूनच निरनिराळ्या वृत्तपत्रांना, मासिकांना त्यांची वर्गणी मिळाली. या सर्व लायब्ऱ्यांतून इंग्लीश, ऊर्दू, पर्शियन आणि अरेबिक भाषेचीं पुस्तकें ठेवलेलीं आहेत. संस्थानी हिंदूंच्या तेलगू, मराठी आणि कानडी यांपैकीं कोणत्याही भाषेचें पुस्तक या सरकारी पुस्तकालयांतून आढळत नाहीं हें ध्यानांत ठेवण्यासारखें आहे. कांहीं खात्यांच्या लायब्ऱ्यांतून प्रांतिक भाषांचीं संस्थानांत प्रसिद्ध झालेलीं चोपडीं आढळतात; नाहीं असें नाहीं.

पण तीं येथील मुद्रणनिर्बंधान्वयें मुद्रकानें आणि प्रकाशकानें सरकारकडे विनामूल्य २ प्रती सादर कराव्या लागतात, त्यांपैकींच असतात. आणि याला कारणेंही पण तशींच आहेत. सरकारी खात्यांतून लहानमोठ्या अधिकारांवर मुसलमानांचा भरणा असल्यामुळें किंवा हिंदू क्वचितच असल्यामुळें प्रांतिक भाषांतील पुस्तकें आपल्या पुस्तकालयांत अडगळीप्रमाणें असावीं हें त्या त्या खात्यांतील अधिकाऱ्यांना रुचत नसावें किंवा लोकमताची तरी क्षिति नसावी यावांचून कोणतेंच कारण संभवत नाहीं. नौकरींत शिरतांना मुलकी भाषेची म्हणून परीक्षा असते; पण तो निव्वळ फार्स असतो. प्रांतिक भाषेचें ज्ञान नौकरींत शिरणाऱ्या पैकीं शें. ९० ना नसतें.

यानंतर शिक्षणाचा प्रसार करणारी संस्था म्हणजे वृत्तपत्र आणि मुद्रण संस्था. संस्थानांत मुद्रणस्वातंत्र्य नाहीं इतकेंच नव्हे तर हिंदूंमधील सुशिक्षितांना केवळ मुद्रणासारखा धंदा म्हणून करण्यासही सरकारची परवानगी मिळत नाहीं. सरकारच्या होम सेक्रेटरीकडे छापखान्याकरितां व पोलिटिकल सेक्रेटरीकडे वृत्तपत्राकरतां परवानगी मागावी लागते. नंतर ते ते अधिकारी पोलिसकडे त्या परवानगी मागणाऱ्या माणसाचा रिपोर्ट मागवतात. आपल्या ओळखीचा कोणी तरी बडा माणूस असून त्याची शिफारस असल्याखेरीज पोलीसकडून त्या माणसाच्याबद्दल चांगला रिपोर्ट जात नाहीं व पोलीस रिपोर्टाच्या बऱ्यावाईटपणावर छापखान्याची किंवा वृत्तपत्राची परवानगी मिळणें अवलंबून असल्यामुळें बहुधा हिंदूंना त्यांतूनही सुशिक्षित हिंदूंना परवाना मिळणें अशक्य होतें. हो किंवा ना करण्याकरितां त्या माणसाला ६ ते ८ महिन्यांचा अवधि लागतो. पोलीस खात्यांत शें. ९९ मुसलमानच आहेत.

१९३२ सालीं संस्थानांत जवळ जवळ १२५ छापखाने असून त्यांतून ५५९ चोपडीं प्रसिद्ध झालीं. त्यांपैकीं मराठी भाषेंतील मोठ्यातली मोठी ग्रंथनिर्मिती म्हणजे गणपतीच्या मेळ्यांच्या पद्यावल्या. ४४ तेलगू चोपडीं प्रसिद्ध झालीं आणि ४१४ उर्दू व फारसी भाषेचीं पुस्तकें प्रसिद्ध झालीं. उरलेलीं चोपडीं इतर भाषांतून प्रसिद्ध झालीं.

संस्थानांत एकूण ८ वृत्तपत्रें असून त्यांत मराठीचीं दोन, तेलगू एक, ब्रिटिशांच्या अमल खालील सिकंदराबाद येथें निघणारें इंग्रजी दैनिक एक आणि बाकीचीं चार उर्दूतून प्रसिद्ध होतात. कानडी बोली बोलणारा १६२००९४ लोकवस्तीचा भाग हैदराबाद संस्थानांत असून त्या भाषेंत एक वृत्तपत्र काढण्यास परवानगी मिळविण्याचा प्रयत्न पुष्कळशा कानडी सुशिक्षितांनीं केला; पण त्यांना सरकारकडून परवानगी मिळाली नाहीं. याचा अर्थ इतकाच कीं लोकशिक्षणाचें अंग म्हणून मुद्रण आणि वृत्तपत्रांचा उपयोग संस्थानांतील सुशिक्षितांना होऊं नये याची पुरेपूर काळजी संस्थानी सरकार घेत असतें.

आतांपर्यंत शिक्षणाच्या निरनिराळ्या अंगांचा विचार झाला. आतां संस्थानांत या शिक्षणविषयक प्रयत्नांमुळें शिक्षणाचा प्रसार कितपत झाला याचा विचार करूं. पुढील कोष्टकावरून संस्थानांत साक्षरतेचा प्रसार कसकसा वाढत वा घटत गेला व शिक्षणावरील खर्च याचा बोध होईल. शिक्षण आणि शिरगणतीच्या सरकारी रिपोर्टावरून पुढील आंकडे घेतले आहेत.

कितीसंख्येत

| सन | लोक संख्या | साक्षर | हजारीं | खर्च रु. | निरक्षर | एकसाक्षर |
|---|---|---|---|---|---|---|
| १८८१ | ९८४५५९४ | ३१८८८० | ३७ | २२९२२० | ९५२६७१५ | ३०·०७ |
| १८९१ | ११५३७०४० | ३७०७५२ | ४४ | ३०३२९३ | १११५६२८८ | ३१·३३ |
| १९०१ | १११४११४२ | ३२७१६९ | ३४ | ७४८६६५ | १०८११९७३ | ३३·०८ |
| १९११ | १३३७४६७६ | ३६८१६६ | ३२ | १०१९७८७ | १३००६५१० | ३६·२ |
| १९२१ | १२४७१७७० | ३६५२९० | ३३ | ७७२५८०७ | १२१०६४८० | ३०·३ |
| १९३१ | १४४३६१४८ | ५९५६३३ | ४१.२५ | १०६९१०५१ | १३८४०५१५ | २४·२५ |

आतां संस्थानांतील हिंदु आणि मुसलमान या प्रमुख जमातींत शिक्षणाचा प्रसार कसकसा होत गेला हें पुढील कोष्टकावरून ध्यानांत येईल.

| सन | हिंदूंची संख्या | साक्षरांची संख्या | निरक्षर | साक्षरप्रमाण |
|---|---|---|---|---|
| १८८१ | ८८९३१८१ | २६४५०७ | ८६२८६७४ | ३३·१० |
| १८९१ | १०३१५२४९ | ३४६४७५ | ९५६९७७४ | २९·०७ |
| १९०१ | ९८७०८३९ | २५०२६७ | ९६३०५७२ | २९·१२ |
| १९११ | ११६२६३७५ | २६७०४१ | ११३५९३३४ | ४३·११ |
| १९२१ | १०६५६४५३ | २७७०५६ | १०३७९३९७ | ३६·४६ |
| १९३१ | १२२०३५०० | ४१०९०४ | ११७९१५९६ | २९·६६ |

| सन | मुस्लिमसंख्या | साक्षर | निरक्षर | साक्षरप्रमाण |
|---|---|---|---|---|
| १८८१ | ९२५९२९ | ४५७५२ | ८८०१७७ | २०·२५ |
| १८९१ | ११३८६६६ | ७०१४७ | १०६८५१९ | १६·२५ |
| १९०१ | ११५५७५० | ६३११० | १०९२६४० | १८·२ |
| १९११ | १३८०९९० | ८१२६० | १२९९७३० | १६·०६ |
| १९२१ | १२९ २७७ | ११५५२२ | ११८२७५५ | ११·२३ |
| १९३१ | १५३५६६६ | १५८८५९ | १३७५८०७ | ९·६६ |

आतां गेल्या ५० वर्षांत स्त्रीशिक्षणांत संस्थाननें किती प्रगति केली हें पुढील कोष्टकावरून समजेल:—

| सन | स्त्रियांची संख्या | साक्षर | निरक्षर | किती जणांत एकसाक्षर |
|---|---|---|---|---|
| १८८१ | ४८४३४५७ | ४९६२ | ४८३८४९५ | ९८२·३३ |
| १८९१ | ५६६३९११ | ६९२० | ५६५६९९१ | ८१८·१२ |
| १९०१ | ५४६७५१३ | १८८८३ | ५४४८६३० | २८९·११ |
| १९११ | ६५७७५५८ | [illegible]४०७७ | ६५५३४८१ | २७३·३३ |
| १९२१ | ६१२६६९९ | ४३३४० | ६०८३३५९ | १४१·६६ |
| १९३१ | ७०६६१३८ | ६८०३९ | ६९९८०९९ | १५५·१४ |

वरील कोष्टकांवरून आज मितीस १० मुसलमानांत एक साक्षर आणि ३० हिंदूंत १ साक्षर संस्थानांत नांदत आहे हें स्पष्ट आहे. लोकसंख्येंत हिंदूंची संख्या मुसलमानांच्या आठपट आहे हें ध्यानांत ठेवल्यास मुसलमान जाति शिक्षणांत हिंदूंच्या २४ पटीनें पुढारलेली आहे हें स्पष्टपणें कळेल. त्याचप्रमाणें उर्दूच्या माध्यमामुळें (१९१३ पासून) व उस्मानियाविद्यापीठाच्या स्थापनेमुळें (१९१८ मध्यें) गेल्या २० वर्षांत मुसलमान जातीनें दुपटीनें प्रगति केली याचाही बोध होईल.

आतां निरनिराळ्या जातींतील स्त्रियांत साक्षरता कशी वाढत गेली त्याचे आंकडे

| सन | मुसलमानस्त्रिया | साक्षर | किती जणांत एक साक्षर |
|---|---|---|---|
| १८८१ | १३६६९९ | ३१ | ४४०९·०८ |
| १८९१ | ४५६४८३ | १२२९ | ३७१·१४ |
| १९०१ | ५६५५२० | ५८१६ | ९७·२५ |
| १९११ | ६७५१६९ | ८४७७ | ७९·११ |
| १९२१ | ६३९२५५ | १९५९९ | ३२·१२ |
| १९३१ | ७४३२३१ | २१४४९ | ३४·६६ |

| सन | हिंदू स्त्रिया | साक्षर | किती जणांत एक साक्षर साक्षरतेचें प्रमाण |
|---|---|---|---|
| १८८१ | ४२७५३६९ | १८८९ | २३१६·३३ |
| १८९१ | ५०६८२७८ | ५२१७ | ९५३·२५ |
| १९०१ | ४८४६६३८ | ९४७५ | ५११·१२ |
| १९११ | ५७२९१०१ | १०८९३ | ५२५·०६ |
| १९२१ | ५२४९८६० | १७३१६ | ३०३·१६ |
| १९३१ | ५९८५९०१ | ३८५८२ | १५५·१४ |

जातवारीनें संस्थानांतील शिक्षणांत वाढ (कॉलेज शिक्षण)

| सन | हिंदु | मुसलमान | हिंदूंची संख्या | मुसलीम संख्या |
|---|---|---|---|---|
| १८९४ | २३ | ११ | १०३१५२४९ | ११३८६६६ |
| १९०० | २२ | १२ | ९८७०८३९ | ११५५७५० |
| १९०५ | २४ | / | | |
| १९१० | ४९ | ३० | ११६२६३७५ | १३८०९९० |
| उस्मानिया विद्यापीठाच्या स्थापनेनंतर | | | | |
| १९१८ | ९८ | २०७ | ११६२६३७५ | १३८०९९० |
| १९२५ | ३९१ | ६१७ | १०६५६४५३ | १२१८२७७ |
| १९३० | ४८३ | ६६९ | १२२०३५०० | १५३४६६६ |

| सन | हिंदूस्त्रिया | मु. स्त्रिया |
|---|---|---|
| १९२४ | ० | ८ |
| १९२७ | ० | ९ |
| १९३० | १ | ११ |

येथपर्यंत शिक्षणखात्याच्या आणि शिरगणतीच्या सरकारी रिपोर्टावरून संस्थानांतील शिक्षणाची सर्वसाधारण परिस्थिति वर्णन केली. यापुढें शिक्षणखात्यांत लोकांच्या दृष्टीनें कोणते दोष आहेत किंवा कोणत्या सुधारणा ताबडतोब करावयास पाहिजेत याचें दिग्दर्शन करूं.

१. आज सरकारच्या शिक्षणखात्यानें ठरविलेल्या शिक्षणक्रमांत मराठी, तेलगू, आणि कानडी भाषांना स्थान नाहीं ही परिस्थिति बदलली पाहिजे. संस्थानांत आज मराठी, तेलगू व कानडी मातृभाषा असणारांची संख्या अनुक्रमें ३७८६८३८ ६९७२५३४ व १६२००९४ अशी १९३१ च्या रिपोर्टात दिली असून उर्दू मातृभाषा असणारांची १५०८२७२ आहे असें म्हटलें आहे. (या संख्येंत मुसलमान म्हटला कीं त्याची मातृभाषा उर्दू असें गृहीत धरलें आहे. पण खेड्यांतून वस्तीस असलेल्या मुसलमानांची मातृभाषा क्वचितच उर्दू असते हें पाहिल्यास उर्दू मातृभाषा असणारांची संख्या रिपोर्टात वस्तुस्थितीस सोडून आहे हें ध्यानांत येईल). अर्थात् संस्थानांतील शें. ९० टक्के प्रजेची मातृभाषा उर्दू नाहीं. पण या भाषेस दोन तऱ्हेनें प्राधान्य देण्यांत येतें. एक ती राजभाषा म्हणून व दुसरें हिंदुस्थानची भावी Lingua Franca म्हणून. पण राजा हा प्रजेचा प्रतिनिधी म्हणून प्रांतिक भाषाही त्याच्या भाषा असूं शकतात. त्याची एकट्याची भाषा प्रजेवर लादण्याची जबरदस्ती होणें योग्य नव्हे. दुसरें येथील उर्दू ही उत्तर हिंदुस्थानांत राष्ट्रभाषा म्हणून प्रचलित असलेली हिंदी नसून ती अरबी आणि फारसी मिश्रित अतएव त्या भाषांइतकीच एतद्देशियांना दुर्बोध असलेली भाषा होऊन बसली आहे. अशी भाषा प्राथमिक, दुय्यम आणि उच्च शिक्षणांत बोधभाषा म्हणून ठरविणें, एतद्देशियांच्या शैक्षणिक प्रगतीला अडसर घालून ठेवण्याइतकेंच हानिकारक आहे. कविवर्य मोरोपंतांची केकावली समजण्यास ज्याप्रमाणें मराठीचें उत्तम ज्ञान, संस्कृताचें उत्तम ज्ञान आणि भारतभागवतादि पौराणिक कथांशीं पूर्ण परिचयाची आवश्यकता असते तसाच प्रकार येथील शिक्षणक्रमाचा. सर्व विषयांचें आकलन होण्यास उर्दू उत्तम पाहिजे; उर्दू उत्तम होण्यास फारसी व आरबी भाषांचें ज्ञान आणि व्युत्पत्ति हवी. या उर्दूच्या अडसरामुळें हिंदू विद्यार्थ्यांचें अत्यंत नुकसान झालेलें आहे.

प्राथमिक शाळांतून हिंदू विद्यार्थ्याला आपल्या मातृभाषेचें ज्ञान अक्षर ओळखीपलीकडे मिळूं शकत नाहीं. स्वभाषेचेंच पूर्ण किंवा चांगलें ज्ञान नसल्यामुळें उर्दू भाषा लवकर ग्रहण करतां येत नाहीं. अशा स्थितींतच सर्वच विषय उर्दूतून म्हणून त्याला एकही विषय ग्रहण करतां येत नाहीं किंवा समजत नाहीं. प्राथमिक अवस्थेंतच इतक्या ठोकरा खाल्ल्यावर दुय्यम शिक्षणांत प्रवेश मिळणार. तेथेंही तीच स्थिति. दुय्यम शिक्षणांत विद्यार्थ्याला आपली मातृभाषा शिकण्याची मुभा ठेवलेली आहे. पण ती इच्छा असल्यास आणि मराठी, तेलगू किंवा कानडी एक विषय म्हणून घेण्यास विद्यार्थी किंवा पालक या दोहोंचीही इच्छा नसते. कारण तीच उर्दू घेतल्यास तींत प्रगती होऊन इतर विषय (हे सर्व उर्दूतूनच शिकविले जातात) समजण्यास सोपें जातें व परिक्षेंत उत्तीर्ण होण्यास त्याचा फार उपयोग होतो. अर्थातच आपण नापास झालों तरी चालेल पण मातृभाषा शिकेनच किंवा आपल्या मुलानें शिकावी ही तळमळ किंवा इतका स्वार्थत्याग सामान्य व्यक्तींत आढळणें शक्य नाहीं. (मुसलमान विद्यार्थ्याला सर्व शिक्षण उर्दूतूनच असल्यानें मातृभाषेचा प्रश्नच उरत नाहीं).

यानंतर विद्यापीठानें आपल्या उच्च शिक्षणांत मराठी, तेलगू आणि कानडी भाषांना वाव दिला आहे. कांहीं कांहीं विद्यार्थी त्या भाषा घेऊन

पदवी घेतलेलेही आढळतात पण प्रांतिक भाषांना सरकारी दप्तरांतून वाव नसल्यामुळें व हे विद्यार्थी उर्दूंत साहजिक असावे तितके निष्णात नसल्यानें त्यांचा पुढील आयुष्यक्रम अत्यंत जिकिरीचा आणि कष्टाचा होतो. अशीं उदाहरणें डोळ्यांपुढें नित्य वावरतांना दिसल्यावर प्रांतिक भाषा घेऊन पदवी घेण्याचा वेडेपणा करण्यास कितीसे विद्यार्थी पुढें येतील ?

आतां प्रश्न असा येईल कीं, सरकारनें आपल्या प्रायमरी शाळांच्या करीक्युलममध्यें 'मेहदू' कमेटीनें केलेल्या शिफारशींना अनुसरून 'प्राथमिक शाळांतील शिक्षण मुलांच्या मातृभाषेंतूनच देण्यांत येईल' असें स्पष्टपणें दिलें असतां अशी स्थिति कां ? संस्थानांतील बहुसंख्य समाजापुढेंही पण हाच प्रश्न आहे. कागदोपत्रीं असा स्पष्ट निर्बंध असून देखील अनुभव मात्र उलट आहे. शिक्षक नेमतांनाच प्रांतिक भाषेच्या गरजा प हावयास हव्या होत्या. पण उर्दूच्या अभिमानाच्या भरांत प्रांतिक भाषेचें ज्ञान नसणाऱ्या शिक्षकांची भरती केली आणि आतां प्रांतिक भाषा जाणणारे शिक्षक नेमण्यास सरकारजवळ आर्थिक सवड नाहीं अशा सबबीवर मराठी, तेलगू व कानडी भाषांचें उच्चाटण होतें याचा अर्थ काय ? केवळ उर्दू जाणणारे शिक्षक कमी करून त्यांऐवजीं या भाषा जाणणारे शिक्षक संस्थानांतील प्राथमिक शाळांतून नेमल्यासच प्रांतिक भाषांवरील आजचें मरण टळूं शकेल. प्राथमिक शाळांतून ही सुधारणा झाल्यानंतरही याच धोरणानें दुय्यम शिक्षणाचीही पुनर्घटना करावी व त्याच पावलानें उच्च शिक्षणांतही फेरफार करावे. असें केलें तरच प्रांतिक भाषांचा तरणोपाय आहे. हें करतांना उस्मानिया पीठाचीही आखणी नव्यानें केली पाहिजे. विद्यापीठाच्या मराठी, तेलगू व कानडी अशा तीन शाखा करून त्या त्या शाखांकडे अनुक्रमें मराठवाडा, तेलंगण व कर्नाटक असे संस्थानी प्रांत शिक्षणार्थ द्यावे. संपूर्ण शिक्षणक्रम विद्यार्थ्यांच्या मातृभाषेंतून व्हावा. उर्दूला फार तर एक आवश्यक भाषा एवढेंच महत्त्व असावें. या शाखांपैकीं कोणत्याही शाखेंतून उत्तीर्ण होणाऱ्या विद्यार्थ्याला सरकारी नौकरींत शिरतां यावें एतदर्थ सरकारी दप्तरें प्रांतिक भाषांतून ठेवण्याची व्यवस्था झाली पाहिजे.

मुंबई, मद्रास, कलकत्ता इत्यादि विद्यापीठांनीं व त्या त्या प्रांताच्या शिक्षणखात्यांनीं आपापल्या शिक्षण खात्यांत प्रांतिक भाषांना संपूर्ण नसला तरी पुष्कळच वाव दिला आहे. अशा स्थितींत प्रांतिक भाषांची उचलबांगडी संस्थानच्या शिक्षणखात्यानें करणें कितपत न्यायाचें आणि शहाणपणास धरून होईल ?

यानंतर येथील शिक्षणखात्यानें आपल्या शिक्षणक्रमांत हिंदूंची संस्कृती, धर्म इत्यादि जगूनवाचून राहील अशी कोणतीच व्यवस्था केली नाहीं हा एक त्यांचा मोठा दोष आहे. संस्थाननें नेमलेल्या मेहदू कमेटीनेंच 'संस्थानांतील हिंदूंच्या भाषांकडे अधिक लक्ष दिलें पाहिजे' असें आपल्या रिपोर्टाच्या सेक्शन ५ च्या ५ नंबरच्या शिफारशींत म्हटलें आहे. त्याच सेक्शनच्या ८ व्या शिफारशींत संस्कृत भाषा हिंदूंची संस्कृती रक्षणाच्या दृष्टीनें अधिक अभ्यासिली जाण्याची आवश्यकता प्रतिपादिली आहे. सेक्शन २२ मध्यें 'ट्रेनिंगला पाठवावयाच्या मधल्या वर्गाच्या शिक्षकांपैकीं निम्मे आणि प्रायमरीकडील एक तृतीयांश उर्दू शिक्षक असावे' असें स्पष्ट म्हटलें असून उरलेल्या शिक्षकांतून मराठी, कानडी व तेलगू शिक्षक त्या त्या भाषा बोलणारांच्या संख्येच्या प्रमाणांत असावे असें म्हटलें आहे. पण वस्तुस्थिति मात्र याच्या उलट आहे. त्याचप्रमाणें सेक्शन २६ मध्यें 'मुसलमान विद्यार्थ्यांच्या धर्मशिक्षणाच्या तासांत हिंदु विद्यार्थ्यांना कांहीं नक्की स्वरूपाचे नीतिपाठ शिकविण्याची व्यवस्था व्हावी असें आमचें मत असून त्याकरतां शिक्षणांत मुरलेल्या शिक्षणप्रेमी हिंदूंची एक कमेटी नेमून त्या कमेटीनें हिंदूंच्या भावना, परंपरा व संस्थांचें हित यांकडे लक्ष ठेवून एक नीतिपाठाची योजना आखल्यास बरें होईल' असें म्हटलें असून देखील १९३१–३२ मध्यें आखलेल्या करीक्युलममधून या विषयाकरितां तयार केलेल्या उर्दू टेक्स्ट बुकांतून इस्लामी इतिहास, इस्लामी संस्कृति इत्यादि विषय आले असून रामायण, महाभारत आणि वेद यांना मात्र चाट मिळाली आहे. उच्चार आणि आचारांत केवढा हा फरक !

संस्थानी प्रजेची शेवटची तक्रार म्हणजे शिक्षण खात्याचे शिक्षणप्रसाराचे आजचे प्रयत्न संस्थानी प्रजा सुशिक्षित करण्याच्या दृष्टीनें अत्यंत अपुरे आहेत. आज मित्तीस संस्थानांत ४ मोठीं शहरें, १२९ मोठीं गांवें आणि २१६९७ खेडीं आहेत. बहुतेक कॉलेजें, हायस्कुलें व मिड्ल स्कुलें यांचा व त्याचबरोबर जवळजवळ ५।७ शें प्रायमरी शाळांचा पसारा या शहर व मोठ्या

गांवांतून मांडला गेलेला आहे. उरलेल्या सुमारें ३४०० प्रायमरी शाळा आज २१६९७ खेड्यांच्या वाट्यास जातात. म्हणजे आजमितीस संस्थानांतील १८ सव्वा अठरा हजार खेडीं शाळाविना असून त्यांतून शाळेंत जाण्यायोग्य वयाचीं सर्वच मुलें शाळांच्या अभावामुळें अक्षरशत्रु आहेत. संस्थानांतील जहागिरी वगळल्यास प्रत्यक्ष संस्थानी सरकारच्या ५७ टक्के क्षेत्रफळांत १६६१४ गांवें आहेत व एकूण शिक्षणसंस्था ५५५६ आहेत. १९३१-३२ मध्यें शाळेंत जाण्यायोग्य मुलांच्या पैकीं अवघीं १५ टक्केच शाळांतून जात होतीं. अर्थात् संस्थानांतील शाळेंत जाण्यायोग्य वयाचीं शें. ८५ टक्के मुलें शिक्षणाभावी वांया जात आहेत. ५७ टक्के क्षेत्रफळांतील ११००० गांवें शाळेशिवाय आहेत व तींही शाळाखात्यावरील सरकारचा खर्च गेल्या २० वर्षांत दसपटीनें वाढून ही अनिष्ट परिस्थिती नाहींशी होण्यास सरकारच्या प्रयत्नांना खाजगी प्रयत्नांची जोड मिळाली पाहिजे. अशी जोड देण्यास संस्थानी प्रजेची आजही तयारी आहे; पण सरकारचा खाजगी शिक्षणसंस्थांचा कायदा प्रजेच्या त्या इच्छेला जागचे जागीं नाहींशी करीत आहे. हा खाजगी शिक्षणसंस्थासंबंधींचा काळा कायदा सरकारनें रद्द केल्यास संस्थानांतील शिक्षणप्रसाराच्या मार्गांतील एक मोठा अडथळा दूर होऊन ज्ञानदानाचें पवित्र कार्य करूं इच्छिणाऱ्या संस्थानांतील शेकडों सुशिक्षितांना शिक्षण प्रसाराच्या कार्यांत सरकारशीं सहमत व सहभागी होतां येईल.

---

## मराठी वाङ्मय

मराठी भाषा ज्या प्रदेशांत बोलतात त्या प्रदेशाच्या सीमा, साधारणपणें उत्तरेस सातपुडा व विंध्य, पूर्वेस छोटानागपूर व आंध्रप्रांत, दक्षिणेस उत्तर कानडा जिल्हा व पश्चिमेस आरबी समुद्र, अशा आहेत. अर्थात् मराठी ग्रंथांची पैदास या प्रांतांत जवळ जवळ दीड हजार वर्षांपासून होत असावी असें अनेक स्थळीं सांपडलेल्या शिलालेखांत व ताम्रपटांत केलेल्या मराठी भाषेच्या उपयोगावरून दिसतें. कारण मराठी भाषेचा व्यवहार त्या कालाच्या पूर्वींही कांहीं काल होत असावा असें सिद्ध होतें. "या (वर दिलेल्या) चार हद्दींच्या आंत मराठीचें माहेर कोठेंतरी असलें पाहिजे आणि या हद्दींच्या आंतील गोदावरीच्या तीरीं वैदर्भांत तें ठिकाण असावें असें वाटतें. गोदेचे दोन्ही कांठ, पैठण व वऱ्हाड '(वर्धातट) हीं या भाषेच्या बालपणांतलीं क्रीडास्थानें निःसंशय होत. तिचें तान्हें रूपडें येथेंच पहावयास मिळेल व तिचें उत्पत्तिस्थानही येथेंच नजरेस पडेल असा तर्क होतो" (महाराष्ट्र सारस्वत)

भाषेच्या दृष्टीनें हैदराबाद संस्थानाचे तीन प्रमुख विभाग पडतात. तेलंगण—यांत सहा जिल्हे आहेत. कर्नाटक—यांत तीन जिल्हे आहेत व मराठवाडींत पांच जिल्हे आहेत. याशिवाय सध्यां ज्याला वऱ्हाड म्हणतात त्यावरील निझामसाहेबांचें स्वामित्व इंग्लिश सरकारनें मान्य केलें आहे; अर्थात् त्याचाही समावेश या संस्थानांतच केला पाहिजे. यावरून हैदराबाद संस्थानांतील महाराष्ट्र हाच मूळ महाराष्ट्र वाङमयाचें माहेरघर आहे हें स्पष्ट दिसेल.

वर सांगितल्याप्रमाणें मराठी भाषाही जरी दीडदोन हजार वर्षांपासून व्यवहारांत आहे तरी त्या भाषेंतील जें उपलब्ध असें वाङमय आहे त्याचा दृश्य उगम सध्यांच्या निजाम महाराष्ट्रांत आहे ही गोष्ट ध्यानीं येईल. जुन्या मराठी कवितेचे बरेचसे जनक या प्रदेशांतच जन्मले. जुनें मराठी राजकारणही यच प्रांतांत झालें. या कालानंतर सातारा पुण्याकडचा महाराष्ट्र हा जरी राजकारण व वाङमय यांचें कार्यक्षेत्र झाला असला तरी अग्रपूजेचा मान इकडल्या मराठवाड्याला देण्याला कोणीही कचरेल असें वाटत नाहीं.

### मुकुंदराज—

मुकुंदराज यांना मराठी काव्याचे आद्य जनक असें मानितात. यांच्या वास्तव्यस्थानाबद्दल जरी मतभेद होण्याचा संभव असला तरी हैदराबाद संस्थानांतील आंबेजोगाई या गांवाशीं त्यांचा कांहींतरी संबंध असला पाहिजे ही गोष्ट सर्व संशोधक मान्य करतात. आंबेजोगाई या गावांजवळ त्यांची समाधी आहे असें म्हणतात व त्यांच्या ग्रंथाचा प्रसारही त्या प्रांतांत बराच आढळतो. त्यांचा प्रसिद्ध ग्रंथ 'विवेकसिंधु' हा शके १११० मध्यें रचिला असें त्याच ग्रंथांत मुकुंदराजांनीं म्हटलें आहे. विवेकसिंधूशिवाय 'परमामृत' 'पवनविजय', 'मूलस्तंभ', 'पंचीकरण' वगैरे ग्रंथ मुकुंदराजांचे म्हणून प्रसिद्ध आहेत.

**हेमाडपंत—**

हेमाडपंत अथवा हेमाद्रि पंडित हा बाराव्या शतकांत विद्यमान होता. हदराबाद संस्थानांतील देवगिरीच्या (सध्यां यास दौलताबाद असें म्हणतात) रामदेवराव यादवाचा हा कारभारी होता. हा मोठा बुद्धिमान व कर्तृत्ववान होता. खाण्यांत बाजरी, राहण्यांत बिनचुन्याच्या इमारती व लिहिण्यांत मोडी लिपी या तीन गोष्टी यानेंच प्रथम सुरूं केल्या म्हणतात. पुष्कळ जुन्या दगडी देवळांना हेमाडपंती देवळें असें म्हणतात हें सर्वविश्रुतच आहे. 'हेमाद्रिकृत लेखन कल्पतरु' हा ग्रंथ हेमाद्रिपंडिताचा म्हणून प्रसिद्ध आहे. या खेरीज 'हेमाद्रिकृत नीतिबोध' या नांवाचा एक लेखही त्यांच्या नांवांवर प्रसिद्ध आहे. इतर कांहीं 'मेस्तकें' किंवा जमाखर्चाच्या वगैरे पद्धती-हेमाद्रिकृत म्हणून लिहिलेल्या आढळतात.

**ज्ञानेश्वर—**

या महापुरुषाचा जन्म शके ११९७ मध्यें पैठणपासून बारा कोसांवर आपेगांवीं झाला. याच्या वडिलांनीं आपल्या लग्नानंतर विरक्त होऊन आपल्या पत्नीच्या परवानगीशिवाय संन्यास दीक्षा घेतली. परंतु नंतर गुरूंच्या आज्ञेनें पुन्हा-गृहस्थाश्रम स्वीकारला. या आश्रमांत त्यांना तीन मुलगे व एक मुलगी अशीं चार अपत्यें झालीं. सर्वांत वडील निवृत्तिनाथ, दुसरे ज्ञानेश्वर, तिसरे सोपानदेव व चौथी कन्या मुक्ताबाई. हीं सर्वच लहानपणापासून अत्यंत विरक्त होतीं. निवृत्तिनाथानांच ज्ञानेश्वरांनीं आपले गुरु मानलें. निवृत्तिनाथांचे ४०० अभंग उपलब्ध आहेत. हे आपल्या वयाच्या २६ व्या वर्षी पण तिन्ही भावंडांच्या मृत्यूनंतर समाधिस्त झाले. ज्ञानेश्वरांच्या ज्ञानेश्वरीबद्दल तर आतां कांहीं लिहिण्याचें कारणच नाहीं, इतका तो ग्रंथ अप्रतिम व आबालवृद्धांना माहीत असलेला आहे. याशिवाय त्यांचे अमृतानुभव, भक्तराज, स्वात्मानुभव, चांगदेवपासष्टी हे ग्रंथ व इतर कांहीं प्रकरणें प्रसिद्ध आहेत. ज्ञानेश्वर आपल्या वयाच्या २२ व्या वर्षी व सोपानदेव व मुक्ताबाई अनुक्रमें २० व १८ व्या वर्षीच इहलोक सोडून गेले. सोपानदेवांनीं पंचीकरण, हरिपाठ, नमन वगैरे प्रकरणें लिहिलीं असून शिवाय 'सोपानदेवी' या नांव ची गीतेवरील समश्लोकी टीकाही लिहिली आहे. मुक्ताबाईची अभंग, पदें, कल्याणपत्रिका व हरिपाठ अशी रचना प्रसिद्ध आहे. तिचे ताटीचे अभंग फारच गोड आहेत.

**नामदेव—**

नरसी ब्राम्हणी हें गांव मोंगलाईत परभणी जिल्ह्यांत आहे. तेथें दामाशेट या नांवाच्या शिंप्याचा नामदेव हा मुलगा. याची अभंगरचना विपुल आहे. याची आई गोणाई, बायको राजाई, व मजुरीण जनाबाई या सर्वच विठ्ठलभक्त असून सर्वांनीं थोडे थोडे अभंग रचले आहेत. त्यांत जनाबाईचे अभंग फार प्रेमळ असून प्रसिद्ध आहेत.

**विसोबा खेचर—**

हा पैठणाजवळील भुर्गी या गांवचा राहणारा. नामदेवांनीं याजपासूनच गुरुमंत्र घेतला. हा सोपानदेवास आपला गुरु मानीत असे. याचें हरिश्चंद्राख्यान, कांहीं अभंग व पदें इतकींच उपलब्ध आहेत.

**गोरोबा कुंभार—**

हा मोंगलाईतील तेरढोकी येथील राहणारा. याचे अभंग उपलब्ध आहेत.

**जगमित्र नागा—**

हा पूर्वी श्रीमान असून पुढें दरिद्री झाल्यावर विरक्तीनें राहूं लागला. हा प्रतिष्ठानीं रहात असे. याची समाधी जोगाईच्या अंब्याजवळ परळी येथें आहे. याचे कांहीं अभंग व पदें मात्र उपलब्ध आहेत.

**पंडित विश्वनाथ—**

हा बाळापुरचा राहणारा. यानें पैठण येथील कमलाकर या साधूचा उपदेश घेतला. यानें अनेक ग्रंथ लिहिले आहेत. 'ज्ञानचंद्रिका' या नांवाचा याचा एक गद्यग्रंथ आहे. त्याचप्रमाणें ज्ञानप्रबोध या नांवाची गीतेवरील ओवीबद्ध टीका आहे.

**हयग्रीवाचार्य पंडित—**

याचा जन्म शके ११९७ मध्यें गोदावरीचे कांठीं राक्षसभुवन या गांवीं झाला. याचें गद्यराजस्तोत्र हें प्रकरण फार नांवाजलें आहे, यांत कृष्णकथा वर्णिल्या आहेत. हा फार विद्वान् होता.

**बहिरा पिसा— (१४ वें शतक)**

हाच बहिरंभट ऊर्फ जातवेद असावा. याची श्रीभागवताच्या दशमस्कंधावरील टीका उपलब्ध आहे. या टीकेची ख्याती अनेक शतकें महाराष्ट्रांत चालली आहे. हा प्रतिष्टानचाच राहणारा.

**जनार्दनस्वामी--**

याचा जन्म शके १४२६ मध्ये चाळीसगांवीं झाला. वयांत आल्यापासून हा पैठणास राहत असे. हा दौलताबादच्या किल्ल्यावर कारभारी होता. याचे कांहीं अभंग व पद आहेत. याचा एक 'श्रीदत्तस्तुति'पर ग्रंथ आहे म्हणतात पण तो उपलब्ध नाहीं. एकनाथांनीं याच्याजवळच उपदेश घेतला. याची समाधि दौलतादाबादच्या किल्ल्यावर आहे.

**एकनाथ--**

ज्ञानेश्वरानंतर महाराष्ट्रसंत मंडळांत श्रेष्ठ असे एकनाथ हेच संत होत. यांचा जन्म शके १४७० मध्यें पैठणास झाला. यांनीं जनार्दनस्वामींजवळ अध्ययन केलें. ज्ञानेश्वरीचें संशोधन हें कार्य त्यांनीं करून मराठी भाषेवर फार उपकार केले. यांचा एकनाथी भागवत हा ग्रंथ सर्वप्रसिद्ध आहे. याशिवाय त्यांचें प्रल्हादचरित्र, रुक्मिणीस्वयंवर, बालक्रीडा, शुकाष्टक, स्वात्मसुख, आनंदलहरी वगैरे पुष्कळ ग्रंथ आहेत. तसेंच पदें, गारुड वगैरे लहान लहान चुटके व अभंग अशी विविध रचना एकनाथांनीं केली आहे. ही रचना फार गमतीची व चमत्कृतीजनक आहे. यांनीं आपल्या उतार वयांत भावार्थरामायण या नांवाचा रामचरित्रावर एक स्वतंत्र व सुरस ग्रंथ लिहिला. हे शके १५२१ च्या फाल्गुन वद्य षष्ठीस इहलोक सोडून गेले. यांची समाधि पैठण येथें असून तेथें दरवर्षी उत्सव होत असतो.

**विष्णुदासनामा--**

हा मुक्तेश्वरापूर्वी होऊन गेला. याचा महाभारत हा ग्रंथ प्रसिद्ध आहे. मराठी भाषेंत अठरा पर्वें महाभारत लिहिणारा हा पहिलाच ग्रंथकार होय.

**नाथपंचक--**

(१) स्वतः एकनाथ, (२) बिठारेणुकानंदन, (३) जनीजनार्दन, (४) रामाजनार्दन, (५) दासोपंत. हे सर्व निकट सहवासांतले होते. पैकीं बिठारेणुकानंदन हा देवी उपासक होता. याचीं कांहीं पदें उपलब्ध आहेत. जनीजनार्दन याचा 'निर्विकल्प ग्रंथ ' हा अध्यात्मपर आहे. याचीं अनेक पदें आढळतात. हिंदींतही त्यानें कांहीं गोड पदें केलीं आहेत. 'महावाक्य निवारण' या नांवाचें वेदांतपर प्रकरण, व 'सीतास्वयंवर' हें पौराणिक आख्यान हीं त्याचीं दोन प्रकरणें आहेत. याच्या दोन समाधी आहेत, एक सरदाराचें भूम या गांवीं व दुसरी मौजे बीड येथें. रामाजनार्दन यांच्या दोन आरत्यांशिवाय कांहींच माहिती नाहीं. एकनाथांच्या खालोखाल दासोपंतांची प्रसिद्धी आहे. हा बेदरकडील नारायणपेठ या गांवचा राहणारा देशस्थ ब्राह्मण. हा नेहमीं आंबेजोगाई येथें राहात असे. यानें लहानमोठे अनेक ग्रंथ लिहिले आहेत. याच्या एका गीतेवरच पांच सहा टीका आहेत. पैकीं 'गीतार्थबोधचंद्रिका' या ग्रंथाचीं संख्या सुमारें वीस हजार आहे. हिच्यापेक्षांही 'गीतार्णव' ही गीतेवरील फार मोठी व विस्तृत टीका आहे. हिची ग्रंथसंख्या सवालक्ष असल्याचें प्रसिद्ध आहे. याखेरीज अवधूतराज, ग्रंथराज व वाक्यवृत्ति असे त्याचे वेदांतपर ग्रंथ आहेत. यांत वाक्यवृत्ति हा गद्यग्रंथ आहे हा त्याचा विशेष. त्याचाच पंचीकरण' हा ग्रंथ अडीच हात पासोडीवर दासोपंताच्याच हातानें लिहिलेला आहे. शिवाय त्याचे संस्कृत ग्रंथ, दशोपनिषदावरील स्वतंत्र भाष्यें, स्तोत्रें, अष्टकें व पदें आहेत. यांखेरीज त्याची अनुपलब्ध ग्रंथसंख्या बरीच आहे. हा शके १५३७ मध्यें माघवद्य ६ स समाधिस्त झाला.

**भानुदास--**

हे एकनाथांचे आजे असून मोठे संत होते. यांनीं विठोबाची मूर्ती अनागोंदीहून परत आणली अशी आख्यायिका आहे. यांचो कांहीं पदें व अभंग उपलब्ध आहेत. हे १४३५ चे सुमारास समाधिस्थ झाले.

**मृत्युंजयस्वामी--**

हे मूळचे मुसलमान असून विदरच्या बहामनी राज्यांतील राजघराण्यांतील होते. पंढरपुरांतील विवेकसिंधु हा ग्रंथ वाचून यांना उपरति झाली. नंतर स्वामी सहजानंदांकडून उपदेश घेतला. यानें अनुभवसार, गुरुलीला, अद्वैतप्रकार वगैरे वेदांतपर आठ ग्रंथ लिहिले.

**कृष्णदास मुद्गल--**

हा एकनाथाचा समकालीन असून पैठणचा राहाणारा होता व त्याच्याच कृपेनें यानें युद्धकांड संपूर्ण केलें.

**मुक्तेश्वर--**

हा एकनाथांचा नातु. याचा काल अद्याप निश्चित नाहीं. पण सामान्यतः तो शके १५५१ ते १५७२ असा समजतात. याच्या महाभारताचीं चार पर्वेंच उपलब्ध आहेत. याशिवाय त्यानें 'संक्षेप रामायण' या नावाचें संपूर्ण रामायण लिहिलें आहे. रामायणाप्रमाणेंच हरिश्चंद्राख्यान,

शुकरंभासंवाद, वगैरे आख्यानें, उपाख्यानें व अभंग आणि पदें लिहिलीं आहेत. हा एक श्रेष्ठ दर्जाचा कवि समजला जातो. रसपरिपाक व वर्णनसौंदर्य हीं याच्या काव्यांत प्रतीत होतात.

**रमावल्लभदास—**

जन्म शके १५३२. याचे वडील दौलताबादच्या राजाचे कारभारी होते. याचें मूळचें नांव तुकोपंत. याला विरक्ति झाल्यानंतर याचें नांव रमावल्लभदास असें ठेवण्यांत आलें. यानें 'दर्शक निर्धार' म्हणून भागवताच्या दशमावर टीका लिहिली. वाक्यवृत्ति व चमत्कारी असेही आणखी त्याचे दोन ग्रथ आहेत.

**शिवकल्याण—**

हा अंबाजोगाईचा राहणारा. यानें अमृतानुभवावर 'नित्यानंददीपिका' नांवाची टीका १५५७ सालीं लिहिली. दशमावर याची एक फार विस्तृत टीका आहे.

**शिवरामस्वामी—**

जन्म १५५४. वडील कलबुर्गाप्रांतात महागांवीं राहात असत. याच्या नांवावर सुमारें शें पन्नास ग्रंथ आहेत.

**विठ्ठल—**

हा बीड जवळील गौरीपुरचा राहणारा. याचे रुक्मिणीस्वयंवर, सीतास्वयंवर, द्रौपदीस्वहरण, रसमंजरी, बिल्हमचरित्र वगैरे सात ग्रंथ आहेत. अंगीं जाडी विद्वत्ता असूनही प्रसाद कमी असल्यामुळें यास मानमान्यता मिळाली नाहीं. मात्र बिल्हमचरित्र फार सुरस आहे. हीं सर्व काव्यें शके १५९६ ते १६०२ या कालांतील आहेत.

**समर्थ रामदास—**

यांचें नांव माहीत नाहीं असा महाराष्ट्रीय असणार नाहीं. यांचा जन्म मोंगलाईतील जांब गांवीं शके १५३० मध्यें झाला. पण पुढील आयुष्य खुद्द महाराष्ट्रांत गेलें. यांचा दासबोध हा मुख्य ग्रंथ; पण इतर रचनाही विपुल आहे. राजकारणांत भाग घेणारे व आपल्या मताचा प्रसार सुसंघटितपणें करणारे असे हे एक मोठे तेजस्वी पुरुष होते.

**केशवस्वामी—**

समर्थपंचकापैकीं केशवस्वामी हे हैदराबादचे. यांची समाधि हैदराबादेस नदीच्या कांठीं एका शेतांत आहे. आपल्या समाधीसंबंधीं कोणत्याही प्रकारची कायम स्वरूपाची व्यवस्था नसावी अशी यांची आज्ञा होती अशी आख्यायिका आहे. एरव्हीं एवढ्या मोठ्या साधूची अशी उपेक्षा समाजानें केली असती असें वाटत नाहीं. यांचीं कांहीं पदें उपलब्ध आहेत.

**हरिनारायण—**

हे तेरढोकीचे राहणारे. 'नामामृतलहरी' या नांवाचा अध्यात्मावरील यांचा एक ग्रंथ आहे. १६४७ मध्यें हे समाधिस्थ झाले.

**शिवदिनकेसरी—**

हे पैठणचे राहणारे. नाथसंप्रदायांत यांची योग्यता ज्ञानेश्वरांच्या खालोखाल समजतात. यांनीं 'विवेकदर्पण' व 'ज्ञानप्रदीप' हे ग्रंथ लिहिले आहेत.

**गोपाळ—**

हा औरंगाबादजवळील सलाबतपूरचा राहणारा. हा आजन्म ब्रह्मचारी होता व शके १६८८ मध्यें यानें जिवंत समाधि घेतली. याचा 'शिरोमणि' या नांवाचा एक ९००० ओव्यांचा व 'समाधिबोध' या नांवाचा एक लहान ग्रंथ व कांहीं पदें आहेत.

**मृतराय—**

हे, मध्वमुनि या नामांकित साधु कवीचे शिष्य. हे औरंगाबादचे राहाणारे. यांचा जन्म शके १६२० मध्यें झाला. यांचे कटाव फार प्रसिद्ध आहेत. यांची कविता प्रौढ असून प्रसादपूर्ण आहे.

**उद्धव चिद्धन—**

हे धारूरचे राहणारे. यांनीं हेमराज, बहिरंभट, मृत्युंजय, गोरा कुंभार यांचीं चरित्रें लिहिलीं आहेत. 'भक्तकथामृतसार' हा यांचा ग्रंथ अद्याप उपलब्ध नाहीं.

**नरहरि मोरेश्वर—**

याचा काल शके १६५०–१७०० हा निजामशाहींत बालेघाटजवळ इट नामक गांवीं राहात असे. याचें फक्त द्रोणपर्व प्रसिद्ध आहे. उद्योगपर्व, भीष्मपर्व व कर्णपर्व हीं अप्रसिद्ध आहेत.

**दयाळनाथ—**

शके १७१० ते १७५८. हा संस्कृत, प्राकृत व उर्दू भाषा चांगल्या जाणत असे. गायनकलेचाही त्याचा अभ्यास होता. त्या कालीं याचीं उर्दू भाषेंत कीर्तनें होत व तीं निझाम सरकार, चंदुलाल दिवाण यांसारखीं बडी मंडळीही ऐकत असत. याची कांहीं कविता व आख्यानें प्रसिद्ध आहेत.

**चूडामणिसुत—**

शके १७३२ ते १७९२. हे बिदर जिल्ह्यांत

चाकूर येथील राहाणारे. यांनीं सुभद्राहरण, सीतास्वयंवर, शकुंतलाख्यान, लवकुशाख्यान, भर्तृहरि शतकावर समश्लोकी, अशीं काव्यें व अमरकोश व महिम्नस्तोत्र यांवर टीका केल्या आहेत.

**निरंजनबुवा—**

परळी वैजनाथाच्या जवळ कळंब या गांवीं हे राहात असत. स्वात्मप्रतीति, साक्षात्कार, रघुनाथचरित्र, अमृतानुभवावर गद्य टीका इत्यादि बरेच ग्रंथ यांनीं लिहिले आहेत. शके १७३३ मध्यें समाधिस्त झाले.

**हंसराज—**

हे परभणीचे. यांचें ज्ञान अगाध असून वैराग्य प्रखर होतें. यांचे १०–११ ग्रंथ असून कवितासंख्या ३५००० आहे. हे वेदांतांत फार प्रवीण होते. यांच्या 'संकेतकुबडींत' दासबोधाचें सार आहे. यांनीं १७७७ मध्यें परंडा येथें समाधि घेतली.

* * *

मराठी काव्याचा पहिला पूर ओसरल्यानंतर मराठी भाषेला मधल्या काळांत पडती कळाच आली असें म्हणावयास हरकत नाहीं. परंतु ही स्थिति बदलून वाङ्मयोत्पादनाचा नवा मनु आला व ज्या गोदातटावर अनेक संतकवींनीं भक्तिपूर्ण काव्याची पैदास केली त्याच गोदातटाकावरील त्यांच्याच वंशजांनीं मराठी वाङ्मयाला हात देऊन पुन्हां परिपुष्ट करण्याचा यत्न चालविला. हैदराबाद संस्थानांतील मराठवाड्यांतील मराठी वाङ्मयाचा हा पुनर्जन्म निःसंशय आनंददायी होय. यद्यपि या मराठी वाङ्मयाला अद्याप भारदस्तपणा आला नसला तथापि भावी काळाच्या भव्यपणाचीं बीजें सध्यांच्या या वाङ्मयांत आहेत ही गोष्ट निर्विवाद आहे. सध्यां मराठवाड्यांत पुष्कळ कवी, लेखक आपल्या कुवतीप्रमाणें वाङ्मयनिर्मिती करीत आहेत. त्यांच्यासंबंधीं जी माहिती मिळू शकली ती अशीः—

## कवि

१. **यशवंतराव कोरेकर**—हे हैदराबादेस सरकारी नोकरींत आहेत. यांची कविता विपुल व विविध आहे. यांचीं कवितेचीं तीन पुस्तकें प्रसिद्ध झालीं आहेत. व एक दोन पुस्तकें प्रसिद्ध होणार आहेत. यांच्या इतका मराठी वृत्तांचा अभ्यास फार थोड्याचा असेल. यांच्या या काव्यगुणामुळें व अनेक कलानैपुण्याबद्दल यांना 'काव्यकौस्तुभ,' 'वृत्तसम्राट्', 'सकलकलाकोविद' अशा पदव्या जनतेनें स्वयंस्फूर्तीनें दिल्या आहेत. यांचा कवितारचनेचा उद्योग अखंड चालू आहे.

२. **संतदासगणु**—(गणेशदत्त य सहस्रबुद्धे) हे एक प्रतिभासंपन्न कवि व प्रेमळ संत आहेत. प्रथम पोलिसखात्यांत नोकरी व नंतर भक्तिपूर्ण आचरण असें विचित्र स्थित्यंतर यांच्या जीवनांत झालें आहे. हे चांगले कीर्तनकारहि आहेत. यांचे भक्तलीलामृत, संतकथामृत, भक्तिसारामृत, अमृतानुभव भावार्थमंजरी, इत्यादि स्वतंत्र ग्रंथ प्रसिद्ध आहेत. शिवाय यांनीं पुष्कळ रसाळ आख्यानेंही रचिलीं आहेत.

३. **देविदासराव महाजन**—संतदासगणप्रमाणेंच हेही नांदेडचे नामांकित कवि आहेत; तसेंच हे चांगल्यापैकीं कीर्तनकारही आहेत. यांनीं कविसम्राट रवींद्रनाथ टागोर यांच्या जगप्रसिद्ध गीतांजलीचें मराठी भाषांतर केलें आहे. त्यांचें काव्यमय नामदेव चरित्रहि प्रसिद्ध आहे. त्यांनीं आपल्या कवितेचा संग्रह प्रसिद्ध केला असून त्यावरून त्यांच्या काव्यगुणाची चांगली प्रतीति येते. शिवाय त्यांनीं 'कविसंमेलन' नांवानें या संस्थानांतील लहान मोठ्या कवींच्या कवितांचे दोन संग्रह प्रसिद्ध केले आहेत. यांनीं आख्यानेंही रचिलीं असून तीं त्यांनींच चालविलेल्या आख्यानरत्नमालेंतून प्रसिद्ध होत असतात. यांच्या कविता अनेक मासिकांतून प्रसिद्ध होतात.

४. **कवि पद्माकर**—हे कवि औरंगाबादचे राहणारे आहेत. हे उत्तम कीर्तनकार व गायनपटु आहेत. यांचा स्फुट काव्यसंग्रह 'प्रफुल्ल पद्माकर' या सार्थ नावानें प्रसिद्ध झाला आहे.

५. **श्रीकृष्ण वामन गाडगीळ**—हे 'खुसखुशीत मेवा' या पुस्तकाचे लेखक डॉ. वामनराव गाडगीळ यांचे चिरंजीव. यांच्या स्फुट कवितेचा संग्रह 'माझीं फुलें' या नांवानें प्रसिद्ध झाला आहे. यांच्या कविता निरनिराळ्या मासिकांतून प्रसिद्ध होत असतात.

६. **कवि कान्त**—हे नांदेड येथील शारदाश्रमातर्फे प्रसिद्ध होणाऱ्या विहंगम मालेचे संपादक होत. 'पहाटतारा' या काव्यसंग्रहांत त्यांच्या कांहीं कविता आहेत. याखेरीज 'फटत्कार' या नांवाच्या काव्यसंग्रहांतही यांच्या कविता आहेत. सांजवाती व लज्जित खंजीर हीं त्यांचीं दोन खंडकाव्यें अप्रसिद्ध आहेत. तीं लवकरच प्रसिद्ध होतील. हे तरुण होतकरु कवि असून सध्यां हैदराबादेस सरकारी नोकरींत आहेत.

७. **पार्थिव**–हे लघुकथालेखक असून नाटककारही आहेत, कांटेरी मुकुट व नरकाचे सुलतान हीं यांचीं दोन नाटकें लिहून तयार आहेत. शिवाय यांची स्फुट कविता प्रसिद्ध आहे.

८. **कृष्णकुमार**–हे कवि पूर्वी नांदेडकडून निघणाऱ्या मंदारपुष्पमालेचे संपादक होते. यांचे गद्यलेख विहंगम मालेंतून प्रसिद्ध झाले आहेत. यांनीं एक खंडकाव्यही लिहिलें आहे पण तें अद्याप अप्रसिद्ध आहे. यांची स्फुट कविताही प्रसिद्ध आहे.

९. **यादवसुत**–हे मोंगलाईंतील प्रसिद्ध कवि आहेत. यांच्या कविता महाराष्ट्र शारदा, काव्यकौमुदी, काव्य संग्रहांतून प्रसिद्ध झाल्या आहेत. यांचें 'भगवा झेंडा' हें खंडकाव्य अप्रसिद्ध आहे.

१०. **कुलारी**–हे एक उदयोन्मुख तरुण कवि आहेत. यांच्या कविता बऱ्याच मासिकांतून प्रसिद्ध झाल्या आहेत. हे कुशल लघुकथालेखकही आहेत

११. **नारायणराव नांदापूरकर**, एम्. ए.–हे कवि औरंगाबाद येथील इंटर कॉलेजांत अध्यापक आहेत. यांनीं कांहीं खंडकाव्यें लिहिलीं आहेत. यांच्या स्फुट कविता 'वाग्विलास' या नांवानें सिद्ध झाल्या आहेत.

१२. **सी. ग. सालाठकर**, एम्. ए.–हे कवि सध्यां हैदराबादेस सरकारी हायस्कूलमध्ये शिक्षक आहेत. यांचें 'जानकीकाव्य' या नांवाचें खंडकाव्य पूर्वींच प्रसिद्ध झालें आहे. याशिवाय 'नीवापांजलि', 'मनतरी', 'अभिमन्यु', 'विरहगुंजन', 'अंबना' इत्यादि खंडकाव्यें अप्रसिद्ध आहेत.

* * * *

कवितेप्रमाणेंच गद्यलेखनही थोडेंथोडें प्रसिद्ध होऊं लागलें आहे. हा या आधुनिक वाङ्मयाचा एक विशेष आहे. पुढील गद्यलेखकांची त्रोटक माहिती मिळूं शकते.

१. **'फिरस्ता'**–डॉ. वामन दामोदर गाडगीळ हे येथील प्रसिद्ध वेदांती श्री. दामोदरपंत गाडगीळ यांचे चिरंजीव. डॉ. साहेबांचा लेखनाचा व्यासंग दांडगा आहे. हे मोठे बहुश्रुत गृहस्थ आहेत. विविध विषयांवर यांची लेखणी सफाईनें चालते. सरकारी नोकरी संभाळून यांनीं वाचन व लेखन हे उद्योग सतत चालविले आहेत. सरकारी नोकरींतून आराम घेऊन सध्यां डॉक्टरसाहेब निझामाबादेस राहात असतात. यांचे पुष्कळ लेख येथील प्रसिद्ध निजामविजय या साप्ताहिकांत व इतर ठिकठिकाणच्या नियतकालिकांतून प्रसिद्ध होत असतात. इतर विषयाप्रमाणें विनोदीलेखनांतही डॉक्टरसाहेबांचा अधिकार मोठा आहे. याचा पुरावा त्यांच्या सर्वप्रसिद्ध 'खुसखुशीत मेवा' या पुस्तकावरून येईल. या ग्रंथावर महाराष्ट्रांतील मोठमोठ्या साहित्यिकांचे चांगले अभिप्राय आहेत.

२. **श्री. दत्तोपंत तुळजापूरकर**, बी. ए. एलएल्. बी.–हे मूळचे हैदराबाद संस्थानांत राहणारे. हे अव्वल दर्जाचे लेखक आहेत. पूर्वीं हे येथें वकिली करीत असत. परंतु सरकारी रोषामुळें त्यांना हैदराबाद सोडावें लागलें व सध्यां हे मुंबईस वकिली करतात. हे महाराष्ट्रास चांगले परिचित आहेत. पूर्वी कै. अच्युतराव कोल्हटकरांबरोबर 'श्रुतिबोध' या प्रसिद्ध लेखनाचे ते भागीदार होते. यांचा 'माझें रामायण' हा ग्रंथ सर्वविश्रुत आहे.

३ **राघवेंद्रराव शर्मा**–हेही पूर्वी हैदराबाद येथें वकिली करीत असून, राष्ट्रीय बाण्याचे म्हणून प्रसिद्ध होते. पण त्यांनाही येथील सरकारच्या रोषाला बळी पडावें लागून हैदराबादेस कायमचा रामराम ठोकावा लागला. हे सध्यां पुण्यासच असतात. यांचें हैदराबादसंबंधींचें पुस्तक महाराष्ट्रांत प्रसिद्ध आहे.

४. **दिवाकर कृष्ण केळकर**–एम्. ए. एल्एल्. बी.–हे हैदराबाद येथें वकिली करीत असतात. सर्व महाराष्ट्रभर उत्तम लघुकथा लेखक म्हणून यांची ख्याति आहे. समाधि व इतर सहा गोष्टी हें यांचें लघुकथांचें पुस्तक प्रसिद्ध आहे. त्याचप्रमाणें 'किशोरीचें हृदय' ही कादंबरी व 'तोड ही माळ' हें नाटक नुकतेंच प्रसिद्ध झालें आहे. यांनीं एक उर्दू नाटकही लिहिलें आहे.

५. **दत्तोपंत माधवराव कुलकर्णी** तुळजापूरकर हे एक बरेच जुने लेखक असून यांची आयेषा ही कादंबरी व तुळजाभवानी हा ग्रंथ प्रसिद्ध आहे.

६. **व्यंकटराव दातार**–हे येथें मोठ्या सरकारी हुद्यावर असून यांचा विद्येचा व्यासंग जबर आहे. यांचें 'गुरुकरुणामृत' हें पुस्तक प्रसिद्ध आहे.

७. **नारायणराव पेंढावे वकील**–तुळजापूरकर यांच्या कांहीं कादंबऱ्या प्रसिद्ध आहेत.

८. **दत्तात्रय अनंत कंधारकर**–यांचा श्रीक्षेत्र माहूर हा ग्रंथ प्रसिद्ध झालेला आहे.

९. **श्री. यमुनाबाई केळकर** बी. ए.–या औरंगाबाद येथें मुलींच्या शाळेच्या मुख्याध्यापिका आहेत. यांच्या लघुकथांचें पुस्तक प्रसिद्ध झालें आहे.

१०. **विश्वेश्वर अंबादास कानोले**–हे

हैदराबाद संस्थानांतील नांदेड गांवीं राहतात. हे इतिहाससंशोधक म्हणून सर्व महाराष्ट्रास माहित आहेत. यांचे शेष घराण्यासंबंधीं संशोधनात्मक लेख प्रसिद्ध आहेत.

११. रासराव काटे वकील—हे शेलु या गांवीं वकिली करीत असतात. यांचा 'संपूर्ण भूषण' हा ग्रंथ छापून प्रसिद्ध झाला आहे.

१२. माणिकराव विठ्ठलराव जहागिरदार—हे एक येथील जुन्या पिढीचे आदरणीय गृहस्थ आहेत. यांनीं उर्दू भाषेंत 'बोस्तानिया आसफिया' या नांवाचा ज्ञानकोश एकट्याच्या हिंमतीवर व चिकाटीवर प्रसिद्ध केला आहे. या एकाच गोष्टीवरून यांचा विद्याव्यासंग केवढा जबरदस्त असला पाहिजे याची कल्पना होईल. हा ग्रंथ येथें सर्वमान्य झाला आहे ही गोष्ट त्यांच्या उर्दू भाषेवरील प्रभुत्वाची व ज्ञानसंचयाची साक्ष [illegible]ईल. इतकें करून कार्याचा गवगवा बिलकूल नाहीं, हें विशेष. आतां मराठी भाषेला जरी यांच्या या उद्योगामुळें कांहीं फायदा झाला नाहीं तरी एवढें कार्य व तेंही परक्या भाषेंत करूं शकणारा महाराष्ट्रीय आपल्यांत आहे ही गोष्ट कांहीं कमी अभिमानाची नाहीं. उद्योगाच्या बाबतींत तरुण पिढीनें श्री. माणिकरावांचा जीवनक्रम आदर्श म्हणून ठेवण्यासारखा आहे.

१३. रघुनाथ दर्द—हेही एक महाराष्ट्रीय गृहस्थ असून उर्दू भाषेंत निपुण आहेत. यांच्या उर्दूंत लिहिलेल्या गोष्टी, कविता व ताजेरफा या नांवाचें नाटक प्रसिद्ध आहे.

---

## तक्ता १ ला.

**हैदराबाद संस्थानांतील जहागिरदार आणि मक्तेदार दाखविणारा तक्ता.**

| जहागिरीचें वार्षिक उत्पन्न | हिंदु | मुसलमान |
|---|---|---|
| १० ते ५०० | १०० | ४२ |
| ५०० ते १००० | १०९ | ४२ |
| १००० ते ३००० | २४१ | १६१ |
| ३००० ते ५००० | ६५ | ७२ |
| ५००० ते ६००० | २५ | २२ |
| ६००० ते १०,००० | २९ | ७२ |
| १०,००० ते १२,००० | १० | २३ |
| १२,००० ते २५,००० | २० | ५५ |
| २५,००० ते ५०,००० | २० | २४ |
| ५०,००० ते १,००,००० | ६ | ९ |
| १,००,००० पासून पुढें | ६ | १२ |
| | ६३२ | ५३४ |

७ हिंदु जहागिरदारांचें वार्षिक उत्पन्न रुपये २८,१८,६३३–४–३ असून १२ मुसलमान जहागिरदारांचें उत्पन्न रुपये ६४,३८,५३४–१२–० इतकें आहे.

## तक्ता २ रा.

**हैदराबाद संस्थानांतील हिंदु आणि मुसलमान यौमियादारांचा आंकडा दाखविणारा तक्ता.**

| वार्षिक रोख तनखा | हिंदु | मुसलमान |
|---|---|---|
| २०० ते २५० | २१ | ८१ |
| २५० ते ३०० | १२ | २४ |
| ३०० ते ४०० | ६२ | २०५ |
| ४०० ते ५०० | २० | ४९ |
| ५०० ते ६०० | १० | १८ |
| ६०० ते ९०० | २६ | ११३ |
| ९०० ते १२०० | ७ | ८ |
| १२०० पासून पुढें | २ | ४० |
| | १६० | ५३८ |

## तक्ता ३ रा.

**हैदराबाद संस्थानांतील हिंदु आणि मुसलमान मनसबदारांचा आंकडा दाखविणारा तक्ता.**

| वार्षिक मनसबीची रक्कम (रोख तनखा.) रुपये. | हिंदु | मुसलमान |
|---|---|---|
| २०० ते २५० | ३२ | २३५ |
| २५० ते ३०० | ३० | १७९ |
| ३०० ते ४०० | ४६ | ३१२ |
| ४०० ते ५०० | ३८ | २०२ |
| ५०० ते ६०० | २४ | १५४ |
| ६०० ते ९०० | ४२ | २३७ |
| ९०० ते १२०० | २५ | १४६ |
| १२०० पासून पुढें | २९ | १७८ |
| | २६६ | १६४३ |

## तक्ता ४ था.

**हैदराबाद संस्थानांतील हिंदु आणि मुसलमान सरकारी नोकरांचा आंकडा दाखविणारा तक्ता.**

( १३३० फसली सनांतील आंकडे )

| वार्षिक पगार रुपये | हिंदु | मुसलमान |
|---|---|---|
| ३०० ते ६०० | १८८४ | ३३८० |
| ६०० ते ९०० | ३०२ | ७१८ |
| ९०० ते १२०० | २१७ | ४७४ |
| १२०० ते १५०० | ८१ | १४८ |
| १५०० ते १८०० | ८५ | २०४ |
| १८०० ते २४०० | ४४ | १७२ |
| २४०० ते ३००० | २७ | ११० |
| ३००० ते ३६०० | ३३ | १३७ |
| ३६०० ते ४२०० | ६ | ४४ |
| ४२०० ते ५००० | ९ | ५९ |
| ५००० पासून पुढें | ५१ | २०५ |
| | २७३९ | ५६५१ |

## तक्ता ५ वा.

हैदराबाद संस्थानांतील लष्कर आणि पोलीस ह्या खात्यांतील हिंदु आणि मुसलमान नोकरांचें प्रमाण दाखविणारा तक्ता.

(१३३० फसली सनांतील वार्षिक पगार.)

| रुपये | हिंदु | मुसलमान |
|---|---|---|
| ३०० ते ६०० | ५४० | १६७६ |
| ६०० ते ९०० | ७२ | ३४५ |
| ९०० ते १२०० | ३८ | १७० |
| १२०० ते १५०० | २५ | ९५ |
| १५०० ते १८०० | ११ | ५१ |
| १८०० ते २४०० | ११ | ८४ |
| २४०० ते ३००० | ३ | २८ |
| ३००० ते ३६०० | ४ | १२ |
| ३६०० ते ४२०० | १ | १७ |
| ४२०० ते ५००० | ६ | १५ |
| ५००० पासून पुढें | ८ | ६२ |
| | ७१९ | २५५५ |

## तक्ता ६ वा.

हैदराबाद संस्थानांतील सरकारी सेवान्तवेतन (Pension) मिळणाऱ्या हिंदु मुसलमानांचा आंकडा दर्शविणारा तक्ता.

( १३३० फसली सनांतील आंकडे )

| वार्षिक सेवांतवेतन (Pension) रुपये | हिंदु | मुसलमान |
|---|---|---|
| २०० ते ३०० | ४८९ | ११२२ |
| ३०० ते ६०० | १७१ | ३७० |
| ६०० ते ९०० | ५६ | १३० |
| ९०० ते १२०० | २५ | ११७ |
| | ७४१ | १७३९ |
| १२०० ते १५०० | ८ | ४२ |
| १५०० ते १८०० | ३ | २३ |
| १८०० ते २४०० | ७ | ३१ |
| २४०० ते ३००० | ५ | २५ |
| ३००० ते ३६०० | ० | १३ |
| ३६०० ते ४२०० | १ | १३ |
| ४२०० ते ५००० | १ | १५ |
| ५००० पासून पुढें | ५ | २७ |
| | ७७१ | १३३४ |

## तक्ता ७ वा.

हैदराबाद संस्थानांतील लष्करी सेवान्तवेतन (Military Pension) मिळणाऱ्या हिंदूंचे आणि मुसलमानांचे आंकडे दर्शविणारा तक्ता.

(१३३० फसली सालांतील आंकडे

| वार्षिक सेवान्तवेतन (Annual Pension) रुपये | हिंदु | मुसलमान |
|---|---|---|
| २५ ते ५० | २१२ | २९६ |
| ५० ते १०० | ३९७ | ८५८ |
| १०० ते १५० | ४३ | १४२ |
| १५० ते २०० | १९ | ६५ |
| २०० ते ३०० | २६ | ३४ |
| ३०० ते ४०० | ५ | १६ |
| ४०० ते ५०० | २ | १४ |
| ५०० ते ६०० | ० | १२ |
| ६०० पासून पुढें | ४ | ४३ |
| | ७०८ | १५१० |

## तक्ता ८ वा.

हैद्राबाद संस्थानांतील हिंदु आणि मुसलमान रुसुमदारांचा (Rusumdars) आंकडा दर्शविणारा तक्ता.

(१९३० फसली सनांतील आंकडा)

| वार्षिक रोख तनखा | हिंदु | मुसलमान |
|---|---|---|
| १ ते ५० | १४६६ | १०२ |
| ५० ते १०० | ६०८ | ३३ |
| १०० ते २०० | ५३५ | १९ |
| २०० ते २५० | १२८ | ३ |
| २५० ते ३०० | १०० | ५ |
| ३०० ते ४०० | १२८ | ७ |
| ४०० ते ५०० | ७५ | ४ |
| ५०० पासून पुढें | ३११ | २४ |
| | ३३५१ | १९७ |

## हैदराबाद संस्थानांतील वरिष्ठ सरकारांत असलेल्या हिंदु मुसलमानांचे पगार.

| हुद्दा | एकंदर मुसलमान अधिकारी | एकंदर हिंदू अधिकारी | मुसलमान अधिकाऱ्याचे मासिक पगार व भत्ता रु. | हिंदु अधिकाऱ्याचे मासिक पगार व भत्ता रु. |
|---|---|---|---|---|
| १ एक्झिक्युटिव्ह कौन्सिल अध्यक्ष | | १ | | ७००० १००० |
| सदर–उल–महामस् | ६ | | २२२५०+७०० | |
| अध्यक्षाचें ऑफिस | ५ | | २९२०+७०० | |
| एकंदर | ११ | १ | २६५७० | ८००० |
| **राजकीय** | | | | |
| १. मुख्य सेक्रेटरीएट | ४ | ० | २३००+२९० रु. | ० |
| २. पोलिटिकल सेक्रेटरिएट | ४ | २ | २६०० | ७२५ |
| ३. फायनॅन्शिअल सेक्रटरीएट | ४ | ३ | ३४१५ रु. व १३०० भत्ता | १९७५ २०० भत्ता |
| ४. रेव्हेन्यू सेक्रेटरीएट | १३ | ५ | ८३७५ व ११२० भत्ता | ४५५० १०० भत्ता |
| **न्याय** | | | | |
| ५. ज्युडिशिअल सेक्रेटरीएट | ९ | ० | ७५०० | ० |
| ६. पब्लिक वर्क्स सेक्रेटरीएट | ८ | ४ | ६७०५ ९०० भत्ता | २४०० ५० भत्ता |
| ७. ड्रेनेज सेक्रेटरिएट | १ | १ | १८००+५०० | ३५० |
| ८. मिलिटरी सेक्रेटरिएट | ५ | | ४०५०+५०० | ० |
| **व्यापार व उद्योगधंदे** | | | | |
| ९. कॉमर्स व इंडस्ट्रीजचे सेक्रेटरिएट | १ | १ | ४५० | ३७५ |
| १०. लेजिस्लेटिव्ह सेक्रेटरिएट | ४ | | ३९००+४०० | ० |
| **धार्मिक** | | | | |
| ११. रिलिजस् ,, | १ | ० | १५०० | ० |
| एकंदर–– | ५४ | १६ | ४८३०५५ | १०७२५ |
| **फिनान्स खातें** | | | | |
| १. फिनॅन्स खातें | १[illegible] | ८ | १२४४५+९०० | ६६१०+२०५ |
| २. सेंट्रल ट्रेझरी | ० | १ | ० | ५२५ |
| ३. ट्रेझरी सुपरिंटेंडेंटस् | ८ | ६ | २५४० | १९६० |
| एकंदर | २६ | १५ | १५८८५ | ९३०० |
| **रेव्हेन्यु डिपार्टमेंट** | | | | |
| १. सुभेदार | ३ | ० | ४५००+३०० | ० |
| २. असिस्टंट सुभेदार | ४ | ० | १६०० | ० |
| ३. तालुकदार | १४ | ० | १४९००+२०० | ० |
| ४. स्पेशल तालुकदार | १ | ० | १००० | ० |
| ५. असि. तालुकदार | ३७ | ३ | १८४००+४५० | १६५० |
| ६. तहशिलदार | १०२ | ९ | २८५४०+ ७० | २१०० |
| ७. प्रोबेशनर तहशिलदार | १२ | ६ | १३५० | ८३५ |
| ८. सर्फ इ खासचे ,, | ४ | ० | ६७५ | ० |
| ९. सेटलमेंट डिपार्टमेंट | ३ | ० | २५५०+२०० | ० |
| १०. सेटलमेंट असि. ऑफिसर्स | ८ | ० | ४३५०+९६० | ० |
| ११. सब असि. डायरेक्टर | ० | १ | ० | २०० |
| १२. लँड रेकॉर्ड ऑफिसर | ४ | १ | ८५० | ३२५ |

| हुद्दा | एकंदर मुसलमान अधिकारी | एकंदर हिंदू अधिकारी | मुसलमान अधिकाऱ्यांचे मासिक पगार व भत्ता रु. | हिंदु अधिकाऱ्यांचे मासिक पगार व भत्ता रु |
|---|---|---|---|---|
| १३. प्रोबेशनर ,, | २ | ० | २०० | ० |
| १४ जमाबंदी ऑफिसर | २ | ० | ६२५+८५ | ० |
| एकंदर—— | ११६ | २० | ८१८०५ | ५११० |
| **न्याय खातें** | | | | |
| १. हायकोर्ट जज्ज | ६ | २ | १२५००+१०० | ४००० |
| २. रजिस्ट्रार | २ | ० | १४०० | |
| ३. हायकोर्ट चीफ सुपरिंटेंडेंट | ३ | ० | ११२५ | |
| ४. गव्हर्मेंट प्लीडर्स | ६ | ० | १४०० | |
| ५. सिटी सिव्हिल कोर्ट जज्ज | ४ | ० | २१७५ | |
| ६. काझींचीं कोर्टें | १ | ० | ९०० | |
| ७. सिटी मॅजिस्ट्रेट | ४ | १ | ३०७५+१०० | ३७५ |
| ८. डिस्ट्रिक्ट स्पेशल मॅजिस्ट्रेट | १ | ० | ८०० | |
| ९. निझाम सदर अदालत | ६ | १ | ७३००+३०० | ९०० |
| १०. डिस्ट्रिक्ट जज्ज | १४ | ० | ११०५० | |
| ११. ॲडिशनल् सिव्हिल जज्ज | ७ | ० | ३७०० | |
| १२. मुन्सफ (रु. ३०० ते ६००) | १० | १ | ५४५० | ५५० |
| १३. मुन्सफ (२५० ते ४००) | ७२ | ७ | २३६८५ | २२७५ |
| एकंदर—— | १३६ | १२ | ७८८६० | ८१०० |
| **पोलीस व तुरुंग खातें** | | | | |
| जेल डिपार्टमेंट | ३ | ० | ११०० | ० |
| १. सिटी व सबर्बन पोलीस | ८ | २ | ५००० | १९०० |
| २. डायरेक्टर जनरल ऑफिस | ४ | २ | २५५०+५३० | १५००+२०० |
| ३. स्पेशल पोलीस ऑफिसर | ० | ० | | ६५०+१५० |
| ४. पोलीस ट्रेनिंग कॉलेज | १ | १ | ३००+ ५० | २४५० |
| ५. पोलिस सुपरिंटेंडेंट | १३ | ५ | ९००० | ५००+१०५ |
| ६. पोलिस असि. ,, | ११ | २ | ३१००+३४५ | ५५०+५० |
| ७. क्रिमिनल सेटलमेंट ऑफिसर | ० | १ | | |
| एकंदर—— | ४० | १३ | २११७५ | ८०५५ |
| **शिक्षण खातें** | | | | |
| १ ऑफिस ऑफ डायरेक्टर ऑफ पब्लिक इन्स्ट्रक्शन् | ४ | १ | ३८३५+३०० | ० |
| २. डिव्हिजनल इनस्पेक्टर | ५ | ० | ३७१०+३०० | ० |
| ३. डिस्ट्रिक्ट इन्स्पेक्टर | १३ | ४ | ४०५५ | ११६०+१६० |
| ४. निझाम कॉलेज | ७ | ९ | ३७८५ | ३८८५ |
| ५. मद्रासि आलिया | १ | ० | ३१०+१५० | ० |
| ६. उस्मानिया युनिव्हर्सिटी ऑफिस | ३ | ० | १७३०+२०० | ० |
| ७. ट्रान्स्लेशन ब्यूरो | २० | १ | १००९० | ४२५ |
| ८. उस्मानिया युनिव्हर्सिटी कॉलेज | ५६ | ११ | २९९९०+१७०० | ५२१०+५०० |
| ९. उस्मानिया मेडिकल कॉलेज | ७ | ७ | २६५०+१३०० | २५६५+७६७ |
| १०. इंन्जिनियरिंग कॉलेज | ८ | १ | ३८२५ | ५२५ |
| ११ सिटी इंटरमिजिएट कॉलेज | ६ | १ | १७४० | २९५+३५ |

| हुद्दा | एकंदर मुसलमान अधिकारी | एकंदर हिंदु अधिकारी | मुसलमान अधिकाऱ्यांचे मासिक पगार व भत्ता | हिंदु अधिकाऱ्यांचे मासिक पगार व भत्ता |
|---|---|---|---|---|
| १२. झनाना कॉलेज | ३ | ० | ९२५ | ० |
| १३. इतर कॉलेजें व हायस्कूलस् | ५० | १८ | १७९४०+९४५ | ६५० |
| एकंदर— | १८३ | ५३ | ८९४८० | २५९२७ |
| **मेडिकल डिपार्टमेंट** | | | | |
| मेडिकल डायरेक्टरर्स डिपार्टमेंट ऑ. | २ | ० | १५००+५०० | ० |
| मेडिकल स्टोअर्स | १ | ० | ५५०+२०० | ० |
| सिव्हिल सर्जन | ५ | ४ | ३६००+१२५ | २३५०+७५ |
| लेडी सिव्हिल सर्जन | ० | १ | ० | ५५० |
| असिस्टंट सर्जन | २० | ३७ | ५०५०+४०५ | ८९००+८५० |
| लेडी असि. सर्जन | १ | २ | २०० | ४५० |
| मलेरिअल ऑफिसर्स | १ | १ | २००+२५० | ४५०+३५० |
| युनानी हॉस्पिटल | ९ | ० | २६५० | ० |
| युनानी मेडिकल स्कूल | २ | ० | ६०० | ० |
| एकंदर— | ४१ | ४५ | १५६३० | १३९७५ |
| **पब्लिक वर्क्स खातें** | | | | |
| सुपरिंटेंडेन्ट इंजिनियर | ४ | ० | ६००० | ० |
| एक्झिक्युटिव्ह इंजिनियर | ८ | ५ | ७६००+५०० | ४२०० |
| असि. इंजिनियर | १७ | ४ | ८४२५ | २०७५ |
| प्रोबेशनर असि. इंजिनियर | ३ | १ | १०५० | ३५० |
| सब् इंजिनियर | १२ | ११ | ४१७५ | ४००० |
| पी. डब्ल्यू. डी. मधील इतर जागा | १८ | १३ | १२३७५+६७५ | ७४२५+२५० |
| एकंदर— | ६२ | ३४ | ६६९२० | ३५४०० |
| **इतर** | | | | |
| १. कंट्रोलर्स टु दि प्रिन्सेस् व साहेबजादे | १ | ० | ३३० | ० |
| २. मिंट व स्टँप इलेक्ट्रिसिटी | ३ | २ | ८५० | ६५० |
| ३. फॉरेस्ट डिपार्टमेंट | १३ | ३ | ९७९० | १८०० |
| ४. फॉरेस्ट सेटलमेंट ऑफिसर्स | २ | ० | १२००+२४० | |
| ५. कस्टम्स् डिपार्टमेंट व स्टँप | १९ | ३ | ९९७०+२२४ | ११५० |
| ६. एक्झाइझ डिपार्टमेंट कमिशनर व असिस्टंट डेप्युटी कमिशनर | २ | ० | १५५० | |
| ७. एक्झाइझ तालुकदार | २ | २ | १४०० | १३०० |
| ८. एक्झाइझ सुपरिंटेन्डेंट | १४ | १ | ६५०० | ६०० |
| ९. सुपरिंटेंडेंट ऑफ ओपियम | १ | ० | ३०० | ० |
| १०. माइन्स डिपार्टमेंट | ३ | २ | २००० | ९०० |
| ११. ॲग्रिकल्चरल डिपार्टमेंट | ३ | ५ | १७४०+१०० | २५३५ |
| १२. कॉमर्स व इन्डस्ट्रीज च्या डायरेक्टरचे ऑफिस | २ | ३ | १८०० | २२००+ ७० |
| १३. कॉटेज इंडस्ट्रीज | ० | ३ | ० | ९७०+ ३५ |
| १४. इंडस्ट्रिअल लॅबोरेटरी | ३ | ३ | १६२० | १३००+ ५० |

| हुद्दा | एकंदर मुसलमान अधिकारी | एकंदर हिंदु अधिकारी | मुसलमान अधिकाऱ्यांचे मासिक पगार व भत्ता | हिंदु अधिकाऱ्यांचे मासिक पगार व भत्ता |
|---|---|---|---|---|
| १५ स्टीम बॉइलर्सचे इन्स्पेक्टर | १ | १ | ३०० | २७५ |
| १६. कोऑपरेटिव्हि सोसायटीज् | १२ | २ | ५२००+१०० | ७७५ |
| १७. पोस्टल डिपार्टमेंट | ८ | १ | २३५५ | २०० |
| १८. सदरत्–उल–अलिया | १ | ० | ५५०+५० | ० |
| १९. इक्लिझिआस्टिकल डिपार्टमेंट | २ | ० | ५५० | ० |
| २०. दफ्तर दिवाणी व माल | ७ | ० | २६५० | ० |
| २१. सेंट्रल प्रेस | २ | १ | ६७०+५०० | ९००+२८० |
| २२. निझामिया ऑब्झर्वेटरी | ० | १ | ० | ७०० |
| २३. गव्हर्मेंट लायब्ररी | १ | ० | ६०० | ० |
| २४. टेलीफोन | १ | १ | ४७५+ ५० | ८००+१०० |
| २५. पब्लिक गार्डन | १ | ० | ६००+ २५ | ० |
| २६. व्हेटर्नरी | २ | ५ | १५३०+३५० | २०००+१०० |
| २७. ऑर्किआलॉजिकल डिपार्टमेंट | ४ | ० | २३००+१७० | ० |
| २८. सेन्सस डिपार्टमेंट | २ | ० | १७५०+१०० | ० |
| २९. स्टॅटिस्टिक्स डिपार्टमेंट | २ | ० | १६०० | ० |
| ३०. लँड कॉम्पेन्सेशन ऑफिस | १ | ० | १०००+१९० | ० |
| ३१. हैदराबाद म्युनिसिपालिटी | ८ | १ | ४१०५+४६० | ३०० |
| ३२. लोकल फंड | १ | ० | ६००+१०० | ० |
| ३३. कोर्ट ऑफ वॉर्डस् | २ | ० | १४५०+१५० | ० |
| एकंदर— | १२६ | ४० | ७००९४ | ११९५० |

## तक्ता ९ वा.

हैद्राबाद शहरांतील हिंदुमुसलमान घर-मालकांचा आंकडा दर्शविणारा तक्ता.

(१३३० फसली सनांतील)

| वार्षिक घरपट्टी | हिंदु | मुसलमान |
|---|---|---|
| ३ ते ६ | १६४३ | २१६६ |
| ६ ते ९ | ५४० | ७०९ |
| ९ ते १२ | २३९ | ३६२ |
| १२ ते १५ | १५८ | २०५ |
| १५ ते १८ | ८९ | १७९ |
| १८ ते २ | ८३ | १४५ |
| २४ ते ३० | ६१ | १२४ |
| ३० ते ३६ | ३६ | ७० |
| ३६ ते ४२ | १८ | ४५ |
| ४२ ते ५० | २४ | ४३ |
| ५० पासून पुढें | ५५ | १२७ |
| | २९४६ | ४१७५ |

## तक्ता १० वा

हैद्राबाद शहरांतील हिंदु आणिमुसलमान लोकांचें उत्पन्न दर्शविणारा तक्ता.

( १३३० फसली सनांतील आंकडे )

वार्षिक उत्पन्न.

| रुपये | हिंदु | मुसलमान |
|---|---|---|
| ६०० ते ९०० | ३०६ | ७९४ |
| ९०० ते १२०० | ३१० | ७२४ |
| १२०० ते १५०० | १०१ | २१७ |
| १५०० ते १८०० | ६९ | २२८ |
| १८०० ते २४०० | ९६ | २५५ |
| २४०० ते ३००० | ४९ | १५४ |
| ३००० ते ३६०० | ३८ | १२३ |
| ३६०० ते ४२०० | २४ | ६२ |
| ४२०० ते ५००० | ३० | ८० |
| ५००० पासून पुढें | १३४ | ४८६ |
| | ११५७ | ३१२३ |

# संकीर्ण



## १ राष्ट्रीय सभेचे कांहीं ठराव

ठराव २ रा—म. गांधींखेरीज इतरांनीं सार्वत्रिक कायदेभंगाची ( किंवा प्रतिकाराची) चळवळ बंद ठेवणें अवश्य आहे असें हृचा सभेस वाटतें, व ज्यामुळें पुष्कळदां जुलुम करणारे व ज्यांवर जुलूम होतो हे ( तेढीनें ) भयंकर क्रूर-कर्मास प्रवृत्त होतात अशा अत्याचारी मार्गापेक्षां अनत्याचारी असहकारितेनें व सविनय कायदे-भंगानेंच स्वराज्य मिळवणें श्रेयस्कर आहे असें हृचा सभेस निश्चयानें वाटत आहे व हें ही सभा पुनः सांगू इच्छिते.

ठराव ४था—ज्याअर्थी कॉन्ग्रेस सभासदांच्या मदतीनें किंवा मदतीशिवाय सर्व हिंदुस्थानभर स्वदेशीच्या पुरस्काराचा आव आणणारे संघ स्थापले जात आहेत व त्यामुळेंच, लोकांच्या मनांत खरी स्वदेशी म्हणजे काय हृयाबद्दल संशय उत्पन्न होत आहे, व ज्याअर्थी, कॉन्ग्रेस-च्या स्थापनेपासून तिचें ध्येय उत्तरोत्तर अखिल जनतेचें खरेंखरें प्रतिनिधीपण पत्करणें हें आहे, आणि ज्याअर्थी कॉंग्रेसच्या विधायक कार्य-क्रमापैकींच ग्रामीय पुनर्रचना व सुधारणा हा एक आहे व सदर पुनर्रचनेच्या कार्यक्रमांत मुख्यत: सूत कातण्याच्या उद्योगाशिवाय खेड्यां-तील अजिवात बुडालेले व नष्ट होत चाललेले इतर धंदे पुनः सुरू करणें व त्यांना उत्तेजन देणें हेंच विशिष्ट काम आहे आणि ज्याअर्थी सूत कातण्याच्या पुनर्स्थापनेप्रमाणेंच हें कार्य, कॉंग्रेसच्या राजकीय चळवळीपासून अलिप्त राहून अबाधितपणें, निश्चयानें व एकजुटीनें केल्यासच फलद्रूप होइल, त्याअर्थी ही राष्ट्रीय-सभा, श्री. जे. सी. कुमाराप्पा यांस, म. गांधींच्या सल्ल्यानें व देखरेखीखालीं "अखिल भारत ग्रामो-द्योग संघ," कॉंग्रेसच्या विधायक कार्यापैकींच एक म्हणून स्थापन करण्याचा अधिकार देत आहे. सदर संस्थेनें वर निर्देशिलेल्या ग्रामोद्योगांचें पुनरुज्जीवन करून त्यांस उत्तेजन द्यावें, व खेड्यांतील लोकांची शारीरिक व मानसिक सुधारणा करावी. सदर संस्थेस आपली स्वतंत्र घटना करण्याचा, लागेल तो फंड जमविण्याचा व आपले हेतू परिपूर्ण करण्याकरितां लागणाऱ्या उपाययोजना करण्याचा अधिकार आहे.

ठराव ६ वा.—पार्लमेंटरी बोर्डाच्या नवीन निवडणुकी कॉंग्रेसच्या वार्षिक अधिवेशनाचे वेळीं व्हाव्यात व हृचास लागेल ती सभासद–संख्या (Power of Co-option) करण्याचा पूर्वी सार-खाच अधिकार असावा.

ठराव ८ वा.—हातसुताची व हातविणीची खादी नेहमीं वापरणाराशिवाय कोणाही सभासदास कोणत्याही कॉंग्रेस कमिटीवर अगर तींत अधिकाऱ्यांच्या जागेवर निवडलें जाऊ नये.

ठराव ९ वा.—कोणत्याही कॉंग्रेस कमिटीचे सभासद होण्यास पुढील अटी पूर्ण झाल्या असल्या पाहिजेत– कॉंग्रेसकरितां किंवा कॉंग्रेसबद्दल १० पेक्षां जास्त नंबरचें दरमहा ५०० वार सूत कातणें किंवा दरमहा ८ तास कोणतेही शारीरिक श्रम पडतील असें काम, निबडणुकीकरितां उमेदवारांनीं नांवें नोंदविण्या-पूर्वी सतत ६ महिने करणें. सूत काढण्याऐवजीं जे शारीरिक श्रम त्यासमान पडतील अशीं दुसरीं उपयुक्त कामें, राष्ट्रीय सभेची कार्यकारी समिती ही प्रांतिक कॉंग्रेस कमिटचा व "अखिल भारत ग्रामोद्योग संघा"च्या सल्ल्यानें वेळोवेळीं ठरवून प्रसिद्ध करील.

ठराव ११ वा—कॉंग्रेसचें पुढील अधिवेशन संयुक्त प्रांतांत भरवावें.

---

## २ कानपूर येथें हिंदुमहासभेच्या सोळाव्या अधिवेशनांत पास झालेले कांहीं महत्त्वाचे ठराव

ठराव २ रा:– (अ) हिंदुस्थान सरकारनें केलेला जातीयनिर्णय हिंदू व शीख हिंदवासी-यांना ढळढळीत अन्यायाचा असल्यानें व तो अराष्ट्रीय असल्यानें ही हिंदुमहासभा तिचा पुनः निषेध करीत आहे व सदर जातीयनिर्णयाऐवजीं दुसरी ( हिंदूंना) न्याय्य योजना होईपर्यंत सदर निर्णयाविरुद्ध चळवळ करीत राहील.

(ब) तसेंच वरिष्ठ कायदेमंडळांत जातीय निर्णय मान्य असल्याच्या ठरावावर कॉंग्रेसपक्षानें विरुद्ध मतें दिलीं नाहींत व त्यामुळें सदर

जातीयनिर्णयाबद्दलचें हिंदूंचें खरें मत व्यक्त होऊं दिलें नाहीं, इतकेंच नव्हे तर निवडणुकीचे वेळीं सदर निर्णयाबद्दल लोकांना दिलेलीं आश्वासनेंही काँग्रेसपक्षानें पुरीं केलीं नाहींत ह्याबद्दल हिंदुमहासभेस वाईट वाटत आहे.

ठराव ३ रा.:—कराचीचा गोळीबार (अ) सरकारनें ताबडतोब इलाज केले हें चांगलें झालें, कारण यामुळेंच कराचीस जातीजातींतील भयंकर दंगा टळला. (ब) तसेंच जाति–वैमनस्य वाढूं नये म्हणून सरकारनें केले तेच उपाय शक्य होते (दुसरे योग्य झाले नसते) व तेच केल्याबद्दल हिंदुमहासभेस समाधान वाटतें (क) व हे दंगेखोर व खुनी माथेफिरू मुसलमान धार्मिक हुतात्मे आहेत असें मानणें व त्यासाठीं सरकारकडे वेळोवेळीं शिष्टमंडळें पाठवून दयेची याचना करणें व ते ह्याकरितां सरकारच्या दयेस पात्र आहेत असें मुसलमान पुढाऱ्यांचें मानणें निंद्य असून त्यामुळें मुसलमानांनीं भयंकर दंगेखोरपणा व चळवळी केल्या असें ह्या सभेचें ठाम मत आहे. (ड) वरिष्ठ कायदेमंडळांत कराची-प्रकरणाबद्दलच्या विवादांत काँग्रेस पक्षानें जें धोरण स्वीकारलें व विशेषतः काँग्रेसपक्षाच्या धुरीणानें दयेबद्दलच्या अर्जाशीं जें सहकार्य केलें त्याबद्दल ह्या सभेस अतिशय दुःख होतें.

ठराव ५ वा.:—फेरोझाबाद येथें स्त्रिया व लहान मुलांसकट एका कुटुंबांतील सर्व मंडळी तसेंच रोग्यासुद्धां नजिकचें एक इस्पितळही सर्व जाळून मुसलमानांनीं जें अभूत क्रूर कर्म केलें त्याचा व मुसलमान मवाल्यांना असलीं भीषण कृत्यें करतांना प्रतिबंध केला नाहीं ह्याबद्दल कांहीं जबाबदार मुसलमान अधिकाऱ्यांचा ही सभा तीव्र निषेध करते.

ह्या सभेस सकारण असें वाटतें कीं फेरोझाबाद येथील दंगा मुसलमानांनीं अगोदर केला व हिंदूंवर हल्ला करण्यांत भाग घेण्यासाठीं आग्र्यासारख्या बाहेरगांवाहून मुद्दाम कांहीं मुसलमान बोलावून आणले होते.

ठराव ७ वा:—गेल्या वर्षी टोकिओ (जपान) येथें भरलेल्या भगवान् बुध्दाच्या पंचविसाव्या शतसांवत्सरिक पुण्यतिथीसाठीं हिंदुमहासभेतर्फे पाठविलेल्या प्रतिनिधींचें उत्तम स्वागत केल्याबद्दल जपानी लोकांचे व जागतिक बुध्दधर्मीयांची परिषद बोलाविणारांचे हिंदुसभा सानंद आभार मानते.

ठराव १९ वा.:—बुद्ध–गया मंदिरासंबंधीं ह्या हिंदुमहासभेचें असें मत आहे कीं, बुद्ध–गया मंदिराच्या व्यवस्थेसंबंधीं सनातनी व बुद्ध–हिंदू यांमध्यें जो वाद चालू आहे त्याबद्दल निर्वेध तडजोड करण्याचे प्रयत्न व्हावेत व म्हणून वरिष्ठ कायदेमंडळांत सदर मंदिराच्या व्यवस्थेसंबंधीं कांहीं सभासद ठराव आणणार आहेत तो त्यांनीं आणूं नये. ह्याकरितां, ह्या वर्ष अखेरीपर्यंत तडजोडीचे प्रयत्न होत आहेत तोंपर्यन्त वरील ठराव आणणाऱ्या खासदार सभासदांनीं तो ठराव आणूं नये. ह्या अटीवर पुढील गृहस्थांची एक समिती हिंदुमहासभा नेमीत आहे—भाई परमानंद अध्यक्ष, बी. जगतनारायणलाल, स्वामी दयानंद, पं. द्वारकाप्रसाद चतुर्वेदी, भिक्षु आनंद कौसल्यायन, देवप्रिय बलीसिंगजी; तसेंच वरील अट पूर्णपणें पाळली गेल्याखेरीज ही समिती आपलें काम सुरूं करणार नाहीं. आणि वरील समितीनें केलेली तडजोड, श्रीजगद्गुरु शंकराचार्य स्वामी भारती कृष्णतीर्थ यांना मान्य असलेली सनातनींनाही मान्य असावयास पाहिजे.

---

## ३ बुद्धगयेचें भांडण

बुद्धगयेस महाबोधी नांवाचें प्रख्यात मंदिर आहे. मुसलमान लोकांस मक्का जितकी पवित्र किंवा ख्रिश्चन लोकांस जेरूशलेम जितकें वंदनीय तितकेंच बुद्धपंथीयांस बुद्धगयेचें महाबोधी मंदिर पवित्र व वंदनीय आहे. बुद्ध लोकांचें तें एक यात्रेचें पवित्र ठिकाण आहे. याच मंदिराजवळील महाबोधी वृक्षाखालीं बुद्धास ब्रह्मज्ञान प्राप्त झालें अशी बुद्धांची भावना आहे. हें देऊळ हल्लीं शैवपंथी महंताच्या ताब्यांत आहे. या देवस्थानाचा कारभार बुद्धांना नापसंत असून तो आपल्या ताब्यांत यावा अशी त्यांची फार दिवसांपासून खटपट चालू आहे. त्यांनीं महंताशीं तडजोडीचें बोलणें करून पाहिलें पण तें फिसकटलें. आतां वरिष्ट कायदेमंडळाचे बुद्धपंथी सभासदांनीं कायद्याच्या द्वारें त्या देवळाची व्यवस्था महंताकडून काढून घेण्याचें योजिलें आहे.

थिनमाँग, बासि, व डॉ. थिनमाँग यांनीं बुद्धगया देवस्थानचा कायदा असेंब्लीपुढें आणण्यास गव्हर्नर जनरलची आगाऊ परवानगी-

देखील घेतली आहे. या कायद्यानुसार महाबोधी वृक्षाजवळील बुद्धगयेचें देऊळ व त्याचें आवार हें बुद्धांचे ताब्यांत येणार आहे व त्याची व्यवस्था एका समितीकडे सोपविली जाणार आहे. त्या समितींत हल्लीचे महंत, हिंदुस्थान, व बर्मा व सीलोनमधील सरकार–नियुक्त नऊ बुद्ध प्रतिनिधी असून या समितीनें देवळाची व्यवस्था, आवाराची डागडुजी, यात्रेकरूंची सोय, हिशेब इ. कामें करावयाचीं आहेत. या कायद्यानें हिंदू यात्रेकरूंच्या कोणत्याही हक्कावर गदा येणार नाहीं, बुद्धाचे मूर्तीची पूजा करण्याकरितां महाबोधी मंदिरांत जाण्याचा हक्क व आवारांतील देवळाचे उत्तरेस असलेल्या पवित्र बोधिवृक्षाखालीं पिंडदान करण्याचा हक्क हे अबाधित राहातील. फक्त त्यांस पशुहत्या करण्याची मनाई होईल. महंताचा मठ व इतर मालमत्ता यांबाबत समितीस ढवळाढवळ करितां येणार नाहीं.

महाबोधी मंदिर हें फार प्राचीन आहे. चिनी प्रवासी हुएनत्संग हा सातव्या शतकांत हिंदुस्थानांत आला तेव्हां त्यानें हें देऊळ पाहून त्याचें सविस्तर वर्णन आपल्या प्रवासवृत्तांत दिलें आहे. इ. स. १५०० पर्यंत हें देऊळ बुद्धानुयायांचे ताब्यांत होतें व वेळोवेळीं त्यांनीं त्याची डागडुजी करून कांहीं नवीन इमारतीही बांधल्या. इ. स. १५९० मध्यें गोसेन घमंडीगीर हा बुद्धगयेस आला. त्यानें त्या देवळाच्या आसपासची एकांत जागा पाहून, धर्मकृत्यें करण्याकरितां तेथेंच एक मठ बांधला त्या महंताची हल्लीं १२ वी पिढी चालू आहे.

या देवळाच्या भांडणास खरी सुरुवात १८९१ साली गोसेनकृष्ण दयाळगीर महंताचे गादीवर आल्यावर झाली. १५ व्या शतकापासून १८ व्या शतकापर्यंत या देवळाची आबाळ होऊन तें मोडकळीस आलें. पुढें १८७५ पासून १८८४ पर्यंत ब्रह्मदेशच्या राजानें हिंदुस्थानसरकारच्या मदतीनें त्या देवळाचा जीर्णोद्धार केला व बुद्धभिक्षु व यात्रेकरू यांचेकरितां एक धर्मशाळाही बांधली हल्लींच्या महंतानें मनाई करीपर्यंत तेथें त्या धर्मशाळेचा बुद्धानुयायी उपयोगही करीत असत. महंताच्या अरेरावीचा प्रतिकार करण्याकरितां १८९१ मध्यें महाबोधी सोसायटी स्थापन झाली. १८९५ मध्यें त्या सोसायटीचे प्रमुख अंगारिका धर्मपाल हे अमेरिकेस सर्वधर्मपरिषदेसाठीं गेले असतां जपानच्या वरिष्ठ धर्माधिकाऱ्यानें त्यांस बुद्धाची प्राचीन मूर्ती महाबोधी मंदिराच्या वरच्या मजल्यावर ठेवण्याकरितां दिली. पण महंतानें अडकाठी केल्यामुळें ती मूर्ती स्थापन झाली नाहीं. पुन्हां कांहीं दिवसांनीं धर्मपाल यांनीं सिलोनमधील बुद्धांचे साहाय्यानें मूर्ती स्थापण्याचा प्रयत्न केला. पण महंताच्या शिष्यांनीं त्यांस हुसकावून लाविलें. महंतावर मारामारी बद्दल फिर्याद झाली व खालचे कोर्टांत महंतास शिक्षा झाली. पण ती हायकोर्टामध्यें रद्द झाली. पुढें ज्या मूर्तीमुळें हें भांडण झालें ती मूर्ती बुद्ध धर्मशाळेंत ठेवून जवळ जवळ १० वर्षे त्या मूर्तीचे पुजारी सुमंगल व अंगारिका धर्मपाल तेथेंच राहात असत. १९०६ मध्यें महंतानें त्यांचेवर फिर्याद दाखल केली. हायकोर्टानें असा निकाल दिला कीं धर्मपाल व पुजारी यांनीं धर्मशाळेंत कायमचें वास्तव्य करूं नये व मूर्ती पण तेथें ठेवूं नये. या निकालापासून महाबोधी सोसायटीनें देऊळ ताब्यांत घेण्याची खटपट चालविली आहे. बौद्धाचें म्हणणें असें कीं महंत हा शैवपंथी असून महाबोधी मंदिर व त्याचें आवार यांवर त्याचा मुळींच हक्क नाहीं. भांडण उपस्थित होईपर्यंत तें हिंदूंचें देवालय म्हणून गणलेंही जात नसे व महंत त्याची पूजाअर्चाही करीत नाहीं व महंताची वागणूक बुद्धपंथीयांच्या भावना दुखविणारी आहे. त्यांची मागणी अशी आहे कीं मंदिरांत पूजाअर्चा बुद्धपंथाप्रमाणें चालावी. तेथें ब्रह्मचारी, उपासक, उपासिका व भिक्षू यांना निर्वेध राहतां यावें. मंदिराचे पश्चिमेस असलेला बोधीवृक्ष केवळ बुद्धांचे पूजेअर्चेकरितांच राखून ठेवण्यांत यावा. कारण देवळाचे उत्तरेस लावलेला दुसरा वृक्ष हिंदूंचे पूजेअर्चेकरितां आहेच. देवळाचे आवारांत पशुहत्या अगर मदिरापान होऊं नये व ही सर्व व्यवस्था होण्याकरितां एक तर तें देऊळ बुद्ध लोकांचे ताब्यांत द्यावें अगर हिंदू व बुद्ध लोकांची एक संयुक्त व्यवस्थापक समिति नेमावी.

महंताचें म्हणणें असें कीं हें देवालय हिंदूंचेंच आहे. विष्णूचा अवतार म्हणून हिंदू लोक बुद्धाची पूजा करितात. देवळाच्या गाभाऱ्यांत जी मोठी मूर्ती आहे तिची समंत्रक प्राणप्रतिष्ठा झाली आहे. हजारो हिंदू यात्रेकरू बुद्धगयेस पिंडदान करण्याकरितां मुद्दाम येतात. सोळाव्या शतकापासून मंदिर व त्याचें आवार महंताचे घराण्याचे ताब्यांत आहे. मूर्तीची पूजा हिंदू पद्धतीनें होत असली तरी बुद्धांना ही आपल्या तऱ्हेनें पूजा करण्यास मनाई होत नाहीं. बुद्धांना मूर्तीची पूजा करण्यापलीकडे मूर्तीपुढें ठेव-

लेल्या मिळकतीवर त्यांचा कांहीं एक हक्क नसून तो महंताचाच आहे. महाबोधी सोसायटीनें जशी महंताविरुद्ध चळवळ चालविली आहे तशीच महंतानेंही त्या चळवळीचा प्रतिकार महंतांचा व साधूंचा संघ स्थापून केला आहे. त्यास अशी भीति वाटत आहे कीं न जाणो देवळाचा ताबा घेण्याचे खटपटींत बुद्ध-लोक आपले मठाची स्थावर मिळकतसुद्धां गट्ट करतील.

हें भांडण इतकें धुमसत असतां कॉंग्रेस व हिंदु-महासभा यांचें लक्ष त्याकडे जाणें सहाजिकच आहे. ऑ. इं. कॉं. कमिटी व बिहार प्रांतिक हिंदुमहा-सभा यांनीं बृजकिशोर प्रसाद, जयस्वाल, दामो-दरदास साधू व बाबू राजेंद्रप्रसाद यांची कमिटी नेमली त्यांनीं सर्व बाजूंचा पुरावा गोळा करून आपलें असें मत दिलें कीं हें देऊळ बुद्धपंथीयांचें पवित्र ठिकाण आहे. तेथील सर्व मूर्ती विशेषत: हिंदू ज्या आपल्या म्हणून म्हणतात त्या पांच पांडव व तारादेवी ह्या मूर्तीही बुद्धपंथीच आहेत. हें देऊळ हिंदूंचें देवालय म्हणून कधीं प्रसिद्ध नव्हतें व हिंदूंनी हें देवालय बांधलें असाही पुरावा नाहीं. उलट बुद्धानुयायांनींच त्या देवळाचा जीर्णोद्धार केला व वेळोवेळीं डागडुजी केली. तें देऊळ, त्यांतील मूर्ती व पूजाअर्चा हीं बहुश: बुद्धपंथानु-सारीच आहेत. त्या देवळांत इतर धर्मीयांस जातां येतें एवढेंच नव्हे तर पादत्राणें न काढतां गर्भा-गारांतही जातां येतें. प्राणप्रतिष्ठा झालेल्या मूर्तीविषयींचें कडक सोंवळें येथें मुळींच पाळलें जात नाहीं. हें भांडण केवळ बुद्धपंथी व महंत यांचेंच असतें तर देऊळ हें बुद्धाचेंच आहे असा त्याचा निकाल देतां आला असता पण सर्व हिंदु यात्रेकरू बोधीवृक्षाखालीं पिंडदान करून देवळां-तील मूर्तींचेंही दर्शन घेतात म्हणून हा प्रश्न जास्त भानगडीचा झाला आहे. म्हणून कमिटी अशी शिफारस करते कीं (१) हिंदू व बुद्ध या दोघां-नाहीं आपआपल्या पद्धतीप्रमाणें देवळांत पूजा करण्याचा हक्क असावा, (२) पांच हिंदू व पांच बुद्ध सभासद असलेल्या कमीटीकडे देवळाचा कारभार व पूजाअर्चेची व्यवस्था सोपवावी. बुद्धगयेच्या महंत नेहमीं या कमिटींत राहावा, (३) महंताच्या शैव मठाची जी मालमत्ता आहे ती कमिटीचे कार्यक्षेत्रांत येऊं नये.

कमिटीतील सभासदांचें असें मत आहे कीं जर या योजनेस कबूल न झाल्यास कॉंग्रेस व महासभा यांनीं वरिष्ठ कायदेमंडळाच्या द्वारें या प्रश्नाचा निकाल लावून घ्यावा. या सूचनेचें मूर्तस्वरूप म्हणजे पहिल्या प्रथमच उल्लेखिलेला बुद्धसभासदांनीं आणलेला बुद्धगया मंदिराचा कायदा होय. या कायद्याची कशी काय त्रिल्हेवाट लागते इकडे सर्व हिंदु समाजाचें व विशेषत: बुद्ध पंथीयांचें लक्ष लागलेलें आहे. महाबोधी मंदिर बुद्धांचे ताब्यांत मिळावें, असें मत महात्मा गांधी, रविंद्रनाथ टागोर, सिल्व्हन लेव्ही, सी. एफ्. अँड्रूज, सर पी. सी. रे, डॉ. विंडरनीज वगैरे पुढाऱ्यांनीं महाबोधी सोसायटीस कळविलें आहे.

---

## ४ नॅशनल लिबरल फेडरेशनचे महत्त्वाचे ठराव

ठराव २ रा.–झांजिबारमधील हिंदी लोकां-संबंधीं मुंबईचे ना. सर फिरोज सी. सेठना यांनीं हा ठराव मांडला व त्यास मुंबईचे एन्. सी. भरुचा यांनीं दुजोरा दिला. (अ) झांजिबार सरकारनें कांहीं महिन्यांपूर्वीं अंमलांत आणलेल्या कांहीं "वटहुकुमा"मुळें, झांजिबार हें ब्रिटिश अमलाखालीं येण्याच्या अगोदर तेथें स्थायिक होऊन राहिलेल्या हिंदी लोकांस आपले रोज-गार धंदे करणेंही अशक्य झालें आहे अशी या परिषदेस काळजी वाटत आहे, व अशी परिस्थिति निर्माण केल्याबद्दल सदर "वटहुकुम" निषेधार्ह वाटतात. सदर "वटहुकुमा"मुळें युरोपिअन व्यापाऱ्यांशीं हिंदी व्यापाऱ्यांना स्पर्धा करून टिकाव धरणें शक्य नाहीं; तसेंच तेथील अरबी व आफ्रिकन लोकांशीं त्यांचें वितुष्ट येत आहे. जमिनीच्या विभागणीच्या वटहुकुमावरून तर नवीन कायदेकानू हिंदी लोकांच्या विरुद्ध मुद्दाम केले असावेत असें वाटतें; कारण सदर वटहुकुम ब्रिटिश प्रजाजन नसलेल्या अरबस्थानांत जन्म-लेल्या अरबी लोकांस लागू पडत नसून, झांजि-बारमध्यें जन्मलेल्या हिंदी लोकांसच मात्र त्यांचे दुष्कर परिणाम भोगावे लागत आहेत. हिंदु-स्थानांत हिंदी व युरोपिनांशीं समभावानें वागा-वयाचें अशी घोषणा करणाऱ्या खास ब्रिटिश साम्राज्यांत असलेल्या झांजिबारमधील हिंदी प्रजाजनांची अशा पक्षपातयुक्त वागणुकीनें मनें वियुक्त होतात व ही गोष्ट ब्रि. साम्राज्याचा एकजूटपणा नाहींसा होण्यास कारण होते. (ब) हिंदुस्थान सरकारनें मि. के. पी. एस्. मेनन,

आय्. सी. एस्. यांस झांजिबारमधील परिस्थिति प्रत्यक्ष पाहावयास ताबडतोब पाठविलें याबद्दल ह्या परिषदेस समाधान वाटत आहे. परंतु मि. मेनन यांच्या चौकशीचा अहवाल अद्याप जनतेस कळला नाहीं याबद्दल परिषदेस वाईट वाटतें; मि. मेनन यांचा झांजीबारमधील वटहुकुमासंबंधीं सदर अहवाल व झांजीबारमधील हिंदी लोकांच्या दुस्सह परिस्थितीबद्दल हिं. सरकारची पूर्ण सहानुभूति असल्याचें लवकर जाहीर व्हावें; तसेंच झांजीबारमधील हिंदी लोकांचीं गाऱ्हाणीं दूर करून त्यांचा झांजिबारमधील दर्जा कायम सन्मान्यतेचा राखण्याची हिं. सरकार पराकाष्ठा करील असें लौकर जाहीर व्हावें. (क) तसेंच टांगानिका, युगांडा व केनियामधील व्यापारी कायदे तेथील हिंदी व्यापाऱ्यांस विघातक असल्यानें त्यासंबंधींचा मि. मेनन यांचा रिपोर्ट लौकर प्रसिद्ध व्हावा (एकमतानें पसार).

ठराव ३ रा:—आमच्या फेडरेशननें गेल्या दोन बैठकीत दाखवून दिलेलीं शुभ्र पत्रिकेंतील ठळक वैगुण्यें काढून टाकण्याच्या ऐवजीं, जॉइंट सिलेक्ट कमिटीवर असलेल्या ब्रिटिश हिंदी मंडळाचें मत व जवळ जवळ झाडून सर्व पक्षोपपक्षांचें मत यांकडे यत्किंचितही लक्ष न देतां जॉइंट सिलेक्ट कमिटीच्या रिपोर्टांत अधिकच अत्यंत आक्षेपार्ह व प्रतिगामी स्वरूपाचीं कलमें घालण्यांत आलीं आहेत. व त्यामुळें प्रांतिक व मध्यवर्ती सरकारांत जबाबदारीची स्वायत्तता आम्हांस देण्याच्या ज्या गोष्टी सरकार बोलत असतें त्या केवळ आभासमय ठरतात हें पाहून या परिषदेस महद्दुःख होत आहे. या परिषदेची खात्री आहे कीं, जॉइंट सिलेक्ट कमिटीच्या रिपोर्टांत सुचविलेल्या धोरणान्वयें कसलीही राज्यघटना जरी बनवून आम्हांस दिली तरी ती हिंदुस्थानांतील कोणच्याही पक्षास मान्य होणार नाहीं आणि सध्यां देशांत जो तीव्र राजकीय असंतोष पसरला आहे तो तिच्या योगें कमी होण्याचे ऐवजीं अधिकच वाढत जाईल. म्हणून जॉइंट सिलेक्ट कमिटीच्या रिपोर्टानुसार जी कोणची घटना तयार होईल ती या परिषदेस अगदीं नकोशी वाटते.

---

## ५ संस्थानी प्रजा सप्ताह

सदर सप्ताह दक्षिणी संस्थान हितवर्धक सभेच्या विद्यमानें ता. १० आक्टोबर १९३४ पासून ता. १६ आक्टोबर अखेर भरविण्यांत आला. संस्थानांतून प्रजेच्या हक्कांची जागृति करणें हा सप्ताह साजरा करण्याचा मूळ हेतु होय. दक्षिणी संस्थान प्रजा परिषदेच्या अधिवेशनांत सप्ताह भरविण्याचा ठराव पसार झाल्यावर त्याची योजना आखण्याचा विचार चालू असतांना राष्ट्रीय सभा आपल्या नव्या नव्या योजना आखण्याच्या कार्यांत गर्क होती. तिच्या अनेक योजनांपैकीं शुभ्र पत्रिका फेटाळून लावणें ही एक प्रमुख समजली जाणारी योजना होती. शुभ्रपत्रिका फेटाळण्याचे कार्यांत संस्थानी प्रजेचा अंशतः समावेश व्हावा व शुभ्र पत्रिका फेटाळली गेल्यानंतर जी कॉन्स्टिटयुअंट असेंब्ली निर्माण करण्याची योजना राष्ट्रीय सभेनें आखिली आहे तींतही संस्थानी प्रजेचा समावेश व्हावा असें सभेचें मत होतें व आहे, व त्याप्रमाणें सभेनें राष्ट्रीय सभेचे चालक महात्मा गांधी यांच्याशीं विचारविनिमय केला परंतु महात्मा गांधींनीं संस्थानी प्रजेस निरुत्साहक व अयोग्य असें उत्तर दिल्यानें आपल्या आकांक्षास उत्तेजक असें राष्ट्रीय सभेकडून उत्तर मिळविणें हें सभेचें प्रधान कार्य ठरलें व त्यासाठीं सप्ताह त्वरेनें साजरा करणें भाग पडलें.

या सप्ताहाचा इष्ट हेतु, राष्ट्रीय सभेचे संस्थानी प्रजेच्या मागण्यांकडे लक्ष वेधण्याचा पुष्कळसा साध्य झाला. कारण वर्किंग कमिटी व म. गांधी यांना सं. प्रजेच्या मागणीचा विचार करणें योग्य व आवश्यक वाटून त्याप्रमाणें ठरावाचा एक मसुदा तयार करण्यांत आला व एक सबकमिटीही नेमण्यांत आली.

सप्ताहाच्या मुदतींत एकंदर १२५ गांवीं सभा झाल्या. पुष्कळ गांवीं सातही दिवस सभा भरत. कैफियत मान्य असलेलीं गांवें २०० वर भरतील. सप्ताहाचा उद्देश अत्यंत सौम्य होता तरी पण संस्थानिकांनीं सप्ताह साजरा करण्यासाठीं आपआपल्या संस्थानांतून बंदी केलीच. असें असून सुद्धां एकूण व्याख्याते, उपवक्ते वगैरेंची संख्या १६६ होती. यावरून सप्ताहाचें साफल्य दृष्टोत्पत्तीस येतें. व्याख्यात्यांत पुढील प्रमुख गृहस्थ होते. श्री. न. चिं. केळकर, रा. ब. आर. आर. काळे, रा. राघवेंद्रराव शर्मा, डॉ. हुल्याळकर, श्री. दा. वि. गोखले. श्री. रा. रा. प्रधान श्री. अ. वि

पटवर्धन, ग. स. करंदीकर, श्री. जोगळेकर ॲडव्होकेट, रा. रांगणेकर, रा. वि. रा. शिंदे, श्री. टिळक वकील, श्री. खाडिलकर वकील, श्री. रा. गो. भिडे. इत्यादि.

---

६ बडोदें येथील साहित्य संमेलनांत
## मंजूर झालेले कांहीं ठराव

ठराव ३ रा—महाराष्ट्र विद्यापीठ लवकर स्थापन व्हावें अशी या संमेलनाची तीव्र इच्छा आहे. एतदर्थ 'महाराष्ट्र युनिव्हर्सिटी असोसिएशन' प्रभृति संस्थाकडून व मंडळीकडून जे प्रयत्न चालू आहेत त्यांस या संमेलनाचा पाठिंबा आहे. आणि जनतेनें व सरकारनें हें विद्यापीठ लवकर स्थापन करण्याची खटपट करावी अशी या संमेलनाची विनंति आहे.

ठराव ५ वा—शुद्धलेखन समितीच्या नियमांप्रमाणें यापुढें लेखक, संपादक आणि प्रकाशक यांनीं, तसेंच सरकार व विश्वविद्यालय यांनीं आपलीं पुस्तकें छापावीं व नव्या शुद्धलेखनाचा प्रसार करावा अशी त्यांना या संमेलनाची विनंति आहे.

ठराव १५ वा—मुंबई विश्वविद्यालयाच्या प्रवेशपरीक्षेच्या इंग्रजीशिवाय सर्व विषयांचें शिक्षण व परीक्षा मातृभाषेंतून द्यावें अशी या संमेलनाची शिफारस आहे.

ठराव १६ वा—या संमेलनाला महाराष्ट्र साहित्यांत शास्त्रीय ग्रथांची अत्यंत उणीव भासत आहे व ही दूर करण्याच्या दिशेनें चाललेल्या पुणें येथील 'महाराष्ट्र शास्त्रीय परिभाषा मंडळा'च्या कार्याची माहिती त्यास असून शास्त्रीय ग्रथांची वृद्धि होण्याकरितां हें संमेलन सर्व शास्त्रज्ञांना अशी विनंति करते कीं, प्रत्येक शास्त्रावर माध्यमिक व उच्च शिक्षणक्रमांत वापरतां येईल, त्याचप्रमाणें ज्याचा स्वतंत्र अभ्यासाकरितां उपयोग करितां येईल, असा एक एक ग्रंथ येत्या वर्षांत त्या त्या शास्त्रज्ञांनीं तयार करून प्रसिद्ध करावा; आणि शिवाय हें संमेलन 'मुंबई विश्वविद्यालया'ला अशी विनंति करतें कीं सर्व शास्त्रावर स्वतंत्र अभ्यासाकरितां मराठी भाषेंत ग्रंथनिर्मिती होण्याची योजना मुंबई विश्वविद्यालयानें शक्य तितक्या लवकर करावी.

ठराव २३ वा—निर्मल, आनंद व उदात्त भावना यांची जागृति हें सर्व ललितवाङमयाचें ध्येय आहे, हें विसरून कित्येक लेखक क्षुद्र विकारांना चेतविणारें लिखाण कळत न कळत लिहीत असतात अशा अनिष्ट लिखाणांचा हें संमेलन निषेध करीत आहे.

---

७ अ. भा. अर्वाचीन इतिहास परिषद्
## पुणें येथील अधिवेशनांत पसार झालेले कांहीं ठराव

(१) इंडियन हिस्टॉरिकल रेकॉर्डस् कमिशनचें उत्कृष्ट काम, विशेषतः त्याच्या उपयुक्त बैठकी पुन्हां चालू कराव्या व त्याप्रमाणें योग्य त्या योजना अमलांत आणण्याविषयीं हिंदुस्थान सरकारला विनंति करण्यांत यावी.

(२) निरनिराळ्या हिंदी विद्यापीठांच्या अभ्यासक्रमांतून आधुनिक हिंदुस्थानच्या इतिहासाच्या अभ्यासास योग्य वाव व स्थान मिळवून देण्याबद्दल धोरण ठरविण्याकरितां एक प्रतिनिधी—समिती नेमावी.

(३) प्रांतिक व मध्यवर्ती सरकार, व हिंदी संस्थानें यांनीं जुनीं देवळें, थडगीं, स्मशानें, समाध्या, टाकी व घुमट यांचें संरक्षण करण्यासाठीं ( जरूर ते ) उपाय लवकर अमलांत आणावेतच. पाहिजे तर (त्यासाठीं) 'पुराण वस्तु संरक्षण' खात्याची मुदत १९ व्या शतकाच्या पहिल्या पंचवीस वर्षांपर्यंत वाढवावी.

(४) पेशवे दप्तराप्रमाणें ( इतर) ऐतिहासिक दप्तरें, जीं कांहीं असतील तीं, प्रवीण संशोधकाच्या ताब्यांत द्यावीं म्हणजे त्यांचें संरक्षण, वर्गीकरण, टिपण, प्रसिद्धीकरण व त्यांचा व्यासंगी लोकांना ( स्कॉलर्स) उपयोग या गोष्टी ते दक्षतेनें पहातील.

(१) पेशवे दप्तरग्रंथ प्रसिद्ध केल्याबद्दल व व्यासंगी लोकांना सवलती दिल्याबद्दल ही सभा सरकारचे आभार मानते.

---

८ चौथ्या बृहन्महाराष्ट्र परिषदेचे
## महत्त्वाचे ठराव

(२) बृहन्महाराष्ट्र मंडळाच्या उद्देशांतील साधनें व कार्य यांतील पोटकलम ३ ला अनसरून पुण्यास स्थापन झालेल्या "बृहन्महाराष्ट्र संघ" यास मध्यवर्ती संस्थेचा महाराष्ट्रांतील घटक म्हणून मान्यता देण्यांत येत आहे. ह्या संघानें मध्यवर्ती संस्थेच्या उद्देशानुसार बृहन्महाराष्ट्र मंडळाच्या अनुमतीनें महाराष्ट्रांत कार्य करावें असें ही सभा ठरवते. ह्या संघाचा

एक सभासद बृहन्महाराष्ट्र मंडळाच्या कार्यकारी मंडळाचा सभासद असावा असें ही परिषद ठरविते.

(३) श्रीक्षेत्र हरिद्वार येथें हिमालयांतील यात्रा व अन्य निमित्तानें जाणाऱ्या महाराष्ट्रीयांची फार गैरसोय होते. ती दूर करण्याकरितां तेथील महाराष्ट्रीयांनीं "महाराष्ट्रीय यात्रा कष्टनिवारक समाज" काढला आहे. हिमालयाचे पायथ्याशीं महाराष्ट्र संस्कृतीचें हें एक केंद्र उत्पन्न होत असल्यानें अखिल महाराष्ट्रीयांनीं त्यास साहाय्य करावें अशी या परिषदेची शिफारस आहे.

(५) नवी दिल्ली हें हल्लीं सार्वभारतीय केंद्र झालें असल्यानें त्या ठिकाणीं एक महाराष्ट्र मंदिर उभारण्याची नितांत आवश्यकता आहे. यासाठीं या परिषदेची अखिल महाराष्ट्रीय जनतेस व त्यांतील सर्व पुढाऱ्यांस या मंदिराची उभारणी करण्याची जोराची खटपट करण्याविषयीं विनंति आहे

(६) अजमेर इंटरमीजिएट बोर्ड व आग्रा विश्वविद्यालय या संस्थांनीं मराठी विषयाच्या परीक्षांसाठीं मोडी लिपि आवश्यक ठरविली याबद्दल ही परिषद त्यांचें अभिनंदन करते.

(८) बृहन्महाराष्ट्र परिषदेचें पांचवें अधिवेशन इंदूर येथें भरवावें; या निमंत्रणाचा ही परिषद स्वीकार करते.

---

## ९ जगांतील प्रमुख भाषा

जगांतील प्रांतिक पोटभाषा, जंगली व नागर वगैरे मिळून एकंदर ६७६० भाषा आहेत असा पाश्चिमात्य भाषाकोविदांचा अंदाज आहे. फ्रेंच ॲकेडमींतील अधिकाऱ्यांची ही संख्या नक्की २७९६ आहे असा अभिप्राय आहे.

जगांतील प्रमख भाषा व किती लोक त्या बोलतात हें पुढील विवेचनावरून दिसून येईल.

(१) इंग्रजी भाषा २२४९९५५०० लोक बोलतात असा अंदाज आहे. पैकीं १२३७७५००० अमेरिकेंत संयुक्त संस्थानांतील रहिवासी आहेत. ब्रिटिश बेटें, माल्टा, जिब्राल्टर, वगैरे भागांतील पांच कोटी लोक व ब्रिटिश साम्राज्यांतील इंग्रजी समजणारे, बोलणारे अगर वापरणारे असे ५०२२०५०० लोक व १ कोट लिबेरिअन्स इतके लोक इंग्रजी भाषा बोलतात असा अंदाज आहे. हल्लीं इंग्रजी भाषेंत वापरांत असलेले व नसलेले असे एकंदर ७ लक्ष शब्द असावे. त्यांपैकीं ३ लक्ष शब्द शास्त्रीय असल्यानें शास्त्रीय पुस्तकाबाहेर सामान्य जनता त्याचा उपयोग करीत नाहीं. इंग्रजी भाषेच्या सर्वांत मोठ्या शब्दकोशांत ४॥ लक्ष शब्द दिलेले आहेत.

(२) चिनी भाषा व चीनमधील पोटभाषा ४७॥ कोटी लोक बोलतात.

(३) २१ कोटी ६० लक्ष लोक सर्व प्रकारच्या हिंदी भाषा बोलतात. हिंदी भाषा म्हणजे मूळ "इंडो-आर्यन" भाषांतून वैदिक-संस्कृत-प्राकृत या क्रमांनीं प्राकृत-संस्कृत व मूळ हिंदुस्थानी प्रादेशिक मिळून झालेल्या आहेत. प्रांतिक भाषा -बंगाली, ओरिया, हिंदी, नेपाळी, पंजाबी सिंधी, मराठी, गुजराथी, वगैरे होत. द्राविडी भाषांत तामीळ, तेलगू, कानडी व मलायलम् भाषा आहेत. इंडो-आर्यन वगैरे भाषा बोलणाऱ्यांच्या संख्या पुढें दिल्या आहेत. बंगाली ५ कोट १० लक्ष, गुजराथी १ कोट ७ लक्ष, मराठी २ कोट पंजाबी २ कोट ४० लक्ष, तामीळी १ कोट ९० लक्ष, तेलगू २॥ कोटी. कानडी १ कोटी १२ल. जगांतील इतर भाषा बोलणाऱ्यांची संख्या: तुर्की १४६४८२७०, तिबेटी ब्रह्मी १ कोटी ७० लक्ष, सयामी-१ कोटी १७ लक्ष; पर्शियन १ कोटी ; जावानीज- ४ कोटी २० लक्ष; जपानी ९ कोटी ४ लक्ष; अरबी २९०२१४९६; अफगाणी १ कोटी १० लक्ष; अबीसीनियन ५५लक्ष, आल्बीनियन १० लक्ष ४ हजार; बोहेमियन ७१ लक्ष, बल्गेरिया ५५ लक्ष; झेकोस्लोव्हाकियाअन दोड कोटी; डैनिश ३६५९८७०; डच १५६५२९४९; फिनिश-३०२२२५७; फ्लेमिश-३५ लक्ष, फ्रेंच ६२४१००४५; जर्मन ७८२३३१४२; ग्रीक ६४८००००; हंगेरिअन ८६८८३४९; इटालिअन ४१३६४५६६; नॉर्वेजिअन २८१४००; पोलिश ३ कोटी २० लक्ष; पोर्तुगीज-४ कोटी ७० लक्ष; रुमानिअन १ कोटी ७४ लक्ष; रशियन (सर्व पोटभाषा धरून) १६ कोटी; सर्बिअन १ कोटी १० लक्ष; स्लोव्हेनिअन ५१८५००००; स्पॅनिश ८०१८९८९२; स्वीडिश ६५०७९१६; इस्टोनिअन ११२००००; लेटिश १८४३९००; लियुआनिअन २३९३०००.

---

## १० महाराष्ट्र गोसंवर्धन प्रातिनिधिक मंडळाची पुढील सहा महिन्यांची योजना

(१) महाराष्ट्रांतील प्रत्येक जिल्ह्यांत

गोरक्षण कार्यकर्त्यांचें संमेलन भरविणें.

(२) महाराष्ट्रांतील गोरक्षण-संस्थांची माहिती देणारें एक पुस्तक मराठी व हिंदी भाषेंत प्रसिद्ध करणें.

(३) गोवध बंदीच्या कायद्याकरितां लोकमत तीव्र करण्यासाठीं सभा भरविणें. लोकांच्या सह्या घेऊन असेंब्लींत जोरदार चळवळ करणें.

(४) सर्व गोरक्षण संस्थांच्या अडचणी व गरजा समजावून घेऊन त्यांचें परस्पर साहाय्य करून निवारण करणें.

(५) गोरक्षण कार्याचें धार्मिक स्वरूप कांहीं देशभक्त व वाङ्मय सेवक नष्ट करीत आहेत त्यांच्या कार्याचा प्रतिकार करणें.

(६) गोरक्षण सप्ताहाचे वेळीं गोपरीक्षक वर्ग भरविणें व त्यायोगें गोरक्षण व गोसंवर्धनाची धार्मिक दृष्टीनें माहिती असणारे अधिक कार्यकर्ते निर्माण करणें.

---

## ११ कौन्सिल ऑफ स्टेट

### सरकारनियुक्त सभासद

अध्यक्ष— ना. सर माणेकजी बैरामजी दादाभाई, बॅरिस्टर नागपूर, सी. पी.

(ए) सरकारी अधिकारी

१. हि. ए. फील्ड मार्शल सर फिलिप चेटवूड
२. ना. खा. ब. मियान सर फाझल इ हुसेन
३. ना. एम. जी. हॅलेट
४. ना. टी. ए. स्टीवर्ट
५. ना. सर गुथरी रसेल
६. ना. डी. जी. मिचेल
७. ना. आर. इ. एल. विनगेट
८. ना. जी. एच. स्पेन्स
९. ना. जे. एन. जी. जॉनसन
१०. ना. एफ. डब्ल्यू. स्टीवर्ट
११. ना. सी. एल्. फिलिप

वऱ्हाडातर्फे

१२. ना. गणेश श्रीकृष्ण खापर्डे, अमरावती

(बी) अधिकारी नसलेले

१३. ना. सर डेव्हिड देवदास, (मद्रास)
१४. ना. दि. ब. सर के. रामुनी मेनन, (मद्रास)
१५. ना. खा. ब. डॉ. सर एन्. चोकसी, (मुंबई)
१६. ना. सर गुलामहुसेन हिदायतुल्ला, (कराची)
१७. ना. नबाब ख्वाजा हबीब उल्ला, (डाक्का)
१८. ना. विजयकुमार बसू, (कलकत्ता)
१९. ना. महाराजा जगदीशनाथ राय, (बंगाल)
२०. ना. सय्यद रझाअल्ली, (मुरादाबाद, सं. प्रांत
२१. ना. राय ब्रा. पंडित गोकर्णनाथ उग्र (डेराडून, सं. प्रांत)
२२. ना. राजा चरणजित सिंग (पंजाब)
२३. ना. नबाब मलिक महमद हयात खान नून, (पंजाब)
२४. ना. महाराजाधिराज सर कामेश्वरसिंग (दरभंगा)
२५. ना. मेजर नबाब सर महमद अकबर खान (होटी, वायव्य सरहद्द प्रांत).

लोकनियुक्त

२६. ना. राजा सर अन्नमल ई. चेटिअर, (मद्रास)
२७. ना. यागद्दा रंगनाथकालू नायडू ,,
२८. ना. व्ही. सी. वेल्लिनागिरी गौदर ,,
२९. ना. दि. ब. जी. नारायणस्वामी चेटी ,,
३०. ना. सय्यद महमद पादशा साहेबबहादुर ,,
३१. ना. सरदार जगन्नाथ महाराजपंडित (मुंबई)
३२. ना. सर फिरोज सी. सेटना ,,
३३. ना. सरदारसाहेब सर सुलेमान कासमहाजी मिठा ,,
३४. ना. अल्लीबक्ष महमद हुसेन (सिंध)
३५. ना. ई. मिलर (मुंबई चेंबर ऑफ कॉमर्स)
३६. ना. जगदीशचद्र बानर्जी (बंगाल)
३७. ना. कुमार नृपेंद्र नारायण सिंह ,,
३८. ना. सत्येन्द्रचंद्र घोष मालिक ,,
३९. ना. खा. ब. सय्यद अबदुल एफीज ,,
४०. ना. महमद सुऱ्हवर्दी ,,
४१. ना. एस. डी. ग्लॅडस्टन (बगांल चेंबर ऑ. कॉ.)
४२. ना. राय. ब. लाला मथुरा प्रसाद मेहरोत्रा (संयुक्त प्रांत)
४३. ना. राय ब. लाला जगदीशप्रसाद. ,,
४४. ना. प. प्रकास नारायण सप्रू ,,
४५ ना. खा. ब. हाफीज महमद दलीम ,,
४६. ना. शेख मशीर हुसेन किडवाई ,,
४७. ना. राय ब. लाला रामशरणदास (पंजाब)
४८. ना. सरदार बुटासिंग ,,
४९. ना. खा. ब. चौधरी महमद दीन ,,
५०. ना. नबाब साहेबजादा सय्यद सर महमद मेहर शाहा पंजा
५१. ना. राय ब. राधाकृष्ण जालन (बिहारओ.)
५२. ना. राजा रघुनंदन प्रसादसिंग ,,
५३. ना. हुसेन इमाम ,,
५४. ना. व्ही. व्ही. काळीकर (मध्यप्रांत)
५५. ना. श्री. हेरंबप्रसाद बारुआ (आसाम

५८. ना. पी. सी. डी. चारी (ब्रह्मदेश)
५७. ना. जे. बी. ग्लास (बर्मा चेंबर ऑफ कॉमर्स)

---

## १२ लेजिस्लेटिव्ह असेंब्लीचे सभासद

अध्यक्षः—ऑनरेबल सर अबदुर रहीम

लोकनियुक्त : मद्रास

(१) एस. सत्यमूर्ति
(२) व्ही. व्ही. गिरी
(३) के. नागेश्वर राव
(४) प्रो. एन. जी. रंगा
(५) एम्. अनंत शयानम अयंगार
(६) टी. एस्. अविनाशिलिंगम् चेटिआर
(७) सी. एन. मुथुरंग मुदलियार
(८) डॉ. टी. एस. एस. राजन
(९) पी. एस. कृष्णस्वामी रजु
(१०) सॅम्युएल ॲरॉन
(११) उमरअली शाह
(१२) मौलवी सय्यद मुर्तुझा साहेब बहादुर
(१३) एच. ए. साथार एच. इसॅक सेत
(१४) एफ. ई. जेम्स
(१५) राजा सर वासुदेव राजा
(१६) एस. आर. रायसामी वेंकटचेलम चेटी गुरु.

मुंबई

(१) डॉ. जी. व्ही. देशमुख
(२) सर कावसजी जहांगीर
(३) दिवाण लालचंद नवलारिया
(४) भुलाभाई जीवनजी देसाई
(५) अहमद इब्राहिम हारून जाफर
(६) केशवराव मारुतीराव जेधे
(७) न. वि. गाडगीळ
(८) एस. के. होसमानी
(९) महमद अली जिना
(१०) नबीबक्ष इल्ला बक्ष भुतो
(११) शेठ हाजी अबदुल्ला हारून
(१२) डब्ल्यू. बी. होसॅक
(१३) सर लेस्ली सिवेल हडसन नाईट
(१४) मथुरादास विसनजी, जे. पी.
(१५) सर गुलाम हुसेन हिदायतुल्ला
(१६) एच. पी. मोदी

बंगाल

(१) शरद्चंद्र बोस
(२) डॉ. पी. एन. बानर्जी
(३) बाबू अमरेंद्रनाथ चटोपाध्याय
(४) पं. लक्ष्मीकांत मैत्र
(५) सूर्यकुमार सोम
(६) अखिलचंद्र दत्त
(७) सर अबदुर रहीम
(८) सर सुरावर्दी
(९) ए. एच. गझनवी
(१०) ए. के. फजुलहक
(११) महमद अनवर उल् अझीद
(१२) एस. ए. वाक्की
(१३) जी मॉर्गन
(१४) सर डार्सी लिंडसे
(१५) जे. ए. मिलिगन
(१६) श्री. धीरेंद्रकांत लहारी चौधरी
(१७) बाबू बैजनाथ बजोरिया

संयुक्त प्रांत

(१) डॉ. भगवानदास
(२) चौधरी रघुवीर नारायणसिंग
(३) पं. श्रीकृष्ण दत्त पालिवल
(४) पं. गोविंद वल्लभदास
(५) श्री. प्रकाश
(६) कृष्णकांत मालवीय
(७) श्री. मोहनलाल सक्सेना
(८) सरदार जोगेंद्रसिंग
(९) मौलाना शौकतअल्ली
(१०) काझी महमद अहमद कझमी
(११) महमद यामीन खान
(१२) मौलवी सर महमद याकूब
(१३) डॉ. झियाउद्दीन अहमद
(१४) महमद अझार अल्ली
(१५) जे. रॅम्से स्कॉट
(१६) महाराज कुमार विजय आनंद गजपती राज

पंजाब

(१) शामलाल
(२) फकीरचंद
(३) भाई परमानंद
(४) सय्यद गुलाम भिक नैरंग
(५) के. एल. गुहा
(६) एच. एम. अबदुल्ला
(७) नबाबसाहेब जादा सय्यद सर महमद मेहेरशहा
(८) खान साहेब शेख फजील हक पिरचा
(९) खा. ब. मखूदस् सय्यद राजन बक्ष
(१०) सरदार मंगलसिंग
(११) सरदार संतसिंग
(१२) एम् ग्यासउद्दीन

बिहार आणि ओरिसा

(१) सत्यनारायण सिंह
(२) बी. बी. वर्मा
(३) बी. दास
(४) पं. निळकंठदास
(५) अनुग्रह नारायण सिंह
(६) श्रीकृष्ण सिंह
(७) दीपनारायण सिंग
(८) बाबू नारायण सिंग
(९) महमद नौमन
(१०) मौं. बडीयज्ञ जामन
(११) ,, महमद शफी दाउदी
(१२) राजबहादुर हरीहर प्रसाद नारायणसिंह

मध्यप्रांत

(१) डॉ. नारायण भास्कर खरे
(२) शेट गोविंद दास
(३) घनश्यामसिंग गुप्त
(४) खानसाहेब नवाब सिद्दिकअल्ली खान
(५) शेट शिवदास डागा

आसाम

(१) श्री. नवीनचंद्र बर्डालोई
(२) वसंत कुमार दास
(३) अब्दुल मतीन चौधरी
(४) एफ. डब्ल्यू. हॉकिनहल

ब्रह्मदेश

(१) यू. तेन माग
(२) डॉ. तेन मँाग
(३) यू. बा. सी.
(४) डब्ल्यू जे. सी. रिचर्डस

दिल्ली

(१) एस. असफअल्ली
(२) रा. ब. शेठ भापचंद सोनी

अजमीर मेरवाडा

(१) डॉ. खानसाहेब

---

सरकारनियुक्त

वऱ्हाड १.

माधव श्रीहरि अणे

(१) ऑ. सर जोसेफ भोर, के. सी. आय. ई. के. सी. एस्. आय. सी. बी. ई. (२) ऑ. सर फँक नॉईस, के. सी. एस. आय. सी. बी. ई. (३) ऑ. सर नृपेंद्र सरकार नाईट, (४) ऑ. सर पर्सी जेम्स ग्रिग, के. सी. बी., (५) ऑ. सर हेन्री क्रेक बार्ट, के. सी. एस. आय., (६) सर लँन्सलॉट ग्रॅहॅम, के. सी. आय. ई., (७) जी. एस्. वाजपेयी, सी. आय. ई. सी. बी. ई., (८) एच. ए. एफ. मेटकाफ, सी. एस. आय. सी आय. ई. एम. व्ही. ओ., (९) जी. आर. एफ. टॉटन हॅम, सी. आय. ई. (१०) जी. व्ही. बेवूर, सी. आय. ई. (११) ए. एच. लॉइड, सी. एस. आय. सी. आय. ई. (१२) पी. आर. राव, (१३) ए. जी. क्लौ. (१४) टी. स्लोअन सी. आय. ई. (१५) ए. सी. विल्यम्स, (१६) एस. एन. मुशरॅन, (१७) के. संजीवराव, (१८) सी. गोविंदन नायर, (१९) रा. ब. ए. ए. वेंकटराम अय्यर अवरगल, (२०) जे. एम. चतर्जी, (२१) एन. आर. मुकर्जी, (२२) खा. ब. मियां अब्दुल अझीझ्, (२३) पी. पी. सिंह, (२४) डी. एच. सी. ड्रेक, सी. आय. ई. (२५) डब्ल्यू. एल. स्कॉट., सी. आय. ई., (२६) वी. डब्ल्यू, स्वितिन बँक.

बिनसरकारी

(१) सरदार बहादुर सरदार सर जवाहर सिंह नाईट, सी. आय. ई., (२) रा. ब. सर सत्यचरण मुकर्जी नाईट सी. बी. ई., (३) रा. ब. एम. सी. राजा, (४) आर. एस. शर्मा सी. आय. ई., (५) एन. एम. जोशी, (६) डॉ. आर. डी. दलाल, (७) डॉ. फरॅन्सिस झेवियर डिसूझा, (८) ऑ. कॅप्टन रा. ब. लालचंद, ओ. बी. ई., (९) कॅ. सरदार शेर महंमद खान., सी. आय. ई., एम. बी.ई. (१०) मेजर नवाब अहमद नवाझ खान, सी. आय. ई., ओ. बी. ई. (११) खान ब. नबाब मलिक अल्लाबक्ष खान तिवाना, एम. बी. ई., (१२) ले. कर्नल सर हेन्री गिडने, नाईट. (१३) एल. सी. बस.

---

उपाध्यक्ष—अखिलचंद्र दत्त
चिटणीस—बॅ. मिया महमद रफि
दुय्यम चिटणीस—रा. ब. डी. दत्त

मार्शल

कॅ. हाजी सरदार नूर अहमदखान, एम. सी. आय. ओ. एम. आय. ए.

---

## १३ मुंबई प्रांतिक सरकार

गव्हर्नर:—हि. ए. रा. ऑ. लॉर्ड ब्रेबोर्न. जी. सी. आय. ई. एम. सी.

### पर्सनल स्टाफ

१. सी. एच. ब्रिस्टो, प्रायव्हेट सेक्रेटरी
२. मेजर सी. जी. टूगुड, (मिलिटरी सेक्रेटरी)

३. मेजर पी. ए. ओपी, (सर्जन)
४. ले. आय. डी. एलियट, (ए. डी. सी.)
५. जे. जी. मॅक्स्वेल गंबल्टन, (ए. डी. सी.)
६. ले. एम. व्ही. मिलबँक, ,, ,, ,,
७. ले. जे. एच. आल्मस, ,, ,, ,,
८. मेजर जी. ई. पोर्टल, (बॉडीगार्ड)
९. ऑ. ले. रिसालदार नाथासिंग, (इं.ए.डी.सी.)
१०. कॅ. एफ. डब्ल्यू. ब्रेट, (ऑ. ए. डी. सी)
११. इंजीनिअर कॅ. डब्ल्यू. डब्ल्यू कॉलिन्स, ,,
१२. एच. ई. बटलर ,,
१३. कॅ. सरदार भी. ना. ऊर्फ भाऊसाहेब पाटणकर (ऑ. ए. डी. सी.)
१४. मेजर आर. एस. मोबर्ली, (ऑ.ए.डी.सी.)
१५. ऑ. कॅ. सुभेदार मेजर सरदार ब. कृ. खं. भोसले ,, ,, ,,

### एक्झिक्यूटिव्ह कौन्सिलर्स

१६. ना. आर. डी. बेल मेंबर व व्हा. प्रेसिडेंट, कौन्सिल होममेंबर
१७. ना. खा. ब. डी. बी. कूपर मेंबर

### मिनिस्टर्स

१८. ना. दि. ब. सिद्दप्पा तोतप्पा कंबळी, (शेती व शिक्षण)
१९. ना. सर शहा नवाजखान गुलाम मुर्तजाखान भुतो, स्थानिक स्वराज्य

## १४ मुंबई ले. कौन्सिलचे सभासद

अध्यक्ष:—ना. सर अल्ली महमद खान देहलवी
उपाध्यक्ष:—एन. ई. नवले.

### लोकनियुक्त सभासद

१. जी. ल. विंटरबोथन
२. एल. आर. तेरसी
३. खा. ब. अबदुल लतीफ हाजी हजरतखान
४. श्री. आत्माराम भिमाजी आचरेकर
५. खा. साहेब वल्लद खान साहेब हाजी महमद उमर अल्लाबक्ष
६. रा. ब. एस. एन. आंगडी
७. रा. ब. रामचंद्र संतूराम आसवले
८. अबदुल कादीर जमाल उद्दीन बंगी
९ जान महमदखान वलीमहमदखान भुरग्री
१०. सर शहा नवाझखान गुलाम मुर्तजाखान भूतो
११. वडेरो वहीदबक्ष इलाहीबक्ष भुतो
१२. खा. ब. शेरमहमदखान करमखान बिजराणी
१३. सरदार महाबूबलीखान महंमद अकबरखान बिरादर
१४. मि. अलफ्रेड गे. ग्रेन्व्हिल बूलक
१५. मि. पी. आर. चिकोडी
१६. रा. ब. गणेश कृष्ण चितळे
१७. डॉ. जे. ए. कोलॅको
१८. दौलतराव जयरामराव झुंजारराव
१९. सर अली महमदखान देहलवी
२०. रा. सा. भगवानदास गिरधरराव देसाई
२१. शंकरअप्पा बसलिंगअप्पा देसाई
२२. धालुमल लिलाराम
२३. एम. के. दीक्षित
२४. डॉ. जोसेफ अल्बान डीसूझा
२५. जी. एस. गंगोली
२६. महमद हसीम गझदेर
२७. गुलाम हैदर शहा साहिबदिनो शहा
२८. खा. ब. गुलाम नबिशहा मौजेलशहा (सय्यद)
२९. डॉ. मानकेरशहा धनजीभाई गिल्डर
३०. लक्ष्मण रघुनाथ गोखले
३१. गोव्हर रोरा
३२. जे. बी. ग्रीव्हज्
३३. जॉन हंफ्रे
३४. खा. ब. जाम जान महमद वालदजाम महमद शरीफखान
३५. खा. ब. जान महमद खान वालद खान साहेब शहा पासन्हखान
३६. हाजी इब्राहिम जतेकर
३७. विश्वनाथराव नारायण जोग
३८. गंगाजीराव मुकुंदराव काळभोर
३९. रा. ब. रावजी रामचंद्र काळे
४०. रा. ब. सिद्दाप्पा तोताप्पा कंबळी
४१. मानकेरशॉ माणेकजी कारभारी
४२. खा. ब. महमद अयूबशहा महमद खुरो
४३. रा. सा. पांडुरंग ज्ञानेश्वर कुलकर्णी
४४. माधवसांग जोरभाई
४५. गुलाम हुसेन इब्राहिम मॅचेसवाला
४६. के. बी. एस. मेहेरबक्ष
४७. मणिलाल हरिलाल मेहेता
४८. सरदार दवार तेमुरास कावसजी मोदी
४९. जयवंत घनश्याम मोरे
५०. रा. ब. भीमभाई रणछोडजी नाईक
५१. नामदेवराव बुधाजीराव
५२. नामदेव एकनाथ नवले
५३. आल्बर्ट क्लिफोर्ड ओवेन
५४. रा. ब. लक्ष्मण विष्णु परुळेकर
५५. अलीभाई इसाभाई पटेल
५६. चतुरभाई नरसीभाई पटेल
५७. खान ब. वलीबक्ष अदमभाई पटेल.

५८. दि. ब. डोंगरसिंग रामजी पाटील
५९. नारायण नागू पाटील
६०. रा. सा. वामन संपत पाटील.
६१. विठल नथू पाटील
६२. रा. ब. गोपाळराव वामन प्रधान
६३. सर रफिउद्दीन अहमद मौलवी
६४. हुसेनअल्ली महमद रहिमतुल्ला
६५. अबदुल रहमानखान करमखान रसालदार
६६. साहेब सिंहजी जवान सिंहजी
६७. एस. डी. सकलातवाला
६८. शेख अबदुल अझीझ अबदुल लतीफ
६९. शेख अबदुल मजीद लिलाराम
७०. रामचंद्रराव बापूराव शिंदे
७१. ले. क. हॅरी सी. स्मिथ
७२. रामचंद्र गणेश सोमण
७३. ए. एन. सुर्वे
७४. व्यंकट आनंदराव सुर्वे
७५. सय्यद मिरान महमदशहा झनुलबद्दीनशहा
७६. सय्यद महमद कामिल शाह काबूल महमदशा
७७. खा. ब. हाजी मिर अलाहदाद खान मिर इमामबक्ष खान तलपूर
७८. बंदेलीखान मिर महमद हसन खान तलपूर
७९. सरदार भाऊसाहेब ऊर्फ दुलाबावा रायसिंहजी ठाकोर ऑफ केरवाडा
८०. सतरामदास सखावतारी तोलानी
८१. विष्णु गणेश वैशंपायन
८२. पेस्तनशाह एन. वकील
८३. रा. सा. रामचंद्र विठलराव वाडेकर
८४. बी. पी. वाडके

### सरकारनियुक्त

१. डॉ. बी. आर. आंबेडकर
२. आर. आर .बखले
३. रा. ब. सिताराम केशव बोले
४. मेजर डब्ल्यू. एलिस. जोन्स
५. बी. एस. कामत
६. महमद सुलेमान कासम मिठा
७. रेव्ह. आर. एस. मोडक
८. एस. एस. पाटकर
९. ए. ई. सेरवाई
१०. शहा रुक यार जंग बहादुर नवाब
११. डॉ. पुरुषोत्तमराय सी. सोळंकी
१२. सय्यद मुनावर
१३. मेजर ए. वाय. दाभोळकर

### सरकारी अधिकारी असलेले

१४. सय्यद अमिनुद्दीन
१५. डब्ल्यू ग्रीव्ह
१६. एन. बी. बॅक्स्ट
१७. जी. ई. एल. गिल्बर्ट
१८. एच. जे. एम. कझिन्स
१९. सी. जी. फरीक
२०. टी. एच. जी. स्टॅंपर
२१. एच. एफ. नाईट
२२. जे. ए. मादन
२३. आर. एम. मॅक्स्वेल
२४. के. एल. पंजाबी
२५. जी. एस. राजाध्यक्ष
२६. डब्ल्यू. डब्ल्यू. स्मार्ट

---

| जाती | जिल्हा | | लोकसंख्या |
|---|---|---|---|
| १ देशस्थ ब्राह्मण | अहमदनगर, पूर्व खानदेश, नाशिक, पुणें, सातारा, सोलापूर, बेळगांव, विजापूर, धारवाड | पुरुष | १२०२२६ |
| | | स्त्रिया | १०७४४० |
| २ चित्पावन ब्रा. | पुणें, सातारा, कुलाबा, रत्नागिरी | पुरुष | ३५३३९ |
| | | स्त्रिया | ३३६०० |
| ३ गौड सारस्वत ब्रा. | बेळगांव, रत्नागिरी, कानडा | पुरुष | १८८९१ |
| | | स्त्रिया | १८९९७ |
| ४ कायस्थ प्रभू | ठाणा, मुंबई शहर, मुंबई उपनगर | पुरुष | ८६८८ |
| | | स्त्रिया | ७४९५ |
| ५ मराठा—कुणबी | सातारा, रत्नागिरी | पुरुष | १७०२९३ |
| | | स्त्रिय | १९४९७५ |
| ६ धोबी, परीट | पूर्वखानदेश, सातारा, पुणें, कानडा | पुरुष | १३३८७ |
| | | स्त्रिया | १३१२५ |
| ७ दरजी, शिंपी | पूर्वखानदेश, पुणें, सातारा, धारवाड | पुरुष | १६६३६ |
| | | स्त्रिया | १६२३९ |
| ८ कुंभार | सातारा, रत्नागिरी | पुरुष | १२३९३ |
| | | स्त्रिया | १२८१४ |
| ९ कोष्टी | नाशिक, पुणें, सातारा, सोलापूर | पुरुष | ९९७८ |
| | | स्त्रिया | ९५४३ |
| १० न्हावी | पुणें, खेडा, रत्नागिरी | पुरुष | १५६२३ |
| | | स्त्रिया | १५६२६ |
| ११ चांभार | अहमदनगर, पूर्व व पश्चिम खानदेश, नाशिक, पुणें, सातारा, सोलापूर | पुरुष | ६१२२० |
| | | स्त्रिया | ६०२०५ |
| १२ धेड | गुजराथ जिल्हे | पुरुष | ५५७०३ |
| | | स्त्रिया | ५७२३४ |
| १३ महार | अहमहनगर, पूर्व व पश्चिम खानदेश, पुणें, सातारा, सोलापूर, नाशिक | पुरुष | २७१७१९ |
| | | स्त्रिया | २८२२०८ |
| १४ मांग | | पुरुष | ७३१४१ |
| | ,, | स्त्रिया | ७३२८६ |
| १५ माळी | पुणें | पुरुष | ३३५५२ |
| | | स्त्रिया | ३३८२६ |
| १६ साळी | अहमदनगर, सातारा, पुणें | पुरुष | ९२७४ |
| | | स्त्रिया | ८२५६ |
| १७ सोनार | पूर्व खानदेश, रत्नागिरी | पुरुष | १७७९५ |
| | | स्त्रिया | १७७२६ |
| १८ सुतार | पुणें, रत्नागिरी | पुरुष | १७६६५ |
| | | स्त्रिया | १७३७२ |
| १९ तेली | पूर्व खानदेश, रत्नागिरी | पुरुष | २२२५२ |
| | | स्त्रिया | २२७४३ |
| २० लिंगायत | धारवाड | पुरुष | १९१७७२ |
| | | स्त्रिया | १८३२०९ |
| २१ मराठा | मुंबई शहर | पुरुष | १८६३५५ |
| | | स्त्रिया | १०४९७५ |
| २२ ख्रिश्चन | ब्रिटिश जिल्हे | पुरुष | १७४५४८ |
| | | स्त्रिया | १४०२४९ |
| २३ पारशी | ,, | पुरुष | ४६१६६ |
| | | स्त्रिया | ४३०३३ |

| वय ०–६ | ७–१३ | १४–१६ | १७–२३ | २४–४३ | ४४च्या वरचे | एकंदर |
|---|---|---|---|---|---|---|
| २ | ८ | २९ | १४३ | १९०० | ७०५३ | ९१३५ |
| ९ | ६० | १४५ | १०३४ | ८२९२ | १३३०५ | २२८४५ |
| २ | २३ | २९ | ३२ | ३८० | १६१५ | २०८१ |
| ४ | १० | २३ | २९० | २४७८ | ४२४५ | ७०५० |
| १ | १ | .... | ८ | १७५ | ८२४ | १००९ |
| १ | ४ | ९ | १४४ | १३३५ | २४३५ | ३९२८ |
| ० | १ | ३ | ९ | ८२ | १९६ | २९१ |
| ९ | ८ | ९ | ३३ | २९८ | ५१८ | ८७५ |
| १४ | ३५ | ३२ | ९४ | १२२९ | ५४०९ | ६८१३ |
| १२१ | १५३ | २०२ | ८२० | ८७५४ | ११४०३ | २०४५३ |
| २ | ३ | १ | १७ | १९८ | ५०२ | ७२३ |
| .... | १५ | २६ | ७९ | ८३२ | १४१४ | २३६६ |
| १ | ४ | ३ | ४३ | २७४ | ५७२ | ८९७ |
| २ | १३ | १७ | ९२ | ९३२ | १६९७ | २७५३ |
| .... | १ | ३ | ३७ | १४४ | ४८३ | ६६८ |
| ३ | २२ | १६ | ७८ | ७४३ | १४९३ | २३५५ |
| .... | ३ | २ | २४ | १९५ | ३८१ | ६०५ |
| ४ | १२ | १८ | ७६ | ४८२ | ९०४ | १४९६ |
| १ | १२ | ११ | ३६ | ३३६ | ६१९ | १०१५ |
| ५ | ३२ | १७ | २२९ | ८९४ | १७५५ | २८४२ |
| १ | ३३ | ३८ | ९५ | ६७० | १६७५ | २५१२ |
| ९ | ९० | ७९ | १२९ | २२५४ | ५१२१ | ७७[illegible]२ |
| ३० | ९५ | ११२ | २ ९ | १३९८ | २३५२ | ४२७६ |
| ६६ | १३६ | १६१ | २८७ | २३०५ | ४६३७ | ७५९२ |
| २७ | १२२ | १९८ | ५५७ | २७९८ | ६४०५ | १०१०७ |
| ११५ | ५५२ | ८२५ | १३३२ | १३१२० | २५६५७ | ४१६०१ |
| ५ | १९ | ३० | १०२ | ७२५ | १७५८ | २६३९ |
| १२ | १०५ | १०४ | ३६९ | २९६४ | ५७४८ | ९३०२ |
| .... | ३ | ७ | ६९ | ४८३ | १०२१ | १५८३ |
| ४ | ३१ | ४४ | १५१ | १७६२ | ३२१७ | ५२०९ |
| .... | २ | ४ | २५ | १६५ | २६१ | ४५७ |
| .... | ८ | ११ | ३६ | ४५५ | ७४६ | १२५६ |
| .... | १ | १ | ३४ | २०९ | ५२५ | ७७० |
| १ | १४ | २६ | १०६ | १०४८ | २१३२ | ३३२७ |
| .... | .... | ३ | १७ | १७१ | ५१८ | ७०९ |
| १ | १९ | ३१ | १२३ | ९५३ | १७५१ | २८७८ |
| ३ | १२ | ७ | २७ | २६८ | ६२९ | ९४६ |
| ५ | २७ | २८ | ८३ | १०७५ | २४०८ | ३६२६ |
| २७ | ९० | ८७ | ५८१ | ५१८० | १०२७८ | १६२४३ |
| ६६ | ४२२ | ६८६ | २२६४ | १६११० | २३५४९ | ४३१७७ |
| १ | ८ | ३५ | २९५ | २०६५ | २०६१ | ४४६५ |
| १ | ४१ | ८९ | ५२२ | ५३४९ | ६०४१ | १२०४३ |
| ४५ | १४६ | ५६ | २६३ | १८०० | ३४५० | ५७६० |
| १४० | २२० | ९८ | ३१८ | ५२६५ | ९४२५ | १५४६६ |
| १५ | .... | १ | ४ | २४८ | १४०२ | १६७० |
| ३ | १ | ६ | २७ | ८५४ | ४४५५ | ५३४६ |

# देश व त्यांचे शास्ते

| देशाचें नांव | शास्त्याचें नांव | शास्त्याचा प्रकार | वय | कधीं झाला |
|---|---|---|---|---|
| अफगाणिस्थान | महंमद जहीरखान | राजा | २४ | १९३३ |
| आल्बानिया | झोग | राजा | ४१ | १९२५ |
| अरबस्थान (सय्यदी) | इब्न सय्यद | राजा | ५३ | १९२६ |
| आर्जेंटिना | जनरल ए. पी. जस्टो | अध्यक्ष (६ वर्षांकरितां) | ६९ | १९३२ |
| ऑस्ट्रेलिया | सर ऐझाक्स् | गव्हर्नर जनरल | ८० | १९३० |
| | जे. ए. लिआन्स | मुख्यप्रधान | | |
| ऑस्ट्रिया | डॉ. विल्यम मीकीअस | अध्यक्ष | ७३ | १९२८ |
| | के. शूस्निग | मुख्यप्रधान | | |
| बेल्जम | लिओपोल्ड ३ रा | राजा | ३४ | १९३४ |
| | काऊंट डी ब्रॉकव्हील | मुख्य प्रधान | | |
| भूतान (ब्रि. संरक्षित) | जिकमी वांगचक | महाराजा | | १९२६ |
| बोलिव्हिया | डॉ. एफ्. टमायो | अध्यक्ष (४ वर्षांकरितां) | | १९३५ |
| ब्राझिल | डॉ. जी. व्हार्गो | अध्यक्ष ,, | | १९३४ |
| बल्गेरिया | बोरीस ३ रा | झार | ४१ | १९१८ |
| कांबोडिआ | मुनी वांग | राजा (फरेंच संरिक्षत) | | १९२७ |
| कानडा | लॉर्ड बेसवरो | गव्हर्नर जनरल | ५५ | १९३१ |
| | बेनेट | मुख्य प्रधान | | |
| चिली प्रांत | ए. अलेसांड्री | अध्यक्ष (६ वर्षांकरितां) | ६६ | १९३२ |
| चीन | लिन सेन | (ॲक्टिंग) अध्यक्ष | | १९३१ |
| कोलंबिया | डॉ. ए. लोपेझ | अध्यक्ष (४ वर्षांकरितां) | | १९३४ |
| कोस्टारिका | डॉन रिकार्डो जे. ओरीमुनो | ,, ,, | ७६ | १९३२ |
| क्यूबा | कर्नल सी. मेंडीटा | अध्यक्ष (तात्पुरता) | | १९३४ |
| झेकोस्लोव्हाकिया | थॉमस जी. मसारिक | आजीव अध्यक्ष | ८५ | १९२० |
| डँझीग | आर्थर ग्रीसर | सीनेट–अध्यक्ष | | १९३४ |
| डेन्मार्क | ख्रिश्चन १० वा | राजा | ६५ | १९१२ |
| डॉमीनीकन रिपब्लिक | जनरल ट्रूजिल्लो | अध्यक्ष (४ वर्षांकरितां) | ४२ | १९३० |
| इक्वाडोर | डॉन व्ही. इबारा | अध्यक्ष | | १९३३ |
| इजिप्त | फौद १ ला | राजा | ६७ | १९२२ |
| इस्टोनिआ | कॉंस्टँटिन पेट्स | मुख्य अधिकारी | | १९३२ |
| इथिओपिआ (अबीसीनिया) | हैली सेलासी रास टफारी | बादशहा | ४४ | १९३० |
| फिनलंड | पी. ई. स्विनहफ द | अध्यक्ष (६ वर्षांकरितां) | ७ | १९३१ |
| फरान्स | ए. लेब्रू | अध्यक्ष (७ वर्षांकरितां) | ६४ | १९३२ |
| जर्मनी | अडोल्फ हिटलर | अध्यक्ष | ४६ | १९३३ |
| ग्रेट ब्रिटन | जॉर्ज पांचवा | राजे व बादशहा | ७० | १९१० |
| | मि. बाल्डवीन | मुख्य प्रधान | | १९३५ |
| ग्रीस | अलेक्झांडर झैमीस | अध्यक्ष (५ वर्षांकरितां) | | १९२९ |
| ग्वाटेमाला | जनरल जे. उबीको | अध्यक्ष (६ वर्षांकरितां) | ५६ | १९३१ |
| हैटी | एस. व्हिन्सेंट | अध्यक्ष | | १९३० |
| होंडुरास | जनरल टी. सी. अँडीनो | अध्यक्ष (४ वर्षांकरितां) | | १९३३ |
| हंगेरी | ॲडमिरल निकोलस हॉर्थी | रीजंट | ६७ | १९२० |
| आइसलंड | ख्रिश्चन १० वा | राजा | ६५ | १९१२ |
| ब्रिटिश हिंदुस्थान | लॉर्ड विलिंग्टन | व्हाइसरॉय | ६९ | १९३१ |

| देशाचें नांव | शास्त्याचें नांव | शास्त्याचा प्रकार | वय | कधीं झाला |
|---|---|---|---|---|
| इराक (मेसापोटेमिया) | गाझी १ ला | राजा | २३ | १९३३ |
| आयरिश फरी स्टेट | इमान डी. व्हॅलेरा | कार्यकारी सभेचा अध्यक्ष | ५३ | १९३२ |
| इटली | व्हिक्टर इमान्यल ३ रा | राजा | ६६ | १९०० |
| | बेनिटो मुसोलिनी | मुख्य प्रधान | | |
| जपान | हिरोहिटो | बादशहा | ३४ | १९२६ |
| लॅटव्हिया | आल्बर्ट क्वीसीस | अध्यक्ष (३ वर्षांकरितां) | ६४ | १९३० |
| लिबेरीआ | इ. बार्क्ले | अध्यक्ष (४ वर्षांकरितां) | | १९३१ |
| लीश्टेन स्टीन | फरान्सिस १ ला | प्रिन्स | ८२ | १९२९ |
| लिथुआनिआ | ए. स्मेटोना | अध्यक्ष | | १९२६ |
| लॅक्झेंबर्ग | चार्लोटी | ग्रँड डचेस | ३९ | १९१९ |
| मांच्यूको | हेन्री पू यी | कांगती बादशहा | २९ | १९३४ |
| मेक्सिको | जनरल एल कार्डेना | अध्यक्ष (६ वर्षांकरितां) | ४० | १९३४ |
| मोनॅको | लुई | प्रिन्स | ६५ | १९२२ |
| मोरोक्को | मौलई महमद | सुलतान | २२ | १९२७ |
| नेपाळ | त्रिभुवन वीरविक्रम | शहा | २९ | १९११ |
| नेदर लंडस | विल्हेल्मिना | राणी | ५५ | १८९० |
| न्यू फौं लंड | सर डेव्हिड अँडरसन | गव्हर्नर | ६१ | १९३२ |
| न्यूझीलंड | लॉर्ड ब्लेडीस्लो | गव्हर्नर जनरल | ६८ | १९३० |
| | जी. डब्ल्यू. फोर्बस | मुख्य प्रधान | | |
| नायकारग्वा | डॉ. जे. बी. साकासा | अध्यक्ष (४ वर्षांकरितां) | | १९३३ |
| नॉर्वे | हा कोन ७ वा | राजा | ६३ | १९०५ |
| ओमान | सय्यद इब्न तैमूर | सुलतान | २५ | १९३२ |
| पॅलेस्टाईन | लेफ्टे. जन. वॉचोपी | ब्रिटिश हाय कमिशनर | ६१ | १९३१ |
| पनामा | डॉ. एच. आरीअस | अध्यक्ष (४ वर्षांकरितां) | ४९ | १९३२ |
| पॅराग्वे | डॉ. इ. अयाला | ,, | ६० | ,, |
| पर्शिया | मिर्झा रेझा पेहलवी | शहा | ५७ | १९२५ |
| पेरु | मेजर-जन. बेनाव्हीडस | अध्यक्ष | | १९३३ |
| पोलंड | प्रो. आय. मोसिस्की | अध्यक्ष (१९४० पर्यंत) | | १९२६ |
| पोर्तुगाल | जनरल ए. कारमोना | अध्यक्ष | ६६ | १९२६ |
| रुमानिया | कॅरोल २ रा | राजा | ४२ | १९३० |
| रशिया | व्ही. एम. मोलोटॉव्ह | सोव्हिएट कमिसारांचा मुख | | १९३१ |
| एल. सॅल्व्हॅडोर | जनरल एम. एच. मार्टिनेझ | अध्यक्ष | | १९३१ |
| सयाम | प्रजादीपक | राजा | ४२ | १९२५ |
| अँग्लो इजिप्शीयन सूदान | सर जॉर्ज साइम्स | गव्हर्नर जनरल | ५३ | १९३३ |
| दक्षिण आफ्रिकेचें युनियन | अर्ल क्लॅरेंडन | ,, ,, | ५८ | १९२४ |
| | जे. बी. एम. हर्टझॉग | मुख्य प्रधान | | |
| स्पेन | एन. ए. झामोरो | अध्यक्ष | ५८ | १९३१ |
| स्वीडन | गुस्ताफ ५ वा | राजा | ७७ | १९०७ |
| स्वित्सरलँड | रुडोल्फ मिंजर | अध्यक्ष (१ वर्षांकरितां) | | १९३४ |
| सीरिया (फ्रेंच हुकमत) | कौंट मार्टेल | हाय कमिशनर | | १९३३ |
| ट्रान्स–जॉर्डन | अब्दुल्ला | अमीर | ५३ | १९२१ |
| ट्यूनीस | सिद्दी अहमद | बे | | १९२९ |

| देशाचें नांव | शास्त्याचें नांव | शास्त्याचा प्रकार | वय | शास्त्र-वर्ष |
|---|---|---|---|---|
| तुर्कस्थान | मुस्ताफा केमालपाशा | अध्यक्ष | ५५ | १९२३ |
| युनायटेड स्टेटस (अमेरिका) | एफ्. डी. रुझवेल्ट | १९३७ पर्यंत अध्यक्ष | ५३ | १९३३ |
| युरुवे | डॉ. जी. टेरा | अध्यक्ष (४ वर्षांकरितां) | ६२ | |
| व्हॅटिकन शहर संस्थान | पोप पायस ११ वा | पोप व सर्व सत्ताधिकारी | ७८ | १९२२ |
| व्हेनीझूला | जनरल जे. गोमेझ | अध्यक्ष (७ वर्षांकरितां) | ७८ | १९३१ |
| यूगोस्लाव्हिया | पीटर २ रा | राजा--तीन रीजंट राज्य-व्यवस्था पाहतात. | १२ | १९३४ |
| झांजिबार | सय्यद खलीफा इब्न हरुब | सुलतान | ५६ | १९११ |

## आजरें-प्रकरण

आजरें प्रकरण अजून संपलेलें नाहीं. कोल्हापूर सरकारानें कमिशन बसवून निकाल दिला; पण प्रसिद्ध झालेल्या हकीकतीवरून दिसतें कीं इचलकरंजीकरांचें अपील होत आहे. अर्थात् प्रकरण चालू असल्यामुळें मूळ हकीकत अजून टिकून आहे असें समजावयास हरकत नाहीं.

इचलकरंजी संस्थानपैकीं आजरें गांवीं तेथील कबरस्तान व इदगा याचे आसपास संस्थानचे हद्दींत मुसलमानांनीं पिंपरणीचीं नवीन झाडें गेल्या वर्षीं लावलीं; त्यांचा पंचनामा करण्याकरितां इचलकरंजीचे पाटील-कुलकर्णी ता. १४-१२-३४ रोजीं गेले असतां मुसलमानांनीं त्यांस हरकत केली, व आजऱ्याचे मामलेदारांचे घरीं जाऊन दंगामस्ती केली; व त्यांचा हेतु मामलेदारांवर हल्ला करण्याचा होता. पण सुदैवानें मामलेदार परगांवीं होते व हा प्रकार कळतांच ते परस्पर इचलकरंजीस गेले. पुढें इचलकरंजीचे ॲडमिनिस्ट्रेटर ले. क. फिरअर व कोल्हापूरचे कांहीं अधिकारी यांनीं २१ डिसेंबर रोजीं मुसलमानांची समजूत घातली व दुसऱ्या दिवशीं पंचनामा झाला. पुढें ता. ८ जानेवारी १९३५ रोजीं इचलकरंजीचे कारभारी, दोन मॅजिस्ट्रेट व आजऱ्याचे मामलेदार सशस्त्र पोलिसांसह ता. १४ डिसेंबर रोजीं पंचनाम्यास हरकत करून दंगा करणाऱ्या मुसलमानांना पकडण्याकरितां गेले. गांवाचे बाहेरील एका मुसलमान हॉटेलवाल्यास पकडल्याचें गांवांत कळतांच सुमारें दोनशें मुसलमान सायुध पुरुष, स्त्रिया व मुलें यांचा जमाव अंमलदारांना आड आला. त्यांना अधिकाऱ्यांनीं सामोपचाराच्या गोष्टी सांगून आरोपींना पकडण्याच्या आड न येण्याविषयीं सांगितलें पण मुसलमानांनीं तें ऐकलें नाहीं. उलट शिवीगाळ करून दंग्याची भाषा करूं लागले. त्यामूळें अधिकाऱ्यांनीं सुरवातीस फुसक्या गोळ्या झाडल्या; तरीही मुसलमान ऐकेनात, उलट दगडझोक करूं लागले; अधिकाऱ्यांस मार बसूं लागला, तेव्हां गोळीबार केल्याशिवाय लोक पांगणार नाहींत असें पाहून अधिकाऱ्यांनीं पोलिसाकडून अकरा फैरीत ६६ गोळ्या झाडविल्या. त्यामुळें एकूण ११ मुसलमान मेले व वीसबावीस जखमी झाले. मुसलमान जमावाची पांगापांग झाली व भयंकर दंगा टळला. इचलकरंजीच्या अंमलदारांनीं मृतांचें दफन करविलें व जखमी झालेल्यांना दवाखान्यांत पोंचविलें. दुसरे दिवशीं कोल्हापुराचे दिवाण तेथें येऊन मुसलमानांचे इच्छेप्रमाणें जखमी मुसलमानांस त्यांनीं कोल्हापुरास नेवविलें. पुढें कोल्हापूर दरबारनें नेमलेल्या कोल्हापुरचे दिवाण व कर्नल रसेल यांच्या कमिटीच्या सदर प्रकरणाबाबतच्या रिपोर्टाप्रमाणें सदर प्रकरणांत संबंध असलेले इचलकरंजीचे कांहीं अधिकारी काढण्यांत येऊन, व मृत व जखमी मुसलमानांस नुकसानभरपाई व पोटगी वगैरे देण्याचा हुकूम कोल्हापुर दरबारकडून झाला. ह्या प्रकरणांत आजऱ्याच्या मुसलमानांना कोल्हापुराकडूब फूस होती असें म्हणतात. कोल्हापुरच्या निकालाविरुद्ध इचलकरंजीच्या ॲडमिनिस्ट्रेटरांनीं स्वतंत्रपणें दक्षिणी संस्थानच्या एजंटमार्फत हिं. सरकारकडे रिपोर्ट केला आहे असें कळतें.

---

## कराची येथें मुसलमानांचा दंगा

पंडित नथूराम यांनीं महंमद पैगंबरासंबंधानें आक्षेप्य मजकूर लिहिला या आरोपावरून त्यांजवर खटला झाला. त्यांत त्यांना शिक्षा झाली. जामिनावर खुले होऊन त्यांनीं अपील केलें. या अपिलाच्या कामासाठीं ते कोर्टांत बसले असतां व कोर्टांत शेकडो लोक वावरत असतां अबदुल क्वायम या नांवाच्या एका मुसलमानानें त्यांच्यावर अनवस्था हल्ला केला व त्यास भोंसकून ठार केलें. आपण हें एक मोठें धार्मिक महत्कृत्य केलें असा त्याचा समज झाला. क्वायमला फांशीची शिक्षा झाली व बरीच भवति-न-भवति होऊन त्यास फाशीं देण्यांत आलें. त्याचा दफनविधि झाल्यावर त्याच्या प्रेतदर्शनासाठीं मुसलमानांच्या झुंडीच्या झुंडी लोटूं लागल्या. त्या

प्रेताची मिरवणूक काढण्याचाही त्यांनीं आग्रह धरला. हा प्रकार होऊं दिला असता तर कराची शहरांत प्रळयच झाला असता. सरकारी अधिकाऱ्यांचें असें मत पडल्यामुळें त्यांनीं, हा मुसलमान समाजाचा आग्रह मोडावा म्हणून, गर्दी मोडण्याचें काम सुरू केलें. मुसलमान लोक बेताल होऊन पोलिसांवर गर्दी करूं लागले व अधिकारी लोकांना मार बसूं लागला. त्याबरोबर पोलिसांनीं फैरी झाडल्या व दीडदोनशें मुसलमान मरण पावले. हा गोळीबार विनाकारण झाला व म्हणून अधिकाऱ्यांची चौकशी व्हावी असा हट्ट पुष्कळांनीं धरला व शौकतअल्लींनीं तर कमिटी नेमून स्वतंत्र चवकशी करण्यासही कंबर बांधली. पार्लमेंटपर्यंत हें लोण पोहोंचलें. पण सरकारनें ' झालें आहे तें बरोबरच न्याय्य झालें आहे ' असें निकालाचें सांगून टाकलें व स्वतंत्र कमिटीला चौकशीचा कसलाही अधिकार नाहीं असें मुसलमानांस बजाविलें. शौकतअल्ली यांना कराचीकडे फिरकण्यासही सध्यां प्रतिबंध आहे.

---

## लाहोरचें शीख-मुसलमान भांडण

लाहोरच्या शीख मुसलमानांच्या वितुष्टाची हकीगत सर्वप्रसिद्ध आहे. शाहीदगंज गुरुद्वाराच्या आवारांत जी मशिद होती ती शिखांनीं पाडून टाकली. यामुळें तेथें मुसलमानांचा मोठाच दंगा झाला. वास्तविक या इमारतीवर आज दीड-पावणेदोनशें वर्षें शीखांचाच हक्क आहे व तो पुन्हां पुन्हां कायद्यानें शाबित झाला आहे. तथापि मुसलमानांनीं मोठाच दंगा केला. पोलिसांनीं गोळीबार करून दंगेखोरांना पिटाळून लावलें. गोळीबारानें वरेच मुसलमान मेल्यामुळें त्या समाजांत मोठाच क्षोभ झाला व असें दिसूं लागलें कीं या ज्वाळा पंजाबांत पसरत जाणार पण इतक्यांत मुसलमानी धर्माच्या पुढाऱ्यांनीं आपला फतवा काढून दंग्याची उचल करणारांना अगदीं मूर्ख ठरविलें. उलेमांच्या मतें "या मशिदीसाठीं मुसलमानांनीं ही जी चळवळ सुरू केली व जिच्यापायीं इतके मुडदे पडले तिला कसलाहि आधार नाहीं. ही मशीद 'मशिद' नाहींच. पूर्वीं कधीं असली तर इतकीं वर्षें ती शिखांच्या ताब्यांत राहिल्यामुळें अपवित्र बनली आहे व म्हणून तिच्यासाठीं मुसलमानांनीं इतका हमामा करण्याचें कारण नाहीं." या फतव्यामुळें मुसलमान समाजाला दंगा करावयास जें एक निमित्त सापडलें होतें तें त्यांच्या हातून अचानक गेलें व त्यास तोंडघशी पडल्यासारखें झालें. मुसलमानांची समजूत काढण्यासाठीं सरकारनें त्यांना एक सरकारी इमारत, कीं जेथें पूर्वीं मशिद होती, ती देऊं केली होती ! पण आतां उलेमांनींच हें मुसलमानांचें भांडण अगदीं खोटें आहे असें जाहीर केल्यामुळें सरकारलाही फसल्यासारखें झालें असेल !

---

